भारत इतिहाससंशोधक मंडळ-पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक ८

# ऐतिहासिक पोवाडे

किंवा

## मराठ्यांचा काव्यमय इतिहास

## ( भाग पहिला )

" शूर मर्दांचे पोवाडे । गुळाविण गोड साखरेचे खडे "

— सत्तू अज्ञान.

यशवंत नरसिंह केळकर

बी. ए. ( टिळक )

१९२८.

पृष्ठें १ ते ४८६ विजय प्रेस पुणें येथें छापिली. व बाकी सर्व मजकूर
म्हणजे टायटल पेज, पुरस्कार, अनुक्रमणिका, प्रस्तावना स्वरलेखन
वगैरे, श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स, पुणें येथें छापला. व ग्रंथ
य. न. केळकर यानी ५५४ सदाशिव पुणें येथे
प्रसिद्ध केला.

# आभार

सतत दोन वर्षे केलेल्या श्रमाला अल्पस्वल्प कां होईना पण दृश्यफळ येत आहे याबद्दल आनंद होणे साहाजिक आहे. अशा आनंदाचें वेळी आभारप्रदर्शनाचे काम अधिकच सुखकर वाटते. या उद्योगात मला अनेकांचे अनेक रीतीनें सहाय्य झालें. श्रीयुत सदाशिवराव दिवेकर यांनीं शितूतांच्या पोवाड्यांच्या संग्रहाची सर्वस्वी दुर्मिळ प्रत लगेल तितके दिवस अभ्यासण्याकरितां दिली. श्रीयुत रङ्गीशास्त्री यांनी त्यांचे संग्रही असलेली रामजोशांची जुनी अस्सल बाडे माझे हवालीं केलीं. रा विनायकराव भावे व रा. माधवराव भावे या एका इतिहासप्रसिद्ध घराण्यांतील पितापुत्रानी या विषयाला कांहीं उपयोगी पडणारे जुने अस्सल कागदपत्र अभ्यासण्याकरितां दिले, श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार यानी शितूतांच्या संग्रहाप्रमाणेच दुर्मिळ महत्वाचे असे पोवाड्याचे पुस्तक मिळवून दिलें,इतिहाससंशोधक श्रीयुत शंकरराव जोशी यानी मिळविलेल्या रामजोशाच्या अस्सल सनदांचा पूर्ण उपयोग मला करूं दिला. श्रीमंत सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे व प्रो.दत्तो वामन पोतदार यानी प्रसंगविशेषी उपयुक्त सूचना केल्या व माहिती मिळण्याची काही स्थळे दाखवून दिली.

श्रीयुत रा. रा. दत्तात्रय विष्णु आपटे यानी आपला वेळ मोडून माझे हे पुस्तक प्रस्तावनेसुद्धां आमूलाग्र वाचलें, चर्चा केली व उपयुक्त सूचना केल्या याबद्दल मी त्यांचा फार फार ऋणी आहे. जमखंडीचे रा. भाऊराव आपटे वकील यानी जुन्या हत्यारांची माहिती मिळविण्यास फार मदत केली. गु. प्रो. कृष्णराव मुळे पुणें व गु. केशवबुवा मटंगे सातारा यांनीं पोवाड्यांच्या स्वरलेखनाच्या महत्त्वाच्या बाबतीत जी मदत केली त्या बद्दल मी त्यांचा फार फार ऋणी आहे. त्यांच्या आपुलकीच्या मदती शिवाय जुन्या चाली जगविण्याच्या अत्यंत आवश्यक प्रयत्नास मला सुरवातच करता आली नसती. या पुस्तकातील शेवटची तीन नोटेशन्स गु. मटंगे यानी करून दिली आहेत. बाकीची सर्व गु. मुळे यांची आहेत.

श्रीयुत विनायकराव गोखले, श्री. त्रिंबक बाळकृष्ण बरवे या माझ्या स्नेह्यानी केलेल्या मदतीबद्दल मी त्यांचे आभार मानले तर त्यांना रुचणार नाही; पण त्यांचा उल्लेख अवश्य कर्तव्य आहे. रा. गोखले यांनीं शब्दसूची करून दिली, प्रुफें तपासली. त्याचप्रमाणे रा. बरवे यानी सुवाच्य व टापटीपीनें प्रेस कॉपी करणें, प्रुफे तपासणे वगैरे हरएक कामें करण्यास मदत केली. रा. चिं. य. मराठे यानीही कांहीं सूचना केल्या त्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे. दुर्मीळ पुस्तकांचे बाबतीत अनेकांकडून बहुमोल मदत झाली. त्यांचे आभार मानावे तितके थोडेच.

असो. सरतेशेवटी ज्या पितृरूप शक्तीच्या प्रोत्साहनावर, आधारावर व धीरावर मला हे कार्य एकाग्रतेने पार पाडतां आले तिच्या चरणीं मस्तक नम्र करून ही विषयाची नव्हे पण पुस्तकाची छोटी प्रस्तावना पुरी करतों.

ग्रंथकर्ता.



# अर्पणपत्र

कैलासवासी श्रीयुत शंकर तुकाराम शालिग्राम व गोविंद
बल्लाळ शितूत—केवळ ज्यांच्याच प्रथम प्रयत्नांनी
पोवाड्यांचे भांडार उपलब्ध झाले—त्यांना व
त्यांच्या संग्रहातील ऐतिहासिक माहिती सर्वस्वी
बरोबर आहे हें ज्यानीं उपलब्ध केलेल्या
समकालीन अस्सल कागदपत्राच्या
पुराव्यानें ठरवितां आले त्या खरे
राजवाडे आदि सर्व इतिहास
संशोधकांना—हे पुस्तक
आदरभावाने अर्पण
केले आहे.

*

# अनुक्रमाणिका



---

# पुरस्कार.

भा. इ. सं. मंडळ पुरस्कृत ग्रंथमालेची लोकप्रियता सारखी वाढत आहे असें स्पष्ट दिसतें. शिवभारत, हिंदी शिल्पशास्त्र इत्यादि अपूर्व ग्रंथ या मालेंत नुकतेच दाखल झाले आहेत. त्याच्याच पाठोपाठ रा. यशवंत नरसिंह केळकर यांचा वरील ग्रंथ बाहेर येत आहे. हा ग्रंथ वाङ्मय व इतिहास या दोहींच्या भोक्त्यांस अनेक दृष्टींनी अपूर्व वाटेल अशी खात्री वाटते. आणि असा सुंदर ग्रंथ मोठ्या परिश्रमानें तयार करून रा. केळकर यांनीं तो भा. इ. सं. मंडळाच्या पुरस्कृत ग्रंथमालेंत दाखल करण्याची उत्सुकता दर्शविली याबद्दल त्यांचे सानंद आभार मानले पाहिजेत.

या ग्रंथांत जुने ऐतिहासिक पोवाडे निवडून त्यांच्या पाठांची मोठ्या परिश्रमानें आणि कौशल्यानें चिकित्सा करून, अर्थबोधक व अवांतर टीपा जोडून वगैरे अनेक रीतींनीं ग्रंथ होईल तेवढा उपयुक्त करण्याचा प्रयत्न केळकर यांनीं मोठ्या कसोशीनें केला आहे असें कोणासही दिसून येईल. या पुस्तकाला त्यांनीं मोठी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे ती वाचली असतां त्यांनीं वाङ्मयेतिहासाचीं फार नांवाजण्यासारखीं कामगिरी केली आहे आणि त्यांच्यासारखे तरुण, उत्साही, बुद्धिमान व कष्टाळु शोधक व चिकित्सक पुढे येत आहेत हें त्यांस भूषणावह आणि आपणांस फार संतोषावह होय यांत संशय नाहीं. आपल्या प्रस्तावनेंत रा. केळकर यांनीं ठिकठिकाणीं इतिहाससंशोधकांनीं पोवाडे—संशोधनासंबंधानें केलेल्या दुर्लक्षाविषयीं उल्लेख करून त्यांना विनंती व सूचना केलेल्या आहेत पण आमचें त्यांना असें सांगणें आहे कीं त्यांनीं असें बाहेर बाहेर न राहतां इतिहाससंशोधकांतच यावें म्हणजे हें काम मनाजोगें होईल. आम्ही तरी हेंच पहात आहोंत कीं संशोधनाच्या ज्या अनेक शाखा आहेत त्यांचा सांभाळ करणारे रा. केळकरासारखे नव्या दमाचे व लायख असे गृहस्थ अधिकाधिक लाभावेत. अजून पुष्कळ शाखांकडे दुर्लक्ष होत आहे. आपल्या महाराष्ट्रेतिहासाविषयीं बोलावयाचें तर येथील. म्हणजे महाराष्ट्रांतील देवळें, देव व देवधर्म, तसेंच जुने वाहतुकीचे रस्ते, जुनें शिल्प, ( घरें, किल्ले, देवळें

इत्यादिकांची बांधणी ) व्यापाराचीं साधनें पद्धति, हिशेब व पद्धति, पेढयांचे व्यवहार, परदेशांशीं संबंध, चालीरीति, धर्मव्यवहार, इत्यादि एक ना दोन अनेक शाखांच्या अभ्यासास सुरवातहि म्हणण्यासारखी झालेली नाहीं. कै. राजवाडे यांनीं आपल्या लेखांतून याविषयीं उहापोह केला आहे. आणि **मराठ्यांचा सांगोपांग सर्वांगीण इतिहास** लिहिला जावा अशी जर इच्छा असेल तर **आधीं** हजारों बाबींचा, वृत्तांचा, व व्यवहारांचा भरपूर उलगडा अस्सल व विश्वसनीय साधनांच्या आधारें विवेचनपूर्वक झाला पाहिजे असें त्यांचें ठाम मत होतें. किंबहुना याच हेतूस्तव महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचें त्यांनीं अंगावर घेतले नाहीं. याचा परिणाम असाही झाला कीं कांहीं अविवेकी टीकाकारांनीं ते या महत्कार्यास अपात्र होते असेंही भरकटण्यास कमी केलें नाहीं ! सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं महाराष्ट्राचा जेवढा व्याप होता तेवढ्या संपूर्ण व्यापाचें हुबेहूब प्रतिबिंब ज्यांत पडेल तो इतिहास आपणांस इष्ट होय आणि जसें एखाद्याच्या चेहेऱ्याचें उत्कृष्ट चित्र काढतांना त्यावरील सुरकुत्या, केंसाची लव वगैरे सर्व बारीक सारीक गोष्टी सुद्धा अप्रतिम आणि बिनचूक रेखाटल्या जाव्या असें आपण अपेक्षूं तोच न्याय अभियुक्त व प्रमाण इतिहासासही लागू केला पाहिजे.

या पुरस्काराचे प्रयोजन फक्त ग्रंथाचें महत्त्व सूचित करण्यापुरतेंच आहे. पुरस्कृत ग्रंथमालेच्या योजनेंत ग्रंथकाराच्या विवेचनाच्या तपशीलाची जबाबदारी अर्थात् ग्रंथकारावर असणार. रा. केळकर यांनीं लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावनेंत आणि दिलेल्या टीपात शेकडो बाबींविषयीं त्यानी लिहिलें आहे. तें सर्वच बरोबर असेल किंवा सर्वांस पटेल अशी अपेक्षाच करणें वाजवी होणार नाही. एवढ मात्र निःसंशय म्हणतां येईल कीं, केळकरांनी या ग्रंथांत केला आहे एवढा परिश्रम, एवढी सूक्ष्मता या पोवाडे—वाङ्मयासंबधीं आजवर महाराष्ट्र वाङ्मयांत एकानेंहि दर्शविलेली दाखवून देतां येणार नाहीं. आणि म्हणूनच केळकरांचा हा ग्रंथ या विषयांतील पहिलीं नमुनेदार प्रयत्न म्हणून सर्वांस मान्य होईल अशी अपेक्षा आहे.

रा. केळकरांनीं जसें पोवाड्याकडे लक्ष्य लाविलें आहे तसेंच त्यांनी भाट व त्यांच्या बाण्या व कबित्तें आणि जुनीं लोकगीतें—रा. मुंडले यांनी जमा केलेलीं

अशी लोकगीतें भा. इ. सं. मंडळानें बरींच प्रसिद्ध केलीं आहेत-यांजकडेहि लक्ष्य पुरवावें. हें सर्व वाङ्मय एकाच शाखेंतलें आहे.

टीकाकार व चिकित्सक यांस मुद्दाम एक विनंती करावीशी वाटते कीं ज्याप्रमाणें इतिहासांत काव्य असूं शकेल त्याप्रमाणेंच काव्यांतहि इतिहास असूं शकतो आणि रा. केळकर यांचें विवेचन वाचून एवढी गोष्ट पुष्कळांस खात्रीपूर्वक पक्की पटली तरी पुष्कळ कार्य झालें असें म्हणतां येईल.

आणखी एक मुद्दा येथें सुचला तो लिहितों. पूर्वी बहुतेक लिहिणें मोडींतच होई, बालबोध ऊर्फ देवनागरी लिपी हिचा उपयोग शास्त्री पंडितच फार करीत शिवाय बालबोध लिपीचा उपयोग व्यावहारिक कामाकरितां फार क्वचित् होई. पवित्र धर्मग्रंथ, संतांची कवनें वगैरे यांचे लिखाणास बालबोध लिपीचा आश्रय बाहुल्यानें करण्यांत येत असे. यामुळें साधारण लोकांत व परकीयांत तर **मोडी म्हणजे मराठी** असाच समज व भाषा रूढ झाली होती अगदी अव्वल इंग्रजींत मिशनरी लोकांच्या व इतर बॅलंटाइन् सारख्या इंग्रजांच्या लिहिण्यावरून कोणासहि स्पष्टपणें प्रतीत होईल.

पोवाडे वगैरे वाङ्मय मोडींतच लिहिलेलें बहुतकरून आढळतें त्यामुळे अपपाठांचा संभव पुष्कळच वाढतो. मूळ रचणारे, लिहिणारे, ऐकणारे व पुढें नकला करणारे यांत बहुधा अल्प शिक्षितांचाच भरणा फार आणि खेरीज हे सर्व वाङ्मय तोंडातोंडीं पसरणारें त्यामुळें मूळ पाठांचें खोबरें व्हावें यांत नवल नाहीं. पाठांची ही दुर्दशा रा. केळकर यांनीं हलकी करण्यासाठीं खरोखरच फार अभिनंदनीय आणि यशस्वी उद्योग केला आहे असें या ग्रंथावरून दिसून येईल.

संशोधनाचें काम आहे. त्यांत जितकें बारीक पहावें तितकें थोडें. हें पहाणें आणि शोधकर्म कधींच संपत नाहीं. आणि यामुळें संशोधनकर्म हें अखंड कर्म आहे तें कधींच पूर्ण व्हावयाचें नाहीं. तथापि ज्या क्षणाला संशोधक लिहितो त्याक्षणीं जेवढा शोध शक्य असेल तेवढा करून त्यानें आपलें काम प्रामाणिकपणानें व काळजीनें करून तेवढयापुरतें तरी पूर्ण अथवा 'थरो' संज्ञेला पात्र होईलसें केलें पाहिजे. कै० रा. भावे हे एक अत्यंत बारीक नजरेचे संशोधक होते यांत काहीं संशय नाहीं आणि तसा बाणाही ते मिरवीत हें सर्वप्रसिद्ध आहे. त्यांच्यासारख्यांच्या लेखांत अगदींच सैल विधानें वास्तविक

सांपडूं नयेत ही अपेक्षा कोणीही वाजवी म्हणेल परंतु पोवाड्याचे प्रकरणीं ही अपेक्षा रा. केळकर यांनीं व्यर्थ ठरविली आहे !

असो. रा. केळकर यांनीं शुद्धलेखनाची जी पद्धति अनुसरली आहे तिची हि जबाबदारी त्यांवरच आहे.

रा. केळकर यांचा हा ग्रंथ पुरस्कृत करण्यास मंडळास फार आनंद वाटतो आणि असे प्रसंग ते वारंवार मंडळास आणून देतील अशी बळकट आशा आहे.

वैशाख शु॥ ५
१८५०
पुणें.

दत्तो वामन पोतदार.
चिटणीस भा. इ. सं मं.

# प्रस्तावना

## संकलनाचा इतिहास

पोवाड्यांचें महत्त्व ओळखून ते छापून काढण्याचें महत्त्वाचें काम १८६९ सालापर्यंत कोणी केलें नव्हतें. या सालीं सुप्रसिद्ध विविधज्ञान-विस्तार मासिकाचा जन्म झाला; व नंतर या मासिकानेंच प्रथम पहिला पोवाडा छापून काढला. १८७२ मध्यें नारायणरावाच्या वधाचा, १८७५ मध्यें कोल्हापूरकर आबासाहेब यांच्या खुनाचा, १८७७ मध्यें बाळा लक्ष्मण शाहीराचा खर्ड्यांचा, १८७८ मध्यें सातारकर जंगली राजाच्या जन्माचा व १८७९ मध्यें प्रभाकर शाहीराचा खर्ड्यांचा, याप्रमाणें पोवाडे या मासिकांत छापून निघाले.

याच सुमारास विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनींही आपल्या निबंधमालेंत रामा सटवा शाहीराचा "भाऊसारखा मोहोरा" हा उत्कृष्ट पोवाडा व बाजीरावाच्या निधनाचा दुसरा एक पोवाडा मिळवून छापला. शास्त्रीबोवाना पोवाडे लावण्या ऐकण्याचा फार छंद होता. स्फूर्तिदायक राष्ट्रीय काव्य म्हणून, इतिहासाचें एक महत्त्वाचें साधन म्हणून व शब्दसमृद्धीचें एक निधान म्हणून पोवाड्यांचें महत्त्व चिपळूणकरांनीं अचुक ओळखलें होतें. आपल्या भाषेला जोर यावा व ती परिणामकारक वठावी म्हणून ते त्या दृष्टीनें पोवाडे व लावण्या यांचा फड सहसा चुकवीत नसत, अशाविषयीं टिळकांच्या आठवणीच्या पुस्तकांत एकानें दिलेली साक्ष प्रसिद्धच आहे.

चिपळूणकरांच्या पूर्वी इतिहाससंशोधनाची मोहीम निघालेली नव्हती. खरेंच बोलावयाचें तर त्या काळीं इतिहासाचा कांहीं मागमूससुद्धां नव्हता; मराठी इतिहाससंशोधनाचा मुख्य मोठा प्रयत्न त्यांच्याच स्फूर्तीनें प्रथम सुरू झाला. त्यांनींच साने व मोडक यांच्या साहाय्यानें काव्येतिहास-संग्रह मासिक सुरू केलें. 'माहिती कितीही क्षुल्लक वाटली तरी तिचा नीट संग्रह करून ठेवावा, कां कीं, कधीं कधीं एखाद्या अशा क्षुल्लक गोष्टींतहि असें तात्पर्य असेल कीं तिच्या योगानें कदाचित् इतिहासहि फिरूं शकेल' हा बीजमंत्र प्रथम सांगणाऱ्या चिपळूणकरांना पोवाडयांचें ऐतिहासिक दृष्टीनें महत्त्व किती आहे हें पूर्णपणें पटलें असले पाहिजे आणि म्हणूनच त्यांनीं

पोवाडे मिळवून निबंधमालेंत छापण्याचा उपक्रम केला. ज्या शाळिग्रा-मांचें नांव आज पोवाड्यांशीं जवळ जवळ एकजीव झालेलें आहे त्यानाहि प्रथम स्फूर्ति देणारे चिपळूणकरच होत. काव्य, इतिहास, भाषा, या तीनहि दृष्टींनीं पोवाड्यांचें महत्त्व केवढें आहे हें त्यांच्याच संगतींत शाळिग्रामांना प्रथम कळलें; व मागाहून तोच पोवाडे मिळविण्याचा अविश्रांत उद्योग करून मराठी पोवाड्यांचा 'उद्धारक' असें त्यांनीं म्हणवून घेतलें.

विविधज्ञानविस्तार, निबंधमाला किंवा काव्येतिहाससंग्रह या तीन मासिकांनीं पोवाड्यांच्या संशोधनाचा पाया घातला असला तरी तो त्यांचा मुख्य उद्देश नव्हता. यामुळें पोवाड्यांचें त्वरित व विपुल संशोधन होण्या-सारखें नव्हतें. पण सुदैवानें याच सुमारास चिपळूणकरांचे स्नेही शंकर तुकाराम शाळिग्राम यांनीं हें कार्य करण्यास स्वतःस वाहून घेतलें. शाळि-ग्राम यांना लहानपणापासूनच पोवाडे लावण्या ऐकण्याचा विलक्षण शोक होता. पुढें चिपळूणकरांच्या संगतींत त्यांचें महत्त्व मनावर बिंबल्यामुळें या वाङ्मयावर त्यांची विशेषच भक्ति बसली. त्यांनीं शेंकडोशें फड पाहिले होते. व ठिकठिकाणच्या गोंधळ्यांकडून पोवाडे ऐकण्याची हौस पुरवून घेतली होती. १८७९ सालीं त्यापैकीं कांहीं पोवाडे जमवून त्यांनीं एक पोवाड्यांचा संग्रह प्रसिद्ध केला. मराठींतील पहिला महत्त्वाचा संग्रह हाच होय. या संग्रहांत ४३ पोवाडे छापलेले असून त्यांत नारायणरावाच्या वधाचा मूळ ७ चौकी अस्सल पोवाडा व दुसऱ्या बाजीरावाच्या वनवासा-संबंधींचे अत्युत्कृष्ट चार पांच पोवाडे—जे पुढें ऑक्वर्थ साहेबांच्या सल्ल्या-मुळें पुढच्या आवृत्तींत गाळण्यांत आले ते—संग्रहीत झालेले आहेत.

त्यानंतर मराठी इतिहासाच्या सुदैवानें व शाळिग्रामांच्या पोवाड्यां-वरील निष्ठेच्या पुण्याईने मराठी पोवाड्यांच्या उद्धाराला एका विद्वान इंग्रज अधिकाऱ्याची मोठीच मदत झाली. हे इंग्रज अधिकारी म्ह. उप-रोक्त ऑक्वर्थ साहेब होत. साहेबमजकुराना मराठ्यांच्या इतिहासाबद्दल व त्यांच्या पराक्रमाबद्दल फार आदर होता. व मराठ्यांच्या इतिहासाचें एक साधन म्हणूनच हे पोवाडे जमविण्याचा व त्यांचा अभ्यास करण्याचा नाद त्यांस लागला होता. हे गृहस्थ विद्याव्यासंगी व परिश्रम करणारे होते व पोवाडे जमविण्याचा उद्योग शाळिग्रामाप्रमाणेंच त्यांचा स्वतंत्रपणें

चालला होता. पण त्यांना या विषयाची आवड असली तरी जबाबदारीचें सरकारी काम संभाळून फुरसतीच्या वेळांतच त्याना हा उद्योग करावा लागे त्यामुळें तो नावारूपाला येण्याचा संभव नव्हता. पण सुदैवाने वर सांगितलेलें शाळिग्रामांचे पोवाड्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर साहजिकच साहेब मजकूर चकित झाले व त्यांनीं शाळिग्रामांची मुद्दाम ओळख करून घेऊन पोवाड्यांच्या संशोधनाचें हें काम दोघांनीं मिळून एकत्र करावें असे आपसांत ठरविलें. यामुळें फारच फायदा झाला. निष्ठा, कळकळ व लागेल तितके परिश्रम करण्याची तयारी शाळिग्रामांजवळ भरपूर होती; परंतु पैसा नव्हता अधिकार नव्हता किंवा अधिकाऱ्यांचा वशिलाहि नव्हता. उलट साहेब मजकुरांजवळ पैसा होता व मोठा अधिकारहि हातांत होता; पण फुरसत नव्हती. शिवाय ते इंग्रज पडल्यामुळें जुनाट अडाणी मराठी भाषेचें ज्ञान त्यांना असणें उघडच शक्य नव्हतें. भाषेचा प्रश्न सोडला तरी इतिहासाचेंहि ज्ञान त्यांना तितपतच होतें. याचें एक उदाहरण पहा. 'बॅलड्स् ऑफ् दि मराठाज्' या इंग्रजी भाषांतरित पोवाड्यांच्या पुस्तकांत ९० पानावर खडकीच्या पोवाड्यास दिलेल्या प्रस्तावनेंत ते लिहितात "The last of the Beshawas Bajirao the posthumous son of the murdered Narayanrao had for his confident a rascal named Trimbakji." (म्ह. नारायणरावाच्या वधानंतर जन्मलेला त्याचा 'निधनोत्तर' पुत्र शेवटचा पेशवा बाजीराव (!) याच्या अगदी विश्वासातला दोस्त कोण ? तर पाजी त्रिंबकजी ) अर्थात् सद्बुद्धि, आवड वगैरे गुण असूनहि ते या कामाला नालायकच ठरले असते.

असो. ही परस्परांचीं व्यंगें परस्परांच्या देवघेवीने नाहीशी झाली व दोघांच्या कर्तृत्वशक्ति एकत्र झाल्यामुळें कार्याचा गाडा भराभर चालू लागला. १८८७ त पोलिटिकल एजंट म्हणून ऑक्वर्थ साहेबांची साताऱ्यास बदली झाल्यामुळें तर मोठी सोय झाली. त्यांचा नवा अधिकार या कार्याच्या दृष्टीनें फार उपयुक्त होता. शिवाय त्यांनीं तत्कालीन गव्हर्नराचें शिफारसपत्र मिळवून पोवाड्यांच्या संशोधन कार्याला मदत करण्याविषयीं संस्थानिकांना पत्रें लिहिलीं, त्याचाही उपयोग झाला. ऑक्वर्थ साहेबांनीं लागेल ती मदत द्यावी व गांवोगाव फिरून शाळिग्रामांनीं

गोंधळ्यांकडून पोवाडे मिळवावे असा उद्योग सुरू झाला व १८९० सालीं जुने नवे पोवाडे एकत्र करून व त्यात निवड करून पोवाड्यांचा एक नवीन संग्रह ऑक्वर्थ–शाळिग्रामांच्या नावानें प्रसिद्ध केला गेला. त्याच्याच आजतागायत ३।४ आवृत्या निघाल्या आहेत. लोकांच्या पूर्ण परिचयाचे असे पोवाड्यासंबधीं जें एकच एक पुस्तक आहे तें हेंच होय.

शाळिग्राम ऑक्वर्थ यांच्या सफल प्रत्नामुळें इतर काही लोकानांहि स्फूर्ति मिळाली. त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर गोविंद बल्लाळ शितूत शाळामास्तर, कोल्हापूर, या गृहस्थांनीं 'जुन्या इतिहासाची विश्वसनीय' माहिती उपलब्ध करण्याच्या बुद्धीनें पोवाडे जमविण्याचा उद्योग सुरू केला. पाचसात वर्षें ते पोवाडे मिळविण्याकरता कोल्हापूर प्रांतात फिरत होते. 'जेथें जेथें पोवाडा कोणास येत असल्याचें ऐकिवांत आलें तेथें तेथें जाऊन' हरप्रयत्नांनें तें त्यांनीं लिहून काढले व अशारीतीनें सुमारें १०० अगदीं नवीन पोवाडे त्यांनीं मिळविले. हा त्यांचा संग्रह अतिशय बहुमोल आहे. त्यातला पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत झालेल्या डभईच्या लढाईचा व शिवाजीच्या कारकीर्दीत दिलेरखानाने पुरंदर किल्ल्याला दिलेल्या वेढ्यासंबंधीचा अशासारखे कांहीं कांहीं पोवाडे तर इतिहासाचें साधन या दृष्टीनें बिनमोल आहेत. शाळिग्रामांप्रमाणें त्यांना कोणा मोठ्या गृहस्थाचा पाठिंबा नव्हता किंवा पैशाची मदत होत नव्हती असें असता केवळ निष्ठेच्या आणि चिकाटीच्या जोरावर त्यांनीं एकट्यानी आक्वर्थ-शाळिग्रामांपेक्षां अधिक मोठा पोवाड्यांचा संग्रह जमा केला याचें फार कौतुक वाटतें.

शितूतांनी येवढा प्रयत्न केला पण त्यांचा संग्रह छापलेला असूनहि तो नामशेष आहे. रा. शितूत यांनीं आपला सर्व संग्रह मालकी हक्कासुद्धां करवीरकर महाराजांच्या चरणीं अर्पण केला. त्या सरकारांतून तो छापूनहि निघाला पण पुढे त्याची काय अवस्था झाली कोणास ठाऊक ? ते संग्रहाचें पुस्तक त्यानंतर कोणासहि पहावयास मिळालेलें दिसत नाहीं ! राजवाड्यांसारख्या इतिहाससंशोधकाला त्याचा पत्ता नव्हता. भाव्यांनीं मराठी शाहिरांवर येवढा मोठा विस्तृत निबंध लिहिला पण त्यांना त्याची वार्ताहि नव्हती. येवढा महत्त्वाचा संग्रह, परंतु कोल्हापूर सरकारनें त्याचा प्रसार न

केल्यामुळें शितूतांचे सर्व श्रम आज तरी फुकटच गेल्यासारखे झाले आहेत व इतिहासाची फार मोठी हानी झाली आहे.

शाळिग्रामांच्या उदाहरणानें स्फूर्ति मिळून पोवाडे जमविण्याचा दुसरा उद्योग रा. सा. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यानीं १८९३ सालीं केला. त्यांनीं 'होळकर शाहीतले पोवाडे' या नांवानें आपला १९ पोवाड्यांचा संग्रह प्रसिद्ध केला.

१८९३ नंतरहि शाळिग्रामांचा उद्योग चालूच होता. त्यांनीं यथावकाश होनाजी बाळ, परशराम, अनंतफंदी व रामजोशी यांच्या लावण्या पोवाड्यांचे निरनिराळे संग्रह शाहिरांच्या चरित्रांसुद्धां प्रसिद्ध केले. त्यानंतर अगदी अलीकडे या विषयातील झालेले प्रयत्न म्हणजे पाचसहा वर्षांखालीं प्रभाकरी लावण्या पोवाड्यांचा चित्रशाळेने प्रसिद्ध केलेला संग्रह व सगनभाऊच्या लावण्यापोवाडयांचा रा. अधिकारी यानी प्रसिद्ध केलेला संग्रह, हे होत.

## संपादनांतील दोष

शाळिग्राम व शितूत यांनीं मधुकरवृत्ति स्वीकारून गांवोगाव फिरून, गोंधळ्यांचे पत्ते काढून, त्यांचीं मनधरणी करून विपुल शाहिरी वाङ्मय उपलब्ध करून दिलें, हे त्यांनीं मराठी भाषेवर व मराठी इतिहासावर अगणित उपकार करून ठेविले आहेत याविषयीं यत्किंचितही शंका नाहीं. त्यांनीं प्रसिद्ध केलेले पोवाडे हे जसे ऐतिहासिक पुरुषांचे पोवाडे आहेत तसेच ते या संपादकांचेहि आहेत व महाराष्ट्रांतील पुढील पिढ्या मुक्तकंठानें ते गातील याविषयींहि शंका नाहीं. परकीय इतिहासकारांच्या शक्तींनीं महाराष्ट्र मूर्छित होऊन पडला तेव्हां त्याला शुद्धीवर आणण्याकरतां अस्सल ऐतिहासिक साधनांच्या संजीवनींची जरूर पडली. अशा वेळीं या एकनिष्ठ संपादकद्वयानें हनुमंताप्रमाणें शाहिरी वाङ्मयाच्या संजीवनींनी भरलेला हा प्रचंड द्रोणागिरीच आणून हजर केला. पण हनुमानाप्रमाणें या संपादकद्वयाला ग्राह्याग्राह्य विवेचक विद्वत्तेचे वावडें असल्यामुळें नक्की वनस्पति ओळखणें त्यांच्या आवांक्याबाहेरचें होतें; म्हणून त्यांनीं वनस्पतींसह वनांना व शिला-

जितासह शिलांना धारण करणाऱ्या शाहिरी वाङ्मयरूपी पर्वतालाच वाहून आणलें ! या उपमांच्या वाग्जाळाला रजा देऊन स्पष्ट घरगुती दृष्टांतानें बोलावयाचें तर शाळिग्रामशितूतांनीं जमवलेली सर्व सामुग्री उपलब्ध झालेली असूनहि उपयुक्त ठरत नाहीं.त्यांच्या सामुग्रीची स्थिति अन्नाची गल्लत झालेल्या मधुकऱ्याच्या झोळीसारखी किंवा कंपाझिटरच्या कोसळलेल्या टाइपांच्या केसीससारखी आहे. अर्थात उपयोगाचे दृष्टीनें त्यांचे संग्रह असून नसल्यासारखे झाले आहेत. जुन्यापुराण्या अशिक्षित खेडवळ शाहीरांचे शेंदोनशें वर्षांपूर्वीचें कवित्व असला मोठा सरसकट शिक्का मारून हे संग्रह वाचले म्हणजे त्यांत अडण्यासारखें कांहींच 'नाहीं. उलट या संपादकांनीं दिलेल्या दिव्य टीपा वाचून सामान्य वाचकांना हे संग्रह अगदी आत्मसात केल्याचा आनंदहि होत असेल ! पण जिज्ञासू आणि चिकित्सक अभ्यासकाला हे संग्रह पदोपदीं—अक्षरशः पदोपदी—नडवितात यांत शंका नाही. सर्व प्रकारच्या शेकडोशें चुकांनीं हें शाहिरी वाङ्मय इतकें झाकून गेलें आहे कीं दाट शेवाळ्याचा थर बसून पाण्याचे दर्शनहि न होणाऱ्या बिन वापरांतल्या तळ्यासारखी त्याची स्थिति झाली आहे.

शाळिग्रामांनीं प्रसिद्ध केलेले सर्व संग्रह इतके विस्कळित व अव्यवस्थित आहेत कीं पुसता सोय नाहीं. त्यांनीं मोठ्या परिश्रमानें हें मृतप्राय वाङ्मय फिरून जिवंत केलें याबद्दल त्यांचे विषयीं जितका आदरभाव जागृत होतो तितकाच संताप त्यांच्या प्रमादांच्या राशी पाहून येऊं लागतो. चिकित्सकदृष्टीचा त्यांचेजवळ सर्वस्वी अभाव असल्यामुळें हातीं आलेलें प्रत्येक बाड त्यांनीं डोळे मिटून-छापून टाकलें आहे. तें धड वाचून पाहण्याचीहि तसदी त्यांनीं घेतली नाहीं. मग अभ्यासून शुद्ध करण्याची गोष्ट दूरच. रामजोशी, अनंतफंदी होनाजी बाळ व परशराम यांच्या लावण्या पोवाड्यांचे संग्रह त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत त्यांत ही गोष्ट फारच ढळढळीत दिसून येते. त्यातील चुकांचा अभ्यास पुढें मागें शाहिरीवाङ्मयाची व्यक्तिवार व विषयवार व्यवस्था लावण्यास उपयोगी पडणारा असल्यामुळें त्यांचा खर्डाच खालीं देतों.

होनाजी बाळाच्या संग्रहांतील लावण्या नंबर ८,९,१०५, १०६, १०७, १०८, १०९, १११, ११२, ११३, ११६, १२३, १२४, १३१,

इतक्या लावण्या होनाजीच्या नसतां त्याच्या नांवावर दडपल्या आहेत. नं. ९ साताप्पाची म्हणजे होनाजीच्या आजाची आहे. नं. १०५, ११६ व १३१ होनाजीच्या चुलत्याच्या म्हणजे बाळा बहिरूच्या आहेत. १०६, १०८, १११, ११२ मार्तंडाच्या आहेत. १०९, ११३ घोंडी बापूच्या आहेत. १०७ दामू विठूची आहे. १२३ दामू नागूची आहे.

रामजोशाच्या संग्रहांतील लावण्यांत हाच प्रकार दृष्टीस पडतो. सदर पुस्तकांतील अगदीं पहिलीच लावणी प्रभाकराची आहे! तिचा शेवट असा आहे "कविराय असा हा दक्ष सेवेमधि लक्ष तयाचा पक्ष धरुन तूं तारी। महादेव प्रभाकर रक्षी या अवतारी." पांडोबा पटवर्धन यांनीं प्रभाकराचें लावण्या पोवाड्याचें अस्सल बाड संशोधून मिळविलें व पुढें तें चित्रशाळेकडून प्रसिद्ध केलें गेलें त्यांत ही लावणी छापलेली आहे. रामजोशी स्वतःस कविराय म्हणवून घेतो येवढें शाळिग्रामानी घोकलेलें; मग त्यांनीं अशी चूक न करावी तर काय करावें? नं. १८, ही सुप्रसिद्ध लावणी रामा लक्षुमणाची असतां रामजोशाच्या नांवावर छापली आहे. बरें ती रामजोशाचीच आहे अशी तरी त्यांची दृढ समजूत कुठें आहे? हीच लावणी अनंतफंदीच्या पुस्तकांत त्यांनीं फंदीबुवाच्या नांवावर छापली आहे! लावणी नं. ९९ नारायण श्रीरंगाची असतां रामजोशावर लादली आहे. सदर लावणीच्या शेवटीं शाळिग्रामांच्या आवडत्या 'कविरायाचा' उल्लेख नाहीं येवढ्यावरून तरी त्यांनीं उमजावयाचें होतें. त्याचप्रमाणें नं. १०७ ची लावणी गंगाधर शाहीराची आहे. लावणी नं. ७० बाळा बहिरूची आहे.

परशरामी लावण्यांच्या संग्रहांतहि वरील सारखीच एक ढोबळ चूक सांपडते. ४३ नंबरची 'स्त्री चरित्र थोर समुद्र' इत्यादि होनाजीची अति सुप्रसिद्ध लावणी परशरामाची म्हणून छापली आहे.

भलत्याच्या नांवावर भलत्याच्या लावण्या छापण्याच्या या ढोबळ चुका झाल्या. या पेक्षा अधिक गर्ह्य आणि उद्वेगकारक चुका म्हटल्या म्हणजे शाळिग्रामांनीं एकाच पुस्तकांत त्याच त्याच लावण्या दोनदोनदा छापण्यासंबंधीं होत. शाळिग्रामांच्या अंगीं सुशिक्षित संशोधकाची चिकित्सक दृष्टि नसेल म्हणून मागें उल्लेखिलेल्या त्यांच्या चुका क्षम्य आहेत, असें वाटेल तर कोणी म्हणावें; परंतु या दुसऱ्या प्रकारच्या चुकासंबंधानें तसें मुळींच

म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांनीं परशरामाची ८ नंबरची लावणी फिरून २१ नंबराला छापली आहे. रामजोशाच्या २५, ४५, ४९, १०२ या नंबरच्या लावण्या तशाच अनुक्रमें १०९, ७८, ७६, ११५ नंबरांत दडपून दिल्या आहेत.

चुकांचे आणखीही अनेक मौजेचे प्रकार दिसून येतात. अनंतफंदीकृत कवितेच्या पुस्तकाचे प्रस्तावनेंत सवाई फंदीविषयीं ते सांगतात कीं, " फंदी मूल हीं अक्षरें ज्या कवितेच्या शेवटीं असतात ती कविता सवाई फंदीची म्हणजे अनंत फंदीच्या मुलाची म्हणून उपलब्ध आहे. " व त्या प्रमाणें ' सवाई फंदी ' असा स्वतंत्र मथळा देऊन त्याच्या दोन लावण्याही त्यांनीं त्या पुस्तकांत छापलेल्या आहेत. पण मौज ही कीं त्याच पुस्तकांत १७ व २६ नंबरच्या लावण्या सवाई फंदीच्या असतां त्या त्याच्या बापाच्या माथीं मारल्या आहेत. या लावण्यांच्या शेवटीं स्पष्ट उल्लेख आहेत. " फंदी फरजंदकी ( फरजंद–मुलगा ) छंद मजालसमे बडिथी । है मकान संगमनेर नदी पेहर थडिथी ॥ " " फंदी मुलाचे छंद बंध कुठवर गेला तर्क धरा । दिल्लीच्या ह्या पलीकडे बोभाटे झाले पोबारा " त्याचप्रमाणें ' उठ्या केशरी ' हा रावबाजीवरील निंदात्मक पोवाडा सवाई फंदीचा असता आणि थेट स्वतः सांगितल्याप्रमाणेंच त्याच्या शेवटीं फंदीमुलाचा उल्लेख असतां शाळिग्रामांनीं तो अनंतफंदीच्या नांवावर घातला आहे. याच पुस्तकांत एके ठिकाणीं तर त्यांनीं कमाल केली आहे. ६५ पानांत जी दुष्काळाची लावणी छापली आहे, त्याच्याच पुढें लगेच तीच लावणी फिरून छापली आहे ! त्या पुस्तकातील दुष्काळाच्या सहाही लावण्या जवळ जवळ एकसारख्या आहेत. कमी अधिक फिरवा फिरव करून आणि योग्य ते पाठ स्वीकारून त्यांची एक लावणी सहजच बनते. पण डोळे मिटून हाताला येईल तसें बाड छापण्याइतपतच जेथें विवेक, तेथें काय करावयाचें ?

रामजोशाच्या पुस्तकांत पौराणिक, उपदेशपर, प्रेमपर असे मुद्दाम भाग पाडून त्यांना तशीं नांवें दिलीं आहेत पण तरीही शेवटीं उपदेशपर किंवा वैराग्यपर लावण्यांत शृंगारपर, व शृंगारपर किंवा प्रेमपर लावण्यांत वैराग्यपर लावण्या घुसडल्याच आहेत. 'उपदेशपर लावण्या' या दुसऱ्या प्रकरणांत २२ पासून ६३ नंबरपर्यंत लावण्यापैकी फक्त पहिल्या अकराच उपदेशपर किंवा

वैराग्यपर असून बाकीच्या २९ ग्राम्य, अभद्र, शृंगारपर आहेत! त्याच-प्रमाणें प्रेमप्रकरणांत २३ वैराग्यपर लावण्या आल्या आहेत.

रामजोशाच्या संग्रहात ११ व १२ नंबरच्या लावण्यांत तर अगदीं बहार झालेली दृष्टीस पडते. नीट पाहिलें असतां १२ वी व ११ वी मिळून एक सबंध सलग लावणी आहे. तो रामाचा पाळणा आहे. ११ वी लावणी हा बाराव्या लावणीत अपुऱ्या राहिलेल्या पाळण्याचा निम्मा भाग होय. असें असतां पाळण्याचा शेवटचा भाग तो संपादकांनीं अगोदर ११ नंबरची लावणी म्हणून छापून दिला व त्याच्याच खालीं त्या पाळण्याचा पूर्वार्ध १२ नंबरची स्वतंत्र लावणी म्हणून छापून टाकला! आणि एकाला चाल दिली पदाची, तर एकाला दिली पाळण्याची! येवढेच नव्हे ज्या पाळण्याचे पाय तोडून त्याच्या डोक्यावर बसविले त्याला सोय पाहून पहिल्याच चरणाला धृपदाचे तोंडहि लावून दिलें!!

रा. शाळिग्रामांनीं पोवाड्यांच्या व लावण्यांच्या कर्त्यांच्या नांवांत जशा घालमेली केल्या आहेत तशा पोवाड्यांतील नायकांच्या संबंधानेंहि केल्या आहेत. १८७९ सालच्या आवृत्तींत त्यांनी प्रभाकरांने रचलेला परशुरामभाऊचा पोवाडा छापला. वास्तविक तो पोवाडा शाळिग्राम समजत होते त्या पेश-वाईतील अद्वितीय योद्धयाचा म्हणजे परशुरामभाऊ पटवर्धनाचा नसून परशुरामपंत बिवलकर नांवाच्या आंग्र्यांचा दिवाणांचा होता. त्याच पोवाड्याखालीं, सदर पोवाडा चुकीनें परशुरामभाऊ पटवर्धनाच्या नांवावर छापला आहे अशी टीप शाळिग्रामांनीं दिली आहे ती दाखवून मिथ्यारोप करण्याची आम्हास दुरिच्छा आहे असे कांहीं चिकित्सक वाचक म्हणतील. तर अशा लोकांनीं शाळिग्रामांच्या पोवाड्यांच्या पुस्तकांच्या शेवटच्या आवृत्तींत छापलेला जनकोजी शिंद्याचा पोवाडा व त्या वरील प्रस्तावना वाचावी. हा पोवाडा इंग्रजीत झालेल्या जनकोजीचा असतां, पानपतावर पडलेल्या जनकोजी शिंद्याचा म्हणून शाळिग्रामांनीं छापून दिला आहे!

## मोडी वाचनाच्या चुका.

पूर्वकाळीं बहुधा सर्व लेखन मोडीत करण्याचा सर्रास प्रघात असे. सरकार दरबारींच काय पण सामान्य व्यवहारातहि जिकडे तिकडे मोडी-

लिपीचाच प्रचार असे. बाळबोध लिपीचा उपयोग शास्त्री, पंडित, भटजी, बायका वगैरे करीत. काव्यें, लावण्या, पोवाडे, आरत्या, भूपाळ्या, ओव्या, पदें, गाणीं इत्यादि पद्यमय वाङ्मय मात्र सामान्यतः बालबोध लिपीमध्यें लिहून ठेवण्याचा प्रघात असे.

मोडी लिपी ही महाराष्ट्राची किंवा मराठीची लघुलिपी द्रुतलिपीच असें म्हणावयास हरकत नाहीं. अर्वाचीन काळीं मोडीचा प्रसार फारच थोडा राहिलेला आहे आणि सुशिक्षितात तर शेंकडा ८० लोकांना मोडी अक्षरें काढतां येत नाहींत येवढेच नव्हे तर मोडी वाचता येत नाहीं असें सांगण्यात त्यांना एक तऱ्हेचे भूषण वाटत असते. वृद्ध किंवा सुशिक्षितांच्या दृष्टीनें खेडवळ अशा लोकांतच काय तो तिचा प्रसार राहिला आहे. हौसेनें मोडी वाचणारा एकच वर्ग सुशिक्षितात आहे. तो इतिहास-संशोधकांचा.

वर्तमानकाळीं मोडी लिपीचें वळण अत्यंत बदलले आहे त्याचप्रमाणें जुन्या भाषेंतलें अनेक शब्दहि आज सर्वस्वीं अपरिचित झालेले आहेत. यामुळें सुशिक्षित आणि विद्वान इतिहास संशोधकांच्याहि हातून मोडी वाचनाच्या पदोपदी चुका झाल्या तरी त्यात आश्चर्य नाहीं. मोडी लिपीची ओळ पाफ गळा नसलेल्या एकाद्या गवयाच्या तानेच्या सुरकुंडी सारखी असते. अशा गवयाच्या तानेत अवश्य असलेले सर्व स्वर अर्धबोबडे व्यक्त झालेले असतात; सुव्यक्त झालेले नसतात. त्याची तान दाणेदार नसते. तीच स्थिति मोडी लिपीच्या तानांची म्हणजे ओळींची असते यामुळें इतिहाससंशोधकाला प्रत्येक अक्षर बरोबर लावून वाचावे लागते. तो विद्वान व जुन्या भाषेशीं चांगला परिचित असेल तरच अशा चुका कमी होण्याचा संभव. अर्थात संशोधक केवढाहि विद्वान झाला तरी जुन्या भाषेंतील एकूण एक शब्द त्याला यथार्थ माहीत असणें केव्हांही अशक्यच. यामुळें चांगले मुरलेले संशोधकहि या लांछनानें भूषित झालेले दिसतात. पारसनिसांच्या भारंभार चुका राजवाड्यानीं दाखविलेल्या आहेत. आणि उलट राजवाड्यांच्याहि कांहीं चुका इतरांनीं दाखविलेल्या आहेत. भा. इ. सं. मंडळानें प्रसिद्ध केलेल्या अहवालांतून संशोधकांनीं एकमेकांच्या दाखवलेल्या अनेक चुका नमूद आहेत.

राजवाड्यांसारख्या इतिहासाचार्यांची जेथें ही स्थिति तेथें शाळिग्रामां-सारख्यांची काय अवस्था असेल? गद्य मजकुरांत मोडी वाचनाच्या चुक्या फारशा होत नाहींत आणि झाल्या तरी मागील पुढील अक्षरांच्या संदर्भानें एक वेळ त्या सहज दुरुस्त होऊ शकतात. पण पद्यातल्या अशा चुका मात्र दुर्बोधता व अनर्थही उत्पन्न करतात. हा मुद्दा विशेष स्पष्ट करण्या-करतां शाळिग्राम शितूतांच्या कांहीं उदाहरणें देणें आवश्यक आहे.

पण त्याच्या आधीं दुसरा जरूर एक खुलासा करणें आहे. वर एकेठिकाणीं असें एक विधान केले आहे कीं 'सामान्यतः पद्यवाङ्मय बालबोध लिपी-तच लिहून ठेवण्याचा प्रघात असे.' या विधानाचा आधार घेऊन शाळि-ग्रामशितूतांच्या मोडी वाचनाच्या चुका दाखविण्यात आमचीच घोडचूक होत आहे किंवा नसत्या चुकांची गोणी आम्ही त्यांचेवर लादीत आहों असे कोणी म्हणेल तर त्याकरतां हे सांगणे आवश्यक आहे कीं उपरोक्त विधानातील सामा-न्यतः हा सूचक शब्द मुद्दामच योजून ठेवलेला होता. सामान्यतः पद्यवाङ्मय बालबोध लिपीत लिहून ठेवण्याचा प्रचार असला तरी काही कांहीं वेळीं तें मोडीतहि लिहून ठेवलेले असे. पोवाडे लावण्यांच्या बाबतीत अनेक वेळां तशी स्थिति झालेली आहे. उ० शितूत प्रतीतील ३७ व्या पोवाड्याच्या प्रस्तावनेत शितूत सांगतात. "हा पोवाडा गुंडाप्पा बिन्न भोंवाना गोंधळी राहणार हुप्री याजकडे मिळाला. ही प्रत मोडी लिपीत लिहिलेली होती. ती त्यानें पाठ करण्याकरतां पांच पन्नास लोकास हा पोवाडा वाचून दाखवा म्हणून विनंति केली परंतु तो कोणास लागेना." त्याचप्रमाणें नं. ११५ चा मिरज येथील मिरासाहेबाचा पोवाडाहि मोडीतच लिहीलेला होता "हा पोवाडा एका मराठ्याकडे मोडीत लिहिलेला आढळला. हा चांगला लागेना" पण याहीपेक्षा महत्वाचा व व्यापक पुरावा शाळिग्रामानीच दिलेला आहे. होनाजी बाळाकृत—लावण्या या पुस्तकाच्या प्रस्तावनेतला उतारा पहा "होनाजी बाळानें एकंदर लावण्या पुष्कळ केल्या आहेत. त्याच्या घरीं जो कांही संग्रह शिल्लक आहे तो मात्र सर्व होनाजी बाळाचाच नाहीं. कारण तो आमच्या अवलोकनांत आला आहे त्यावरून असें वाटतें कीं इतकें काम एका माणसाचे हातानें उठवावयाचें कठिण. तो संग्रह जुनाट मोडी लिपींत लिहिलेला असून फार अशुद्ध आणि खराब झालेला

आहे. त्यांतून चाळून पाहतां बाळा बहिरू, सातप्पा यांच्याहि लावण्या आढळल्या."

मुळांतच मोठी लिहून ठेवलेल्या अशा बाडावरून बाळबोधींत नक्कल करून घेतांनाच शाळिग्राम शितूतानी अगणित चुका केल्या आहेत. पण दुसऱ्याही अशाच मोडीवाचनाच्या चुका झालेल्या आहेत त्या मात्र मूळ मोडीबाडावरून नकलतांना झालेल्या नसून गोंधळयाच्या तोंडून पोवाडा ऐकत असतां तो मोडींत टिपून घेतल्यामुळें त्या नकलेची मराठी प्रत तयार करतांना त्या झालेल्या आहेत. शाळिग्राम व शितूत हे गांवोगांव गोंधळयाकडे जात आणि त्यांची दप्तरे असल्यास त्यावरून पोवाडे उतरून घेत किंवा गोंधळयास म्हणावयास लावून तो म्हणत असतां तो टिपून घेत. अर्थात् अशा वेळीं मोडी लिपीचाच उपयोग करणें त्यांना भाग पडे. ग्वेडवळ अशिक्षित गोंधळी हा असा विचित्र प्राणी असतो कीं एकदां पोवाडा म्हणावयास सुरुवात केल्यानंतर तो घडाघडा म्हणून दाखवितो पण तेंच, लिहून घेण्याकरतां त्याला सावकाश एक एक शब्द म्हणावयास सांगितलें तर तो कायमचाच गोंधळून जातो. पाड्यावर घातलेल्या नवीन पोराप्रमाणें बे एक बे ला सुरवात करून बे दाही वीसपर्यंत तो जातो पण मध्यें खंड पाडल्यास त्याला फिरून बे एक बे पासून सुरुवात केल्याखेरीज पल्ला गाठतां येत नाहीं. व्यासाप्रमाणेंच जणूं कांहीं त्याचा संकेत असतो कीं एकदां बोलावयास सुरुवात केल्यावर मध्यें थांबावयाचें म्हणून नाहीं. पण यामुळें असल्या या अशिक्षित व्यासाचा लेखक बनणाऱ्या सुशिक्षित गणपतीची फारच त्रेधा उडते. या गणपतीला चार हात नसतात आणि ते असते तरी त्याचा कांहीं उपयोग नसल्यासारखेंच ते झाले असते. कारण एकापुढें एक धावता मजकूर लिहावयाचा असल्यामुळें एका हातालाच तें काम करावें लागणार. यामुळेंच गणपति बनलेल्या संशोधकाला धावत्या लिपीची म्हणजे मोडीची मदत घेणें इष्ट असते. अशा रीतीनें घाईनें तयार केलेल्या मोडी खडर्यावरून मागाहून मराठी प्रत तयार करतांना मोडी वाचनाच्या चुका होणें साहजिकच आहे. मोडी ही बोलून चालून धावती लिपी. तींत शब्द तोडलेले नसावयाचे. लपेटी वळणें फार आणि अक्षरसाम्य अतीशय; उ० क ला, ख द ब ह, ल न ज, इ घ इ, ढु लु, दु ली, गु उ,

प द, इत्यादि अक्षरे अगदीं सारखीं वाटावयाचीं. अनुस्वारांना कायमचा चाट मिळालेला असावयाचा. यामुळें चांगला दर्दी तज्ञ विद्वान लेखक व वाचक असल्याखेरीज त्याची मुळाबरहुकूम नक्कल होणें कठीण. शालिग्राम व शितूत यांची अशीच दशा झाली आहे. खालील कांही नमुने पहा.

| अशुद्ध | शुद्ध |
|---|---|
| नाहीं झुझायाची तकवा धरली हिंमत | नाहीं झुजायाची तकवा हरली हिंमत |
| लवे नूतन नवती शाहीर जदिप वादिचे | नवे नूतन नव्हती शाहीर जदीद ( नवशिके ) वादिचे. |
| भुलांप उलुका भालुरीत घन विजवा कडकडती | भुकंप उल्का, भालु, रिक्तघन विजवा कडकडती |
| नानाला | जाजाला ( जेजाला ) |
| नग वाखाणी | जग वाखाणी |
| मानून | माजून ( मस्त होऊन ) |
| दर्दास | हर्दास ( कथेकरी ) |
| तकवा | तलावा |
| लालबूत | कलबूत |
| दरस्त्री | परस्त्री |
| ढाक रोविली | ढाला रोविली ( ढाला–निशाण ) रा. शितूत यांनीं ढाक हा पाठ शुद्ध धरून खालीं पाठभेदांत ढाला हा शब्द दिलेला आहे ! |
| अनभाव | अजमाव |
| सजीन | सनीन ( भाला ) |
| नानाला बंदुखानी तोफा कर्णाला | जाजाला ( जेजाला ) बंदुखा नी तोफा गर्नाळा |
| तू बौध्य होऊन बसला– | तूं बौध्य होऊन बसला– |
| पांडुरंगा होशिल जागा | पांडुरंगा होशि न जागा |
| लोकबळ माया जाळ घळघळ रडती– | कोलाहळ मायाजाळ घळघळ रडती– |

| | |
|---|---|
| बावाला | बावाला |
| मल्हारावाची दासी बोलली दिनभर बसा डेऱ्यांत । तिला दिले लवंडून मल्हारबा गेले रागांत | मल्हाररावाची दासी बोलली खिन-भर ( क्षणभर ) बसा डेऱ्यांत ।तिला दिले लवंडून मल्हारबा गेले रागांत |
| जे महा महादळ दक्षण उरवे । करून पुंडाई वर्तती गर्दे । | जे महामहा खळ दक्षण उरवे ।करून पुंडाई वर्तती गर्वे |
| महान्न झाले भिन्न मनोदय खिन्न करुनिया शत्रूच्या शकले | महाजन झाले, भिन्न मनोदय छिन्न करुनिया शत्रुच्या शकले |
| खंडाळा मोड लिंबाट | बंडावा मोडली वाट ( वाटेनें बंडे मोडली ) |
| विश्वराम ढेरे | इच्छाराम ढेरे |

## बालबोध वाचनाच्या वगैरे चुका.

| अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|
| वन बाई पाहता नागदृष्टि | वन बाई ! पाहताना ग दृष्टीं |
| अंगावर जुहार भार वर नाव किति | अंगावर जुहारभार वरनाव ( वर्णाव ) किती |
| दरपना रात्रीं चंद्र घेउन | दर पन्हा (मुक्काम) रात्रीं चंद्र घेउन |
| ऐशी फौज चालली दर्यामधिं सागर हलवित | ऐशी फौज चालली दर्पामधिं सागर हलवित |
| सब सैन्य जयवंतराव साहेबांचे फिरले | सब सैन्य जयवंत रावसाहेबांचे फिरले |
| घेइ जोठाशी पचंग | घेई जो ठाशी पचंग |
| राज्यास होती पडपणती | राज्यास होती पडपण ( आधार )ती |
| बाहिर सावध होया आहेत रे— हत्यारे राज्याची | बा हिरसा वध होया, आहेत रे— हत्यारे राजाची. ( हिरसा—नाठाळ; होया—होण्याकरितां ) |
| इसन मिर्दा | हाशम मिर्धा |
| उणाव | उणाख ( नीच ) |

| | |
|---|---|
| स्वामीस | खामीस ( निकृष्ट दशेस ) |
| तंबू खाजविला (!) | तंबूर वाजविला |
| गांड मनीं | गांडमणी ( गुह्य गोष्ट ) |
| करमच खोटें | कर्म चखोटें |
| चुनार चिरे | चुना राचि रे |
| जपून नव्हते द्रव्याला | जबून नव्हते द्रव्याला (जबून–दरिद्री) |
| अपुल्या अंगीं ठेवुनि निरूपण | अपुल्या अंगीं ठेवुनि निरू ( दृढ, बळकट ) पण ( निश्चय ) |
| किति कन्या हयविक्रयें परम पातकी | किति कन्या हाय ! विक्रयें परम पातकी |
| विरश्री शूराचे अंगीं सागरीं बाई भरतील हुडे | विरश्री शूराचे अंगीं सागरीं बाई भरती चहढे |
| बोल मला | बोलबाला |
| खांब | सांब |
| सात सहस्र उंट न पार स्वामिचे | सात सहस्र उंट नफर स्वामीचे |
| दिला मार वळणास जातिने पचंग बांधुनिया | दिला मार पळणास जातीनें पचंग बांधुनिया ( पळणास–पळणाऱ्या लोकांस ) |
| मसी रंग | मशीरन् |
| आग ना वरस | अग्र वरस ( वर्ष ) |
| सहजोगती | शहाजोग ती |
| चतुर साधारण | चतुरऽसाधारण ( चतुर असा–धारण ) |
| जे सावध होते परंतु भलि केली सरतासरती | बेसावध होते परंतु भलि केली सर-तासरती |
| तैनामीं | तैनाती, किंवा ते नामी |
| घे· यासी | घेयासी ( घेण्यासी ) |

| | |
|---|---|
| संनिध नाना दिपिच्या बस्ता | संनिध नान दिपिच्या ( द्विपींच्या ) वस्ता |
| बाजी न आले परतून | बाजीनं (घोड्याच्या बाजी चालीनें) आले परतून |
| गळा कंठी पाच शिरीं पेच | गळा कंठीं पाच शिरपेंच |
| नेट उठविले | वेठ ( जोराचे हल्ले ) उठविले |
| मेरू मंडळ कापती | मेरूमांदार कापती |
| मारुनि आरते जेर केले | मारुनि अरि ( शत्रू ) ते जेर केले |
| झाला अभंग | झाला भंग |
| आभय | आभर ( तृप्त ) |
| खेण्या खंडक उडून झाला फार | रेवण्या खंदक उडून झाला पार |
| नानाला बंदुखानी तोफा— कर्णाला | जाजाला ( जेजाला ) बंदुखा नी ( आणि ) तोफा गर्णाळा |
| उपनाव देव टोके कर्ते | उपनाव देव टोकेकर ते |
| मुलासम | मुलायम ( सुंदर ) |
| कुंडलेंती मकराकृती श्रवणी तळपतीं फरशांकुर हातीं | कुंडलें ती मकराकृती श्रवणि तळपती फरशांकुश हातीं |
| शुभ्र जसा मंदराचळ तेचि कोमळ कांति | शुभ्र जसा मंदराचळ तेवि कोमळ कांति |
| चरण हृदयीं धरितो दिनरामा अंदुतव संगी | चरण हृदयीं धरितो दीन रामा अंदु तव संगी |
| शामकर्ण वारू समजऊन प्यारा | शामकर्ण वारु सजऊन प्यारा |
| नागेशवेळचे कवी बोलले भारती | नागेशवळेचे (वळीचे) कवी बोलले भारती |
| गणनायका गीतनायका अढळ दे स्फूर्ति | गणनायका ! गीतगायका अढळ दे स्फूर्ति |
| हाजरा बाजरा घेउनि आला घरीं | हा जराबाजरा ( सामानसुमान ) घेउनि आला घरीं |

| | |
|---|---|
| अशी धुम मातली कोण गाण गोपी कापती | अशी धुम मातली कोण गोपगोपी कापती |
| अरे काही जाणतील ही नसे दया मदनासी ॥ | अरे काही जाण तिळही नसे दया मदनासी ॥ |
| या वस्तीहुनि बारि किंग अटवी। | या वस्तींहुन बरीं किंग अटवी । |
| ह्याणे माझा हाषे सकळ उड-विला | ह्याणे मझिा होष्र सकळ उडविला |
| म्हणे भलि केली रांगोळी नित्य आंघोळी नजन जळी | म्हणे भलि केली रांगोळी नित्य आंघोळी मजन (मज्जन) जळीं |
| याच्या भीईन कांभी बाला ! | याच्या भीईन कां मी बाला ! ( बाला–वापाला ) |
| शिळा टोपिवर शिळा पडो | टिळा टोपिवर शिळा पडो |
| पिका शिंगळ लाविती | पिकाशी गळ लाविती (कोकिळाच्या बरोबरीनें गातात) |

## गोंधळ्यांचा सावळा गोंधळ.

शाहिरी वाङ्मय अशुद्ध करण्याची जबाबदारी पाठांतरानें परंपरा जिवंत ठेवणाऱ्या गोंधळ्या भराड्याकडेहि पुष्कळशी जाते. त्यांना शिक्षणाचा यत्किंचितहि संस्कार नसल्यामुळें शुद्धाशुद्ध विचार करण्याचें चुकूनहि त्यांच्या मनांत येत नाहीं. बापानें शिकवावें तें, किंवा ऐकून शिकावें तें अधिक अशुद्ध कसें म्हणावें येवढ्याचेंच त्यांना ज्ञान असतें. वस्त्राच्या अनेक पदरांतून गाळलें म्हणजे पाणी निर्मळ होतें. पण पोवाडा जसजसा अनेक शाहिरांच्या कंठांतून घोळला जातो तसतसा तो अधिकाधिक कलुषितच होत जातो. ज्या काळांत पोवाडा तयार झाला त्या काळांतले गोंधळी, तत्कालीन भाषेशीं पूर्ण परिचित असताहि जर म्हणतांना चुक्यांचा सावळा गोंधळ घालतात तर त्यांच्या मागच्या पिढ्यांतल्या गोंधळ्यांनीं ऐतिहासिक माहिती अपरिचित झाल्यावर व भाषेंत महदंतर पडल्यानंतर पुष्कळ वेळां अर्थाचा अनर्थ करून सोडला तर त्यांत आश्चर्य नाहीं. पृथ्वीच्या पाठी-

वरील कोणत्याही राष्ट्राच्या पोवाडयांच्या इतिहासाकडे पहा तेथें हीच स्थिति दिसून येते. Ballad in literature या पुस्तकाचा कर्ता एके ठिकाणीं म्हणतो " At every stage of oral transmission we must suppose that some accidental variations from what was delivered would be introduced " इंग्लंडमधील पोवाडयांचा सुप्रसिद्ध संशोधक व संपादक प्रो० चाइल्ड यानें आपल्या संग्रहांना ज्या प्रस्तावना जोडल्या आहेत त्यातून हार्ट नामक लेखकानें जें सार काढलें आहे तें हेंच आहे कीं " The balled is at its best when it is early caught and fixed in print " म्हणजे पोवाडा झाल्यानंतर तो लवकरच लिहून किंवा छापून ठेवण्यांत आला तरच त्याचें मूळ सुंदर स्वरूप शुद्ध राहूं शकतें. डेन्मार्कमधील पुरातन पोवाडयांचें शुद्ध स्वरूप आजतागायतहि आविकृत टिकलें आहे त्याचें कारण ते ताबडतोब लिहून ठेवण्यांत येत असत हेंच होय; एरवीं तद्देशीय गोंधळ्यांनीं आपल्या म्हणणीनें त्यांत कितीतरी अपपाठ पेरून ठेविले असते, अशी एक साक्ष दुसऱ्या एका ग्रंथकारानें दिली आहे.

शाहिरी वाङ्मयांत या गोंधळ्यांनीं आपल्या अक्कलहुषारीनें ज्या करामती करून ठेविल्या आहेत, त्यांपैकीं कांहीं मनोरंजक नमुने विषद करून दाखविण्यानें समजूत चटकन पडेल. शालिग्रामाशितूतांच्या पोवाडयांच्या संग्रहांतूनच कांहीं उदाहरणें घेतों.

( १ ) त्रिंबकराव दाभाडयाच्या पोवाडयात एके ठिकाणीं २३ व्या चौकांत ' ठोक या भावे शिंग बोलला ' असे शब्द आहेत. वास्तविक तेथें ' ठोक्या भावेशिंग ( भावसिंग ) बोलला ' असे शब्द पाहिजेत. ' भावसिंग ठोक्या' चें नांव इतिहासाशीं दाट परिचय असलेल्या वाचकास किंवा इतिहास संशोधकासच परिचित असणार. एरवीं सामान्य वाचक गोंधळ्याचे आहेत तसे शब्द घेऊन ' शिंग याला भावे म्हणजे मनःपूर्वक ठोक ' किंवा फार तर ' भावसिंग याला धरून ठोक ' असें म्हणाला असलाच अर्थ समजणार !

( २ ) नारायणरावाच्या वधाच्या पोवाडयांत १० व्या चौकांत एके-ठिकाणीं ' मग कचेरीस उभा पटवर्धन राहिला ' असे मूळ पाहिजे असतां

गोंधळ्यानें ' मग कचेरी शोभे पटवर्धन राजाला ' असा पाठ तयार केला आहे !

( ३ ) शितूतांच्या महादजी शिंद्याच्या मोठ्या पोवाड्यांत ' असे कळले की मोगलाला तंबूर झाला मानकऱ्याला केले पुकार। पुण्याकडे फिरविले झेंडे धारावाडावर ' असा पाठ आहे. मूळ पाठ ' असे कळले कीं, मोगल आला, तंबूर ( एक रणवाद्य ) झाला, मानकऱ्याला केले पुकार। फिरविले झेंडे धारूरावर " असा पाहिजे. याच चरणाच्या पुढें एके ठिकाणीं 'मोंगल आला तळघाटाला गलबल झाली ' अशा शुद्ध पाठा ऐवजीं ' मोगलाला तळ घाटाला गलबल झाली " असा गोंधळ्याचा पाठ छापला आहे. सारांश, जेथें 'मोगलाला' असे पाहिजे तेथें 'मोगल आला' असे केलें. व जेथें 'मोगल आला' असें पाहिजे तेथें 'मोगलाला' असे केलें. कोणीकडे 'धारूर' व कोणीकडे ' धारवाड ' पण गोंधळ्यास त्याचें काय ?

| अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- |
| ४. पंचामृत माहित नव्हते मोशिमशाला | पंचामृत माहित नव्हते गोष मसाला— ( मासमसाला ) |
| ५. भोंळा माझा वामन | भोळा माझा बामन |
| ६. आधार मह्मा आक्रीत | अधर्म हा आक्रीत |
| ७. संतचार | संचार |
| ८. अरबसिंदे | अरब सिद्दे ( शिद्दी ) |
| ९. काय लिहिले सिद्धी | काय लिहिलेस विधी ? |
| १०. पाहुण्यानी दिल्या मुंढाळ्या— ओढिती तट करिती अल्ला अल्ला | पाहुन यानि, दिल्या मुंढ्याला— ओढि तिथ, थट करिती अल्ला अल्ला—तेथें तर कमाल झाली आहे. गोंधळ्याच्या मूळ अशुद्ध पाठावरून कितीही डोकें खाजविलें तरी बोध होणें शक्य नाहीं. एवढी एक ओळ म्हणजे गोंधळ्याच्या चुकांची बाशखडीच आहे. निझामाचें आडनाव मुंढे असें होतें ही गोष्ट लक्षांत |

| | |
|---|---|
| | आल्याखेरीज व थट हा जुना शब्द ठाऊक असल्याखेरीज अर्थच लागणें शक्य नाहीं. |
| ११. गरिबाचे मोडून पसारे | गलिमाचे मोडून पसारे |
| १२. सुत अरबन चिडे | सुतार बनचिडे. हीं पक्षांचीं नांवें आहेत. |
| १३. वनगाया शियाळा | वनगायाशि आयाळा |
| १४. गुणीच डोल | गुणी चंडोल |
| १५. दळभारांत | दरबारांत |
| १६. बोले तुकूम देही | बोले हुकूम द्याही |
| १७. ह्याला प्रसन्न गौरासुरेपाणी | ह्याला प्रसन्न गौरि शूल पाणी |
| १८. हत्ती त्येगा धरला | हतीं तेगा ( तरवार ) धरला |
| १९. त्रिंबकराव नानाचा लष्करी | त्रिंबकराव नाना चाल करी |
| २०. माझ्या भणीच्या को वंशा | माझ्या भणीच्या ( बहिणीच्या ) कोंवशा ( आश्रयस्थाना ) |
| २१. धाडधाडसा बोलला | धाडा धाडा असा बोलला. ( धाडा–हल्ला ) |
| २२. बंदुकीचा गजभर चिरा जो तुटला | बुंदकीचा गजभर चिरा जो तुटला. |
| | शाहिराला सांगावयाचें आहे कीं उदेभानाच्या वारामुळे तानाजीनें बुंदकीचा म्हणजे ठिपक्या ठिपक्याचा जो चिरा म्हणजे फेटा घातला होता तो गजभर तुटला, कापला गेला. गोंधळ्याला बुंदका व बंदूक यातला फरक कसा कळणार? त्यानें दडपून बंदूक शब्द म्हटला. बुंदका हा शब्द जेव्हां आढळावा तेव्हां मूळ पाठ काय तो कळणार ! |

| | |
|---|---|
| २३. हात चालऱ्हा ऱ्हा | हातचा लऱ्हा ( तरवार ) हा |
| २४. मी नावाचा जाण राव धुळप जी | मी नावाचा जानराव धुळप जी |
| २५. ऱ्हाल्या | न्यहाल्या ( गाद्या ) |
| २६. पांडवदळी बिभीषण आला | पांडवदळी भीष्म आला |
| २७. पहा वाहवा विष्णूची | पाहावा हवा ( शोभा ) विष्णूची |
| २८. दुरगुण | दुराविण |
| २९. नवा आणि गोल शिपाई | नवा आलिग्गोल (बिन कवायती)-शिपाई |
| ३०. कोण देतो इत्ती कडे तोंड | कोण देतो हो तिकडे तोंड ! |
| ३१. आणिले पुण्यात जपानी नळाचे पाणी | आणिले पुण्यात जहांपन्ही नळाचे पाणी |
| ३२. त्यानें बुधले पुरले पलंगा शेजारी | त्याने बुधले पुरले अलंगा ( तट ) शेजारीं |
| ३३. खासा मुडदा कागदी शेला | खासा मुडदा काग दिशेला. पाढऱ्या कावळ्याकडे किंवा कावळ्याकडे जाणे म्ह. मरणें असा शब्द ऐ. ले. सं. आला आहे तेथें त्याचा मरणें असा अर्थ दिला आहे. खासा स्वारीचा मुरदा पडला, ते मेले. असें मूळ शाहिरास सांगावयाचें. पण गोंधळ्यानें केलेला अनर्थ पहा ! |
| ३४. हिंदुपद झाले दाणापाणी | हिंदुपद झाले वारापाणी. वारापाणी होणे म्हणजे दाणादाण होणें. असा मूळ शब्द असतां गोंधळ्यानें त्याचे दाणापाणी करून टाकले. |
| ३५. बालेघाटी गेले तीर्थ डोकीस | बालेघाटी गेले तेरढोकीस. तेरढोकी हें गांवाचें नांव आहे. |

| | |
|---|---|
| | असले अपभ्रंश झाल्यावर मूळ पाठ शोधण्याला काय त्रास पडत असेल त्याची कल्पना अशी कामें केलीं असतील त्यांनाच एक करतां येईल ! |
| ३६. बैरागी | बैरखी |
| ३७. मधील | मंदील |
| ३८. जिव नीलवर्णापरी परस्पर शत्रु विराले तसे | जिवनीं लवणापरी परस्पर शत्रु विराले तसे |
| ३९. पाल गुलाब | पाल गुराब ( जहाजांचे प्रकार ) |
| ४०. हांजी हालली मुलुखांत | हालीमाजी ( बैकैद, गोंधळ ) मुलखात. |
| ५०. दिवाणखाना खुष जोरे रंगमहाल मौज | दिवाणखाना खुषबो रे रंगमहाल मौज(खुष्बो—अत्तर, सुगंधी पदार्थ) |
| ५१. झुंजल्याविण | झुंज लावुन |
| ५२. दक्षिणेमध्यें पयस फिरविला | दक्षिणेमध्यें प्रेष फिरविला (प्रेष--पत्र, वर्तमान, बातमी ) |
| ५३. दे विद्या अरबासी | द्यावी द्वाही अरबासी |
| ५४. संगती पागा देऊन | संग (संगें--बरोबर) ती पागा घेउन |
| ५५. टाकिले कागद साग्र वृत्त लिहुन । पुढें लिहुन ठेविती | टाकिले कागद साग्र वृत्त लिहुन पुढे निहुन ( नेऊन ) ठेविती |
| ५६. भोज खिंडि म्होर | भोसे खिंडि म्होर |

वर नमुन्याकरतां दिलेल्या उदाहरणांवरून अशिक्षित शाहीर मूळ शब्दांना कोणचें विकृत स्वरूप आणतील तें सांगतां येणार नाहीं हें स्पष्ट दिसून येईलच. ‘ हिरण्यकश्यिपूच्या पोटीं प्रल्हाद बाळ जन्मले ’ याबद्दल ‘ हरिण कासवाच्या पोटीं परळात बाळ जन्मले ’ किंवा ‘ कां दावाग्नी लावला ’ याबद्दल ‘ कांदा वांगी लागला ’ असें म्हणण्याबद्दल हरदासांनीं गोंधळ्यांची केलेली थट्टा अगदीं यथार्थ आहे असें कोण म्हणणार नाहीं ? मूळ ज्या गोंधळ्यापासून पोवाडे मिळवले त्यांत इतक्या चुका, त्यानंतर उतरून घेणा-

रांच्या श्रवणदोषानें निर्माण झालेल्या चुका, त्यानंतर ते पोवाडे गोंधळी म्हणत असतां मोडीत उतरून घेतल्यामुळें निर्माण होणाऱ्या मोडी वाचनाच्या चुका, त्यानंतर शाळिग्राम शितूतासारख्या संपादकांनीं शब्दांच्या अपरिचितपणामुळें, ऐतिहासिक नांवागांवाच्या अज्ञानामुळें, पौर्वापर्य उचितार्थ समजण्याच्या अपात्रतेमुळें, शब्दांच्या वा अक्षरांच्या केलेल्या तोडजोडीमुळें निर्माण झालेल्या चुका; इतक्या चुकांच्या भरतीला छापखान्यांतील चुकांची भुतावळ मिळाविली म्हणजे पोवाड्यांचे आजचें स्वरूप काय आहे तें कळून येईल ! सारांश शाहिरीवाङ्मयाचे आमूलाग्र शुद्धीकरण करणे हेंच अगदी पहिले महत्वाचे काम ठरते. हे काम अत्यंत किचकट, त्रासाचे जिगजिगीचे जीव काढणारे असते खरे. परंतु मेल्याखेरीज स्वर्ग दिसत नाहीं म्हणतात त्याप्रमाणें या दिव्यांत टिकून राहिल्याखेरीज शाहिरी वाङ्मयातला उज्ज्वल विश्वसनीय इतिहास हाती येणार नाहीं. हा इतिहास किती बहुमोल असतो याचेच आता थोडेसे दिग्दर्शन करावयाचे आहे.

## पोवाड्यांतील इतिहास

पोवाड्यांत सगळा इतिहासच असतो. इतिहासाचें तें एक साधन आहे. परंतु या साधनांतील उत्तम, मध्यम, कनिष्ठ या वर्गांपैकीं कोणच्या वर्गात त्याचें स्थान मानावयाचें ? समकालीन पुरावा हा उत्तम आणि विषमकालीन पुरावा मध्यम किंवा कनिष्ठ पुरावा होय. एकादा विवाक्षित इतिहासप्रसंग घेतला तर त्या प्रसंगांत भाग घेतलेल्या व्यक्तींनीं स्वतः लिहिलेली किंवा लिहविलेली माहिती किंवा त्या प्रसंगाशीं व्यक्तिशः कांहीं संबंध नसतां त्रयस्थ नात्यानें परंतु त्याच प्रसंगीं विद्यमान असलेल्या लोकांनीं लिहिलेली किंवा लिहविलेली हकीकत ही सर्व उत्तम प्रकारांतील साधनसामुग्री होय. याच्या उलट कोणत्याही ऐतिहासिक प्रसंगानंतर कालांतरानें म्हणजे तो प्रसंग व त्या प्रसंगीं विद्यमान असणाऱ्या व्यक्ती नामशेष झाल्यानंतर लिहिलेली किंवा लिहविलेली कोणच्याहि तऱ्हेची हकीकत ही सर्व कनिष्ठ किंवा मध्यम प्रकारातील सामुग्री होय. या सामुग्रींत मुख्यतः बखरींचा किंवा बखरवजा अखबारांचा समावेश होत असल्यामुळें तिलाआपण बखरपुरावा म्हणूं. हा बखरपुरावा अनेक दोषांनीं लिप्त असतो. विसंगति, व्युत्क्रम, कल्पना

यांचे त्यात फार मिश्रण झालेले असते, त्यातील स्थल काल नाम निर्देश चुकलेले असतात, पौर्वापर्याकडे लक्ष दिलेलें नसतें, हकीकतींत विकृति उत्पन्न झालेली असते. एक ना दोन अशा अनेक कारणांमुळें इतिहास-संशोधकांनी हा बखरपुरावा तात्पर्यतः ग्राह्य असला तरी त्याज्य मानलेला आहे.

पोवाडा हा सत्कृदर्शनी पद्यमय बखरीसारखा भासतो हे खरे परंतु त्याला तसे रूप असले तरी पोवाडा वर सांगितलेल्या अधम पुराव्यात गणला जाण्यासारखा खोटा साक्षीदार नसतो तर उलट समकालीन साक्षीदारा-प्रमाणे तो विश्वसनीयच मानावा लागतो. पोवाडा विश्वसनीय मानावयाचा तर तो समकालीन ठरला पाहिजे. तसा तो आहे की नाहीं हे दोन कसोट्या लावून ठरवावयाचें असतें. पहिली कसोटी म्हणजे खुद्द पोवाड्यांत शेवटीं शाहिराने दिलेली रचनाकालासंबंधीं माहिती. व दुसरी कसोटी म्हणजे पोवा-ड्यांत वर्णन केलेल्या हकीकतीशी समकालीन अस्सल कागदपत्रात दिलेल्या हकीकतीनी पाहावयाचा पडताळा. या दोनहि कसोट्या लावून पाहिल्या तरी त्यातूनहि पोवाडा सहीसलामत बाहेर पडतो हें या पुस्तकातील पोवाड्यांच्या प्रस्तावना व पोवाड्यातील वाक्यवाक्याला उपो-द्बलक म्हणून दिलेल्या समकालीन कागद पत्रातील अवतरणांच्या टीपा देण्याचा जो उद्योग केला आहे त्यावरून स्पष्ट दिसून येण्यासारखें आहे. आज उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक पोवाड्यांत फक्त सगनभाऊचा पानपतचा पोवाडाच तेवढा विषमकालीन आहे. बाकी एकूणएक पोवाडा समकालीन आहे असें निश्चितपणें विधान करावयास हरकत नाहीं.

येऊन जाऊन वरील विधानाला भुणा घालण्याकरतां म्हणून तानाजीचा व नारायणरावाच्या वधाचा १४ चौकी पोवाडा पुढें आणण्यांत येईल. पण नारायणरावाच्या वधाचा मूळ अस्सल सातचौकी पोवाडा या पुस्तकांत छापलेला त्यावरून सर्व खुलासा होण्यासारखाच आहे. हा पोवाडा मूळ नारायणरावाच्या खुनानंतर लगेच लिहिला गेला. याचा शाहीर नारायण-रावाचा पक्षपाती होता. पण पोवाड्यांत आनंदीबाईचा उल्लेख सुद्धां नाहीं. यानंतर बारभाईच्या पक्षपाती कोणा शाहीरानें मूळ पोवाडा अगदीं बदलून टाकला. धृपदापासून घालमेल केली. व नानाफडणिसांच्या पक्षाला अनुकूल अशी माहिती भरून आनंदीबाईकडे खुनाचें सगळें कर्तृत्व देऊन पोवा-

ड्याचें स्वरूप पार बदलून टाकलें. यानंतर फिरून एका राघोबादादाच्या पक्षपाती शाहिरानें घालमेल केली व मूले कुठारः या न्यायानें सवाई माधवराव हा एका सोनारशिंपिणीचा मुलगा होय अशा हकीकतीचा एक चौक जोडून आनंदीबाईवर आरोप घालणाऱ्यांना अद्दल घडविली. अशा रीतीनें हा चौदाचौकी पोवाडा म्हणजे अठरा धान्याचें एक कडबोळे आहे. हाच पोवाडा प्रचलित असल्यामुळें पोवाड्यावर अविश्वसनीयतेचा आरोप करतां येत असे पण आतां मूळ सात चौकी अस्सल पोवाडा उपलब्ध झाल्यामुळें पोवाडे समकालीन व विश्वसनीय असतात हें विधानच बळकट पुराव्यानिशीं सिद्ध होतें. तानाजीच्या पोवाड्यासंबंधानें हेच म्हणतां येईल. त्याची मूळ लिहून ठेवलेली प्रत संशोधकानीं हुडकून काढल्यास प्रचलित पोवाड्यातल्या सर्व चुका किंवा प्रक्षिप्त भाग वेगळा करतां येईल. या पोवाड्याचे शेवटीं शाहिरानें आपलें नाव गांव राहण्याचें ठिकाण दिलें आहे व खुद्द शिवाजी महाराजांनीं आपणांस राजगडास बोलावून नेऊन पोवाडा करविला असें सांगितलें आहे. तेव्हां त्याच्या समकालीनत्वाविषयीं वादच नाहीं.

इतिहाससंशोधनाची एक नवी शाखा म्हणून सुद्धां पोवाड्यांचे अधिकाधिक संशोधन व संपादन व्हावयास पाहिजे. कारण या समकालीन पुराव्याचें महत्वच तसे मोठें आहे. या पोवाड्यांनीं इतिहासावर नवे नवे किरण कसे पाडले आहेत त्याचीं कांहीं उदाहरणें देतों.

( १ ) मल्लारदास शाहिराच्या डभईच्या लढाईच्या पोवाड्यानें आज उपलब्ध असलेल्या सर्व साधनांपेक्षां पुष्कळ नवी विश्वसनीय माहिती मिळते. या संबंधींचें इतकें तपशीलवार व सुसंगत वर्णन अन्यत्र कोणच्याहि साधनांत उपलब्ध नाहीं.

( २ ) शिवराम शाहिराच्या नानासाहेब पेशव्याचा मृत्यूवरील पोवाड्यांत नानासाहेबाच्या शिकारखान्याचें व पागांचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें त्याच्या दोन नाटकशाळांची ' गुणवंती ' व ' केशरी ' अशी नांवे दिलेलीं आहेत. ही सर्व माहिती अगदीं नवीन आहे.

( ३ ) नारायणरावाच्या वधावरील लहरीमुकुंदाच्या सातचौकी पोवाड्यानें आनंदीबाईवरील पुतण्याच्या खुनाचा आरोप निर्मूल केला आहे. त्यांत आनंदीबाईचें नांवहि नाहीं. ३० ऑगस्ट १७७३ रोजीं नारायणरावाचा

खून झाला व नंतर ऑक्टोबर महिन्यांत अमृतरावास पेशवाईची वस्त्रे घेण्याकरतां राघोबानें पाठविलें. पोवाड्याच्या शेवटच्या चौकांत 'वस्त्रे आणावया पाठविले अमृतरायाशी ' असे शब्द आहेत. अर्थात् खून झाल्या नंतर दीडदोन महिन्यानी लगेच हा पोवाडा रचला गेला. आनंदी बाईचें खुनात अंग असते तर या कालांत तें सहज लोकांच्या बोलण्या चालण्यांत प्रामुख्यानें आलें असतें. पण तसें नव्हतें म्हणूनच शाहिरानें पोवाडयांत तिच्या नांवाचा उल्लेखहि केलेला नाहीं. रियासतकार सरदेसाई यांच्या शोधपूर्वक व काळजीनें काढलेल्या अनुमानाला या समकालीन पोवाडयानें चांगलीच बळकटी येते.

( ४ ) प्रभाकराच्या खर्ड्याच्या पोवाडयांत या स्वारीवर गेलेल्या पेशव्यांच्या बावन पागातील सरदार शिलेदारांची बिनचूक यादी दिलेली आहे. अशा याद्या बखरींतून आहेत पण त्या अपुऱ्या आहेत व त्यातलीं कांहीं कांहीं नांवें चुकली आहेत. ऐतिहासिक लेखसंग्रहाच्या ९ व्या भागांत खर्ड्याच्या लढाईच्या प्रकरणांत कांहीं नांवें आलीं आहेत पण तींही पुरीं नाहींत. प्रभाकराच्या या यादीचें महत्व फार मोठें आहे.

( ५ ) सवाई माधवरावाच्या मृत्यूच्या पोवाडयांत नवीन ऐतिहासिक माहितीचे किती तरी कण सांपडतात. 'निरोगी सात सहस्र उंट नफर स्वामीचे । वीस सहस्र तुरग निवडक भीमथडी ग्रामीचे । सबल दोनशें नव्वद कुंजर विशाल हरकामीचे । म्हशी दोन सहस्र कांटेदार बाणिच्या । सहा सहस्र गाई फार तरी वाणीच्या । कांहीं सफेत कपिला व्याघ्राबर खाणीच्या । बैल बारा सहस्र । एवढ्या जिवास खायाला । कोण श्रीमंतांवाचून दुसरा समर्थ द्यायाला. ' या उताऱ्यांत पेशव्यांच्या उष्ट्रखान्यातील गजशाळेंतील व पागांतील वाहनांची संख्या त्याचप्रमाणें पेशव्यांच्या थट्टीखान्यातील गुराजनावरांची संख्या बिनचूक दिलेली आहे. पोवाडा समकालीन असला तरी शाहीरानें ही अतिशयोक्ति केली असें म्हणतां यावयाचें नाहीं कारण तसें नसतें तर शाहिरानें हत्तींची संख्या ' दोनशें नव्वद ' अशी वेडी-वाकडी कशी दिली असती ? त्याचप्रमाणें ११ व्या चौकांत शाहिरानें पेशव्यांच्या सातशें कुणबिणींची, चवदाशें घरगुलामांची आणि नाटकशाळांची माहिती दिलेली आहे. या पोवाडयाच्या नवव्या व दहाव्या चौकांत प्रभा-

करानें सवाई माधवरावाच्या पशुपक्षांच्या शिकारखान्याचें वर्णन दिलें आहे व त्याला त्यांचा किती लळा होता तें " जंबुक चितळे रोहि भेकरे कुरवाळुन धरणें । रीस एडके गेंडे सशाना बनात पांघुरणे । आपण खावे ते त्यास पुत्रवत् किती माया करणें " या शब्दानीं सांगून त्याच्या मरणाच्या वार्तेनें ते पक्षीही रडू लागले किंवा मूर्छित पडले असें काव्यमय वर्णन केलें आहे. पेशव्यांच्या बखरींत या शिकारखान्याची थोडी माहिती आहे. १७९१ मध्यें विइल्यम प्राइस यानें स्वतःच्या डोळ्यानीं पाहून या शिकारखान्याची नोंद आपल्या डायरींत करून ठेविली आहे. पण त्यावरून स्वतः सवाईमाधवरावाला या हरणांचा आणि पक्षांचा किती विलक्षण लळा होता तें स्पष्ट होत नाहीं. प्रभाकराच्या पोवाडयावरून तें स्पष्ट होतें. प्रभाकराची माहिती किती नवी व अचूक आहे हें दाखविण्याकरतां खुद्द सवाई माधवरावानें लिहिलेली किंवा लिहविलेलीं शिकारखान्यासंबंधीचीं २।३ पत्रें देतों. हीं पत्रें आजपर्यंत कोठेंहि प्रसिद्ध झालेलीं नाहींत.

"विशेष बलवंतराव वाकडे मपिंसु लिग द्यावयाचे तुमचे विद्यमाने ठरले त्यास खासा स्वारी यावयाचा मुहूर्त कार्तिक वद्य पंचमीस आहे. त्यास लिंगामध्यें येक रेघ घालयची आहे ती व जिल्हेकरून स्वारी यावयाचे सुमारे लौकर तयार होईल असे बलवंतराव यापसी बोलून करावे, म्हणजे स्वारी आल्यावर स्थापनेस लौकरच मुहूर्त पाहून. त्यास येवढे काम लवकर करावे उत्तर पाठवावे व हरणाचा मजकूर प्रथ(म) आपाजीपंत गडबोले याचे पत्रातच लिहिला आहे त्यास विशेष काय ल्याहावे लवकर स्वारीपूर्वी धरऊन फतेचे वर्तमान व गर्देनचे मेज लवकर पाठवा काला पहाडाची गाठ कसी आहे वरकड हरणे आजारी होती ती कसी कसी आहेत ती नावानिसीवार लिहा. अकडबाज रोड आहे किंवा ताजा आहे आणि काला आहे तितकाच आहे किंवा अधिक उणा जाला ते ल्याहा व रात्रीस हरण सोडीत असतात त्याचे बरकडीवर घाट आहे ती बरी जाली कीं नाहीं तें ल्याहा व आजारी हरणे असेतील त्याचे आजार कोठकोठे आहे ते नावनिसीची याद पाठवा जीनसखान्यातून पाच मासे अंबर पाठवा हरण लवकर हर इलाजानें धरावा आणि पत्राचे उत्तर लवकर पाठवा व नवा पाटा कसा आहे ते कळवा.

र॥ छ×६ सफर बहुत काय लिहिणें हे विनंति."

श्री

"विशेष माणीक हरणाची हाडे वीटलवाडीकडे जाताना गणेशखेड लागते तेथे ठेविली आहेत ती हवालदार यापासून कोणास न कळता काढऊन शिकारखान्याचे गड्याबरोबर येथे पाठवावी व शिकारखान्याचा जो गडी पाठवाल त्यास ताकीद करून ठेवावी कीं तेथे डेऱ्यास गेल्यावर मी वस्त घेऊन आलों इतकेच बोलावे, हाडे आणिली असे बोलूं नये व चिरगुटांत पकी बांधऊन (पाठ)विणे बहुत गुप्त. यानंतर तेथे हवालदार ×××ण पाटा धरावयास सांगितला आहे तो मे(हनत) करून लवकर धरावा सापडताच कागद पाठवावा धरला असला तर त्याचे मानेचा घेरा मोजून दोरी लखोट्यांत घालून पाठवावी नसला धरला तर मेहनत करून स्वारी आल्याच्या पूर्वी धरून लवकर लिहिणें व चिठी कोणास घरीं न दाखविणें संभाळा आपल्या जवळच ठेवा.

र॥ छ० ६ सफर

व या कागदाचें उत्तर भास्कर दिक्षीत याचे नावे पाठवणें.

श्री

यादी हरणाचे कलमाची त॥

काले पहाडाची गाठ फुटली म्हणून लिहिले त्यास सयद अली पसून ओखद लावीत जाणे डाग बरा जाला नसला तर त्यालाहि उपाय करावा कलम १

बेडक्या ताटकीसिंगा याची गाठ राहिली आहे तिजवर फिरून सइदअलीस पुसोन डाग द्यावा अगर तो म्हणेल त्याप्रमाणें करावें कलम

अकडबाज थोडासा रोड जाला म्हणून लीहिले त्यास मुढी चारितात त्यामध्यें नित्यापेक्षा वेलदोडे थोडेसे अधीक टाकावे थोडेसे लोणीही मुढीत घालून खायास देत जावी कलम २

थोरला लक्ष्मीचिपाटा आजारी आहे म्हणून लिहिले त्यास उपाय सईदापासून जो होईल तो करवा ईश्वरसत्ता. कलम

पागेत हरण फिरतात त्यातून येकाने उडी टाकिली त्यास त्याचे पायबिय नीट पाहा कलम

अकडबाजाचे पूर्वेकडील कोपरे याचे हरणाचे बरगडीवर गाठ होती तिजवर डाग दिल्हा तो चुकला त्यास सईदास पुसोन त्याचे मने ठरला तर फिरून डाग द्यावा कलम

· वानवडीचे मुकामी हरणे धरली त्यापैकी तीन हरण्या मेल्या व येक आहे ती बरी हुषार असली तर ठेवावी नाहीतर सोडावी रानांत कलम.

वरकड हरणे बरीच आहेत म्हणून नांवनिसीवार झाडा पाठविला तो समजला कलम.

अकडबाजास व माणिकास मुढी चारीत असता ती अकडबाजास व पाहाडास लिहिले मसाले आहे ते अधिक घालून दोघा जणास चारीत जावीं व काला पहाड व अकडबाज ताजे राखावे. वेलदोडे व लोणी मुढीत अधिक घालावे कलम.

पोलेचुबी व हरण गंजीवर येऊन दाणा खातो म्हणोन लिहिले त्यास त्याला हुसकून लावावा. हरण्यांत दाणा खावयास देऊ नये. कलम

घाकटे पाडयास अकडबाजानें मारिलें म्हणून लिहिले ते कलर्ले कलम.

सदरहूप्रमाणें करून अमक्या हरणास अमके केले याप्रमाणे कलमेवार उपाये कराल ते लिहून पाठवावे हे विनंति.

( ६ ) पोवाडा हें समकालीन कागदपत्रांच्या अभावीं इतिहासाचें अस्सल साधन देखील होण्याच्या योग्यतेचें केव्हां केव्हां कसें असतें त्याचें एक उदाहरण देतों. पंधरा सोळा वर्षांखालीं रावबहादूर लठ्ठे व वासुदेवशास्त्री खरे यांचा ज्ञानप्रकाशामधून एक वाद झाला. वाद परशुरामभाऊ पटवर्धनास करवीरकरांनीं पट्टणकुडीच्या लढाईत आकसानें तो मरणोन्मुख असतां मारविलें कीं नाहीं याबद्दल होता. लठ्ठयांचें म्हणणें अर्थातच मारविला नाहीं, आपल्या जखमानींच तो मेला असें होतें. खरे यांचे म्हणणें परशुरामभाऊ अनेक जखमांनीं घायाळ होऊन करवीरकरांकडे मरणोन्मुख

स्थितींत पाडाव सांपडला असतां आपल्या लोकांकडून घोड्यावरून ढकलून देववून व नामर्दपणानें वार करवून मारविला असें होतें. पुढें कांहीं दिवसांनीं खरे यांनीं पत्त्यामुद्यासुद्धां पटवर्धनी दप्तराच्या तत्कालीन अस्सल पुराव्यानें आपलें म्हणणें सिद्ध केलें. खरे यांच्या भाग ११ वरून ही गोष्ट स्पष्ट दिसून येते. जी गोष्ट खरे यांनीं अस्सल पत्रांनीं सिद्ध केली तीच गोष्ट कोल्हापूरच्या शाहीरांनीं आधीच लखलखीत सांगितली होती.

शितूत यांच्या पुस्तकांत पट्टणकुडीच्या लढाईवर १७ व १९ नंबराला दोन पोवाडे छापलेले आहेत. हे दोनहि पोवाडे कोल्हापूरकरांच्या पक्षपात्यांनीं लिहिलेले आहेत. त्यांत परशुरामभाऊस गव्हार, राक्षस, रावण वगैरे निवडक शिव्या दिलेल्या आहेत. हे दोनहि पोवाडे अगदीं लढाई झाल्याबरोबर रचलेले आहेत व त्यांतील माहिती अगदीं तंतोतंत बरोबर आहे ही गोष्ट अस्सल कागदपत्रांच्या पुराव्यानें टीपांत स्पष्ट केली आहे. नं. १७च्या पोवाड्याच्या पाचव्या चौकांत भाऊ जखमी होऊन हातीं मरणोन्मुख सांपडल्यावर 'झाला हुकूम धन्याचा मारा वैऱ्याला। तेव्हां सर्जेराव बापूनें हत्तीवरनें खालीं टाकून दिला। भाऊ पळताच खाशा भालदारानीं तोडला॥ तरवारीच्या धारेनें प्राण गेला॥' अशी माहिती दिली आहे. नं. १९ च्या पोवाड्याच्या पाचव्या चौकांत खालील चरण आहेत.

"मग स्वार झाला भाऊसाहेब चढला घोड्यावर॥
शामजी घाटगे बापुसाहेब कागलकर॥
केली दोघांनीं लगट जाउन धरले घोड्यावर॥
राजापाशीं घेऊन आले डेऱ्यासुमार॥
धनी महाराज बोलला नको दृष्टीला जिवें
मारा नेहून दूर॥
दौलतरावं, विश्वासरावं तोडून केले चूर॥"

कोल्हापूरच्या पक्षपाती शाहीरानीं लढाईनंतर लगेच रचलेल्या दोन पोवाड्यांतून ही एकच दिलेली साक्ष अस्सल पत्रांच्या प्रत्यंतर पुराव्यानें खरी ठरत असतां पोवाडा हें इतिहासाचें अत्यंत महत्त्वाचें साधन नाहीं असें कसें म्हणतां येईल? शिवाय या पोवाड्यांचें दुसरेहि महत्व आहे. पटवर्धनी दप्तरावरून सदर लढाईत पटवर्धनांकडे कोण कोण सरदार होते,

त्यांची हालहवाल काय होती, त्यांपैकीं कोणास जखमा झाल्या, त्यांनीं कशा हालचाली केल्या, वगैरे इत्थंभूत माहिती मिळेल. तशी अर्थातच करवीरकरासंबंधीं मिळणार नाहीं. ती सर्व या दोन पोवाडयांवरून मिळते. पट्टणकुडोच्या लढाईचा साग्र व व्यवस्थित इतिहास लिहावयाचा झाल्यास पटवर्धनांच्या पत्रांइतकाच या पोवाडयांचा उपयोग होणार आहे. रा. मोडक यांनीं कोल्हापूरच्या इतिहासांत यांचा कांहीं उपयोग केलेला नाहीं.

( ७ ) आजपर्यंत इतिहासांत ज्यांचा नुसता उल्लेख आला आहे परंतु ज्यांसंबंधीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं अशा प्रसंगावर पोवाडयांनीं नवा प्रकाश पाडलेला आहे. इ. स. १७७५ त पेशव्यांचे तर्फे घुळपांची व इंग्रजाच्या रिव्हेंज आणि बॅाबे या दोन लढाऊजहाजांचीं मोठी घनचक्कर होऊन शेवटीं शत्रूला शरण जाण्यापेक्षां मरण बरें असा विचार करून मराठ्यांनीं आपल्या हातानें दारूच्या कोठाराला आग लावून जलसमाधि घेतली व त्यावरील तांडेल व खलाशी बुडाले. ह्या धीरोदात्त प्रसंगाची माहिती उपलब्ध ऐतिहासिक कागदपत्रांत कांहींच सांपडत नाहीं. नाहीं म्हणावयास खरे यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ५ पत्र लेखांक १४४० मध्यें या लढाईसंबंधीं दोन तीन वाक्यें आहेत. ग्रँडडफच्या इतिहासांत जवळजवळ इतकाच तांत्रिक उल्लेख आहे. फक्त वर दिली येवढीच माहिती त्यांत मिळते. पण हीच माहिती या लढाईवर पोवाडा रचणाऱ्या शाहीरानें वर्णन केली आहे ती किती विस्तृत व तपशीलवार आहे ! पेशव्यांच्याकडे कोणकोणचे पाल होते व कोणचीं दोन मोठीं जहाजें होतीं, त्यावरचे निवडक खलाशी कोणच्या प्रांतांतले होते, त्या लोकांवर कोणा थोर सरदारांची हुकमत होती, युद्धांत परस्परांनीं डावपेंच काय केले, इंग्रजांच्या व मराठ्यांच्या हालचाली कसकशा व कोणकोणत्या ठिकाणीं झाल्या, जिवापाड लढल्यावर शेवटीं "तुला पेसवाचा धमक दावितो आतां जी" असें म्हणून मराठे कसे आवेशामुळें लढले व शेवटीं " न येऊ म्हणती शरण करूं पेशव्याची नामना " असा विचार करून त्यांनीं जहाजाला कशी आग लावून दिली, नंतर कोण हाहाःकार उडाला, वगैरेसंबंधीं आवेशपूर्ण व तपशीलवार माहिती बापू खंदेसिचा पोवाडा उपलब्ध नसता तर खचित मिळाली नसती. अस्सल ऐतिहासिक कागदपत्रांत ज्यांचा फक्त नुसता निर्देश केलेला आहे परंतु त्यासंबंधीं तेथें

कांहीं अधिक माहिती लिहिलेली नाहीं अशा या प्रसंगावर या पोवाड्यानें नवा प्रकाश पाडला आहे. हा पोवाडा रा. दळवी यांनीं प्रसिद्ध केलेल्या मराठी कुळांचा इतिहास भा. ३ मध्यें धुळपांच्या प्रकरणांत छापला आहे.

(८) प्रभाकराचा हिंदुस्थानवर्णनाचा एक पोवाडा आहे. त्यांत "ब्राह्मण क्षत्रिय आदि वर्णांत शिवछत्रपतीपासून पेशवाईअखेरपर्यंतचे कालांत कोण-कोणतीं घराणीं व पुरुष उदयास आले त्यांचें संकलित वर्णन आहे. या वर्णनाची व्याप्ति उत्तरेस नेपाळपासून दक्षिणेस चिनापट्टण म्हणजे मद्रास-पर्यंत आहे ही विशेष गोष्ट होय." त्याचप्रमाणें प्रभाकराच्या "श्रीमंत झाले लोक श्रीमंतापासुन लक्षावधि" या पोवाड्यात वरच्यापोवाड्या-प्रमाणेंच पेशव्यांच्या सोयऱ्यांची व सरदारांची विस्तृत यादी दिली आहे. हा पोवाडा म्हणजे तत्कालीन हिंदुस्थानांतील श्रेष्ठ घराण्यांची एक अचूक सूचिच होय.

( ९ ) पहिल्या बाजीरावसाहेबांचा मुलगा समशेर बहाद्दर व नातू अली-बहाद्दर यांची माहिती सर्वांस आहे. परंतु नानासाहेब पेशव्यांचेहि असेच दोन लेकवळे होते याची वार्ता इतिहासज्ञानांहि नाही. ही खाजगी माहिती प्रथम प्रभाकर शाहिराच्या 'श्रीमंत झाले लोक श्रिमंतापासुन लक्षावधी। दुरावले श्रीमंत आपल्या दृष्टिस पडतील कधीं' या पोवाड्यांत प्रकट झाली. चरण असा आहे "श्रीमंतांचे प्रतिबिंब अली बहाद्दर समशेर बहाद्दर। कुशाबा हैबतासिंग सजेले काय रूप सुंदर" कुशाबा आणि हैबत-सिंग ही त्या दोघांची नांवें. या दोन नांवापैकीं हैबतासिंगाचे नांव प्रत्यंतर पुराव्यानेंहि खरे ठरते. मराठी दप्तर रुमाल दोन मध्यें भट पेशवे वंशाची जी विश्वसनीय हकीकत छापली आहे त्यातील रमाबाईच्या सती प्रकरणात हैबतासिंगाचा उल्लेख स्पष्टपणें आलेला आहे.

( १० ) मराठ्यांच्या लष्करासंबंधीची एकत्रित माहिती पोवाड्यातून जशी सापडते तशी दुसरीकडे सापडणे शक्य नाहीं. त्यांच्या फौजातून कोणकोणत्या निवडक लढवाई जातींचा भरणा असे, कोणकोणची शस्त्रे घेऊन लढण्यांत त्यांचा हातखंडा असे, तोफखाना कसा असे, कवाइती कंपू किती असत, त्यांची शिस्त कशी असे, रणवाद्ये कोणची असत, त्या-पैकीं बिनकवायती फौज कोणती वापरी, एक रंगी पोषाक कोण वाप-

रीत, सैन्याबरोबर पेंढार, बाजारबुणगे, बेलदार, कामाठी वगैरे किती जमाव असे, तळावरची व्यवस्था कशी असे वगैरे युद्धविषयक कितीतरी बारीक सारीक माहिती पोवाड्यावरून समजून येते. विशेषतः पोवाड्यांतून शस्त्रांची जितकी नावें आली आहेत तितकी दुसरीकडे मिळत नाहींत.

## पोवाडेवजा लावण्या

येथच थोड. विषयांतर करून लावण्याविषयी दोन शब्द लिहिणें आवश्यक आहे. कारण पोवाड्यांचा इतिहासाला जितका उपयोग आहे तितकाच लावण्यांचाहि असणार. ज्या शाहिरांनी पोवाडे रचले त्यानीच लावण्या रचल्या असल्यामुळें त्यांच्या समकालीनत्वाविषयीं शंका येण्याचें कारणच नाहीं. शिवाय लावण्यापोवाड्यांचें प्रमाण शंभरास पांच असे असल्यामुळे लावण्या विपुल उपलब्ध आहेत, व त्यांचाहि इतिहासाला उपयोग होण्यासारखा आहे. सामान्य विधान करावयाचे झाल्यास पोवाडा राजकीय स्थितिदर्शक असतो तर लावणी समाजस्थितिदर्शक असते असे म्हणता येईल. पोवाड्यात ऐतिहासिक वीर पुरुष आणि मुत्सद्दी यानी शत्रूशी घेतलेली झुंजें आणि गाजविलेले पराक्रम, त्यानी रचलेली कारस्थाने आणि त्यांचे परिणाम यासंबंधीं माहिती मिळते त्याप्रमाणें लावण्यातून ऐतिहासिक कालांतील समाजस्थितिविषयीं, लोक समजुतीविषयी व लोकाचाराविषयीची माहिती कळून येते. मराठे शाहींत समाजाच्या समजुती व ग्रह काय होते, शकुनावर व मुहूर्तावर लोकांचा किती दृढ विश्वास होता ‘ जाणे जोशांचे ’ आणि गणकाचे केवढे प्राबल्य होते विवाह कोणच्या वयोमर्यादेपर्यंत होत, स्त्रियांचे शिक्षण कितपत असे, त्यांच्या सौंदर्याच्या व्याख्या काय असत, स्त्रियांचे व पुरुषांचे पोषाक कसे असत, दागदागिने व अलंकार किती व कोणचे वापरले जात, लोकाचे उत्सव कोणकोणते असत, सण कोणते पाळले जात, नवससायास किती व कोणकोणचे केले जात, सास्वासुना नणदा जावा इत्यादिकांचे परस्पर संबंध कसे असत, गृहसौख्य आणि गृहव्यवस्था कशी असे, वाहने कोणची असत, घरांची मांडणी व त्यातील रचना कशी असे, वगैरे शेकडोंशे बारीक सारीक पण महत्त्वाच्या गोष्टीवर या

लावण्या प्रकाश पाडतात. मराठेशाहीचा सामाजिक इतिहास लिहिणाराला या लावण्यांचे सूक्ष्म अध्ययन केल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

वर सांगितल्याप्रमाणे पोवाडे लावण्यात राजकीय व सामाजिक असा सामान्यतः भेद असला तरी या नियमाला बरेच अपवादहि दाखविता येतात. कारण काही पोवाडे असे आहेत कीं त्यातील समाजस्थिति वर्णनावरून त्याना लावण्या म्हणणे इष्ट होईल व उलट अशा काही लावण्या आहेत की त्यातील सर्वस्वी राजकीय महत्त्वाच्या वर्ण्य विषयामुळें त्याना पोवाडे अशी संज्ञा देणे युक्त होईल. 'शके सत्राशे एकुणचाळीसामधि। ईश्वरे नाम हा बरवा संवत्सर होता तधी। झाली प्रथम लढाई दिपवाळीचे अधी' ही होनाजीची लावणी म्हणजे वास्तविक तो खडकीच्या लढाईचा सुंदर पोवाडाच आहे. 'ब्राह्मणीराज्य जोरदार घोडयावर स्वार होते शिपाई' ही लावणी कसली? तो पेशवाईचा पोवाडाच आहे. 'शाल्योदन मिष्टान्न' इत्यादि लावणीत दुसऱ्या बाजीरावाचे वर्णन असल्यामुळें तो पोवाडाच मानला पाहिजे. तीच गोष्ट 'श्रीमंत झाले लोक। श्रिमंतापासुन लक्षावधि' किंवा 'चोहो वर्णातुन कोण मुशाफर' इत्यादि अनेक लावण्यांची आहे. याचे उलट रामजोशाच्या दुष्काळाच्या पोवाडयाला किंवा प्रभाकराच्या महेश्वर वर्णनाच्या पोवाडयाला लावणीतच गणावें लागेल.

अशा पोवाडेवजा लावण्यांतूनहि किती महत्त्वाची माहिती मिळते. उदा० परशरामाची 'पश्चिमवाहिनी गोदा प्रतिमूळ गंगा' ही लावणी पहा. ही खुद्द दुसऱ्या बाजीरावासमोर रचलेली आहे. त्यात रघुनाथरावदादानी कोपरगावास वाडे, महाल, देवळें, बांधली व रहाटगाडगी सुरू करून पाणी पाजून बागा तयार करविल्या ही हकीकत सांगितलेली आहे. ही माहिती आजपर्यंत कोठें उपलब्ध झालेली होती? एकट्या बाजीरावासंबंधीच पाच पन्नास लावण्या आहेत. व त्यापैकीं कांहीं कांहीं तर खुद्द त्याला म्हणून दाखविलेल्या आहेत. प्रभाकर, होनाजी, सगनभाऊ यांचे लावण्यांचे संग्रह प्रसिद्ध आहेत. त्यापैकीं अनुक्रमें लावणी नं. १, २, ५, ६, ७, १८, २०, २५, २७, २९, ३१, ३५, ७९, ९२, ९३, ९५, ९७, ९८, १०१, १०८, १०९, ११०, १११, व १४४. ८१, ९३, ९७, ११९, १३५, १४२ व १८. २०, २४, ३४, ३८, ५०, ५९, ६३, ६८,

६९, इतक्या लावण्या दुसऱ्या बाजीरावाच्या आहेत. यापैकीं कोणांत बाजीरावाच्या निरनिराळ्या रंगमहालाचें व तेथल्या वैभवाचें वर्णन आहे. कोणांत त्याच्या स्वारीचें वर्णन आहे, कोणांत त्याचें सुंदर शब्दचित्र आहे, कोणांत त्याच्या बीभत्स विलासांचें वर्णन आहे, कोणात त्याच्या दानशूरपणाबद्दल व कर्मठपणाबद्दल माहिती आहे, कोणांत त्याच्या जैना नावाच्या प्रीतिपात्राची माहिती आहे, कोणांत त्याच्या मनरंजन महालाचा उल्लेख आहे, कोणात त्याच्या नाटकशाळांची वर्णनें आहेत, कोणांत त्याच्या इद्दपारीनंतर दुःखी झालेल्या स्त्रियांनीं त्याच्या समवेत केलेल्या क्रीडांची त्यांच्या मुखानें माहिती वर्णिली आहे. कोणांत त्याच्या महालांची व विलास स्थानांची वर्णनें आहेत. या समकालीन शाहीरानी स्वतःच्या डोळ्यानी पाहून काढलेले हे बाजीरावाच्या खासगी आयुष्याचे यथास्थित चित्र आहे. पण एकाहि इतिहाससंशोधकाने आजपर्यंत त्याकडे लक्ष दिले नाहीं.

साराश शाहिरी वाङ्मयाचा कोणचाहि प्रकार पाहिला तरी त्याच्या समसमकालीनत्वामुळे त्यात सत्य इतिहासाचे सुवर्णकण चोहीकडे विखरलेले सापडतात. तो पोवाडा असो किंवा लावणी असो, लावणीवजा पोवाडा असो किंवा पोवाडेवजा लावणी असो फार काय इतिहासाशी ज्याच्या अर्थाअर्थीं काही संबंध नाहीं असा एखादा पौराणिक विषयावरचा पोवाडा असो त्यात कर्त्याच्या काळाचे कोणचे ना कोणचे तरी सामाजिक व राजकीय चित्र थोडें तरी उमटलेले दिसेल. शितूतानी द्रौपदीवस्त्रहरणाचा एक पोवाडा छापला आहे. ‘शके सत्राशे अठ्ठावीस रुद्र हावसो । क्षयनाम संवत्सर रविवाराचे दिवशी जोडिला ख्याल कार्तिक शुद्ध द्वादशी’ असा रचनाकाळ पोवाड्याचे शेवटी तपशीलवार दिला आहे. म्हणजे इ. स. १८०६ मध्यें हा पोवाडा रचला गेला. या पोवाड्याच्या शाहिरानें कृष्णानें द्रौपदीला जी निरनिराळी वस्त्रें नेसविली त्याची याद देताना स्वतःच्या काळीं हिंदुस्थानांत प्रसिद्ध असलेल्या सर्व कापडपेठांची व त्या त्या ठिकाणीं होणाऱ्या विशिष्ट फर्माशी कापडाचीच न कळत माहिती दिलेली आहे. द्वापार युगातला कृष्ण पण त्यानें शाहिराच्या द्रौपदीला ‘विलाइत कलकत्ता बंगाल्याचे पीतांबर’ सुद्धां नेसविले आहेत. अडाणी शाहिराचा अविदग्धते-

मुळें कलेच्या दृष्टीनें त्याचे हातून हा कालविपर्यासाचा दोष घडला पण इतिहाससशोधकांच्या दृष्टीनें तोच किमती मोत्याचा घोस ठरला आहे यांत शंका नाहीं.

मूळ, इतिहासाचे एक महत्त्वाचे साधन म्हणूनच या शाहिरीवाङ्मयाच्या संशोधनाचा उद्योग सुरू झाला. परंतु शाळिग्राम शितूतानी फार नाहीं तरी अडीचशें तीनशें पोवाडयांचा व चारपाचशे लावण्यांचा जो संग्रह उपलब्ध करून दिलीं त्याचाहि आजवर कोणा इतिहासकारानें परामर्ष घेतला नाहीं. मग नवीन पोवाडे संशोधून काढणें तर दूरच. नाहीं म्हणावयास एकट्या राजवाड्यानी तेवढी या वाङ्मयाकडे एकदोनदां कृपादृष्टि टाकली. आपल्या साधनांच्या चवथ्या खंडांत त्यानी पोवाडयांचे कामापुरते का होईना पण परीक्षण करून समकालीनत्वामुळें बखरीपेक्षां पोवाडे हे अधिक ग्राह्य असा निकाल दिला, व पुढें आपल्या साधनग्रंथांतून एकदोन त्रुटित पोवाडेहि छापले. बाकी एकाही इतिहासज्ञाने तिकडे आपला कूर्मकटाक्ष टाकला नाहीं.

शाळिग्रामशितूतांच्या प्रयत्नानंतर आतां एकहि ऐतिहासिक पोवाडा मिळणे शक्य नाहीं असें पुष्कळास वाटतें. परंतु ते चूक आहे. गोंधळयाभराडयांच्या पठणात असलेले व कांहीं त्यांच्या घरच्या जुनाट दप्तरातून पडून राहिलेले अनेक नवेनवे पोवाडे मिळण्याचा दृढ विश्वास वाटतो. खडर्याच्या स्वारीवरचे काही अप्रसिद्ध पोवाडे मोगलाईत अजून जिवंत आहेत. उदगीरच्या लढाईचे पोवाडे तिकडच्या गोंधळयांच्या दप्तरात मिळण्याचा दृढ संभव आहे. कोकणपट्टीतल्या पोवाडयासंबंधी तर अजून नीट शोधन झालेला नाहीं. कान्होजी आंग्रयापासून कृष्णराव धुळपापर्यंत मराठ्यांचे आरमार शाबूत होते. त्या शेपाउणशे वर्षांच्या काळांत आंग्र्यानी व धुळपानी पुष्कळ लढाया घेतल्या. ‘ धुळप याचा इंग्रज टोपी काढून करिती आदर ’ परतु धुळपापेक्षा आंग्र्यानीच इंग्रजावर काय किंवा परकी आरमारावर काय असा वचक बसविला होता व इतक्या वेळा त्यांचा पराभव केला होता की आंग्र्याचे नांव निघताच ‘ जशि चित्याला पाहुन हरणी दचकत हरली हिंमत ’ अशी त्यांची स्थिति होऊन जात असे. त्या आंग्र्याच्या पराक्रमाचे कितीतरी पोवाडे कोकणपट्टीत झाले असतील

व त्यापैकीं अजूनहि पुष्कळ हयात असतील–पण ते मिळविण्याचा प्रयत्न अजून झालेला नाही. नागपूरच्या भोसल्यांच्या पोवाड्यांसंबंधीं हेच म्हणता येईल. धनाजी जाधवाचा एक पोवाडा कोंकणपट्टींत जिवंत आहे– कोळ्यांच्या पठणात आहे अशी विश्वसनीय माहिती मिळते परंतु त्याचा कोणी उतरून घेऊन अजून संग्रह केला नाहीं. ते असो पण कोकणपट्टी-तील आरमारविषयक पोवाडे मिळतील तर मराठी भाषेच्या दृष्टीनें व मराठी इतिहासाच्या दृष्टीने एक नवेच दालन उघडल्यासारखे होणार आहे. आज धुंळपांच्या दप्तरातले २।३ पोवाडे उपलब्ध आहेत. परंतु त्यातल्या एकाच पोवाड्यांत आजतागायत् उपलब्ध असलेल्या कोणच्याही साधनापेक्षा किती अधिक माहिती मिळू शकते ते वर सांगितलेच आहे. असो. येथेच आम्हास नवीन उपलब्ध झालेल्या पुणे प्रांतातील पेशवे कालीन समस्त गोंधळयांच्या याद्या जशाच्या तशा उतरून घेतो. इतिहास संशोधकाना त्यांचा उपयोग होण्यासारखा आहे.

श्री

कर्जरोखा सके १७०७ विश्वावसू नाम संवच्छरे अस्वीन शु॥१ ते दिवशी धनको नाम राजश्री हरी विठल सहश्रबुधे पिपलवडीकर यासी रिनको नाम समस्त गोंधली महालानिहाय व प्रांत पुणे आसामी त ॥

| किता देहाये | किता देहाये |
|---|---|
| १ सुलतानजी थिटे आलकुटीकर | १ बजाजी जाधव निबरलकर |
| १ सुंदरदास जाधव चासकर | १ लक्षुमन गंगावने |
| १ भवानदास कोठे तलेगावकर | १ शिवराम थिटे चाँसकर |
| १ संताजी मोरे पिपलगावकर | १ आत्माराम जाधव कमानकर |
| १ भवानदास काठे पिंपलवडीकर | १ मल्हारी थिटे पुनेकर |
| १ खंडोजी लोखंडे | १ हरी थिटे चासकर |
| १ पाशाणकर गरुड | १ संताजी जाधव खेडकर |
| १ चेंडुदास पाशाणकर | १ गंगाजी गरुड पुणेकर |
| १ क्वालोजी गरुड पाशाणकर | १ राणोजी वायसकर |
| १ म्हसाजी थिटे आलेकर | १ हाणोजी गंगावणे |

१ पुंडाजी कांठे आलेकर
१ सटवाजी इंगले
१ आणाजी धुमाळ

———

१३

१ मल्हारदास जाधव चितळवडेकर
१ गोविंदा आठला कोतुलकर
१ भवानी गरुड बावधानकर

———

१३

२६

सुरु सीत समानीन मया व अलफ कारने रोखा लिहून दिल्हा ऐसाजे तुम्हापासून घेतले कर्ज आपले आत्मकार्यालागी रु. ९०० अक्षरी नऊशे दौलताबाज हे उसने तुम्हास आपण एके वरशा आलीकडे भरना करून देऊ यासी अंतर न करू हा कर्जरोखा लिहून दिल्हा सही.

ब।। बापु शंकरजी गोंधली देहाये हाली मुकाम को पुणें-

निशाणी चवडका (चवंडक्याचें चित्र)

साक्षे

ता।। २९ माहे जिल्काद

श्रीशंकर

करारनामा सके १७०९ प्लवंग नाम संवछरे कार्तीक वा। १३ ते दिवसी राजश्री हरी विटल सहश्रबुध्ये मौजे पिपलवडी यास आसामी गोंधले बी।। ता।।

कित्ता

१ बजाजी जाधव निंबरल्कर
१ लक्ष्मण गंगावणे मौजे रानभेंडीकर
१ कालोजी गरुड पाशानकर
१ चंडीदास गरुड पाशानकर
१ आनाजी धुमाल मौजे वाघापूरकर
१ पदाजी काठा आलेकर
१ आंबाजी थिटा पाशानकर
१ सदू टेंबा पाशाणकर
१ गोविंदा आटला कोतुलकर

किता

१ हैबती गरुड पिपलगावकर
१ विटोजी गरुड पिपलगावकर
१ माणकू सातारकर
१ गंगाजी गरुड पुणेकर
१ गोधाजी इंगला बहिरववाडकिर
१ सटवाजी गरुड बहिरववाडीकर
१ सटवाजी इंगला बहिरववाडीकर
१ गोडाजी थिटा सिनरकर
१ सटवाजी वईद बहिरववाडीकर

| | |
|---|---|
| १ चेनजी गरुड पिपलगावकर | १ संताजी जाधव खेडकर |
| १ मनाजी बडधा निबरलकर | १ आत्माराम जाधव चासकर |
| १ हाणमंता आठला विटेकर | १ नथु आठला इटेकर |
| १ नथू बडधा पुणेकर | १ भापजी गरुड बावधानकर |
| १ सदू भिसा जुनरकर | १ हरि थिटा पाशाणकर |
| | १ पांडु थिटा पाशाणकर |
| —— | —— |
| १४ | १५ |

सदरहू आसामी येकूणतीस सन ११८१ कारणे करारनामा लेऊन दिल्हा येसाजे

आमचा व जोगी भराडी याचा कजिया सूरसमेल वाजविण्याचा कजिया सरकारात पडोन निवाडा जाला आम्ही वादास खरे जालो सबब दरबार-खर्चास वगैरे तुम्हापासून कर्जाव येवज घेतला बी।। त।। खते त्याची फेड येआ वरशात मुलकी पटीवर करावी म्हणून करार त्यास मुलकी पटीवर येवज वसुलांत घेऊन तुम्हास पाठवील त्याची पावती तुम्हापासून घेतली दरोबस्त येवजाची फेड जाली नाहीं. सबब तुम्ही तगादा लाविला त्याज-वरून तुम्हासी विनंति करून वायदा दोहो वरशाचा मागितला की मुलकी पटी करून फेड करून देऊ याखेरीज पुणियात आमचे गोंधल्याचे मेल आहे त्याजवर दरसाल रु. २ प्रो। देऊ. व यात्रा त।। श्री देवाच्या आठ त।।

| | |
|---|---|
| १ श्री जेजोरी चैत्र मास पुर्णिमा | १ कवठे चैत्री पुर्णीमा |
| १ बोल्हाई अस्वीन वद्य ८ | १ निंबभरी चैत्री पुर्णीमा |
| १ निंबगाव चैत्री पुर्णीमा | १ कोर्धान पौश व चैत्री पुर्णीमा |
| १ कनेरसर चैत्री पुर्णीमा | १ दर्याबाई वडगाव |
| —— | —— |
| ४ | ४ |

येकूण आठ आहेत त्याचा आकार होईल XX प।। निमे येवज होईल तो सदरहूप्रमाणें येवज जमा करून दरसाल देऊन दो वरशात फेड करून देऊ या येवजावर फेड न जाली तरी स्वदेशी गोंधले याजवर आणिक

पटी करून येवजाची फेड करून देऊ बाकी येवज राहिलियास तुमचे खती ज्या असाम्या पूर्वी आहेत त्याजवर वरगणी करून देऊ. त्याप्रमाणे गैर-हजीर आसामी जालीवनदार असामी याजवर वरगण येईल त्याचा पैका आपण वसूल करून देऊ. इतकियावर येवज न फिटे तर आपण खु॥ नि॥ घर घराउ देऊ मुलकी गोंधळ्याचा उजूर करणार नाही यास जामीन सुलतानजी बिन हैबतदास थिटे आलकुटीकर व सुंदरदास बिन उदाजी जाधव चासकर व भवानदास बिन मोहोनदास काठा तळेगावकर व संताजी बिन मोहोनदास मोरे पिंपळगावकर व भवानदास बिन तुळशीदास काठे पिंपळवडीकर व खंडोजी बिन मल्हारदास लोखंडे पुणेकर सदरहू आसामी ६ आपण जमान असो. सदरहू गा प्र॥ तुमच्या रुपयाची फेड करून देतील न दे तर आपण उगवणी करून देऊ उगवणी न करू तर आपण खु॥ नि॥ रुपये देऊ हा करारनामा लेहून दिल्हा सही.

नि॥ चवंडके
(चवंडक्याचें चित्र)

बि॥ विठल पदमाकर
जोशी कुलकर्णी
मौ॥ ब्राह्मणवाडे व गोरेगांव

गोही

त्रिंबकजी प॥ लांडगे व
रामाजी प॥
गोवेकर भवानजी जाधव चोटे
मौजे कलंब त॥XX

१ बापु शंकर नि॥ गोंधले पुणेकर
१ येमाजी वलद बापुजी फलके
मौजे आकोडी त॥ घोडे
१ कासी वलद संताजी फलके
मौजे आकोडी त॥ घोडे
१ पत्रा प्रो साक्षे बाबुराव
चिमणाजी कुलकर्णी मौजे
आकोडी त॥ घोडे.

१ भवनदास गरुड बावधानकर
१ खंडोजी इसलकर पासमोरेवल्लीकर
१ कासीदास गरुड जवलेकर
१ नायेकू दिपुरडा राजापूरकर

१ खंडोजी गरुड जाबगावकर
१ पदू काठे आलेकर
१ सटवाजी गरुड बहिरववाडीकर
१ मनाजी बडदे निबरलकर

१ फिरंगोजी रेणुकदास कवठेकर
१ इटोजी पाचागे कडधेकर
१ भुजंगा काठे तलेगावकर
१ दारकू काठे तलेगावकर
१ परसोजी गंगावणे पाशानकर
१ सिवजी धुमाल इरेगाव पाडलीकर
१ राणोजी धुमाळ चाखल वोहलकर
१ भिकाजी थोटे नगरकर
१ निंबाजी जाधव सा(खा)तगावकर
१ राणूजी पाचांगा कडधेकर
१ मलि पाचांगा पिपलगावकर
१ देवजी तरसा कडुसकर
१ लक्षुमन गंगावणे सबेडीकर
१ आणाजी धुमाल वाघापूरकर
१ सिवराम आठला कोतुलकर
१ भिकाजी थिटे सातारकर
१ मानकू सातारकर
१ पांडू थिटे पाशानकर
१ हाणोजी गंगावणे पाशानकर
२ तुकोजी इंगले, सुदउंब्रेकर
१ आत्माराम जाधव चासकर
१ खंडोजी थिटे संसारफरेकर
१ मथुरामदास श्रीगोंदेकर
१ कालोजी गरुड पाशानकर
१ राणूजी धुमाल दाभाडी पाटनकर
१ (है)बती आठला बिडकर
१ मानकू जाधव कडुसकर
१ सैताजी जाधव खेडकर
१ फिरंगुजी भिसे जुनेरकर
१ बजाजी जाधव चितळवडेकर
१ हरि थिटे चासकर
१ सिवराम थिटे चासकर
१ नथु बडदे चासकर
१ मणाजी बडदे चासकर
१ पिराजी मोरे पिपलगावकर
१ गगाजी गरुड पुणेकर
१ संताजी उब×× मतीकर
१ कान्होजी इंगले जाबुलपाडेकर
१ अंबाजी थिटे पाशानकर

सदरहू असामी मिलोन आपण कर्जाव ऐवज घेतला च्यार हजार याची वसूल आपन तुम्हास पटोदर देऊ यासी अंतर न करू व व्याजसुद्धां ऐवज देऊ रुपये सिका देऊ यासी मणोती दर सेकडा रुपये पाच प्रमाणे येकून रुपये दोणसे २०० यासी व्याज नाही. मणोतीचे पोते ×× मुदलच देऊ. येणेप्रमाणे करार ×× हे कर्जखत लिहून दिधले सही ऐवज पुनीयात देऊ.

निशानी चवडका

( चवडक्याचे चित्र )

## पोवाड्यांचे समालोचन

आज उपलब्ध असलेल्या पोवाड्यांची एकंदर संख्या अदमासे ३०० आहे त्यापैकीं शिवकालीन म्हणजे पहिल्या शिवाजी महाराजापासून पहिल्या शाहू महाराजापर्यंतच्या काळातले अवघे सात आहेत. पेशवे कालीन सुमारे दीडशे आहेत व बाकीचे अव्वल इंग्रजीतले आहेत.

शिवकालीन पोवाड्यापैकी खुद्द शिवाजी महाराजांचे दोन, तानाजीचा एक, बाजी पासलकराचा एक, शाहूमहाराजासंबंधी दोन व पहिल्या बाजीरावासंबंधी तीन अशी वर्गवारी पडते. अफजलखानाच्या वधापासून म्हणजे सन १६५९ ते १७४९ पर्यंतच्या सुमारे नव्वद वर्षांच्या काळांत शाहिराना स्फूर्ति देणारे खंडोगणती प्रसंग घडलेले आहेत. एकट्या शिवाजी महाराजाच्या कारकीर्दीतच पाचपंचवीस तरी प्रसंग असे दाखविता येतील कीं त्यावर तत्कालीन शाहिरानी अवश्य पोवाडे रचले असतील असे निर्धास्तपणे मानता येईल. पण आज वर सांगितलेल्या दोनचार पोवाड्याखेरीज दुसऱ्या कोणाचाच मागमूस लागत नाहीं. या शेपाउणशे वर्षात घडलेल्या विविध प्रसंगावर व त्या काळात वावरलेल्या अनेक कर्त्या पुरुषावर पाचपन्नास पोवाडे तरी रचले गेले असतील. ते आज सांपडत नाहींत यावरुन काळाने ते सर्वस्वी नाहिसे केले असे मानावयाचे कीं काय? शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर वीस बावीस वर्षेपर्यंत सबंध महाराष्ट्रभर मोगलीं फौजानी जो धुमाकूळ उसळून दिला व रयतेचा जो चिंधीचोळा केला त्या तडाक्यातच हे शाहिरी वाङ्मय नष्ट झाले असे मानावयाचे कीं काय? पण तसे म्हणावे तर अफजलखानवधाचा पोवाडा व दिलेरखानाने पुरंदर किल्ल्याला दिलेल्या वेढ्यासंबधीचा पोवाडा हे तरी त्यातून कसे वाचले? तेहि नष्ट व्हावयास पाहिजे होते. असे होण्याचे कारण कोणी असे देतील कीं अफजलखानवध व दिलेरखानाचा पुरंदराला वेढा हे प्रसंग फार महत्वाचे असल्यामुळे त्यासंबधीचे हे पोवाडे समाजाला फार प्रिय झाले असावे. अर्थात गोंधळ्याच्या पठणात ते जिवंत राहिल्यामुळे ते आजवर तगून राहिले. पण यावर असा युक्तिवाद करता येईल कीं शिवाजीची आग्र्याहून सुटका, किंवा शाहिस्तेखानावर घातलेला छापा किंवा सुरतेची केलेली लूट,

किंवा राज्याभिषेकाचा अपूर्व समारंभ अशासारख्या तितक्याच महत्त्वाच्या प्रसंगांचे पोवाडेहि त्याच कारणाकरिता व त्याच रीतीने तगावयास पाहिजे होते. पण तशी कांहींच स्थिति नाहीं.

पण वरील सर्व शंका उपशंका जी वस्तुस्थिति गृहीत धरून अनुमानिलेल्या आहेत तीच गृहीत धरण्यासारखी आहे असे वाटत नाहीं. शिवाजीच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रभर उठलेल्या वावटळीतच शिवकालीन पोवाडे नष्ट झाले असावे हीच ती गृहीत वस्तुस्थिति. मोगली सेनेने रयतेला कितीही नागविले असले, कितीही जुलूम जबरदस्ती केली असली किंवा कितीहि जाळपोळ केली असली तरी गरीब बिचाऱ्या गोंधळ्यांच्या पोवाड्याना त्याचा काहीही उपसर्ग लागण्याचा संभव दिसत नाहीं. मोगली फौजानी गोंधळ्यांची घरेदारे लुटून त्यांची दप्तरे जाळली किंवा तत्कालीन गोंधळ्यांची वळती करून त्यांची कत्तल उडवली असाच कांहीं पुरावा सापडला तर गोष्ट निराळी.

हे शिवकालीन पोवाडे सर्व नष्ट झाले ते सापडणे अशक्य आहे असे वाटत नाहीं. आधुनिक सुशिक्षित इतिहास संशोधकानी महाराष्ट्रातील गोंधळ्यांचे पत्ते काढून त्यांची दप्तरे तपासली तर हे पोवाडे तेथें लिहिलेले त्याना अजूनहि उपलब्ध होण्यासारखे आहेत. हे पोवाडे नष्ट झाले याचा अर्थ गोंधळ्याच्या पाठांतरातून ते नाहीसे झाले. स्वराज्याचा उपभोग घेणाऱ्या व प्रत्यहि नव्या नव्या पराक्रमाच्या आवृत्ति काढणाऱ्या राष्ट्राला ताज्या पराक्रमाचा ताजा पोवाडा ऐकण्याचे भाग्य लाभत असता, जुने पोवाडे ऐकण्याकडे त्यांचे लक्ष जाण्याचे कारण नाहीं. बापजाद्यांच्या पराक्रमांच्या पोवाड्यानीं नीरश्री आणावयाची तर तो कर्तृत्वशून्य नादान लोकाना. कर्तृत्ववान वंशजाना या टोंचणीची आवश्यकता नसते आणि म्हणूनच विशेष आस्थाहि नसते. कारण त्यांच्याच पराक्रमाचे पोवाडे तयार होत असतात. शिवछत्रपतींच्या हिंदवी स्वराज्याचे वारस जे पेशवे ते असेच कर्तृत्ववान निपजले. 'धन्य वंश एकेक पुरुष जणु कल्पवृक्ष पिकले' असे शाहिरानी अभिमानाने म्हणावे अशाच तोलाचे त्याचे कर्तृत्व होते. शिवाजीच्या वंशजांनीं शंभर वर्षे शिवशाही गाजवली तशीच पेशव्यांच्या पुरुषांनीं शंभर वर्षे पेशवाई गाजविली. किंबहुना महाराष्ट्रच तेवढा

हिंदवी करण्याची शिवाजीची जी आकांक्षा होती तिचा विस्तार करून सबंध हिंदुस्थानच हिंदुपदपातशाहीच्या अमलाखाली आणण्याची स्पृहणीय महत्त्वाकांक्षा पेशव्यांनीं धरली होती. असली महत्त्वाकांक्षा धरण्याचा तेजस्वीपणा त्यांच्यात होता. व तो महोद्योग सफळ करण्याइतके बुद्धिबल व बाहुबलीह त्यांचेजवळ भरपूर तयार होते. अर्थात पेशव्यांच्या व पेशव्यांच्या सरदारांच्या पराक्रमाचे प्रत्यही नवे नवे निनाद उठत असता शाहीरानी त्यांच्या ताज्या पराक्रमांचे ताजे पोवाडे रचावे व समाजाला तेच ऐकावेसे वाटावे यात कांहीं एक आश्चर्य नाही. शिवशाहींतले पोवाडे नष्ट होण्याचे हेच मुख्य कारण होय. अडचणीच्या वेळी स्वदेशी आठवत असते तशी संपन्नतेच्या वेळीं का आठवावी ? आज आपण पारतंत्र्यांत आहो म्हणूनच शिवाजीच्या स्वराज्याची आठवण करतो. शिवशाहीनतरची पेशवाई झाली तरी ते स्वराज्यच होते येवढेच नव्हे तर वाढते स्वराज्य होते. तव्हा त्या काळी पेशव्याना काय किंवा लोकाना काय शिवाजीची वारंवार आठवण होण्याचे कारण नव्हते. पेशवाईतील सबंध शंभर वर्षातला जो प्रचंड पत्रव्यवहार उपलब्ध आहे त्यांत शिवाजीचे उल्लेख दहापंधरा वेळा तरी आलेले सांपडतील कीं नाहीं याशी शंकाच वाटते. आणि तसे होणे साहजिकच आहे. समोर वाहणारी नदी असताना तीत क्रीडा करण्याचे सोडून त्या नदीच्या उगमस्थानी जाण्याचा विचार कोण करणार ? सारांश पेशवाईत निरनिराळया नव्या नव्या विषयावर पोवाडे होऊं लागले, ते लोकांना आवडू लागले यामुळें शिवकालातले पोवाडे पाठांतरातून नाहींसे झाले. आणि पोवाडे पाठांतरानेच केवळ जिवंत राहाणारे असल्यामुळे तसे ते मागे पडताच कायमचेच पारखे झाले. शिवशाहीतील पोवाडे असे नष्ट झाले, पण जरी ते श्रवणपठणातून सर्वस्वी नष्ट झाले असले तरी ते गोंधळयांच्या जुनाट पिढीजात दप्तरातील बाडातून नष्ट झाले असे मानण्याचे कारण नाहीं व अजूनहि इतिहाससंशोधक प्रयत्न करतील तर या ३०० वर्षांच्या काळाच्या चाळणीतूनहि राहिलेले बरेचसे पोवाडे मिळण्याची दृढ आशा आहे असे फिरून फिरून सांगावेसे वाटते.

असो. वर जे शिवकालीन पोवाडे म्हणून सांगितले त्यापैकी खुद्द शिवाजीच्या पराक्रमाविषयी एकच असून दुसऱ्या दोन पोवाड्यात त्याचा बराच

संबंध आलेला आहे. या पैकीं तानाजीचा पोवाडा या पुस्तकात घेतलाच आहे. शिल्लक राहिलेला दत्ताजी जाधवाचा ऊर्फ पुरंदर किल्ल्याच्या वेढ्यासंबंधाचा पोवाडा शितूत यानी आपल्या संग्रहांत छापलेला आहे. खुद्द शिवाजीच्या काळीं तयार झालेला व त्याच्या हालचाली संबंधी माहिती देणारा म्हणून त्या पोवाड्याचे महत्व फार मोठे आहे. टीपा देऊन त्यातील भाषेची व व्यक्तींची नीट खुलासेवार ओळख देण्याइतपत तो आम्हास उलगडला नसल्यामुळे या भागात घेतलेला नाहीं. या खेरीज अज्ञान नाना शाहीराचा एक चंडीचा पोवाडा शितूत प्रतीत छापलेला आहे. तो पौराणिक विषयावर असला तरी शिवकालीन आहे म्हणून त्याचा येथे मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो.

शिवाजीनंतर संभाजीचा अगर राजारामाचा एकही पोवाडा उपलब्ध नाहीं. नंतर एकदम शाहूच्या काळातले पोवाडे दृष्टोत्पत्तीस येतात. ते एकंदर पाच आहेत. दोन शाहूच्या मृत्यूचे आहेत. बाजीरावासंबंधी तीन आहेत. एक १७२६ मधील कर्नाटकचे स्वारीसंबंधीं, एक त्रिंबकराव दाभाड्याशी झालेल्या युद्धाचा व एक त्याच्या मृत्यूचा. येथपर्यंत पोवाड्यांचा पहिला कालखंड पडतो.

दुसरा कालखंड पेशवाईतील पोवाड्यांचा. आज उपलब्ध असलेल्या संख्येपैकी जवळ जवळ निमे पोवाडे याच कालातले आहेत. या खंडाची सुरवात पानपतच्या पोवाड्यानी होते आणि त्याची समाप्ती खडकी अष्टीच्या लढायांच्या पोवाड्यानी होते. त्यातहि वर्गवारी पाडल्यास असे दिसून येते की सवाई माधवराव व दुसरा बाजीराव यांच्या कारकीर्दीतील प्रसंगावर बरेच म्हणजे जवळ जवळ ४० पोवाडे रचलेले सापडतात. हा काळ त्यातल्या त्यात अलीकडचा आहे हेच त्याचे कारण असावे. नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीतील सहा पोवाडे उपलब्ध आहेत. त्यापैकी पानपतासंबधीचेच चार असून एक पुणेवर्णनाचा व दुसरा नानासाहेबाचे मृत्यूवरचा आहे. या काळांतील लावणी एकहि उपलब्ध नाहीं. चिमाजी आप्पाचा पोवाडा मिळत नाही तसा रघुनाथराव दादासंबंधीहि मिळत नाही. फार काय थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीत इतक्या मोहिमा झाल्या तरी त्यासंबंधीचा पोवाडा एकहि मिळत नाहीं. क्वचित प्रभाक

राच्या एकदोन लावण्यांतून व बाळा बहिरूच्या एका लावणीत त्यासबंधीं थोडीशी माहिती आहे. नाहीं म्हणावयास माधवरावाच्या मृत्यूचा पोवाडा मात्र उपलब्ध आहे पण तोहि अर्धवट आहे. त्याचे सगळे चौक सापडलेले नाहीत. नारायरावाची कारकीर्द सारी सात आठ महिन्यांची आणि त्यातला महत्वाचा प्रसंग म्हणजे त्याच्या खुनाचाच होय. प्रसंग महत्वाचा आहे पण त्यावर एकच पोवाडा प्रसिद्ध आहे यानतर सवाई माधवरावाच्या कारकीर्दीचे पोवाडे लागतात. या कारकीर्दीतील महत्वाच्या प्रसगावर बरच पोवाडे सापडतात. जन्माचा, रगाचा व मृत्यूचा असे तीन पोवाडे खुद्द त्याच्यासबंधी असून कर्नाटकातील मोहिमा व खडर्याची स्वारी मिळून पंधरावीस पोवाडे सापडतात. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीतील महत्वाच्या प्रसंगावर असेच जवळ जवळ पंधरा वीस पोवाडे उपलब्ध आहेत. खुद्द त्याच्या सबंधीच्या लावण्याहीं पन्नास साठ उपलब्ध आहेत. या शेवटच्या दोन पेशव्याच्या कारकीर्दीत शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले, आंग्रे, धुळप वगैरे सरदार घराण्यातील पुरुषावरहि रचलेले पुष्कळ पोवाडे उपलब्ध आहेत. हा दुसरा कालखंड झाला.

पहिल्या व दुसऱ्या कालखंडाकडे पाहिले असतां सर्वच दृष्टींनी फार तफावत पडलेली दिसून येते. पहिल्यात फक्त सात आठच पोवाडे सापडतात. दुसऱ्यात सत्तर ऐंशी सापडतात. पहिल्यात लावणी एकहि नाहीं दुसऱ्यात अगणित आहेत. पहिल्यात शाहीर गोंधळी किंवा मराठेच असत तर दुसऱ्यात अनेक ब्राह्मण शाहीर गाजलेले दिसतात. पहिल्या काळातील पोवाड्याची रचना दुसऱ्यात अगदी पालटलेली दिसते. पहिल्यात शाहीरानीं आपल्या पोवाड्याना जवळ जवळ गद्यासारखें सुलभ असलेले ओवीवृत्त लावलेल आहे तर दुसऱ्यात अनेक 'अवघट बिकट' कवनाच्या चाली व रागरागिण्या घुसलेल्या आहेत. पहिल्या पोवाड्याचे चौक चार दोन ओव्याचेच असत. दुसऱ्याना तें बंधन कोठेंच दिसत नाहीं. पहिल्या पोवाड्याना लाभलेले शाहीर खेडवळ अडाणी असल्यामुळें त्याची भाषा तडफदार पण साधीसुधी आहे. याच्या उलट दसऱ्या काळातील पोवाडे रचणारे अनेक शाहीर व्युत्पन्न पढीक विद्वान ब्राह्मण असल्यामुळे त्यानी शाहिरी वाङ्मयांत पुष्कळ गीर्वाणवाणी पसरून देऊन तिला

ज्वलित बनविलें आहे. जुने पोवाडे जवळ जवळ गद्यच असलेल्या ओव्या असल्यामुळें त्यांत वाटेल तितकी ढवळाढवळ करतां येण्यासारखी सोय असे. नव्या पोवाडे लावण्यांना रागदारीच्या 'अकट बिकट' कवनाच्या चाली लागल्यामुळे त्यांची रचना बांधेसूद व नियमबद्ध झालेली दिसते.

तिसरा कालखंड अव्वल इंग्रजीतील पोवाड्यांचा. महाराष्ट्राच्या पेशवाईरूप स्वराज्यसूर्याला इंग्रजाच्या ग्रहणाचा पूर्वीच स्पर्श झालेला होता व त्याची काळ छाया हळुहळू त्या बिंबावर पसरत चाललेली होती. तत्कालीन 'जाणे ज्योतिषाना' म्हणजे मुत्सद्यांना याची वार्ता होती किंबहुना अनेक वेळा त्यानी ती बोलूनहि दाखविली होती. परंतु त्याचा प्रतिकार करण्याची पात्रता एकाच्याहि अंगात राहिली नव्हती. महाराष्ट्रातील सामान्यजनतेची स्थिति मात्र मूढ पशु पक्षासारखी होती. सूर्याला ग्रहण लागून तो काळा ठिक्कर पडेपर्यंत त्याना त्याची कल्पनाहि नसते. आणि म्हणूनच त्यांचे उडणें, बागडणें चिवचिवणे, नित्याप्रमाणे अनिर्बंध चालू असते. पण ग्रहण पूर्ण होऊन 'सूर्य मावळला बुडाले आभाळ' अशी जाणीव त्यांना झाली कीं ते चकित होतात, घाबरतात आणि दुःखाने शब्द करीत सैरावैरा धाऊ लागतात. तीच स्थिति पेशवाई अखेरीस मराठी जनतेची झाली व तीच तिने आपल्या मुखानीं म्हणजे शाहिरांच्या पोवाड्याच्या रूपानी बोलून दाखविली. 'काशीपासून राज्य एकछत्री' अशी कालपर्यंत ज्या पेशवाईची आम्ही अभिमानाने स्तुतिस्तोत्रे गात होतो, 'ज्यानी पुण्याकडे विलोकले ते सगतिला मुकले' अशी ज्याच्या जवामर्दीची आम्ही स्तुति करीत होतो, 'ऐरावत बांधून आणतिल प्रसंगि इंद्राचा' ही ज्या पुरुषाची ईर्षा, ती पेशवाई एका फुसक्या लढाइने नेस्तनाबूत झाली, आणि तिच्या जागी इंग्रजांची नवी मुद्रा उभी राहिली. "आता कोणीकडे जावे काय खावे कोणाच्या बळे राहावे." अशी दुःखाची, वैतागाची, भयचकितपणाची संमिश्र भावना १८१८नंतर लगेच झालेल्या पोवाडयातून दृष्टीस पडते.

यानंतर इंग्रजी अम्मल जारी झाला. आणि त्याबरोबर महाराष्ट्राचे राजकीय व सामाजिक स्वरूप पार बदलून गेले. 'तलवारी बापडी' होऊन 'फिरंगी छडी' दुनियेवर फिरायला लागली. आणि 'तप तेजाचा सूर्य

उदयला जशा चांदण्या गेल्या हारपून । तसे पृथ्वीतिल निर्वीर्य राजे शूरत्व अंगीं गेले करपून ' अशी सरदारांची स्थिति झाली. बाजीराव तर केव्हांच स्वराज्य अर्पून बसला होता. शाहीर म्हणतो ' अशाश्वत जाणुन देई स्वराज्य गोपीचंद । विदेहि झाले सोडुनि सर्वहि फंद. ' शिंदे होळकरासारखे वीर पण त्यांची स्थिति ' जसे भाउले भिंगाला ' अशी झाली होती. इंग्रजांनी ' हत्यारे न् पात्यारे मुलखांतली चट सारी ' नेल्यामुळें ' वाघ न् बकरी मिळून दोन्ही एक जागी झाली ' होती. ' जे पंच हत्यारी होते आपल्या लावणीत । ढाल तलवारा ठेविल्या घरच्या गोणीत ' ही शिपायांची स्थिति. ' तिन लाख फौज ज्या ठायी, तिथे एक शिपायी नाहीं ' ही पेशव्यांच्या राजधानीची स्थिति. चवरंग पलंग गेले आणि खुर्च्याला किंमत आली. भरगच्ची मंदिल, चिरे, शाला दुशाला याना कोणी विचारीना; डगल्या टोप्यांचा प्रसार झाला. मशाला विझल्या, कंदील लागले. नालख्या पालख्या संपल्या आणि त्यांची जागा मेण्यानी घेतली. अबदागिरी गेल्या आणि छत्र्या उघडल्या ! सारांश ' जुने कायदे अगदि मोडले जधिपुन झाली इंग्रेजी.'

पण जुने कायदे इंग्रजानी मोडले तरी त्या ऐवजी आपले नवे कायदे सुरू केले होते. कडकशिस्त, टापटीप, कामाचा उरक, न्यायाचा कडकपणा व यंत्रकलेचे चमत्कार इत्यादिकांच्या जोरावर त्यानी तत्कालीन समाजाला इतके चीत आणि चकित करून सोडले होते की विचारता सोय नाही. घटोत्कचाच्या मायावी राज्यासारखे ते त्याला अघटित वाटत होते. ' कला कुशल हिकमती जाणती मातीचं करतिल सोने ' ' कळा कुशलताहि कमति जाणतो ईश्वर कळना कळ ऐशी । दहा हस्तींशी काम हलेना एक माणूस हलवी त्याशी ' ' छत्तीस कारखाने घरीच करतो इतराची ना धरि आस्ता ' " झाला इंग्रजी अंमल फिरंगी कुंपनीची द्वाही । सद्दी त्याची बळकट त्याला राम परसन होई. " " बाच्छाई न् मऱ्हाटे राजे होउन गेले माप । अवघ्याहुन कल्पना अधिक बसविली छाप " अशी आश्चर्यचकित होऊन शाहीरानी वर्णन केली आहेत.

स्वराज्य नाशानंतरच्या पहिल्या कांहीं वर्षांत जे पोवाडे झाले त्यात गतस्वराज्याबद्दलची हळहळ हाच मुख्य विषय दिसतो. नंतर इंग्रजी आग

वळणी पडल्यावर त्यांच्या शिस्तीची जी छब पडली त्या पहिल्या रंगात इंग्रजांची स्तुतिच भरलेली आहे. या काळांत पेशवाईत पुण्याला जे महत्त्व होते ते मुंबईला आले आणि पेशव्यांचे जें महत्त्व होते ते इंग्रजाकडे गेले यामुळे साहजिकच इंग्रजांचे व मुंबईचे पोवाडे झाले.

१८१८ नंतर स्वराज्य संपले आणि त्या बरोबर पोवाड्यांची निर्मिती घंटत चालली. इंग्रजांच्या आरामराज्यात काही पोवाडे झाले पण त्यात राम राहिला नाही. १८१८ नंतर खास इंग्रजी अमलात जो प्रदेश होता त्यात तर फारच थोडे पोवाडे निर्माण झाले. आणि ते निर्माण होण्याचे कारण तरी पेशवाईतले शाहीर १८४४ पर्यंत जिवंत राहिले हेच होय. प्रभाकर आणि परशराम हे अनुक्रमे १८४३ व १८४४ सालापर्यंत जिवंत होते. त्यानी स्वराज्यांत जिथे फुले वेंचली तिथेच आता त्याना गोवऱ्या वेचण्याचा प्रसंग आला होता. स्वराज्यनाशाच्या उलटापालटीत त्यांचा सर्व आधार तुटला आणि कर्जाने पिडून, अन्नाला महाग होऊन पोटाकरितां दारोदार भटकण्याचा वख्त त्यांच्यावर गुदरला होता. पोटाची व्यथा मोठी कठीण आहे. या पोटाकरता त्याना वाटेल त्या लुंग्यासुंग्या लोकांची खुषामत करण्याचा प्रसंग आला. ज्यानें पेशव्यांच्या दरबारचा कडाका गायला त्याला त्याच तोंडाने स्प्रिंगल साहेबाच्या मोजणी हपिसाचा पोवाडा गावा लागला. ज्यानें सवाईमाधवरावाच्या रंगाची आणि बाजिरावाच्या विलासांची वर्णने उल्हासाने आलापिली त्याला आता बकाल मुंबईमधल्या शोकीमंडळीच्या पानचट लीला घोकण्याचा प्रसंग आला. ज्यांनी नाना महादजींचा गौरव केला त्यानाच आता साष्टी कलेक्टर हपिसातल्या मंडळीची स्तुतिस्तोत्रे म्हणावी लागली किंवा ज्यानी आत्मस्फूर्तीने परशरामभाऊ, बापू गोखले यांचे पराक्रम तोंडभर गायले त्यानाच आतां मुंबईतल्या पेस्तनजी शेटाची चाटुस्तुति करावी लागत होती. सारांश पेशवाईतले जे शाहीर शिल्लक राहिले होते त्यानी पोटाकरता काही पोवाडे गाइले हेच काय ते मुख्यतः इंग्रजी अमलातले पोवाडे. ही शाहिरांची पिढी नष्ट झाल्यावर मात्र शाहिरी कवितेची नदी बहुतेक कोरडी ठणठणीत पडली.

वर सांगितलेल्या काळांत जे पोवाडे झाले• म्हणून सांगितले त्यातले

कांहीं सरस असण्याचे कारण त्यांत खुद्द स्वतःच्या डोळयांनीं पेशवाई पाहि-लेल्या शाहिरांची करुण स्थिति उत्कटतेनें व्यक्त झालेली आहे हें होय. हे पोवाडे गाताना क्षणोक्षणी त्याना पेशवाईची आठवण येत होती आणि ते टिपें गाळीत होते. ‘ मनुष्यमात्रादिकांचे माहेर होती पेशवाई ’ ‘ ते गेले दिवस हे आले मोठ्या कहराचे । निरुपाय प्याले घ्यावे अता जहराचे ’ ‘सकळ रायात म्हणविती श्रेष्ठ जे राय । दिवस सोन्याचा दर्शने जयाच्या जाय.। असले गेले टाकुन हवेल्या पागा । खराटे झाले उदकाविण सुकल्या बागा ।’ ‘ स्वकर्म आचरणारे अभय जे बळि सर्वा ठायीं । पहा त्यांचे वंशज हिंडती पृथ्वीवर पाई ’ ‘श्रीमंत गेल्यापासुन मिळेना अन्न कोठे बाहेर’ इत्यादि चटका लावणाऱ्या उद्‌गारांत पेशवाईबद्दलचे त्यांचे प्रेम वळवाच्या सरीप्रमाणें कोसळलेले दिसते.

इंग्रजानी पेशवाईचा वृक्ष मुळापासून उपटून टाकला तरी त्याच्या सर-दारशाखा तोडून टाकल्या नव्हत्या. पेशवे नष्ट झाले होते. परंतु ‘ पेशव्याच्या कृतीवर बावन सरदार शिंदे होळकर वाढले भारी ’ असे सरदार अजून आपापल्या संस्थानावर अधिष्ठित होते. शिंदे, होळकर, गायकवाड, कोल्हापूरकर यांच्याशी इंग्रजानी स्वतत्र तह करून त्याना राखले होते. शिवाय मराठ्यांचे समाधान करण्याकरता सातारकरांचे स्वतंत्र असे संस्थानहि त्यानी निर्माण करून ठेवले होते. स्वराज्याचा आभास उत्पन्न करणाऱ्या या संस्थानांतून पोवाडयांची परंपरा थोडीबहुत टिकली पण त्या पोवाडयांतले तेज केव्हाच नष्ट झाले होते. तोडून टाकलेल्या झाडाच्या फांद्या काही दिवस ओल्या राहतात पण त्याला फलपुष्पांचा बहर येणे शक्य नसते. असल्या संस्थानिकानी आश्रय दिलेल्या शाहिरानी पाचपंच-वीस पोवाडे रचलेले आहेत. ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें त्यांची किंमत कितीही असो पण पोवाडयांचे म्हणून जे वैशिष्ट्य ते मात्र त्यात यत्किं-चितहि उरले नाहीं. याला शाहीर तरी काय करणार ? आणि संस्थानिक तरी काय करणार ? पोवाडयांचे आदिकारण जो पराक्रम त्याचा कोठेच साक्षात्कार दिसून येत नव्हता. फौजा नाहीशा झाल्या होत्या, हत्यारे गंजून गेली होती. मुलुखगिऱ्या संपल्या होत्या. लढाया नामशेष झाल्या होत्या. ‘ शूर मर्दांची दाली बुडाली करू लागले मजुरी ’ असा शिपायावर प्रसंग

आला होता, आणि मोठेमोठे उमराव धारकरी पण 'राव्या पारे पिंजऱ्यात कोंडिले मायेणीचा चंदिच्चारा' अशी त्यांची स्थिति झाली होती. येऊन जाऊन संस्थानिकांचे पराक्रम म्हणजे कागदी घोडे नाचविणें, लाटसाहेबांच्या भेटी घेणे, त्याना मेजवान्या देणे, जुना आव आणून पोकळ स्वाऱ्या मिरवणें हे किंवा असलेच काही तरी होते. आणि यावर त्या पोटार्थी शाहिरानी पोवाडेहि रचले; परंतु एखाद्या राजसौधावरील रत्नजडित पिंजऱ्यातल्या पोपटाची एखाद्या भिकाऱ्याच्या घरच्या पिंजऱ्यातल्या पोपटाने स्तुति करून, त्याच्या वीतभर रत्नखचित वासयष्टीचे, उंदराच्या कानाएवढ्या रुप्याच्या वाटीचे आणि सोलून ठेवलेल्या मूठभर डाळिंबाच्या दाण्याचे विशाळ कल्पना करून वर्णन करावें किंवा तो चोच वासून त्या काठीवरून उराडा पडला म्हणजे त्याची पोटभर स्तुति करावी इतकीच त्याची योग्यता. त्यात 'स्वतंत्र वनवृत्ति' कोठून प्रकट होणार? इंग्रजीतील बंदिस्त खुराड्यातील एकेका कप्प्यात कोंडलेल्या या निरुपद्रवी राजबिंड्या खबुतराच्या पोवाड्यापेक्षा शंभू महादेवाच्या डोंगरात वाटमाऱ्या करणाऱ्या किंवा दरोडे घालणाऱ्या उमाजी नायकाचे किंवा हरी रामोशाचे पोवाडे अधिक जिवंत आहेत याचा अर्थ तरी तोच आहे. त्यांचा हेतु कितीही वाईट असला धंदा कितीही त्याज्य असला तरी त्यात पराक्रम होता आणि जिवंतपणा होता आणि म्हणून शाहिरानी स्वयंस्फूर्तीने रचलेले त्याचे पोवाडे सरस वठले आहेत. आणि नावे मोठी लक्षणे खोटी असलेल्या या संस्थानिकांच्या पोवाड्यापेक्षा उमाजी नाइकासारख्या दरोडेखोराच्या नावावरच गोंधळ्या भराड्याना आपली पोटे अजूनहि भरता येत आहेत.

## शाहिरांचा परामर्श

गुणिजन पदरीं बाळगण्याची चाल पूर्वापार आहे. भांड, भाट, भालदार, भवय्ये, शाहीर, चितारी, गपी, विनोदी वगैरे लोकाचा गुणीजनात अंतरभाव होतो. शाहीरासंबंधीं जुन्यांत जुना उल्लेख शके ११००च्या सुमारास सांपडतो ( महिकावतीची बखर ) त्यानंतर त्यांचा उल्लेख शहाजीच्या कालापर्यंत सांपडत नाहीं. तेथून मात्र त्यांचे संबंधीं उल्लेख सांपडूं लागतात.

राधामाधवविलासचंपूवरून शहाजीनें आपल्या पदरीं कोणकोणचे पंडित, कवि, भाट, शाहीर बाळगले होते व त्यांना काय काय बक्षिसें मिळत होती याची माहिती मिळते. एका भाटाला त्यानें पालखी व घोडा दिल्याचा उल्लेख सांपडतो. शहाजीवर रचलेल्या एका मराठी कवीताच्या शेवटीं " अरे शाहरा जा " असा स्पष्ट उल्लेख आहे.

शिवाजीनें गुणी लोकांचा चांगलाच परामर्श घेतला. शिवभारतकार परमानंद, पर्णालपर्वतग्रहणाख्यानाचा कर्ता जयराम पिंड्ये, यांसारख्या संस्कृत कवीप्रमाणें किंवा भूषण कवीसारख्या भाटाप्रमाणें शिवाजीनें मराठी शाहीरांना आश्रय दिला होता. अफझलखान वधाचा पोवाडा रचणाऱ्या अज्ञानदासाला आणि तानाजीचा पोवाडा रचणाऱ्या तुळशीदासाला अनुक्रमें घोडा आणि शेरभर सोन्याचा तोडा दिल्याचा उल्लेख खुद्द त्या पोवाड्यांतच सांपडतो. शिवाजीनंतर संभाजी राजारामांचे कारकीर्दीत या शाहीरांची काय स्थिति होती तें कळण्यास साधन नाहीं. नाहीं म्हणावयास संभाजीच्या पदरीं कोणीं मोहनलाल व मतिराम असे दोन भाट होते एवढी माहिती मिळते. भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या शके १८३४च्या अहवालांत राजवाड्यांनी एक मेस्तक पुस्तक छापिले आहे त्यात गुणिजनांसंबंधीं व शाहिरांसंबंधीं काही उल्लेख आले आहेत.

शाहूच्या कारकीर्दीपासून मराठी राज्यात शाहीरांची चलती सुरू झाली व दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत तिचा कडेलोट झाला. शाहूपासून दुसऱ्या बाजीरावीपर्यंतच्या काळात शाहीरांनीं सर्व तऱ्हेची मोठमोठी बक्षिसे मिळविलेली दिसतात. शेले, दुपट्टे, तोडे ही तर नेहमीची सामान्य बक्षिसे होत. पण क्वचित् शाहीरांनीं जमिनी, वर्षासने, घोडे, आणि केव्हा हत्तीहि मिळविले आहेत. त्रिंबकराव दाभाड्याचा पोवाडा रचणाऱ्या मल्हारदासाला त्रिंबकरावाच्या आईने प्रत्यक्ष आपल्या मुलाचा शिरताज हा उंची शिरोलंकार, बाबूराव दाभाड्यानें घोडा व यशवंतराव दाभाड्यानें हत्ती दिल्याचें स्वतः शाहीरच सांगतो.

नानासाहेब पेशवे, थोरले माधवराव, नारायणराव यांच्या कारकीर्दीत शाहीरांना दरबारात कितपत मान होता किंवा दरबारकडून त्याना काहीं देणग्या पोहोचल्याचे कोठें उपलब्ध नाही. परंतु सवाई माधवरावाच्या

कारकीर्दीत मात्र गंगुहैबतीच्या फडाला दरबाराकडून आश्रय होता असें पोवाड्यावरून स्पष्ट दिसते. होनाजीला सवाईमाधवरावाच्या कारकीर्दीतच कोंडणपुरचे कुरण इनाम मिळाले असे म्हणतात. शिमग्यात पाच दिवस वाड्यापुढे तमाशा करण्याबद्दल त्याला सालीना ३०० रुपये मिळत असत ते निराळेच.

दुसऱ्या बाजीरावाने शाहीरांचा फारच परामर्ष घेतला. त्यावेळचे हे शाहीर त्याचे जणुकाय जीवाचे दोस्तच बनून गेले. स्वतः वैषयिक दुराचरणाच्या आणि विलासांच्या आवृत्त्यावर आवृत्त्या काढाव्या व त्यांवर या शाहीराकडून लावण्या, पोवाडे रचवून घ्यावे. तो कोठेंहि स्वारीशिकारीस यात्रेस प्रवासास गेला तरी ही शाहीरमंडळी त्याचे बरोबर असत, व प्रवासातहि तमाशे उभे करून त्या त्या मुक्कामाच्या गावचे शाहीर बोलावून आणून आपापसात सामने लढून आपल्या धन्याची हौस पुरवीत. एकट्या बाजीरावावर तत्कालीन शाहीरांच्या पाच पन्नास लावण्या प्रसिद्ध आहेत व त्यापैकी पुष्कळशा खुद्द त्याला म्हणून दाखविलेल्या आहेत. यावरून शाहीरांचा बडेजाव बाजीरावींत अतिशय असे व त्यांच्यावर बक्षिसांचा पाऊस पडत असे असें अनुमान करणें काहीच कठीण नाही. शाहीराना काय काय देणग्या बाजीरावीत मिळाल्या या संबंधी विश्वसनीय व तपशीलवार माहिती आज उपलब्ध नाही. पेशव्यांचे धूळ खात पडलेले प्रचंड दप्तर जेव्हा इंग्रजसरकारच्या कृपेने सगळेच्या सगळे छापून निघेल तेव्हा या शाहिराच्या नावे केवढ्या रकमा खर्ची पडल्या ते तपशीलवार कळेल. वेंकटनरसी नायाच्या कंचनीचा तीन दिवस नाच करून तिला २६००० रु. श्रीमंतानी दिले ( २४ जानेवारी १८०२ ), 'इष्काची समशेर असली पेशवे नित्य लढती' असा शाहीराकडून गौरव करून घेण्यात त्यानी मोक्ष मानला, अनंतफंदी सारख्या एका तमासगिराच्या हवाली आपल्या हातचा पत्रव्यवहार केला, स्वतः जातीने लक्ष घालून होनाजीकडून रागदारीच्या लावण्या तयार करवल्या इत्यादि गोष्टीवरून, बाजीरावाने शाहीरांचा फारच चांगला परामर्ष घेतला असला पाहिजे असे बळकट अनुमान निघते.

१८१८ साली स्वराज्य बुडाल्यानंतर सयाजीरावासारख्या त्या मानाने एका

लहानशा संस्थानिकाने गुणीजनांचा जो परामर्ष घेतला तो पाहता त्या-वरूनहि बाजीरावाने शाहिरांचा केवढा परामर्ष घेतला असला पाहिजे याचें अनुमान करता येण्यासारखे असल्यामुळे त्याची काही माहिती देतो.

" पेशवे दरबारची जी आश्रित माणसे होती त्याना सातारा, बडोदे, इंदूर, ग्वाल्हेर, ब्रह्मावर्त याखेरीज दुसरे आश्रयस्थान राहिले नव्हते. त्यातले त्यात सातारा आणि बडोदे ही राज्ये जवळ होती. त्यात बडोदे फार जवळ होते. तेव्हा तेथून जी काही मंडळी निघाली ती गायकवाडसरकारच्या दर-बारी येऊन दाखल झाली. त्यात शाहीर, मल्ल, गोंधळी, साठमार, गाणारे, वाजवणारे वगैरे पुष्कळ मंडळी होती. त्यांचे गुण पाहून त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे महाराजानी आश्रय दिला." ( थो. सया० महा० चरित्र ) खुद्द समकालीन प्रभाकरानेंहि अशीच साक्ष दिली आहे. तो म्हणतो "एव-ढेच विश्रांतिचा राहिले स्थळ ( बडोदे ) पश्चिमच्या रहाळात " "नायकिणी आणि कसबिणी शाहीर नेहमी बडोद्यामधि ठरले। पावे पगाराशिवाय बक्षीस। कसबी लोक याने तरले.' अनंतफंदी, प्रभाकर, परशराम, रामा गोंधळी, घोंगडे, बाकेराव, वगैरे बहुतेक प्रमुख लोकांना बडोद्यास चांगला आश्रय होता. १८१७ नंतर परशरामानें आपला शिष्य बाकेराव याजबरोबर एकंदर निर निराळ्या सस्थानातून २९ मुलुखगिऱ्या केल्या. त्यातल्या २१ खुद्द एकट्या बडोद्यास केल्या होत्या.

बडोद्यास गुणी जनांचा आणि तमासगीरांचा परामर्श घेण्याचे खातेच उघडण्यात आले होते. व त्यावर महाराजांचे मेव्हणे रघुनाथराव धायबर यांचे बंधु यादवराव यांची नेमणूक झाली होती. तमासगिरांच्या वर्दी घेण्याकरता एक स्वतंत्र कारकून त्याच्या दिमतीस दिला होता. यावरून तमासगिराना केवढा आश्रय दिला तो उघडच होत आहे. एका तमाशाचे वेळी खूप होऊन सयाजीरावानी तेथल्या तेथें बाकेरावास ६० रु. चा तोडा तिपदरी पागोटें व दुपेटा दिला. नऊ दिवसांत त्याला ५५० रु. बिदागी मिळाली. ३०० रु. ची नेमणूक व १०० रु. पोषाक दरसाल चालू झाला. खाद्याखेरीज इतराकडून कडी, तोडे, गोफ, तर पुष्कळच मिळाले म्हणतात.

# शाहीरांची चरित्रे

आज मराठींत छापील पोवाड्यांची संख्या सुमारे दोन अडीचशे इतकी आहे. परंतु इतके पोवाडे लिहिणाऱ्या शाहीरांच्या चरित्रासंबंधी मात्र काहीहि माहिती मिळूं शकत नाही. त्यांच्या चरित्रसामुग्रीचे दोन प्रकार मानता येतील. सनदा, पत्रे, वंशावळी, करीने, वाके, दानपत्रे इत्यादि साधने ही अस्सल सामुग्री होय. अस्सल सामुग्रीचाच दुसरा प्रकार म्हणजे खुद्द त्या त्या शाहीरांच्या कवनांच्या अभ्यासानें मिळणारी माहिती. याशिवाय आख्यायिका व वृद्ध मुखातल्या आठवणी वगैरे ही दुय्यम प्रतीची चरित्रसामुग्री होय. शाहीरांच्या चरित्राला उपयोगी पडेल अशा वर सांगितलेल्या सनदा पत्रे वगैरेंचा अव्वल पुरावा आजपर्यंत कोठेहि प्रसिद्ध झालेला नाही. नाही म्हणावयास अगदी अलीकडे भारत इतिहास संशोधक मंडळाचे एक सभासद रा. शंकरराव जोशी यानी मात्र रामजोशाच्या चरित्रावर नवा प्रकाश पाडणाऱ्या सनदा पैदा केल्या आहेत. रा. जोशी यांच्या या सफळ झालेल्या प्रयत्नावरून अनंतफंदी, प्रभाकर, होनाजी बाळ वगैरे पेशव्यांचे दरबारी गाजलेल्या इतर शाहीरांच्या सनदा वगैरे उपलब्ध होण्याचा पुष्कळसा संभव आहे असे वाटू लागते. शालिग्राम यानी आख्यायिका वगैरेवरून रामजोशाला मिळत असलेल्या वर्षासनांची दिलेली माहिती नवीन उपलब्ध झालेल्या सनदानी बहुतेक खरी ठरते तर त्यानी इतर शाहिराच्या वतनासंबंधाने दिलली माहिती कदाचित् त्यांच्या घराण्यांत सापडणाऱ्या सनदापत्रावरून कशावरून खरी ठरणार नाही ? रामजोशी जितका पेशव्याचे दरबारी गाजला तितकाच किंबहुना त्याहूनहि अधिक अनंतफंदी गाजला होता. खुद्द पेशव्याने आपला पत्रव्यवहार त्याचे स्वाधीन करून माधवनिधन काव्य लिहूवून घेतले होते. या कामगिरीबद्दल त्याला पेशव्याकडून रामजोशाप्रमाणेच इनामे किंवा वर्षासने मिळाली असली पाहिजेत. बडोद्यास तर त्याला पाचशें रुपयांचे वर्षासन होते असे म्हणतात. तेव्हां अनंतफंदीच्या वंशजाकडे संशोधकानी आपला मोर्चा वळविल्यास तशी सनदापत्रे त्याना खास उपलब्ध होण्यासारखी आहेत. होनाजीचा व पेशव्यांचा संबंध लक्षात घेता

त्याचे वंशजाकडे कोंडणपुरच्या इनाम जमिनीसंबंधी व इतर वर्षासना-संबंधीच्या सनदा किंवा कागदपत्र मिळण्यासारखे आहेत. जी गोष्ट होना-जीची तीच प्रभाकराची. इतिहाससंशोधकानी या बाजूकडे आजपर्यंत दुर्लक्ष केलेले आहे. पण वरील शंकरराव जोशांप्रमाणे ते या शाहीरघराण्यावर मोहिमा करतील तर मराठी शाहीरांच्या चरित्रेतिहासाला फारच मदत होण्यासारखी आहे.

इतिहाससंशोधक केव्हा मनावर घेतील ते घेवोत. आज तरी कोणाहि शाहिराच्या चरित्राला उपयोगी असा अव्वल दर्जाचा पुरावा उपलब्ध नाही एवढी गोष्ट खरी. त्याच्या अभावीं दुसरा अव्वल दर्जाचा पुरावा म्हणजे खुद्द त्या त्या शाहीरांच्या कवनांचा होय. आख्यायिका किंवा वृद्ध गृहस्थांच्या स्मरणातून मिळणाऱ्या माहितीपेक्षा वरील पुरावा केव्हाहि अधिक विश्वसनीय यात शंका नाही. शाहीरांच्या काव्यातून त्यानी स्वतःसंबंधी माहिती दिलेली असते. कोणी पोवाडयाच्या अगर लावणीच्या शेवटी आपले नाव घालतो, कोणी आपल्या साथीदारांची नावे सांगतो, कोणी आपल्या गुरूला वंदन करण्याच्या मिषाने त्याचे नाव दाखल करतो, कोणी आपली प्रौढी मिरविण्याकरितां पराभूत केलेल्या प्रतिस्पर्धी सामनेवाल्या शाहीरांचा उल्लेख करतो, कोणी आपल्या धन्याचे किंवा अन्नदात्याचे अभीष्टचिंतन करण्याकरितां त्याचा गौरवपूर्ण उल्लेख करतो, कोणी स्वतःस मिळालेल्या बक्षिसांची घोषणा करतो, कोणी आपल्या स्वतःच्या राहात्या ठिकाणाचा, गावाचा व प्रांताचाहि उल्लेख करतो. सारांश, शाहीराने सांगितलेली ही माहिती अत्यंत विश्वासार्ह असते. चरित्र सजविण्याला तिचा फारच थोडा उपयोग होतो इतकेच काय ते. पोवाडेलावण्यातील अंत्योल्लेखाखेरीज खुद्द पोवाडयातील वर्ण्य विषयावरूनहि कित्येक वेळा शाहीराचा काल वगैरे ठरविण्यास फार मदत होते.

वरील दोन अस्सल साधनाखेरीज चरित्र विषयाचे जे तिसरे साधन म्हणजे आख्यायिका, वृद्धांच्या आठवणी वगैरे ते पूर्णपणे विश्वासार्ह मानता येत नाही. हे साधन अगदीच टाकाऊ आहे असे नाही. किंबहुना त्याचाहि योग्य उपयोग झाल्यास तें चरित्र सजविण्याला थोडेबहुत उपयोगीहि पडते. परंतु स्वतंत्रपणाने त्याची विश्वसनीयता मान्य करवत नाही.

अस्सल कागदपत्रांच्या वा खुद्द शाहीराच्या मुखजबानीच्या प्रत्यंतर पुराव्याने ते खरे ठरले तर त्याचा उपयोग.

रा. शाळिग्राम यानी सर्व भर या शेवटच्या साधनांवरच दिल्यामुळे जरी आज त्यांची चरित्रे तपशीलवार भासली तरी ती विश्वसनीय आहेत असे ठरत नाही. या आख्यायिकांच्या व दंतकथांच्या जाळ्यात सांपडल्यामुळे व विवेचक बुद्धीला रजा दिल्यामुळे शाळिग्रामानी काहीं असंभाव्य गोष्टी कशा खऱ्या म्हणून वर्णिल्या आहेत याचा एक मासला पहा. परशुराम शाहीराच्या चरित्रात ते सांगतात की, तो ९० व्या वर्षी वारला. मरणाच्या अगोदर पंधरा दिवस आपली मरणवार्ता त्याने आपल्या आईस अगाऊ कळविली होती. या उल्लेखावरून परशुरामाच्या मरणसमयी त्याच्या आईचे वय निदान १०५ ते ११० तरी असले पाहिजे. अर्थात् ही गोष्ट उघडच असंभाव्य दिसते. निदान तसा कांही विश्वसनीय पुरावा सापडल्याखेरीज ही गोष्ट खरी मानतां येत नाही. रा. शाळिग्राम यांचेजवळ विवेचक दृष्टीचा अभाव असल्यामुळे त्यांचे हातून निरानिराळे प्रमादहि झाले आहेत. परशुरामाच्या चरित्रात त्यानी परशुरामाला, होनाजीच्या चरित्रात होनाजीला रामजोशाच्या चरित्रांत रामजोशाला व अनंतफंदीच्या चरित्रात अनंतफंदीला त्या त्या वेळेपुरता सर्वश्रेष्ठ ठरविले आहे. विवेचक दृष्टि चालवून वरील शाहीरांच्या लावण्या त्यानी धड सगळ्या वाचल्याहि नाहीत. शिवाय विद्वत्ता व उच्च प्रकारची रसिकता यांचा त्यांचे ठिकाणी विशेष ओलावा नसल्यामुळे या शाहीरातील सरस निरसपणा ठरविण्याचे त्याना साधले नाही.

पुढे दिलेल्या शाहीरांच्या चरित्रात मूळ शाहीरांच्या लावण्या पोवाड्यांवरून निघणारी अनुमाने, शाळिग्राम यानी दिलेली माहिती व अस्सल साधनें उपलब्ध झाल्यास ती, ही सर्व जमेस धरली आहेत व चरित्रे शक्य तितकी वस्तुस्थितीला जुळतील अशी सजविण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे.

## रामजोशी.

तमासगीर आणि कीर्तनकार या दोनही नात्यानी पेशवाईत गाजलेल्या शाहिरात रामजोशाची गणना होते. इतर शाहिरांच्या मानाने रामजोशाच्या

चरित्राची माहिती लोकाना थोडी अधिक आहे. सोलापूरकर रामजोशी यांचे घराणे सोलापुरात फार जुन्या काळापासून वास्तव्य करीत होते. मुसलमानी पातशाहीत यांच्या घराण्यातील एक मुलगा सोलापूर येथील किल्ल्याचे बांधकामाचे वेळीं बळी देण्यात आला व तेव्हांपासून पातशहाने कसबे सोलापूरची जोशीपणाची वृत्ति रामजोशाच्या पूर्वजाना दिली. त्या जोसकीचे वतन आज तागायतहि हे घराणे उपभोगीत आहे. बळी दिलेल्या मुंजाचे देऊळ सोलापूर किल्याच्या दारातच असलेले अजूनहि पाहावयास मिळते.

रामजोशाच्या पूर्वजांचे खरे उपनाव तासे असे होते. जोशी हे नाव त्यांच्या वृत्तीवरून पडले. त्यांच्या घराण्यातील पुरुषांची अगदी पहिली नावे पुतळे जोशी व धोंडभट जोशी अशी सापडतात. त्यानंतर एकदम रामजोशाच्या आजाचे व बापाचे नाव सापडते. रामजोशाचा बाप जगन्नाथ जोशी, उपनाव तासे, गोत्र वत्स, सूत्र कात्यायन, शाखा वाजसनेय, हा वर उल्लेखिलेल्या पुतळे व धोंडभट जोशानंतर कितव्या पिढीतला पुरुष होय हे समजण्यास आज काही एक साधन उपलब्ध नाही.

जगन्नाथ जोशी यास अनंत जोशी या नावाचा एक सख्खा भाऊ होता. हे दोघेहि बंधु चांगले पढीक विद्वान् वेदशास्त्रसंपन्न ज्योतिषी होते. एका सनदेत जगन्नाथ जोशाचा सिद्धान्तवक्ते असाहि उल्लेख केलेला आहे. त्यावरून यांचा पेशा ज्योतिषाचा, कीर्तनकाराचा किंवा पुराणिकाचा असावा असे वाटते. जगन्नाथ जोशी हा बराच खटपट्या होता. त्याने बरीच इनामे मिळविली होती. सन १७११ चे सुमारास कोल्हापूरच्या शंभु छत्रपतीकडून "गोदातीरस्थानीं मौजे लोणी नजीक सेदरी प्रा। परंड हवेली" हा गाव त्याने इनाम म्हणून मिळविला. त्यानंतर सन १७५८ ता. १७ आक्टोबर रोजी जगन्नाथ जोशी व अनंत जोशी हे दोघे पुण्यास गेले असता श्रीमत बाळाजी बाजीराव प्रधान याजकडून कुटुंबाच्या योगक्षेमाकरिता त्यानी सोलापुरी तीस बिघे जमीन इनाम करून घेतली. याच सालात म्हणजे सन १७५८ सालीं जगन्नाथ जोशास नंदादीपाबद्दल साल दरसाल बारा रुपयांचे वर्षासन मिळाले. त्यासंबंधीचे बाबुराव सदा-

शिव यांचे सोलापूरचे कमाविसदार रामचंद्र त्रिंबक याना लिहिलेले आज्ञापत्र उपलब्ध झाले आहे.

जगन्नाथपंताला मुलगे दोन. थोरला मुद्गल व धाकटा रामजोशी. मुद्गलभट हा रामजोशापेक्षा बराच वडील होता असे मानले पाहिजे. कारण सन १७६९ साली मुद्गल भटाने नरसिंगराव जनार्दन धायगुडे याचेकडून मिळविलेली ४०० रुपये वर्षासनाची सनद पाहाता त्यात मुद्गलभटाचा उल्लेख 'वेदमूर्ति असा केला आहे; व मुद्गलभटाने जी याचना केली आहे त्यात तो आपण कुटुंबवत्सल आहो, योगक्षेम चालत नाही असे गाऱ्हाणे गातो. यावरून १७६२ साली तो वेदाध्ययनविद्या वगैरे परिपूर्ण झालेला व लग्न वगैरे होऊन प्रपंचाचा भार अंगावर पडलेला असा दिसतो. अर्थात् या साली त्याचे वय तर्कानें सुमारें २०–२५ तरी धरण्यात चूक होणार नाही.

मुद्गल जोशी हा कथा कीर्तन व पुराण करून व आपली वतनें इनामे व वर्षासने संभाळून प्रपंच चालवीत असे. आपल्या बापाप्रमाणेच हा चांगला विद्वान् गृहस्थ होता. चांगला व्युत्पन्न कवीहि होता. त्याच्या मराठीत रचलेल्या स्फुट सुभाषितवजा श्लोकांचा संग्रह रा० शंकरराव जोशी यानी मिळविला आहे. त्यावरून त्याची कवित्वशक्ति साधारण बऱ्या प्रकारची होती असें दिसतें. पण त्याची संस्कृत भाषेतील प्राविण्याबद्दलच विशेष ख्याति होती. त्याने यदुवंशनामक रघुवंश महाकाव्याच्या धर्तीवर १९ सर्गांचे विस्तृत संस्कृत महाकाव्य रचल्याचे फार ऐकू येते; व इतिहाससंशोधकांच्या परिश्रमाने ते लवकरच उपलब्ध होईल अशी दृढ आशा वाटत आहे.

रामजोशाचा जन्म १७६२ साली झाल्याचे शाळिग्राम सांगतात परंतु तो सन बहुधा चुकीचा असावासा वाटतो. याला पुरावा म्हणून शंकरराव जोशानी नक्कल करून आणलेल्या मुद्गल भट व रामजोशी या भावाभावामध्ये झालेल्या अस्सल फारकत पत्राचा देता येईल. सदर फारिकत सन १७७८ २२ मार्च रोजचे आहे. व फारकत लिहून देणाऱ्या मुद्गल भटाने असे स्पष्टपणे म्हटले आहे की "लोकांचे देणे तुमचे व आमचे उभयताचे मारफातीचे निघाले ते वारू" सदर देणे थोडथोडके नसून ९००॥ रुपये होते. व त्यातील सहाशे रुपये खुद्द एकट्या रामजोशाने केलेले

होते. अर्थात् शालिग्राम देतात तो १७६२ सन रामजोशाच्या जन्माचा मानला तर या वेळी त्याचे वय अवघे १६ वर्षांचे निघते. सोळा वर्षांचा मुलगा आपल्याहून प्रौढ असलेल्या कर्त्या भावाशी भांडून निराळा होण्याची इच्छा करील किंवा त्या वयात सहाशें रुपये कर्ज मिळविण्याची तरी पत त्याला असेल या गोष्टी अगदी असंभवनीय वाटतात. अर्थातच असे उघड दिसतें की, या फारीकत पत्राचे वेळीं तो चांगला सज्ञान प्रौढ प्रपंचाची जबाबदारी ओळखणारा, स्वतःच्या कुटुंबाचा चरितार्थ चाल-विण्याची पात्रता असलेला म्हणजे वीस बावीस वर्षांचा तरी असला पाहिजे. अर्थात रामजोशाचा जन्म सन १७५८ किंवा त्याहि मागे थोडासा नेण्यास हरकत नाही.

लहानपणापासूनच रामजोशाचे लक्ष अभ्यासात लागेना. तो जात्या फार बुद्धिमान होता पण त्याचे हातून फारशी विद्या त्या वयात झाली नाहीं. भाऊ वडील खरा पण हे स्वच्छंदी पोर त्याचे ऐकत नसावे असे दिसतें. शिवाय या वेळी दोघा भावांचा समेट घडवून आणणारी किंवा रामजोशाला धाकांत ठेवणारी त्यांची आई हयात नसावीसे वाटते. कारण ती हयात असती तर उपरोक्त फारिकतांत आईने कोणा भावाजवळ राहावे वगैरेसंबंधीं कांही तरी उल्लेख हवा होता. जेथे घरातील गुरे, ढोरे पुस्तके, पांघरुणे याची निमेनिम वाटणी करून घेण्यात आली तेथे त्याच्या आईच्या चरितार्थासंबंधीं कांहीं तरी सोय पहाण्यांत आलीच असती. वडील भावाच्या हुकमतीला न जुमानणारा, आईची प्रेमळ शिकवण नसलेला असा रामजोशी गांवांत उनाडक्या करूं लागला. त्याच्या घरासमोरच कोणा धोंडिबा शाहिराचा फड होता तेथे त्याने आपली बैठक थाटली. प्रतिष्ठित असे स्वतःच्या बाळबोध घराण्यांतील शास्त्र, पुराण, कथा कीर्तन वगैरे धंदे सोडून धोंडिबाच्या फडांत बसून हा लावण्या रचूं व गाऊं लागला. धोंड्या शाहिराच्या कांही लावण्या वास्तविक रामजोशानेच करून दिलेल्या आहेत असे म्हणतात. कसेहि असो. सन १७७८ चे सुमारास या दोघा भावा मध्ये धुसफूस, भांडणे सुरू होऊन एकमेकांपासून विभक्त होण्यापर्यंत पाळी आली. या साली मुद्गल भटाने "चिरंजीव रामचंद्र जोशी यासी स्वसंतोषें फारिकत पत्र लिहून दिलें." सदर फारिकत पत्रातील

खालील वाक्य महत्त्वाचे आहे "आपण व तुम्ही येकस्थळी असता चालेनासे जाहाले कजिया होऊ लागला या निमित्य विभक्त जालो." दोघांना मिळून ९५० रुपये कर्ज होते तें कर्ज फेडण्याची जबाबदारी मुद्गलभटाने आपल्या शिरावर घेतली; व त्याकरिता सन १७७८ पासून १७८२ पर्यंत 'आरली व कसबे मजकूर येथील इनाम व किल्ल्यातील वर्षासन वगैरे त्याने आपणाकडे लावून घेतली. १७८२ नंतर वडिलार्जित समाइक वतने वाटल्यास वाटण्या करून घ्यावी असे ठरले. घरातील सर्व वस्तभाव, भांडी, चिरकूट, पांघरूणे, गुरे, ढोरे, घोडे, देवदेवतार्चन व पुस्तके यांची निमेनिम वाटणी करून घेण्यात आली. मुद्गलभटाने रामजोशाला घरांतून काढून लावले ह्या प्रचलित असलेल्या लोकवार्तेचे उगमस्थान या फारिकत पत्रांतच आहे.

भावापासून फुटून निघाल्यानंतर स्वतंत्र प्रपंचाची जबाबदारी रामजोशाला जाणवू लागली व अनन्यगतिक होऊन तो पंढरपुरास वे. शा. सं. बाबा पाध्ये यांचेकडे अध्ययन करण्याकरितां जाऊन राहिला. तेथे कांही वर्षे राहून त्याने उत्तम विद्या व कीर्तनाची कला संपादन केली व नंतर तो सोलापुरी आला. या काळानंतर त्याचा जिकडे तिकडे बोलबाला होऊं लागला. त्याने ठिकठिकाणीं कीर्तनानिमित्त संचार केला व पुष्कळ पैसा जोडला.

रामजोशी पंढरपुरास असताच सुप्रसिद्ध मोरोपंत कवींची ख्याति त्याचे कानावर गेली होती. नंतर पुढे कांही दिवसांनीं एके दिवशी बारामती येथे बाबूजी नाईक बारामतीकर याच्या येथे झालेल्या कीर्तनाचे प्रसंगी मोरोपताचा व रामजोशाचा प्रत्यक्ष परिचय झाला, व क्रमाक्रमाने त्याचे दाट स्नेहात रूपातर झाले. मोरोपताना रामजोशाबद्दल इतका आदर वाटू लागला की ते त्याचा कविप्रवर असा कागदोपत्री उल्लेख करू लागले, व रामजोशालाही मोरोपंताबद्दल इतका आदरभाव उत्पन्न झाला की त्याने मोरोपताला आपला काव्यरचनेतील गुरुच केले, व तो डोळे मिटून मोरोपंती पद्धतीचे अनुकरण करू लागला. यमकांची खटपट, भाषेची सजावट, ग्राम्य दृष्टांत, संस्कृतप्राकृत शब्दांची खिचडी, यमक साधण्याकरितां उपयोगांत आणलेले अत्यंत अभद्र व अश्लिल शब्द एक चरण मराठी एक चरण संस्कृत, कधी एक चरण मराठी तर कधी एक कानडी, कधी संस्कृत

कविता वगैरे रामजोशाच्या दोषावरून ही गोष्ट उघड दिसून येते. मोरोपंताप्रमाणें तो उत्तम संस्कृतज्ञ शब्दप्रभु होता. अर्थात् मोरोपंताचे अनुकरण त्याला फारच चांगले साधले यांत शंका नाही. रामजोशाने मोरोपंताच्या पायापाशी आपला डफ फोडून टाकून त्यांचे शिष्यत्व खरोखर पत्करले ही दंतकथा खरी असो वा नसो. रामजोशाच्या रचनाशैलीवर मोरोपंताची पुष्कळच छाप आहे यांत शंका नाहीं. आपल्या गुरूचे उपकार रामजोशांनीं फेडले ते असे. मोरोपंती आख्यानांचा रामजोशाने आपल्या कथाकीर्तनांतून सर्रास उपयोग करण्यास सुरवात करून महाराष्ट्रांत तरी मोरोपंतांची कीर्ति प्रथम पसरविली.

यानंतर पुढील आयुष्यांत रामजोशी महाराष्ट्रभर कथाकीर्तने करीत फिरत होता. पंढरपुरवर्णन, तुळजापुरवर्णन, गिरीच्या व्यंकटेशाचे वर्णन, बारशीच्या भगवंताचें वर्णन वगैरे लावण्या या प्रवासांतच निर्माण झालेल्या आहेत. पुण्यास तर तो दरवर्षी येऊन जाई असे म्हणतात. पुणेवर्णन किंवा अजून लोकापुढे यावयाचे असलेले त्याचे "कृष्णजन्म आनंद वाटतो इ." शनवारवाड्याचे वर्णन, असल्या लावण्या पुण्यासच तयार झाल्या असाव्या. सन १८१२ साली मृत्यूच्या आगोदर काही दिवस तो पुण्यास येऊन राहिला होता. काशीयात्रा करण्याचा त्याचा मानस होता व त्याकरिता पुण्यातील लोकाकडे पैशाची याचना करीत होता. त्या संबंधाची एक लावणी व एक कटाव आमचे संग्रही आहे. कटावांत तत्कालीन सर्व मोठमोठ्या शास्त्र्यादिकाचे उल्लेख आलेले असल्यामुळे ऐतिहासिक दृष्टया त्याचे महत्व बरेच आहे. बाजीरावाला केलेल्या विनंतिवजा लावणीत पहिलेच शब्द 'आलो राव बाजी पाशी या कविस घडावी काशी' असे आहेत. असो.

रामजोशाच्या उत्तर आयुष्यातील हकीकतीचे अस्सल साधन एकच उपलब्ध आहे ते म्हटले म्हणजे सन १८०३ साली त्याला राजे जगदेवराव बहादुर यानी दिलेले दानपत्र होय. या दानपत्रात त्यानी रामजोशाला तुळजापुरास एक वाडा बांधून दिल्याचा व पूर्वापार मिळत असलेल्या पस्तीस रुपयांच्या वर्षासनांत अधिक पासष्ट रुपये मिळून एकंदर शंभर रुपये वार्षिक इनाम दिल्याची माहिती मिळते.

रामजोशाला इनामे वतने, पैसा उमाप मिळाला. परंतु तो दरवेळीं

कंगालच राहिला. याचे कारण त्याचा उचळ्या, रंगेल, विलासी, व्यसनी जीवनक्रम होय. " उचापत काढल्याशिवाय याचा दिवस जात नसे. याची स्वारी गावोगाव कथा करण्यास फिरूं लागली म्हणजे एक चिमा नायकीण म्हणून राख बरोबर घेत असत. ती रूपाने फारच सुदर होती. तिला व आपल्याला बसण्यासाठी एक रेशमी काढण्यांचा झोपाळा स्वारीत घेत असत. बरोबरची शिष्य मंडळी, मोठा घोडा, दोन कुत्रीं, दोन माकडे, दोन राघू, दुसरेही विलासी पदार्थ बरोबर घेत असत. यामुळे त्यास उचापत काढावी लागे. ऋणकर होण्यास त्यास अवघड वाटत नसे. हे शाक्त होते, म्हणून मद्यही पीत असत. गांजा ओढणे, तंबाखू खाणे हें त्याचे नित्याचें कर्तव्य असे. ही व्यसने त्यास पूर्ववयीच असावीत "

रामजोशी सन १८१२ साली पुण्यात वारला. त्याची जी इतकी प्रसिद्धि आहे. ती त्याच्या वास्तविक गुणापेक्षा त्याच्या वरील विचित्र आचरणानेच होय. त्याचे सर्व आयुष्य परस्पर विरोधी गोष्टीनी गजबजलेले होते. मूळ तो एका व्युत्पन्न कर्मठ शास्त्र्याचा मुलगा. पण पूर्ववयातच त्याने तमासगीर म्हणवून घेतले. पुढे पढरपुरास जाऊन विद्याध्ययन केल्यानंतर तो सत्पात्र शास्त्री पुराणिक बनला; पण चिमा किंवा बयाबाईसारखी प्रीतिपात्रे राजरोस जवळ बाळगावयास त्याने कमी केले नाही. त्याने अनेक ठिकाणी पाण्यासारखा पैसा मिळविला पण तरीही पाण्यानें धुतल्यासारखा तो निर्धनच राहिला. बरें, असा निर्धन होता तरी चित्रविचित्र विलासी थाटाचा लवाजमा बाळगावयास त्याने सोडले नाही. तो कथाकीर्तनांतून निस्पृहपणाचा आणि विरक्तीचा तोंडभर उपदेश करी; परंतु दरदिवशी उचापती काढतांना लोकाकडे किंवा सावकारापुढें तोंड वेंगाडण्यास त्यास लाज वाटत नसे. तो " तूं म्हणशी माझी रामा सुकुमारी गोरटी परिणामी तुझिया कामा येईल काय चोरटी " या किंवा याहीपेक्षां अभद्र शब्दानी स्त्रियांची किंवा विषयाची रेवडी उडवीत असे. परंतु त्याला स्वतःला त्याच्या आवडत्या चिमा नाइकिणीखेरीज एकही क्षण करमत नसे. त्याच्यासंबंधीच्या ज्या आख्यायिका प्रसिद्ध आहेत त्या त्याच्या स्वैर वर्तनाच्याच मुख्यतः आहेत. अगदीं बारीक सारीक वर्तनासंबंधीही विचित्र आख्यायिका आहेत. त्याच्या काव्यकमळाचा जन्म

शौचकूपाच्या कर्दमात होत असे हा त्याचाच एक नमुना ! सारांश विचित्र गुणीवल्ली म्हणूनच त्याची विशेष ख्याति झाली. इतर शाहिराप्रमाणे त्याच्या लावण्या आजतागायत जिवंत राहण्याचे कारण असे आहे की तो कथेकरी असल्यामुळें व त्याच्यामागें शाहिरीपंथाप्रमाणे कथेकरीपंथ मोडून न गेल्यामुळें त्या टिकल्या. त्याच्यामागून झालेल्या अनेक कथेकऱ्यानी त्याच्या लावण्या टिकविल्या. यासंबंधीची साक्ष शाळिग्रामानी रामजोशाच्या चरित्रांत दिली आहे.

## स्तुतिप्रलापांची शर्यत

आजपर्यंत ज्या ज्या विद्वानाना रामजोशासंबंधी लिहिण्याचा प्रसंग आला त्यानी आपापल्या सोईप्रमाणे आणि आवडीप्रमाणे स्तुतीच्या शेंद-राची इतकी काही जाड जाड पुटे रामजोशावर चढविली आहेत की त्या-खाली त्याच्या कवितेचे वास्तविक स्वरूप पार बुजून नाहिसे झाले आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर, रंगाचार्य रड्डी, विनायकराव भावे या सारखा जाडया जाडया महंतानी रामजोशाची पूजा बांधलेली असल्यामुळे रसिक व चिकित्सक अभ्यासकालाहि रामजोशाच्या कवितेचे साक्षात् दर्शन न होता स्तुतिसुमनाच्या माळानी बांधलेल्या पूजेकडे पाहूनच समाधान मानावे लागते. मग प्रत्यक्ष मूर्तीच्या अंगावरील शेंदूर खरवडून टाकून परीक्षा करणे तर दूरच ! कित्येक वेळा मूळ देवाची स्वयंभू मूर्त एकीकडेच दिगंबर राहून उत्सव मूर्तीचा तेवढा बडेजाव होत जातो आणि त्या उत्सवमूर्तीच्या दर्शनाकरता मोठी जत्रा भरते तशीच सामान्य लोकसमाजाची स्थिति रामजोशाच्या बाबतीत झाली आहे.

वर सांगितलेल्या तीन विद्वानानी रामजोशाची किती बेसुमार स्तुति केली आहे हे पाहणे मनोरंजक होईल. चिपळूणकर म्हणतात " वर्ण-माधुर्याची ज्याच्या कानास काही लेश म्हणून ओळख असेल, शब्दांचा सुंदरपणा व खुमारी ही ज्यास यत्किंचित् कळत असतील, तसाच त्यांचा झोक प्रौढपणाहि ज्यास थोडासा तरी समजल असेल, स्त्रियांच्या लावण्याचा डोळ्यावर व हृदयावर कसा व्यापार घडतो याचा ज्यास लवलेश अनुभव असेल त्यास वरील कवन केवळ थरारून टाकील यात संशय नाही. या

कवीच्या साऱ्या कृतीतून अशी एक खुबी आहे की अभियुक्त संस्कृत कवीनी योजलेल्या प्रौढ शब्दांची व अर्थांची शुद्ध लौकिक मराठी भाषणातील केवळ व्यावहारिक अशा शब्दाशी व अर्थांशी भेसळ इतकी बेमालूम केलेली असते की त्यांच्या त्या मिश्रणचातुर्याने ते सर्व एकरंगी दिसून त्यापासून एक जातीचा विशेष आनंद होतो. सारांश सरस, प्रौढ, झोकदार आणि आवेशयुक्त असे आपल्या भाषेचे रूप ज्यास पाहणे असेल त्यास ते या कवीच्या लावण्यात सापडेल. शेवटी आणखी ही एक गोष्ट सांगितली पाहिजे की वरील लावणीची चाल समजून ती जो गाईल किंवा गाइलेली ऐकेल त्यासच तिचा रस पुरतेपणी समजेल. एरवी नुसते शब्द वाचून त्याची कल्पनाहि त्यास व्हावयाची नाही." रामजोशीकृत छंदोमंजरीला लिहिलेल्या प्रास्ताविक भागात रड्डी शास्त्री यानी आपले मत प्रगट केले आहे. त्यात त्यानी चिपळूणकरांच्याहि पुढे धाव घेतली आहे. ते म्हणतात "जोशीबुवा सरस व्युत्पन्न असल्यामुळे व संस्कृत साहित्याशी त्यांचा उत्तम परिचय असल्यामुळे त्यांच्या काव्यास मनोहरत्व येण्यास संस्कृत कल्पनांचा व शब्दांचा फार उपयोग झाला आहे. शृंगार व वैराग्य यांच्या वर्णनासंबंधाने जोशीबुवांचा हातखंडा आहे. फार काय पण मराठी भाषेत या दोन विषयांचे वर्णन करणारा यांच्या तोडीचा कमी निपजला नाही असे म्हटले असता अतिशयोक्ति होणार नाही. तात्पर्य यांच्या पूर्वीच्या कविमंडळात या सर्वगुणानी विशिष्ट असा कवि क्वचितच आढळून येईल व त्यांच्या पश्चातहि आजपर्यंत कोणी त्यांच्या तोडीचा कवि झाला आहे असे वाटत नाही." महाराष्ट्रसारस्वतकार भावे यांचा अभिप्राय असाच मासलेवाईक आहे. त्यांच्या अभिप्रायाचे सार म्हणजे 'लावण्या रचणाऱ्या आणि पोवाडे गाणाऱ्या सर्व कवींचा तुरा म्हटला म्हणजे सोलापूरकर रामजोशी. लावणीने रामजोशास महत्व यावे तें रामजोशीनींच लावणीछंदास नवे महत्व आणले. ते स्वतः व्युत्पन्न व संस्कृतज्ञ विद्वान असल्यामुळें यांच्या लावण्यात अशुद्धतेचा प्रकार कोठे दिसत नाही. उलट शब्दरचनेचा सुंदर थाट दृष्टीस पडतो. यांच्या लावण्यात जसा प्राकृत तसा संस्कृत शब्दांचाहि भरणा फार आढळतो. परंतु त्यांची आपल्या काव्यात कवीने इतक्या

खुबीने मिसळ करून दिली आहे की त्यापासून श्रोत्यास व वाचकास आनंदच होतो. ज्याची संस्कृतात ग्रंथ रचण्याजोगी विद्वत्ता तो डफावर थाप देऊन लावण्या करण्यास लागल्यावर तेथेहि सर्वांवर त्याने ताण करावी. मराठी भाषेस समोर थाटाने उभी करून तीस आपलेपुढे नर्तकीप्रमाणे नाचवावे यात नवल ते काय !! महाराष्ट्र कवींच्या पहिल्या पंक्तीत जोशी बुवाची संभावना तर होतेच. आणखी भाषाकामिनींचे हे खरोखर वस्ताद आहेत; आणि एका मुक्तेश्वराखेरीज ती यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाबरोबरहि इतकी खुलून रंगात आलेली नजरेस पडत नाहीं. ''

कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा असा एकदेशीय व एकांतिक अभिप्राय बनण्याचे एक मोठे कारण आमच्या मताने असे आहे कीं त्यावेळी तुलनेने रामजोशाची वास्तविक किंमत ठरविण्याची साधनेच उपलब्ध झालेली नव्हती. फार काय रामजोशाच्या लावण्या व पवाडे यांचा एकत्र संग्रह केलेले पुस्तकहि त्यावेळेपर्यंत प्रसिद्ध झालेले नव्हते. शास्त्रीबुवाना कथाकीर्तने व तमाशे ऐकण्याचा विलक्षण छंद होता. व तो पुरवून घेत असता त्यानी ज्या लावण्या वगैरे ऐकल्या असतील त्यावरूनच त्यानी मुख्यत: आपले मत बनविले असावे. लावण्या चालीवर गायल्याखेरीज किंवा ऐकल्याखेरीज त्यातील खरा रस समजणार नाही. फार काय नुसते शब्द वाचून खऱ्या रसाची अस्पष्ट कल्पनाही येणे शक्य नाही ही शास्त्रीबोवांची सूचक वाक्ये आमच्या विधानास उपोद्बलकच दिसतात. कवित्वगुणात रामजोशाशी बरोबरीने स्पर्धा करण्याच्या योग्यतेचे दुसरे शाहीर जे परशराम अनंतफंदी किंवा होनाजी त्यांच्या लावण्याचे संग्रह पुष्कळच मागाहून प्रसिद्ध झालेले आहेत. अर्थात आपला अभिप्राय लिहिताना या इतर शाहिरांची काव्ये जमेस धरून रामजोशाची किंमत ठरविणे त्याना शक्य झाले नाही हा एक मुद्दा शास्त्रीबोवांच्या समर्थनपर म्हणून पुढे आणण्यासारखा आहे.

पण खरेच बोलावयाचे तर शास्त्रीबुवाना रामजोशाची कविता इतकी प्रियतम होण्याचे कारण सर्वतः शास्त्रीबुवांच्या लेखनपद्धतीतच सांपडण्यासारखे आहे. मृदु ललित किंवा जाड जाड संस्कृत शब्द घालून आपली भाषा भरदार करण्याकडे, सजविण्याकडे, नटविण्याकडे शास्त्रीबोवांचे किती

लक्ष असे ते प्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणें संस्कृत शब्द व त्या मानाने अगदीं प्राकृत व ग्राम्य शब्द यांची सर्रास सरमिसळ त्यांच्या लेखनांत फारच दृष्टीस पडते. अर्थात वरील दोषानी वा गुणानी युक्त अशा मनुष्याला कधीं न भेटणारा असा समानधर्मा भेटला तर त्याच्या आनंदाला अलोट भरती यावी यांत कांहीं नवल नाहीं. याहीखेरीज शास्त्रीबोवांच्या पक्षपाताचे आणखी एक कारण संभवनीय वाटते. ते म्हणजे मोरोपंत व रामजोशी यांचा परस्पर संबंध. रामजोशाने मोरोपंतास जवळ जवळ गुरू म्हणूनच मानले होते. उलट मोरोपंत त्याचा उल्लेख 'सोलापूरकर कविप्रवर' असाच नेहमीं करीत. मोरोपंताविषयीं शास्त्रीबुवांचा असलेला निरुपम आदर व त्या आदरणीय विभूतीच्या आर्यांचा रामजोशाने कथाकीर्तनांतून केलेला प्रसार, हीं लक्षांत घेतां शास्त्रीबुवांचे मन रामजोशाविषयीं पक्षपाताने कलुषित झाले नसेल असे म्हणवत नाहीं.

शास्त्रीबुवांच्या नंतरचे दुसरे स्तुतिपाठक रड्डीशास्त्री. यांना रामजोशाच्या नांवावर मोडणारा छंदोमंजरी नांवाचा ग्रंथ उपलब्ध झाला. स्वतः शास्त्रीबुवा छंदःशास्त्रांत चांगले पारंगत असल्यामुळे त्यानी सदर छंदोमंजरीचे मोठ्या आवडीने व परिश्रमपूर्वक अध्ययन केले व शेवटीं ' त्यांतील वृत्ताविषयींची विशेष योजना, सरस पदरचना, व प्रतिभाचातुर्य इत्यादि गुण पाहून ' सदर पुस्तक सटीक छापण्याची स्फूर्ति त्याना झाली. अर्थात आजपर्यंत दुर्मिळ असलेला असला अपूर्व ग्रंथ मिळवून व सजवून लोकांपुढें मांडताना शास्त्रीबुवाना रामजोशाचे चरित्र द्यावे लागले आणि त्याच्या इतर उपलब्ध काव्याचे परीक्षण करावे लागले. यावेळीं 'रामजोशाची इतर उपलब्ध कविता अत्युत्कृष्ट आहे व अशा उज्ज्वल प्रतिभेच्या पुरुषाच्या हातूनच छंदोमंजरी ग्रंथ लिहिला गेला आहे ' असे सांगण्याचा मोह शास्त्रीबुवांना पडला असला पाहिजे. शास्त्रीबुवा तरी काय करणार? त्यांचा रामजोशी छंदोमंजिरीचा कर्ता पडला तेव्हां चरित्रनायक ' अद्वितीय ' असल्याखेरीज कसे भागते? शास्त्रीबुवानी रामजोशाच्या छंदोमंजरीचे व त्याच्या काव्याचे आलोडन केले तेव्हां त्यांना त्यांत बरेच दोष आढळले व ते दोष असे ठळक होते कीं, ते लपवून ठेवल्यास किंवा त्यांचा उल्लेख न केल्यास पक्षपाताचा आरोप येण्याचा उघड संभव. तेव्हां त्यांचा उच्चार त्यांना

करावाच लागला, कीं "जोशीबुवांचा संस्कृत भाषेकडे विशेष ओढा असल्यामुळें संस्कृत शब्दांचा भरणा त्यांच्या कृतींत विशेष दिसतो. त्यांनीं संस्कृत व मराठी शब्दाचे संधि संस्कृत संधिनियमाप्रमाणें पुष्कळ ठिकाणीं केले आहेत. मराठी भाषेचे दोन प्रकार. एक सामान्य जनांची भाषा व दुसरी नागरिकांची अथवा अभियुक्तांची भाषा. पहिल्या लोकांच्या भाषेंत व्याकरणाकडे दुर्लक्ष, विकृत शब्दांचा भरणा व ग्राम्यर्थसूचक शब्दाकडे प्रवृत्ति ही दिसून येतात. नागरिकांच्या भाषेंत व्याकरणशुद्धता, अविकृत-शब्दता, व ग्राम्य शब्दाविषयीं विन्मुखता या गोष्टी दिसतात. या दृष्टीने पाहिले असतां जोशीबुवाचे काव्य पहिल्या प्रकारांत मोडते असे म्हणावे लागते. शिवाय या कवीने मनाला उद्वेग उत्पन्न करणारे यतिभंगही बरेच ठिकाणी केले आहेत. आणखी एक विशेष दोष म्हटला म्हणजे एक प्रकारचा उद्दाम शृंगार हा होय. परमेश्वररूपी भगवान श्रीकृष्ण यांच्या विलासवर्णनात बरेच ठिकाणीं या कवीनी मर्यादातिक्रम केला आहे."

पण वरील सर्व दोष जमेस धरूनहि शास्त्रीबुवा लिहितात कीं 'यांच्या पूर्वीच्या कविमंडळांत सर्व गुणानी विशिष्ट असा कवि क्वचितच आढळून येईल. व त्यांच्या पश्चातहि आजपर्यंत कोणी त्यांच्या तोडीचा कवी झाला नाहीं" पण ज्या छंदोमंजरीच्या भरीं पडून रामजोशाला अद्वितीय कवि ठरविण्याचा प्रयत्न रड्डीशास्त्र्यानीं केला तो छंदोमंजरी ग्रंथच रामजोशाचा नाहीं असे कै. भावे यानी महाराष्ट्र सारस्वत ग्रथात पत्यामुद्यासुद्धां ठरविल्यामुळे 'छंदोमंजिरी या कल्पक ग्रथाचा कर्ता तसाच कल्पक प्रतिभावान कवि होता' किंवा 'रामजोशी अत्यंत कल्पक कवी असल्यामुळेच त्याला छंदोमंजरी लिहिता आली' असा रड्डी शास्त्र्यांच्या लिखाणातून निघणारा भ्रामक ध्वनी भ्रमाच्या भोपळ्याप्रमाणे फुटून गेल्यास त्यांत आश्चर्य काय? रामजोशाच्या छंदोमंजिरीबद्दलचा रड्डीशास्त्र्यांचा हा 'भास कीं आभास' तेव्हाच उघड झाला असता तर रामजोशाच्या इतर काव्याचे परिक्षण करून त्याला एकैक कविराय ठरविण्याच्या रिकाम्या उद्योगात शास्त्रीबुवा पडले असते की नाहीं याबद्दल जबरदस्त शंका उत्पन्न होते.

यानंतर रामजोशाची तळी उचलणारे सर्वात मातबर भासणारे सरदार

म्हणजे महाराष्ट्रसारस्वतकार भावे हे होत. रामजोशाची गाठ पडल्यानंतर तर ते केवळ बेहोष झाले आहेत. ' दैवे ही गाठ बयाबाईची पडली। कविता इजसंगे रंगा आली।' याप्रमाणें रामजोशाची जी तन्मयवृत्ति झाली तीच रामजोशाचें वर्णन करताना भाव्यांची झाली आहे. सबंध महाराष्ट्रसारस्वतात महाराष्ट्र शाहीर हा भाग भावे यांनी अत्यंत रंगून लिहिलेला आहे. उपसंहारात ते म्हणतात कीं, मराठी शाहीरांची आणखीहि मौज मी तुम्हास दाखविली असती (शृंगाराची) पण मला भिक्षुकाला निदान गजरासपणें तेथें उभे राहणें बरें नाहीं हें जाणून मी तुम्हाला खुणावून दूर निसटलों" वरील उद्गारांतच रा. भावे यांचा रंगेलपणा कोणत्या जातीचा व किती अमर्याद होता याचें बीज सांपडतें. उत्कृष्ट काव्याचे निरनिराळे नमुने म्हणून जे अनेक उतारे रा. भावे यानी ठिकठिकाणीं आपल्या पुस्तकांत उध्दृत केले आहेत, त्यावरूनहि त्यांचा रंगेलपणा उघड दिसून येणारा आहे. अर्थात् अशा रंगेल रसिकाला रामजोशासारखा विलासवान मर्द फाकडा भेटल्यावर त्याने त्याचे वर्णन मनापासून केलें असल्यास त्यात आश्चर्य नाही. सबंध शाहीरांच्या भागात रामजोशालाच त्यानी अग्रपूजेचा मान दिलेला आहे. व त्याच्या बदफैली चरित्रानेच पुष्कळशी जागा आडवली आहे. मात्र रामजोशाशीं भाव्यांचे तादात्म्य झालेले असल्यामुळे हा चरित्रविषयक भाग अत्यंत सरस वठला आहे हे कबूल केले पाहिजे. समानधर्मतेमुळें प्रिय झालेला रामजोशी, त्यांत चिपळुणकर, रड्डीशास्त्री अशा बड्या बड्या लोकांनीं केलेली त्याची शिफारस यामुळें रामजोशाची स्तुति करतांना भावे यांनीं कोणतीच अटक मानलेली नाहीं.

रा. भावे यांच्या ह्या महाराष्ट्र सारस्वत ग्रंथांत सर्व मराठी साहित्याचा इतिहासच असल्यामुळे वाचकाना असे वाटणे साहजिक आहे की, रा. भावे यानी केलेली विधाने पूर्ण विचारान्ती पाहून पारखून आणि तावून सुलाखून केलेली असावीत. त्याप्रमाणें वाचक असेहि म्हणतील की चिपळूणकर व रड्डी शास्त्री यानी रामजोशाची केलेली स्तुति एकांतिक होती असें क्षणभर समजूं. कारण त्यांचे वेळी प्रभाकर, होनाजी बाळ, अनंतफंदी इत्यादिकांची कविता पुस्तकरूपानें उपलब्ध झालेली नव्हती. पण रा. भावे याना या

सर्व कवींच्या या कवनांचा अभ्यास व उपयोग करून घेता आलेला आहे. अर्थात् रा. भावे यांचे रामजोशासंबंधीचे मत चिपळूणकराप्रमाणे किंवा रड्डी शास्त्री यांच्याप्रमाणें एकांगी भासत नाही. ते मत त्यानी तुलनेने व सर्व शाहीरांचा आढावा घेऊनच बनविले आहे असे स्पष्ट दिसते. म्हणूनच येथे असा स्पष्ट इशारा देऊन ठेवावासा वाटतो की, रा. भावे यांचा मराठी शाहीरावरचा भाग केवळ सूचीवजा आहे. आजपर्यंत मराठी शाहीरासंबंधी इतकी एकत्र केलेली माहिती दुसरीकडे कोठेच दिली नसल्यामुळें वाचकांस त्या सर्व शाहिरांचा रा. भावे यानी अभ्यास केला असला पाहिजे असा भ्रम पडतो. हे धाष्टर्याचें विधान इतर अनेक पुरावे देऊन सिद्ध करता येईल. परंतु भावे यांचा सगळ्यात आवडता शाहीर जो रामजोशी व ज्याच्याकरता त्यानी सगळ्यात जास्ती पानें खर्ची घातली त्या कवीचेच अध्ययन त्यानी कितपत व कसे केले होते याचे दोन नमुने दिले म्हणजे पुरे होईल. भावे म्हणतात "जसे शृंगाराचे तसे रामजोशाच्या पवाडयांतील वीररसाचे चित्रहि केवळ अद्भुत आहे. 'ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई' इ० हा पोवाडा एक वेळ अवश्य वाचण्याजोगा आहे. त्यांच्या हयातींत पडलेल्या दुष्काळाचे शब्दचित्रहि फारच हृदयद्रावक आहे." रामजोशाचे पोवाडे अवघे सबंध दोन आहेत! ते म्हणजे पुणेवर्णन व दुष्काळाचा पोवाडा. "ब्राह्मणी राज्य जोरदार इ०" पुणे वर्णनाच्या पोवाड्यांतला वीररस केवळ अद्भुत आहे असे भावे दडपून सांगतात. परंतु पहिल्या अक्कडकडव्याखेरीज त्यात वीररस कोठेंच नाहीं. नुसते पुण्याचे ठराविक वर्णन आहे. त्याचप्रमाणे 'दुष्काळाचा पोवाडा फार हृदयद्रावक आहे' असे भावे सांगतात. परंतु प्रासानुप्रासाच्या मौजेखेरीज त्यांत कोठेंहि करुणरस नाहीं. उलट हा पोवाडा वांचंकाला शब्दांची मौज म्हणूनच वाचावासा वाटतो.

ही खुद्द भावे यांच्या आवडत्या रामजोशाची स्थिति! तर इतरांची काय असेल हे सांगावयास नकोच. त्यासंबंधीं भावे यांच्या घरसोडीचे एकच उदाहरण देतो. भावे म्हणतात "पुण्यातला रंग आणि खर्ड्याची लढाई हे महाराष्ट्राच्या इतिहासातले शेवटले प्रसंग—मराठ्यानी ज्यांची प्रेमाने आठवण ठेवावी असे हे शेवटले प्रसंग—यांचे श्रवणाने महाराष्ट्राचे कान तृप्त

होत, मन तल्लीन होई, आणि गाणारांच्या जिभेलाहि हे प्रसंग गाताना आपण धन्य झालो, आपण पुनीत झालो, असे वाटे; आणि म्हणूनच होनाजी बाळा, अनंत फंदी, रामजोशी, प्रभाकर, सगनभाऊ, रामचंद्र, परशुराम वगैरे एकोन एक चांगल्या शाहिरानी या प्रसंगाची मनोहर वर्णनें करून आपल्या देशास ऐकविली, आणि आनंदाने व स्फूर्तीने लोकांचे देह फुगवून सोडले." भावे यानी वर्णन केलेल्या वरील दोन प्रसंगावर रामजोशी, सगनभाऊ किंवा परशराम यांचा एकहि पोवाडा किंवा लावणी प्रसिद्ध नाहीं. रा. भावे यांनीं हे विधान निवळ दडपून दिलेलें आहे !

## परिशिष्ट

श्री

वेदमूर्ति राजश्री जगंनाथ जोशी व अनंत जोशी बिन केशव जोशी उपनाम ताशे गोत्र वछ सूत्र कात्यायन वास्तव्य कसबे सोलापूर गोसावी यासी

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ तिसा खमसैन मयाव-अलफ तुम्ही हुजूर कसबे पुणे येथील मुकामी येऊन विनंति केली कीं, आपण स्नानसंध्यादि षट्कर्म आचरोन कसबे मजकुरी राहतो त्यास कुटुंबवत्सल आहो योगक्षेम चालत नाहीं यास्तव स्वामीनी कृपालु होऊन आपणास काही नूतन इनाम जमीन कसबे मजकुरी पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें करून दिल्हीया कुटुबाचा योगक्षेम करून राजश्री स्वामीस व स्वामीचे राज्यास अभीष्ट चिंतून सुखरूप राहो म्हणोन त्याजवरून मनास आणितां तुम्ही थोर सत्पात्र जोतिर्विद, तुमचे चालविल्या श्रेयस्कर आहे हे जाणून तुम्हावर कृपालु होऊन कुटुंबाचे योगक्षेमार्थ तुम्हास कसबे सोलापूर सरकार मजकूर पैकीं जमीन चावर ।- पाव एकूण बिघे तीस स्वराज्य व मोगलाई ये॥ दुतर्फादेखील सरदेशमुखी व इनाम तिजाई कुल्बाब कुल्कानू हालीपटी व पेस्तर पटी जलतरूपाषाणनिधिनिक्षेपादि करून खेरीज हकदार करून नूतन इनामजमीन कसबे मजकूरचे तनाखियामध्ये वजा करऊन दिल्ही असे. तरी तुम्ही कसबे मजकूरपैकीं सदरहू तीस बिघे जमीन अवल दूम सीम तिही प्रतीची चतुःसीमापूर्वक दुमाला करून घेऊन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनभऊन स्नानसंध्यादि षट्कर्मे आचरोन राजश्री

स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण इच्छून सुखरूप राहाणे. या इनामास तुमचे गोत्र पुरुषास संमध नाही. तुम्हासच नूतन इनाम करून दिल्हा असे * जाणिजे छ १४ सफर आज्ञाप्रमाण लेखन सीमा

श्री०
राजा शाहु नर-
पति हर्ष निधान
बाळाजी बाजीराव
प्रधान

अक्षरें वेगवेगळीं

[ ह्याप्रमाणेंच व मितीचे "आमइनाम देशमुख व देशपांडे पाा सोलापूर सरकार सुबे खुजस्ते बुनियाद यासी आणि मोकदम कोा सोलापूर" यास आज्ञापत्र दिले आहे. ]

श्री

फारीखत वोा चिरंजीव रामचंद्र जोशी यासी मुदगल जोशी कसबे सोलापूर सुाा सन ११८७ कारणे लिहून दिल्हे फारिखत यैसे जे आपण व तुम्ही येकस्थळी असता चालेनासे जाहाले कजिया होऊ लागला या निमित्य विभक्त जाहालो लोकाचे देणे तुमचे व आमचे उभयेताचे मारफातींचे निघाले बि तपसील

२०० रामचंद्र तिमाजी देशपांडे
१०० बापू सिवपत
१५० बहिरव पाठक
१५० दाजाबा बवे

६००

३०० बयाबाई सिराढाणेकर
२५ राघोपंत दामले
२५ दिंडुरे बाबत

३५०

९५०

---

येकूण साडे नवसें सदरहू देणे याचे भरतीस घरातील वस्तभाव व भांडीं व चिरकूट पांघरुणे व किल्ल्यातील वर्षासन व निंबालकरानी मौजे आरली येथे इनाम दिल्हा आहे तो व कसबे मजकूर येथील इनाम सन ११८८

ता सन ११९२ पाच साले तुमचे व आमचे संतोषानेच आम्ही आपणाकडोन लाऊन येऊन सदरहू साडे नवसे रु. देणे आम्हाकडे लाऊन घेतले ते आपणच वारु तुम्हाकडे काही तगादा नाही देण्याचे यैवजास व वस्तभाव भांडीं व पांघरुणे ( वि ) कून बाकी राहिले ते व गुर व घोडे व देवदेवतार्चन व पुस्तक जे काय होते ते बरोबर विभागाप्रो। वाटून घेतले काही राहिले नाही आरली व कसबे मजकूर येथील इनाम व किल्यातील वर्षासन सन ११९३ पासून उभयेतानी बरोबर वाटून घ्यावे वाडावडिलाची वृत्ति जे आहे ते'समायेक आहे जे समई पाहिजे ते समई वाटून घेऊ यासिवाय तुमचे विद्यमानचे देणे असेल ते तुम्ही वारावे आमचे विद्यमानचे देणे असेल ते आम्ही वारावे देऊ सराफ माशालकर याजकडे समा (इ) क कर्ज येणे ते उगऊन वसूल येत नाही तो बरोबर उभयेता वाटून घेऊ या प्रो फडशा जाहला असे येकमेकाचा कझ्या राहिला नाही आपले खुषरजावदीने लिहून दिल्हे फारिखत सही तेरीख छ २१ सफर

( बालबोध ) शके १६९९ हेमलंबी नाम संवछरे फाल्गुण वद्य ९ रविवार हे फारीखत स्वसंतोषे लिहून दिल्हे सही

पत्राप्रमाणे साक्षे नारो मल्हार देशपांडे पा। सोलापूर | स्वदस्तुर कृष्णाजी गोविंद नि॥

पत्रप्रमाण साक्षे मेलगिरी बहिरो पा का॥ मजकूर | नारो मल्हार देशपांडे पा मजकूर

पत्रप्रमाण साक्ष गोविंद जिवाजी पोतदार पा॥ सोलापूर | जगनाथ पाठक बिन हेरंब पाठक वागिक जोसि साक्ष

## अनंतफंदी

अनंतफंदीचा जन्म सन १७४४ साली झाला. हा यजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. आडनाव घोलप. याच्या पूर्वजांचा धंदा गोंधळीपणाचा व सराफीचा असा सजोड असे. अनंतफंदीच्या वडिलांचे नाव काय, ते काय उद्योग करीत वगैरे संबंधी काहीच माहिती मिळत नाहीं. पण फंदीबुवाच्या बाळपणच्या वगैरे ज्या आख्यायिका उपलब्ध आहेत त्यावरून फंदीबुवाचे वडील त्याचे लहानपणीच निवर्तले असून त्याच्या विधवा बायकोनें म्हणजे

राऊबाईनेच नंतर या एकुलत्या एक लहानग्याचा प्रतिपाळ केला असावा असे म्हणता येते. लहानपणी फंदीबुवाला कोणाचाच दाब नव्हता. बाप वारलेलाच होता अशा स्थितीत आपल्या आईचे प्रेमसर्वस्व बनलेल्या एकुलत्या एक पोराला तिचा कितीसा धाक लागणार? तिचा काहीही उपाय न चालून फंदीबुवा लवकरच गावातला एक खोडकर उनाड पोरगा बनला त्याने लिहिणे पुसणे अगदी सोडले. दोन वेळ गिळायला तेवढे आईचे तोंड पाहून सगळा दिवस उनाडक्यात घालवावा आणि नंतर सगळी रात्र उजाडून येईपर्यंत तमासगिरांच्या फडात काढावी हा क्रम त्याने धरला. याच काळात एक दिवस आईशी भांडून रागारागाने फंदीबुवा भवानीबुवाच्या मठांत जाऊन बसला असता त्याची आई तेथे आली व भवानीबोवाजवळ आपल्या मुलाची गाऱ्हाणी सांगू लागली. तेव्हां अकस्मात त्या वरदी पुरुषाच्या कृपेनें फंदीबुवाला कवित्वस्फूर्ति झाली अशी आख्यायिका आहे. सदर आख्यायिकेचे तात्पर्य इतकेच धरून चालावयास हरकत नाही की फंदीबुवा लहानपणापासूनच कवित्व करू लागला. त्याचा वडिलार्जित धंदा गोंधळीपणाचाच असल्यामुळे ही विद्या त्याला स्वल्प परिश्रमाने साध्य होण्यासहि मदतच होण्यासारखी होती. ते कसेही असो. या विद्येच्या जोरावर तरुणपणातच फंदीबोवानी आपला तमाशाचा फड निर्माण केला आणि राजरोस रीतीने लावण्या रचून त्या म्हणण्याचा किंवा म्हणविण्याचा उद्योग करून त्यानी चरितार्थाची सोय केली. या कामातले त्याचे मुख्य साथीदार मलकफंदी, रतनफंदी व राघवफंदी असे तिघेजण असत असे त्याच्या लावण्यावरून दिसते. आपल्या उमेदीत असता फंदीबोवानी निरनिराळ्या प्रांतात अनेक वेळा मुलुखगिऱ्या केल्या. जिकडेतिकडे लौकिक मिळविला व उमाप पैसा जोडला. प्रौढ वयांत वयोमानारूप त्यानी शृंगारिक ग्राम्य लावण्या रचण्याचे टाकून देऊन आपली वाणी परमार्थाकडे वळविली व कीर्तनकाराचा पेशा स्वीकारला. हा पेशा त्यानी अहिल्याबाईचे उपदेशावरून स्वीकारला अशी आख्यायिका आहे. त्याच्या समयसूचकतेच्या आणि शीघ्र कवित्वाच्या गुणाना हा पेशा फारच मानवला. उत्तरवयात पुणे प्रांतात त्याचा अत्यंत बोलबाला झाला. अनंतफंदी पुण्यास प्रथम केव्हांपासून आला हे कळण्यास मार्ग नाहीं. परंतु

१७९५ मध्यें खर्ड्यांचे स्वारीचे वेळी पुण्यास त्याचे वास्तव्य असून दरबारांत त्याचा परामर्ष घेण्यात आला होता हे नक्की आहे. कारण 'सवाइ माधवराव सवारी' या खडर्यांचे पोवाडयाचे शेवटी स्पष्ट उल्लेख केला आहे की 'फंदी अनंत कटिबंध छंद ललकारी श्रीमंताचे दरबारी' सवाई माधवरावानंतर रावबाजीच्या कारकीर्दीत तर अनंतफंदीचा फारच गौरव झाला. खुद्द बाजीरावाची त्याच्यावर बहाल मर्जी बसून गेली इतकी की आपल्या पत्रव्यवहारावरून स्वतःच्या राज्यारोहणाच्या राजकारणाची सर्व हकीकत लिहून देऊन त्याने फंदीबोवाकडून माधवनिधन काव्य लिहून घेवविले. कीर्तनकार या नात्यानें फंदीबुवांचा विलक्षण लौकिक पाहूनच धूर्त बाजीरावानें हा उद्योग केला असावा यात शंका नाही. पण त्यावरून फंदीबोवाची तत्कालिन समाजावर केवढी छाप होती हे दिसून येईल.

सदर माधवनिधन आख्यानाचे सहा अध्याय असून त्यांत एकंदर ३५९ ओव्या आहेत. सवाईमाधवरावाच्या मृत्यूनंतर जे घोटाळे आणि घालमेली झाल्या, नाना फडणीस परशरामभाऊ व शिंदे यानीं परस्परावर जे डाव टाकले त्याचे बाजीरावास अनुकूल अशा रीतीने सुसंगत व सुगम वर्णन या आख्यानात केले आहे. बाजीराव हा सद्‌गुणाचा पुतळा असून गादीचा अधिकार त्यालाच कसा पोचत होता हे सांगून त्याच्या प्रतिपक्षीयांची बरीच निंदा त्यात वाचावयास सांपडते. प्रत्येक अध्यायाचे शेवटीं 'ही कथा बाजीराव रघुनाथें। लिहोनि दिधली आपुल्या हातें। त्या पत्रा बरहुकूम टीका येथे। कवित्व केले कवीने" अशी किंवा "ही कथा राघवात्मजे लिहिली आपुल्या स्वकरांबुजें। लेखाबरहुकूम काय जे। कवित्व केले फंदीने" अशी ग्वाही दिली असल्यामुळे ऐतिहासिक पुराव्याचे दृष्टीने या आख्यानाचे महत्त्व पहिल्याप्रतीचे मानावे लागते. पटवर्धनी दप्तरातील पत्रांच्या प्रत्यंतर पुराव्याने हे आख्यान सर्वस्वी सत्य व सुसंगत आहे असे दिसून येते. या ओवीबद्ध आख्यानाचीच दुसरी एक विविध वृत्तात्मक प्रत उपलब्ध आहे तिचा उपयोग फंदीबुवा कीर्तनाचे वेळी करीत.

फंदीबुवांची पुणे प्रांतात केवढी छाप बसली होती यासंबंधी दुसराहि एक महत्त्वाचा पुरावा उपलब्ध आहे. महाराष्ट्रातील अतिविख्यात शाहीर होनाजी बाळ याने फंदी बोवांच्यावर एक उत्कृष्ट लावणी रचलेली आहे.

त्यांत त्याने त्यांचे सुंदर चित्र काढले आहे. ‘फंदी अनंत कवनाचा सागर’ ‘वाचा वाचस्पतीसारखी बहुतांचे तनमन हरकी। लांगेलुंगे कवि भेदरले अवघ्यावर त्याची गुर्की’ ‘समोर गाता कोणी टिकेना’ ‘धन ज्याचा हातचा मळ’ ‘फंदी अनंदी छंदी वरदीब्राह्मण त्यावर गुरुकृपा’ ‘अकटबिकट कवनाच्या चाली नित्य नव्या अक्षयि थापा’ ‘विद्या अभिमान नाही जयाला असा कवी कंचा धुंडा’ ‘कीर्तनरंगी सडा घालिती मानवला सर्वत्रासि असे। पुढे मागे ऐसा नसे दुसरा मृत्युलोकिचा रहिवासी’ ‘पहावे रत्न पंधरावे’ इत्यादि वर्णनानंतर जास्त काही लिहिण्याचे कारण नाहीं समकालीन प्रसिद्ध कवीकडून स्तुतीचा करभार मिळविण्याचे आणि प्रत्यक्ष पेशव्याच्या हाताने काव्य सामुग्री लिहून मिळण्याचे परमभाग्य मराठे शाहीरातील दुसऱ्या कोणासहि लाभलेले नाहीं.

इ. स. १८००।१८०१ नंतर फंदीबुवा पुणे प्रांतात नव्हते असे दिसते. १८०३ सालाचे सुमारास पेंढाऱ्यांचे दंगे उसळून त्यानी अनन्वित जुलूम जबरदस्ती केली रयतेची ससेहोलपट करून देश उजाड करून टाकला. त्या संबंधाच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या ७।८ लावण्या फंदीबोवानी केल्या आहेत. त्यात एके ठिकाणी म्हटले आहे की “झाले बाजीराव धणी आता पृथ्वीला आनंद असावा (पण)। जुने मुच्छदी घरी बसविले दोन दिवस घ्या विसावा’. या अधिक्षेपात्मक उद्गारावरून व बाजीरावाचा हाडवैरी यशवंतराव होळकर याने पुण्यास येऊन त्याचा धुव्वा उडवून पुणे लुटले त्या संबंधीच्या गौरवपर पोवाड्यावरून पुण्याशी किंवा बाजीरावाशी त्यांचे सौरस्य राहिले नसावेसे वाटते. माधवनिधन काव्यातला सहावा अध्याय या दुष्काळानंतरच त्यानी जोडला. महाराष्ट्रसारस्वतकार भावे तो अध्याय प्राक्षिप्त ठरवितात आणि कारण सांगतात की, स्वतःला दूषणात्मक असा मजकूर बाजीराव अनंतफंदीला कसा लिहून देईल? पण सहाव्या अध्यायातील भाषा थेट पहिल्या पांच अध्यायासारखी आहे. त्या अध्यायातील मजकुराची सामुग्री बाजीराव लिहून देणार नाही हे भाव्यांचे म्हणणे बरोबर आहे पण म्हणून अनंतफंदीने स्वतः पाहिलेली व ऐकलेली हकीकत एकत्र करून तो अध्याय जोडला नाहीं असे कसे म्हणता येईल? बाजीरावाचा काहीच संबंध नसल्यामुळे पूर्वीच्या अध्यायाप्रमाणे या अध्यायाचे

शेवटीं ' ही कथा बाजीराव रघुनाथे । लिहोनी दिधली आपुल्या हाते ' इत्यादि मजकूर येण्याचे काहीच कारण नाही. अनंतफंदीनेच दुष्काळावर व पेंढाऱ्यांच्या दंग्यावर जर पाचसहा लावण्या रचलेल्या प्रसिद्ध आहेत तर बाजीरावाच्या राज्यारोहणानंतर अनुक्रमानेच प्राप्त झालेल्या या दुष्काळ-वर्णनाचा भाग त्याने आपल्या माधवनिधन काव्याला का जोडला नसेल ? रा. भाव्यांच्या म्हणण्याप्रमाणे पेंढाऱ्याचे दंगे व दुष्काळ या संबंधीची माहिती बाजीरावाने लिहून दिलेली नाही असेच आम्हास वाटते पण असली माहिती बाजीरावाने लिहून देण्याची काही जरूरच नव्हती. इतर शेकडो लोकांप्रमाणे ते ती स्थिति ऐकत आणि कदाचित् प्रत्यक्ष पहात होते. व तीच त्यानी वर्णन केली. दुष्काळवर्णनात पूर्वीच्या अध्याया-प्रमाणे गुप्त राजकीय घालमेली काही नसल्यामुळे बाजीरावाकडून माहिती लिहून घेण्याची जरूरच नसणार. सारांश, या सहाव्या अध्यायाचे शेवटीं बाजीरावाच्या ' पत्राधाराचा ' उल्लेख नाही येवढ्यावरून तो प्रक्षिप्त ठर-विण्यास पुरेसा पुरावा आहे असे म्हणवत नाही. प्रक्षिप्त म्हणावयाचेच असल्यास, तो अनंतफंदीनेच पण मागाहून पहिले पांच अध्याय लिहून माधवनिधन काव्य पुरे झाल्यावर जोडला याच अर्थाने म्हणता येईल.

या दुष्काळाच्या सुमारानंतर फंदीबुवाचे आणि बाजीरावाचे बिनसले असावे या विधानाला दोन आधार देता येतील. फंदीच्या मुलाचा बाजी-रावाचा निंदापूर्ण असा एक पोवाडा १८१७ च्या सुमाराचा आहे. त्याच-प्रमाणे ' वडिलांचे हातचे चाकर । त्यास न मिळे भाकर ' इत्यादि सुर-वातीचा दुसरा एक पोवाडा आहे. तो अपूर्ण असल्यामुळे तो फंदी-बुवाचा आहे का फंदीच्या मुलाचा आहे हे स्पष्टपणे कळत नाही तरी ' जुन्याची तिंबुनी कणिक राज्य अपुले हरविले ' या उल्लेखावरून तो १८१८ नंतर रचलेला असला पाहिजे. या दोन निंदात्मक पोवाड्यावरून फंदीबुवांचे मत काय असेल ते जाणता येते. दुसऱ्या बाजीरावावर ७।८ पोवाडे आहेत पण ते सर्व त्याच्याविषयीच्या सहानुभूतीने आणि भक्तीने ओथंबलेले असून एकट्या फंदीबुवांचे आणि त्यांच्या मुलाचे असे दोनच काय ते पोवाडे निंदात्मक आढळतात ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. असो. भावे सांगतात कीं ' शेवटच्या रावबाजीवरील यांचा एक पवाडा

तर फारच प्रसिद्ध आहे" पण त्यांच्या अनेक बिगर चौकशीने दडपून दिलेल्या विधानापैकीच हे एक होय. तसा एकहि पोवाडा उपलब्ध नाही.

आपल्या ऐन उमेदीत फंदीबुवानी निरनिराळ्या अनेक प्रांतात व राज्यांत मुलुखगिऱ्या केल्या व लौकिक मिळविला. "मोठ्या मोठ्या राज्यामधि मशहूर । जग जाहीर चारी तर्फा" असे त्यांचे होनाजीने वर्णन केलेच आहे. आपल्या उत्तर वयांत म्हणजे सन १८०० ते १८१८ च्या काळांत ते मिरज सांगली बडोदे वगैरे ठिकाणी मुलुखगिऱ्या करून आल्याचे त्यांच्या चिंतामणराव सांगलीकर, बाळासाहेब मिरजकर, फत्तेसिंग गायकवाड इत्यादिकावर रचलेल्या पोवाड्यावरून दिसते. नंतर लवकरच म्हणजे सन १८१९ साली ते वारले.

अनंतफंदी वारले तेव्हां ७५ वर्षांचे होते आणि त्याना कवित्व करण्याची स्फूर्ति पहिल्या पचविशीतच झाली ही गोष्ट लक्षांत घेतां, त्यांची कवने, पोवाडे, लावण्या, पदे कितीतरी असतील. तरुणपणीचा धंदा तमासगीराचा व प्रौढपणीचा कीर्तनकाराचा असल्यामुळें त्याचे हातून हमखास विपुल कवित्व लिहून झाले असले पाहिजे. निदान शेदीडशे लावण्या व पाचपंचवीस पोवाडे तरी लिहून झाले असले पाहिजेत पण आज त्यांचा म्हणून उपलब्ध असलेला जो कवितासग्रह आहे त्यात सारे सात पोवाडे व पाच पंचवीसच लावण्या आहेत. शिवाय या लावण्यातहि काही संशयितच आहेत. उदाहरणार्थ 'अनंतभगवंताची नामे त्यातुनि ही उत्तम' ही संध्येवरील लावणी अनंतफंदीच्या व रामजोशाच्या नावावर दोघाच्याहि मोडते. आमचे संग्रही असलेल्या एका जुन्या बाडात हीच लावणी एका दुसऱ्याच शाहीराची म्हणून छापली आहे. शाळिग्रामानी छापलेल्या अनतफंदी व रामजोशी यांच्या कवितासंग्रहातील या लावण्याच्या शेवटी कर्त्याचा उल्लेख नाही. आमचे संग्रही असलेल्या बाडात कर्त्याचा स्पष्ट उल्लेख आहे तो असा "रामालक्ष्मण म्हणे जयाचे नामे गेला भ्रम गाइल्या उद्धरती आधम" असो. 'फंदी अनंत कवनांचा सागर' अशी ज्याची समकालीन होनाजीने स्तुति केली त्याचा इतका तुटपुंजा संग्रहच उपलब्ध व्हावा हे दुर्दैव होय. दुःखात सुख इतकेच कीं या तुटपुंज्या संग्रहातहि ऐतिहासिक महत्त्वाच्या पोवाडेलावण्यांचा भाग त्यातल्यात्यात मोठा आहे. पानपत-

च्या लढाईच्या वेळी फंदीबुवा १७।१८ वर्षांचे होते. अर्थात त्यानंतर पोवाडयाला योग्य असे शेकडोशे प्रसंग व व्यक्ति त्यांना आढळल्या असल्या पाहिजेत व त्यावर त्यांचेकडून लेखनहि झाले असले पाहिजे असे निःसंशय वाटते. हा संग्रह असाच कोठे तरी धूळ खात पडला असेल. एखाद्या संशोधकाचीच तो वाट पहात बसला असेल. शालिग्रामांच्या प्रस्तावनेत उल्लेखलेले होनाजीच्या घरचे प्रचंड संग्रह व शालिग्रामानी स्वतःजवळ जमविलेल्या संग्रहातील अवशिष्ट भाग संशोधकानी अजूनहि मिळवून प्रसिद्ध केल्यास मराठी वाङ्‌मयावर व मराठी इतिहासावर खरोखरच फार उपकार होतील.

## होनाजी बाळा

मराठी शाहिरात होनाजी बाळाचाहि अस्कारा फार असे. कवित्व-गुणाची देणगी होनाजीस पिढीजातच होती असे दिसते. कारण होनाजीचा आजा साताप्पा हा उत्तम लावणी रचणारा होता त्याप्रमाणे त्याचा चुलता बाळा ऊर्फ बाळाबहिरू हाही तसाच गाजलेला फडकरी होता. कवित्वाचा हा गुण पितृपुत्रन्यायाने होनाजीस सव्याज मिळाला होता आणि या गुणाचा परमोत्कर्षहि त्याने आपल्यापुरता करून दाखविला यांत शंका नाही.

सातप्पा शिलारखाने हा जातीने नंद गवळी. याच्या कालासंबंधाने कोठेच काही माहिती उपलब्ध नाही. पण अदमासाने पहिल्या बाजी-रावांच्या कारकीर्दीचा किंवा नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीचा काळ हाच सातप्पाचा काळ मानावयास हरकत नाही. सातप्पाच्या लावण्या आज मितीस कोठेहि उपलब्ध नाहीत. नाही म्हणावयास रा. शालिग्राम यानी होनाजीच्या म्हणून ज्या लावण्या छापल्या आहेत त्यातील एक मात्र निः-संशय सातप्पाची आहे असे तिच्या शेवटच्या चरणावरून दिसते ( लावणी नंबर ९ ) रा. शालिग्राम यानी होनाजीच्या घरचा प्रचंड लाव-ण्यांचा संग्रह धुंडाळला तेव्हा त्याना त्यात सातप्पाच्या काही लावण्या आढळल्याचे त्यानी प्रस्तावनेत नमूद केले आहे. परंतु अजूनपर्यंत त्या जगापुढे आल्या नसल्यामुळे त्याविषयी काहीच लिहिता येत नाही. सातप्पाचा लौकीक फार होता. तत्कालीन फडकऱ्यात तर सातप्पा म्हणजे कोणी वरदी

महापुरुष आहे व शंकराचा त्याला वरप्रसाद आहे अशी दृढ समजूत होती. साताप्पा वारला तेव्हा संगमावर त्याची समाधि बांधण्यात येऊन त्याच्या नांवाने एक शांतलिंग स्थापन करण्यात आले. अजूनपर्यंतहि दर श्रावणी सोमवारी तमासगीर तेथे जाऊन हजेरी देतात. जुन्नरच्या सुप्रसिद्ध गोविंदराव शाहीराची अशीच ख्याति प्रसिद्ध आहे. साताप्पा प्रमाणेच जुन्नरास त्याची समाध असून त्याचा लौकिक त्या प्रांतात विलक्षण आहे. आजतागायतहि जुन्नरास एकाद्या घरात भुताची वगैरे बाधा झाली तर तेथे एक रात्रभर गोविंदरावी लावण्याचा तमाशा केला म्हणजे ती नष्ट होते असा समज रूढ आहे. असो.

साताप्पास तीन मुलगे होते. बाळा, कुशाबा आणि सयाजी. यापैकी बाळा हाच सुप्रसिद्ध बाळा बहिरू होय. बाळा बहिरू असे जोड नाव पडण्याचे कारण बहिरू नांवाचा रंगारी बाळाच्या बैठकीतला नेहमीचा जिगर दोस्त असे. बाळाने लावणी करावी व ती बहिरूने म्हणावी किंवा बहिरूची लावणी बाळाने म्हणावी अशा या दोघांच्या दाट स्नेहामुळे त्यांच्या तमाशाचे नाव बाळाबहिरूचा तमाशा असेच पडले म्हणून ते स्वतःच तसे जोड नाव लावूं लागले. बाळा बहिरूचा स्वतंत्र असा लावण्यांचा संग्रह प्रसिद्ध नाहीं. परंतु साताप्पा प्रमाणेच बाळाबहिरूच्याहि काही लावण्या होनाजीच्या नावावर शाळिग्रामानी छापल्या आहेत. उ. लावणी नंबर १२७, १०५, ९२ वगैरे. ‘ आम्ही प्रलयंगता तुम्ही ग बुध नाहीं कामाची ’ ही सुप्रसिद्ध उत्कृष्ट लावणी बाळाबहिरूचीच आहे. त्या लावणीत वर्णिलेल्या कर्नाटकच्या स्वारीच्या प्रसंगावरून आणि ‘ कर्नाटकच्या स्वारीस होतो श्रीमंताबरोबर। रणसंग्रामी झटून केली अंगी तलवार।......झाडिमध्ये पिटुन घातला लुटून हैदर ” इ. उल्लेखावरून थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीपासून बाळाबहिरूचा फड पुण्यात गाजत असावासा दिसतो. यांच्या फडाचे व सगनभाऊच्या फडाचे सामने त्यावेळीही होत असावेसे दिसते. एका लावणीच्या शेवटी सगनभाऊ म्हणतो कीं ‘ फोडिले रंगाऱ्याचे मडके ’ ते बहुधा या बहिरू रंगाऱ्यास अनुलक्षून असावे. बाळाबहिरूचा पोवाडा असा एकच उपलब्ध आहे व तो नानाफडणिसाचा होय. आजतागायत गोंधळ्यांच्या तोंडांत जे पोवाडे शिल्लक राहिले आहेत त्यापैकी हमखास नेहमी म्हटल्या

जाणाऱ्यापैकी तो आहे. त्या पोवाडयावरून उघड असे दिसते की सवाई-माधवरावाची जवळ जवळ सर्व कारकीर्द बाळाबहिरूने पाहिली होती व तेथपर्यंत कवने करण्याचा त्याचा उद्योग सुरू असावा.

बाळाचा भाऊ कुशाबा म्हणून होता व तोही तमाशात गात असे असे चरित्रकार सांगतात. त्याचे स्वतंत्र असे काही कवित्व उपलब्ध नाही. परंतु ' झांगड झांगड नौबत झडे ' हा खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा त्याचाच असावा असे दिसते. सदर पोवाड्यातील ' दिल्या गारपिरावर मोगलावर ढाला ' या पुण्यातील विशिष्ट स्थलोल्लेखावरून व ' आले शहर पुण्यास माधव ' या उल्लेखावरून शाहीर पुण्याचा रहिवासी असावा असे स्पष्ट दिसते. यामुळेंच हा शाहीर म्हणजे बाळा बहिरूचा धाकटा भाऊ कुशाबा असावा असा तर्क करावयास थोडीशी जागा होते.

बाळा बहिरूचा सगळ्यात धाकटा भाऊ सयाजी हाच होनाजीचा बाप. पण त्याच्याविषयीं कसलीच माहिती उपलब्ध नाही. यावरून तो अल्प-वयातच वारला असावा असे वाटते.

होनाजी बाळा याच्या जन्मतिथीसंबंधाने वगैरे काही उल्लेख उपलब्ध नाहींत. काव्यगुणात होनाजीला घरचीच शाळा होती. होनाजीची प्रसिद्धि सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत झाली. त्यावेळीं पेशवेसरकारातून त्याला राजाश्रय मिळाला होता असे त्याच्या रंगाच्या व खर्ड्यांच्या पोवाडयावरून दिसते. सवाईमाधवरावाच्या मृत्यूनंतर बाजीरावालाच गादी मिळावी असे प्रबळ लोकमत होते त्याचा फायदा घेऊन खर्ड्यांच्या लढाईच्या पोवाडयात शेवटीं ' गादीचा अधिकार ज्याला लक्ष ( त्या ) श्रीमंतापायीं ', असे सूतोवाच होनाजीने करून ठेवले. पुढे बाजीराव गादीवर आला तेव्हा त्याच्या स्तुतिपर ' श्रीमंत बाजीराव प्रभूचे पुण्य आगळे दिसे ' हा पोवाडा त्याने रचला. बाजीरावीत होनाजीच्या गुणाचे चांगलेच चीज झाले. खुद्द खाशा-स्वारीजवळ तमासगिरांची चांगलीच रीज होती. होनाजीच्या फडाची गाण्याबद्दल पूर्वापार ख्याती होती. बाळा करंजकर, रामा अंदू, विठू अंदू काशिराम धोंडी सदाशिव पांडू भवानी बापू भाऊ त्रिंबक वगैरे नामांकित गाणारे होनाजीच्या फडात होते म्हणून एकदा बाजीरावाने होनाजीजवळ

अशी इच्छा प्रकट केली की रागदारीत बसविलेल्या लावण्या ऐकावयास मिळतील तर बहार होईल. तेव्हा होनाजीने तीच आज्ञा समजून अनेक उत्कृष्ट रागदारीच्या लावण्या तयार केल्या व त्या आपल्या धन्याला ऐकवून शाबासकी मिळविली. कदाचित तेव्हापासूनच रागदारीत लावण्या रचण्याचा एक विशेष प्रकार रूढ झाला असावा कारण होनाजीचा प्रतिस्पर्धि सगनभाऊ याने तोच क्रम अनुसरला व होनाजीवर कडी केली. तत्कालीन दुसरा शाहीरतुरा जो प्रभाकर त्याच्या तर सर्व लावण्या बैठकीच्याच आहेत. खुद्द स्वतःविषयींच्या बीभत्स शृंगारिक लावण्या ऐकण्याचा बाजीरावाचा आंबटशोक होनाजीने पुष्कळ वेळा पुरविला. उ. ८३, ९३, ९७, ११९, १३५, वगैरे लावण्या खुद्द बाजीरावासंबंधीच्या आहेत. ‘ होनाजीबाळा म्हणे सख्याला दे सखये गोविंदविडे । काशिनाथ श्रीमंतपदाशी गाइ करुन रुचकर छंदडे ’ असे स्पष्टच उल्लेख आहेत.

होनाजीचा परामर्ष बाजीरावाचे कारकीर्दीत चांगला घेतला गेला व त्याची फेड आपल्या पोवाडयानी होनाजीने कृतज्ञताबुद्धिने केली. बाजीरावाचा खडकीवर मोड झाल्यानंतर महाराष्ट्राचे स्वातंत्र्य सैरावैरा धावू घडपडू लागले त्या प्रसंगावरचे होनाजीचे दोन पोवाडे अत्यंत करुण उतरले आहेत. ‘ शकेसत्राशे एकुणचाळिसामधी ’ या पोवाडेवजा लावणीत खडकीच्या व अष्टीच्या लढाईचे वर्णन असून, ‘ दिन असता आकाशतळी अंधार पडला बाई ! विश्वतरंगाकार प्रभुविण शून्य दिशा दाही ’ या पोवाड्यांत बाजीरावाचे रूपाने स्वराज्यनाश झाल्यावर प्राप्त झालेल्या दुर्दशेचे अतीशय चटका लावण्यासारखे वर्णन त्याने केले आहे.

होनाजीला एकंदर प्राप्ती अशी त्या काळांत पुष्कळच होत असेल. कारण स्वराज्य आणि सुबत्ता, रसिकांचे आणि ‘ इष्काचे आगर पुणे शहर ’ अशा राजधानीतले वास्तव्य, प्रत्यक्ष बाजीरावासारख्या श्रीमंतप्रभूची बहाल मर्जी इत्यादि गोष्टीवरून तसा निष्कर्ष सहज निघण्यासारखा आहे. शिवाय होनाजीचा पिढीजात तमासगिराप्रमाणे पिढीजात गवळयाचाही स्वतंत्र धंदा चालूच असल्यामुळे इतर एकंदर शाहिरापेक्षा त्याची स्थिति समाधानकारक असावी असे उघडच होते. चरित्रकार शाळिग्राम यानी या संबंधाने काही माहिती दिली आहे आणि अस्सल पुराव्याच्या अभावी तूर्त तरी

तेच आपले सर्वस्व आहे हे खरे, परंतु तिचा डोळे मिटून स्वीकार करता येणार नाही. कारण शाळिग्रामांच्या हकीकतीतही विसंगतपणा आहे. ११ पानावरील प्रतीकाच्या प्रारंभी शाळिग्राम सांगतात कीं, 'कोंडणपूर येथे जो डोंगर आहे तो डोंगर व त्याजभोवतालचे रान होनाजी बाळाला पेशव्याकडून लाभले असून हल्ली ते सर्व रान होनाजी बाळाचेच वंशज उपभोगीत आहेत' पण त्याच प्रतीकाचे शेवटीं ते म्हणतात की 'या डोंगरात होनाजी बाळाचा मालकीचा संबंध नाही. परंतु इतके मात्र खरे की चौधरी गवळयांची मुलगी होनाप्पाचे मुलास दिली असल्यामुळे त्या उभयतांचा सोइरसंबंध झाल्यापासून होनाजी बाळा त्या डोंगरावर आपली जनावरे घेऊन जात असे. वरील कोंडणपुरच्या डोंगराची देणगी होनाजी बाळास पेशवे सरकाराकडून मिळालेली नसून ती दुसऱ्या गवळयास मिळाली आहे' दुसरे एके ठिकाणी ते सांगतात की होनाजी बाळास पेशवे सरकारातून शिमग्याबद्दल सालीना तीनशे रुपये मिळत व तेच पुढे असे सांगतात की होनाजी बाळास पेशवाईत पुष्कळ मिळकत जरी मिळत असे तरी नियमित नेमणुकीचे उत्पन्न म्हणून काही असेल असे वाटत नाही. सारांश शाळिग्रामानी चरित्रविषयक म्हणून दिलेल्या ऐकीव माहितीवरून व त्यातहि विसंगतपणाची जी भर पडली आहे त्यावरून त्यांची शाहीरचरित्रे संशयित आहेत निदान पूर्ण विश्वसनीय नाहीत हे अगदी उघड दिसते. अर्थात, होनाजीचा व त्रिंबकजी डेंगळ्याचा अत्यंत स्नेह होता, त्यांची एक बैठक असे, त्रिंबकजीच्या वाडयातच होनाजीची म्हणून एक खोली असे त्यात त्याने प्रतिपक्षी सामनेवाल्यांची हिसकावून आणलेली निशाणे आणि बिरुदे व त्याची तमाशाची हत्यारे ठेवलेली असत वगैरे माहितीवर विसंबता येत नाही.

शाहिरांच्या साक्षात कवनांचा अभ्यास करून त्यावरून शाहिरांच्या चरित्रासंबंधीचे काही विश्वसनीय कण सापडण्यासारखे असता शाळिग्रामानी काय पण महाराष्ट्र सारस्वतकार भाव्यांसारख्या इतिहाससंशोधकानेहि प्रयत्न केला नाही. असे कण फारच थोडे सांपडतात पण तेच सर्वांत अधिक विश्वसनीय असल्यामुळे त्यांचे महत्व फार आहे. लावण्यावरून होनाजीसंबंधी काही माहिती मिळते.

( १ ) होनाजीचे कुळदैवत.

" कुळदैवत श्रीवळनाथ ( रवळनाथ ? ) तारिती अनाथ करिती सनाथ मान्य स्वजाती । होनाजी बाळा म्हणे वियोग न हो देहांती "
( लावणी नं. २ )

( २ ) लावणी नं. ६ ही जेजुरीच्या मल्हारी मार्तंडावर आहे व ती स्वतः होनाजी तेथे गेला असता त्याने रचली असे ' तो हा मल्हारी दृष्टि पाहिला नगाचें शिरी ' या उल्लेखावरून उघड दिसते.

( ३ ) लावणी नंबर १७ च्या शेवटीं होनाजी बाळा आपल्या वतनासंबंधी काही उल्लेख करतो ' कवि शांतगुण रतन राधिके । होनाजी बाळाचे वतन राधिके इ० ॥

असो. पेशवाई जाऊन इंग्रजी झाली तेव्हा होनाजीच्या शिमग्याच्या सालीना वेतनात छाटाछाट झाली व त्याला कंपनी सरकारातून शंभरच रुपये मिळू लागले. पेशवाईनंतर बडोद्यास सयाजीराव महाराजाकडून त्याला २०० रुपयांचे वर्षासन होते असे म्हणतात.

होनाजीचा शेवट मोठा शोचनीय झाला. एक दिवस रात्री त्याच्यावर मारेकरी घातले गेले व त्यातच त्याचा अंत झाला. तमासगीर मंडळीत त्याच्याविषयीं अत्यंत भक्ति असल्यामुळें त्यानी मोठ्या थाटाने वाजत गाजत त्याच्या शवाचे दहन केले. आज तागायतहि दर भाद्रपद कृष्ण चतुर्दशीस म्हणजे त्याच्या मृत्यूतिथीस शहरातील सर्व तमाशे त्याच्या वाड्यापुढे जाऊन हजेरी देतात म्हणतात.

## सगनभाऊ

वारकरी सांप्रदायात पंढरीच्या विठ्ठलाची भक्ति करणारे मुसलमान भक्त आढळतात त्याप्रमाणें मराठी शाहिरातहि मराठी बोलीने समाजाला आळविणारे मुसलमान कवी सापडतात. त्या सर्वात गाजलेला कवी सगनभाऊ होय. त्याचा अस्कारा नुसत्या मुसलमान शाहिरातच तेवढा होता असे नव्हे तर एकंदर मराठी शाहिरात प्रभाकर परशरामासारखी जी पाचचार नावे आज तागायत ऐकू येतात त्यातच त्याची गणना होते.

हा जातीने शिकलगार मुसलमान. याचा जन्मशक भावे यानी अद-

मासे १७०० ( म्ह. सन १७७८ ) दिला आहे तो बरोबर दिसतो कारण सवाई माधवरावाच्या कारकीर्दीतील कोणच्याच प्रसंगावर सगनभाऊचे एकदेखील कवन उपलब्ध नाही. १७०० हा त्याचा जन्मशक धरला तरच याची बरोबर उपपत्ति लागते. कारण सवाई माधवरावाचे मृत्यूचे वेळी तो अवघा १७ वर्षांचा होता असे गणितानेच उघड दिसते. अर्थात येवढ्या अल्पवयांत त्याला कवित्व शक्ति ती काय असणार व असली तरी ती किती परिपक्व असणार ?

सारस्वतकार भाव्यानी शोध करून दिलेला जन्मशक बरोबर दिसतो, परंतु स्वतः भावे यानीच आपण दिलेला जन्मकाळ खोटा ठरण्यासारखे एक विधान महाराष्ट्रसारस्वताच्या ४५५ पानावर केले आहे. तेथे ते म्हणतात "पुण्यातला रंग आणि खर्ड्यांची लढाई हे महाराष्ट्राच्या इतिहासातले शेवटचे प्रसंग मराठ्यांनी ज्यांची प्रेमाने आठवण ठेवावी असे हे शेवटचे प्रसंग यांचे श्रवणाने महाराष्ट्राचे कान तृप्त होत मनतल्लीन होई आणि गाणारांच्या जिभेलाहि हे प्रसंग गाताना आपण धन्य झालो आपण पुनीत झालो असे वाटे आणि म्हणूनच होनाजी बाळा अनंतफंदी राम जोशी प्रभाकर सगनभाऊ रामचंद्र परशराम वगैरे एकोन एक चांगल्या शाहिरानी या प्रसंगांची मनोहर वर्णने करून आपल्या देशास ऐकविली" या उताऱ्यात सगन भाऊने सवाई माधवरावाच्या कारकीर्दीतील रंगावर व खर्ड्यांचे मोहिमेवर कवित्व केल्याचे भावे स्पष्टच सांगतात. शिवाय भावे यानी त्याची 'चांगल्या' शाहिरात गणना केली आहे. सोळा वर्षांच्या मुलाची गणना तत्कालीन चांगल्या शाहिरात होइल हे संभवनीय वाटत नाही. अर्थात् त्याचा जन्मशक बराच मागे न्यावा लागेल. म्हणजे भावे यानी स्वतःचा सिद्धांत स्वतःच खोडून काढला असे होते. भावे यानी अशी धरसोड केली पण ती करताना त्यानी एक सपशेल खोटी गोष्ट दडपून दिली. ती सगनभाऊच्या खर्ड्यांच्या पोवाड्याबद्दल. सगनभाऊचा एकहि पोवाडा वरील विषयावर उपलब्ध नाही. भाव्यांची दडपेगिरी येथेच थांबली नाही. त्याच वाक्यात रामजोशी व परशराम यांच्याहि माथीं त्यानी रंगाचे व खर्ड्यांचे पोवाडे मारले आहेत. पण सगनभाऊप्रमाणेच या दोघाही कवींचे तत्संबंधी एकदेखील कवन उपलब्ध नाही. असो.

दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत सगनभाऊच्या कवित्वाची प्रसिद्धी होऊं लागली. त्याने आपला एक स्वतंत्र फड काढला होता. बिबिछान, येमा, बाळा, राघू व रामा गोंधळी हे त्याचे प्रमुख फडकरी साथीदार असत. यापैकी रामा गोंधळी हा उत्कृष्ट गायक होता व मुख्यतः त्याच्या मुळेंच सगनभाऊच्या लावणीची विलक्षण छाप पडली. 'लावणी करावी सगनभाऊने ध ती वाजवून म्हणावी रामागोंधळ्याने' अशी जणू काही म्हणच तेव्हा पडली होती. "रामा गोंधळी म्हणजें प्रतिगंधर्वच होता. त्याच्या म्हणणीची योग्यता अप्रतिम होती. त्याच्या गोड सुरावर पुणे शहर इतके लुब्ध होऊन गेले होते कीं त्याच्या तमाशाभोवती हजारो माणसांची गर्दी होऊन जाई. पाव पाव मैलपर्यंत त्याच्या तमाशाभोवती लोकांचे कडे पडे" सगनभाऊच्या अनेक लावण्यांच्या शेवटी रामाचा मोठा गौरवपर उल्लेख आहे. उदा० 'रामा दर्दीचे गुण चौमुलखी चौघडे' "भाऊसगन गुणीजन गाती । रामजी चाल गाइ नखऱ्याची" "नित्य गाई रामा जसा पट्टयाचा मोहरा" एके ठिकाणी तर सगनभाऊने त्याला 'रामबाणाची' उपमा दिलेली आहे. असो. आपल्या 'अजब तऱ्हा' रचणुकीवर व रामाच्या मोहक म्हणणीच्या जोरावर सगनभाऊने पुण्यातील तत्कालीन सामनेवाल्यावर अनेकदा तोंडी केल्या. "सगनभाऊ म्हणे होनाजी बाळा उत्तर द्यावे रोकडे" किंवा "होन्या गवळ्याचा झाला चुना" इत्यादि उल्लेखावरून होनाजी बाळाशी त्याच्या अनेक वेळा चुरशीच्या झटापटी झालेल्या दिसतात. इतर तमासगिराप्रमाणे सगनभाऊवरही बाजीरावाची प्यार मर्जी होती. बाजीरावाच्या विलासकांडावर सगनभाऊच्या १५ लावण्या प्रसिद्ध आहेत. "प्रित उभयता मजवर ममता असावी या प्रभुरायाची" व "सगनभाउच्या कवनासी रसिक चाहाती राजबनसीं रसिकगोड शिरारे" हे शेवट असलेल्या लावण्या तर खुद्द बाजीरावासच म्हणून दाखविल्याचे स्पष्ट सांगतात.

सन १८१८पर्यंत सगनभाऊ पुण्यातच होता. या सालीं पेशव्यांची शेवटची लढाई पुण्याजवळ खडकीस झाली. पेशव्यांचा मोड झाला. बाजीराव पळून गेला व त्या दिवशीच पेशवाईचा खरा अंत झाला म्हणावयास हरकत नाहीं. या लढाईसंबंधीचा सगनभाऊचा 'दक्षणच्या पेशव्यास

घाला कधीं नव्हता आला। गंगाधर शास्त्र्यावरून राज्याचा नाश झाला' हा पोवाडा फार प्रसिद्ध आहे. पण यापेक्षाहि अत्यंत उत्कृष्ट असा त्याचा दुसऱ्या बाजीरावावरचा एक पोवाडा आहे. तो पोवाडा बाजीराव पुण्याला मुकल्यानंतर एकवर्ष व नऊ महिन्यानी लिहिलेला आहे. 'एक वारिस नऊ महिने प्रभुरायाच्या भेटीला' असा स्पष्ट उल्लेख आहे. स्वराज्यनाशानंतर दीन झालेली प्रजा एकेक दिवस मोजून कशी काढीत होती, स्वराज्याच्या 'रेशिमगाठीला'. अंतरल्याची दुःखकर आठवण घडोघडी येऊन प्राप्त झालेल्या विपन्न स्थितीचे चित्र त्याना कसे भेसूर व भयाण वाटत होते, 'पैसा असुन गाठिला' 'दुनिया कशी बापुडी' दिसूं लागली होती रोजगार बंद कसे पडले होते, वाण्या उदम्यांची व सावकारांची दुकाने बसून अठराही कारखाने बंद कसे झाले होते, सारांश पिसे उपटलेल्या पक्षा-प्रमाणे रयत कशी 'लोल' होऊन गेली होती त्याचे अत्यंत हृदयस्पर्शी चित्र या पोवाड्यात पहावयास मिळते. टिपे गाळीत रचलेला हा पोवाडा आज शंभर वर्षानंतरहि लोकास टिपे गाळावयास लावण्यास समर्थ आहे.

पेशवाई गेल्यानंतर प्रजेचे 'सर्वस्व हरण झाले' त्यात या बिचाऱ्या शाहिरांचीहि वाताहात झाली. येवढा परशराम कवी निस्पृह कीं ज्याने बाजीरावाची देणगी त्याच्या तोंडावर नाकारून 'सुइ दोऱ्याला हयात असो द्या तोचि इनाम मोकासा। चैनी खातर आम्ही राया पडलो नाही या फंदा' असा निस्पृह जबाब दिला त्याला 'परशराम म्हणे आलो नांवावर, गरीब महाराज नवाजे' अशी किंवा 'कल्पतरूचे दर्शन झाले दरिद्र तेथे कुठे उरे' अशी दीनयाचना करीत होळकरशाहीत भटकण्याची पाळी आली. पुण्याचा गंगुहैबतीचा जुनाट फड मोडल्यामुळे प्रभाकराला मुंबईस पोटाकरता दारोदार भटकण्याचा वक्त आला. सगनभाऊच्या कपाळी तेच होते. पुण्यातला त्याचा फड मोडला. रामा गोंधळी बडोद्यास निघून गेला म्हणून सगनभाऊ साताऱ्यास स्थापन झालेल्या छत्रपतींच्या दरबारी गेला. १८१८ नंतर पुढे साताऱ्याचे राज्य खालसा होईपर्यंत तो तेथे होता. पेशव्यांच्या राज्यनाशाप्रमाणे सातारच्या राज्यनाशाचे पोवाडेही गाण्याचे त्याचे नशीबी होते. पदच्युत प्रतापसिंह महाराज छत्रपतींवर त्याचे दोन पोवाडे उपलब्ध आहेत. साताऱ्यात आल्यानंतर सगनभाऊने जे पोवाडे

रचले त्यात त्याच्या पानपतच्या पोवाड्यासंबंधी दोन शब्द लिहिणे आवश्यक आहे. हा पोवाडा पानपतानंतर लिहिला गेला असे लोक समजतात पण ती चूक होय. नुसत्या पोवाडयांतील ऐतिहासिक माहितीच्या परीक्षणाने किंवा त्यातील कमालीच्या असत्य व अनैतिहासिक हकीकतीच्या ढिगाऱ्याकडे दृष्टीक्षेप फेकल्यासहि हा पोवाडा समकालीन नाहीं असे दिसून येईल या पोवाडयातली भाषा कमावलेली आहे व सगनभाऊने तो पानपतानंतर लगेच लिहिला असे मानले तर पानपताचे वेळी तो सुमार २०।२५ वर्षांचा तरी असला पाहिजे. सगनभाऊ १८४० नंतर वारला म्हणजे त्याची हयात सुमोर ९० वर्षांची निघते. अर्थात हे असंभवनीय आहे. शिवाय १७६१च्या सुमारास जर तो पानपतच्या पोवाडयासारखी भाषा लिहू शकणारा कमावलेला कवि होता, तर थोरला माधवराव किंवा सवाई माधवराव यांच्या कारकीर्दीवरचे त्याचे एकहि कवन पोवाडा किंवा लावणी उपलब्ध असू नये हे कसे शक्य आहे ? पण या सर्वांपेक्षाहि एक बळकट पुरावा देता येण्यासारखा आहे. बाजीरावीच्या अखेर पर्यंतचे जे त्याचे कवित्व म्हणजे लावण्या पोवाडे उपलब्ध आहेत त्यापैकी एकाच्याहि शेवटी तो आपल्या ठिकाणाचा उल्लेख करीत नाही. उलट १८१८ नंतर साताऱ्यास गेल्यानंतरचे त्याचे जे पोवाडे आहेत त्याच्या शेवटच्या ओळींत आपण शाहूनगरचे रहिवासी आहो असे तो मुद्दाम सांगतो. त्याच्या पानपतच्या पोवाड्याचे शेवटी तर 'गातो सगनभाऊ ठिकाणा शाहु नगर गातो फत्तेजंग पोवाडा करून' असे स्पष्ट म्हटले आहे. अर्थात १८१८ नंतर हा पानपतचा पोवाडा रचलेला आहे. जंगबहार नामक मूळ उर्दू पोवाडयाचे हे स्वैर भाषांतर आहे. प्रतापसिंह महाराज गुणी होते त्यानी कदाचित या पोवाड्याच्या श्रवणाची इच्छा दर्शविली असेल आणि म्हणून मग सगनभाऊने तो मराठीत रचला असेल. मूळ प्रसंग घडून आल्यानंतर ६०।७० वर्षांनी त्यावर फिरून पोवाडा झाल्याचे येवढे एकटे एकच उदाहरण शाहिरी वाङ्मयात दृष्टीस पडते. या पोवाड्यात सगनभाऊने आप्पा यशवंताच्या 'तलवार पुण्यावर धरून आला मोगल चढाई करून' या पोवाडयाचे भाषानुकरण केले आहे. असो.

१८४० च्या आगेमागे केव्हांतरी सगनभाऊ वारला. सगनभाऊ स्वतः

कोणा गुरुनाथ सिद्धाचा शिष्य होता. मरणसमयी तो स्वतःच गुरूच्या पदवीला पोचला होता. त्याचा सांप्रदाय बनून अमृतफाजखासारखी शिष्यावळहि तयार झालेली होती. शेवटी एका गोष्टीचा उल्लेख करून हे चरित्र संपवू. भावे लिहितात कीं "सगनभाऊच्या लावण्या मार्मिक व भेदक आहेत व काही शृंगारिकहि आहेत." पण आज उपलब्ध असलेल्या सगनभाऊच्या संग्रहात अशा भेदिक म्हणजे परमार्थपर लावण्या २।३ सुद्धां सापडत नाहीत. उलट सर्व शृंगारिकच आहेत. त्याची आजतागायत प्रसिद्धी आहे ती शृंगारिक कवी म्हणूनच. शालिग्रामानीही तशीच साक्ष दिली आहे. ते म्हणतात "अज्ञजनात सगनभाऊच्या किंवा त्याहूनहि शृंगाररसाने थबथबलेल्या अशा लावण्या म्हणण्याचा परिपाठ आहे व थोर व गंभीर मनाचे पुरुष त्यांचा धिःकारच करतात." भावे अनेक वेळा अशी बेजबाबदार विधाने दडपून देतात.

## प्रभाकर

पेशवाईतला खराखुरा शाहीरतुरा म्हणजे प्रभाकर. काव्य व इतिहास या दोन्ही दृष्टींनी मराठी शाहिरांत प्रभाकर केवळ अद्वितीय आहे. परंतु त्याच्या चरित्रासंबंधीं फारशी विश्वसनीय माहिती मिळत नाहीं ही खरोखर मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय. याच्या चरित्राची दोनच साधनें उपलब्ध आहेत.

१. त्याच्या लावण्यापोवाडयांच्या संग्रहाला जोडलेले लहानसे चरित्र व

२. खुद्द त्याची कविता.

त्याच्या संग्रहाला जोडलेल्या चरित्रांतील माहिती खुद्द प्रभाकराच्या धाकट्या मुलीने सांगितलेली आहे. परंतु प्रत्यंतरपुराव्याने ती विश्वसनीय मानणे धोक्याचे दिसते. कारण एक तर प्रभाकरासंबंधींची माहिती ज्यावेळी या यमुनाबाईसाहेब पटवर्धनानी सांगितली त्यावेळी त्यांचे वय ९० वर्षांचे असल्याचे संपादकानी नमूद करून ठेविले आहे. त्यातूनहि त्या पडल्या बाईमाणूस. विस्मृतिप्रभावामुळे म्हाताऱ्याची साक्ष मानू नये असे म्हणतात ते कसे खरे ठरते ते या बाईनी सांगितलेल्या माहितीवरून स्पष्ट दिसते. संपादकानी मुख्यतः याच बाईच्या हकीकतीवर भरंवसा ठेवला आहे. त्यानी खुद्द प्रभाकराच्या कवितेतून मिळणारी माहिती लक्षातहि

घेतलेली नाही. यामुळे त्यानी दिलेले प्रभाकराचे चरित्र विश्वसनीय मानवत नाही. एक दोन उदाहरणानी हे विधान स्पष्ट करतो.

चरित्रकार प्रभाकराचा जन्म गंगापूर येथे शके १६९१ म्हणजे इ. स. १७६९ साली झाला असे सांगतात. परंतु ही माहिती बरोबर दिसत नाहीं. याला प्रमाण म्हणून प्रभाकरी लावण्या पोवाड्यांच्या संग्रहांतील लावण्या न. २१, २२, २३, २४ वाचकांनीं पहाव्या या चारहि लावण्यांतील विषय थोरले माधवरावसाहेब यानी १७७० च्या आगेमागे केलेल्या हैदरावरील मोहिमांस अनुलक्षून आहे. लावणी नं २१मध्ये कोणी स्त्री आपल्या शिलेदार असलेल्या नवऱ्याला स्वारीत सामील होण्यापासून परावृत्त करीत आहे. ही स्वारी कर्नाटकची आहे. नवऱ्याला परावृत्त करतांना ती स्त्री म्हणते "मुळीं मुलुख कर्नाटक । निर्दयी लोक कंटक ॥ विश्वासघातकी ठक । बिकट झाडी चहूकडून । बाऱ्या कठिण निर्जल भूमि ॥" लावणीतील नायिका नवऱ्याला परावृत्त करीत आहे तो काळ श्रावण झडीचा आहे. कारण ती म्हणते "नका जाऊ दूर देशा घरी काय धनद्रव्याला कमी । आली हो वर्षाची नागपंचमी ॥ धृ० ॥ झिरमिर झिरमिर पर्जन्य वरसे भर महिना श्रावण । कठिण लष्करची हवा दारुण ॥ महोत्सव नगरात मिळाले देशावरिल ब्राह्मण ॥ पाहू सुखसोहाळा दोघेजण ॥" इसवी सन १७७० साली हैदरअल्लीवरची तिसरी स्वारी करण्याची तयारी झाली. (ऐतिहासिक लेखसंग्रह पत्र नं. १००३ पहा) त्यांत लावणीतील नायिकेने सांगितलेली हकिकतच दिलेली आहे. "श्रावण मासाचा समारंभ झालेनंतर मग हिशेब पाहणेचा डौल. यंदा श्रीमंतांचे वाड्यात दशग्रंथी ब्राह्मण ४०० व पंडीत वर्षाप्रमाणे......दक्षणाहि बरोच होत्ये... खासा श्रीमंत भाद्रपद शु॥सप्तमीस डेरे दाखल होणार ऐशी बोलवा आहे."

वरील प्रत्यंतर पुराव्याने ही लावणी इ. स. १७७० साली भाद्रपदाच्या आधी रचली गेली हे निःसंशय आहे. ही लावणी गंगू हैबतीने केलेली आहे. लावणीचा शेवट असा आहे "करी गंगु हैबती कवन हो । गवसून सारखी गवन टेवी कडोविकडीची ठिवण हो । अक्षरी मोत्याची ववण । लय लाउन करिती श्रवण हो । जणुं मिष्टान्नाचे जेवण । (चाल) महादेव कवीश्वर म्हणे । विद्येचे माहेर पुणे । काय गुणिराजाला उणे । (चाल)

पदरचना नित प्रभाकराची सभेस गाइन मी ॥ " लावणीच्या या तुकांत " करी गंगु हैबती कवन " असे स्पष्ट म्हटले असल्यामुळेच ही लावणी गंगु हैबतीची आहे असे आम्ही म्हणतो. याच तुकांत पुढे " महादेव कवीश्वर म्हणे " किंवा " पदरचना नित प्रभाकराची " असे शब्द आहेत त्यावरून ही लावणी महादु सुताराची किंवा प्रभाकर दाताराची तरी कशा-वरून नाहीं असे कोणास वाटण्याचा दृढ संभव आहे. ते कसेहि असो. ती कोणाचीहि असो. लावणीवरून प्रभाकर सन १७७० त गंगुहैबतीच्या फडांत सामील झालेला होता एवढे निश्चित दिसते. प्रभाकर गंगु हैबती-च्या फडातील एक गाणारा साथीदार होता. म्हणजे अर्थात् कमीत कमी पंधरा वर्षांवर वयाचा असलाच पाहिजे म्हणजे इ. स. १७७०च्या पूर्वी पंधरा वर्षे त्याचा जन्मकाळ नेल्याशिवाय गत्यंतर नाही. वर दिलेल्या तुकांत ' पदरचना नित प्रभाकराची । सभेस गाइन मी ' असे शब्द आहेत. त्या-वरून प्रभाकर या सुमारास कवित्व करू लागला होता असे दिसते. याच तुकांत नित म्हणजे नेहमी असा स्पष्ट शब्द आहे. त्यावरून तर प्रभा-कराचा जन्मकाळ १७५५ च्याहि पूर्वी न्यावा लागेल. चरित्रकाराने प्रभा-कराला वयाच्या पंधरा सोळाव्या वर्षी काव्यरचना करण्याचा छंद लागला असे लिहिले आहे. ते कदाचित् खरेहि असेल. परंतु लावणी नं. २१ मधील अंतःपुराव्यावरून त्याचा जन्मकाळ वर सांगितला तोच धरला पाहिजे.

लावणी नं २२ हिचाहि विषय कर्नाटकच्या स्वारीसंबंधींच आहे. त्यांत स्पष्ट म्हटले आहे 'ठेवून हस्तीवर जरिपटका । निघाले रावसाहेब कटका नको घालु अडकाठि साजणी । कर आमुची सुटका ॥ ही लावणी गंगु हैबतीची आहे. तिचा शेवट असा आहे. " कवन करी गंगू हैबती । झडती नावाच्या नौबती । महादेव गुणी सुगर प्रभाकर सुमित्र रसवन्ते" जातीने कर्नाटकच्या मुलुखगिऱ्या करणारा पेशवा म्हणजे माधवरावच होय. हैदरअल्लीवरील तीन स्वाऱ्यांपैकी कोणत्या तरी एका स्वारीच्या वेळचा या लावणीचा काळ आहे. ह्या लावणीच्या शेवटी गंगु हैबतीने आपल्या रसवंत्या म्हणजे गोड गळ्याने गाणाऱ्या मित्रांत प्रभाक-राची गणना केली आहे. यावरूनहि आम्ही वर सांगितलेला जन्मकाळच खरा दिसत नाही काय ?

लावणी नं २३ त्याच काळची व त्याच मोहीमासंबंधीची आहे. कारण शेवटी निकराने प्रियेचा प्रेमपाश तोडून सैन्यात दाखल झाल्यामुळे कष्टी झालेल्या शिलेदाराच्या प्रियेचे समाधान करताना शाहीर म्हणतो " गंगु हैबती म्हणे जतन कर नवतीची बहरी । फत्ते करुन खावंद त्वरित येतील पुण्यशहरी । महादेव गुणिराज कवीची जरब पडे कर्णी । प्रभाकराचे छंदबाण भेदती अंतःकरणी ॥ " या तुकावरून गंगु-हैबतीची ही लावणी हैदर अल्लीवरील स्वारीचे वेळींच तयार झाली हे उघड दिसते. त्याचप्रमाणे प्रभाकराच्या वयावरहि या तुकाने प्रकाश पडतो.

लावणी नं. २४ ही देखील कर्नाटकच्या मोहीमेसंबंधीच आहे. त्यात तर खुद्द थोरल्या माधवरावाचेच छावणीतील वर्णन आहे. " दिन दुनियेचे मुकुटमणी राव सुचिन्ह मंडित छत्रपती । त्यजुन सौख्य सुख शेज यथाविधि सुरेश्वरापरि तप तपती ।......जा जा हो या हो रायांची भेट घेउनी । कुच करूं आपण मग पंचामृत जेवुनी ॥ " या लावणीच्या शेवटावरूनहि मागे वर्णन केलेला प्रभाकराचा काल निश्चित ठरतो. तो शेवट असा. " करि कवन गंगु हैबती । जीवन ठेवुनि महादेव गुणिराज म्हणे । ही चतुर सुगर कांता पाहिली । प्रभाकरावर मर्जी बहाल दोघांची बहुत जाहाली ॥ "

सारांश वर दिलेल्या चार लावण्यांतील अंतःपुराव्यावरून खालील गोष्टी सिद्ध होतात.

१ गंगु हैबतीचा फड थोरल्या माधवरावाचे कारकीर्दीपासून गाजत होता.

२ स. १७७० च्या सुमारास प्रभाकर त्याच्या फडांत लावणी रचणारा व गाणारा म्हणून सामील झालेला होता. अर्थात् चरित्रकारानी प्रभाकराचा दिलेला जन्मकाळ चूक ठरतो.

चरित्रकार प्रभाकर सन १७९० चे सुमारास गंगापुराहून बाप वारल्यामुळे पुण्यास आल्याचे सांगतात. तेहि चूक दिसते. कारण वरील विवेचनावरून १७९० च्या आधीच प्रभाकर पुण्यास बरीच वर्षे स्थायिक झालेला होता हे स्पष्ट दिसतच आहे. त्याच्या बापासंबंधाने चरित्रकार म्हणतात की तो कारकुनी पेशांत असून गंगापुरास राहात असे. तो कारकुनीपेशात

होता परंतु गंगापुरास राहात नव्हता तर खुद्द पुण्यास पेशव्यांच्या वाड्यात फडांत नोकरीस होता असे आम्हास उपलब्ध झालेल्या सवाई माधवरावाच्या पहिल्या लग्नासंबंधीच्या अनेक कागदपत्रावरून स्पष्ट झाले आहे. हे कागदपत्र म्हणजे या लग्नातल्या बारीक सारीक कामकाजांच्या निरनिराळ्या लोकांकडे नेमून दिलेल्या कामांच्या याद्या होत. यापैकी सोयऱ्याना शिधे वगैरे देण्याच्या कामावर नेमलेल्या कारकुनांच्या दोन चार याद्यांत जनार्दन प्रभाकर असे नाव आलेले आहे. त्या याद्यापैकी एक याद मुद्दाम खाली देतो.

श्री ॥

तेरीज हजेरी कारकून सिलेदार सिधे पोहोचावयाकडे आहेत. मुरु सलास समानीन

| छ. २४ रो | छ. २५ रो | छ. २६ रो | छ. २७ रो | छ. २८ रो | छ. रो २९ | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | मल्हार मोरेश्वर |
| १ | १ | | | | | अमृत सिवराम |
| | | | | | | त्रिंबक शामराज |
| | | | | | | अमृतराव लक्ष्मण |
| १ | १ | | | | | चिमाजी बापुजी |
| | | | | | | जिवाजी रघुनाथ |
| | | | | | | भिकाजी त्रिंबक |
| | | | | | | गोपाल चिमणाजी |
| | | | | | | सदासीव आणाजी |
| | | | | | | गोपाल अमृत देव |
| १ | १ | | | | | बापुजी गोविंद तडवळेकर |
| | | | | | | मोरो गोविंद तिखे |
| १ | १ | | | | | बाबजी निंबजी |
| १ | १ | | | | | श्रीनिवास त्रिंबक |
| | | | | | | मल्हार चिंतामण |
| | | | | | | धोंडोशंकर |
| | | | | | | **जनार्दन प्रभाकर** |

वरील अस्सल कागदपत्रावरून जनार्दन प्रभाकर म्हणजे प्रभाकराचा बापच असावा असे दृढ अनुमान काढावयास हरकत नाही. प्रभाकराने पेशव्यांच्या कुटुंबासंबंधाने किंवा त्यांच्या हालचालीसंबंधाने जी अतिशय सूक्ष्म तपशीलवार व मुद्देसूद माहिती आपल्या पोवाडे लावण्यातून दिलेली आढळते त्याचे बीजहि त्याचा बाप खुद्द पेशव्यांच्या वाड्यातील फडात नेहमी काम करणारा एक कारकून शिलेदार होता या वस्तुस्थितींतच सांपडणार आहे. असो. वर दिलेल्या अस्सल पत्रावरून प्रभाकर शाहीराचा बाप १७८३ च्या पूर्वी पुण्यात स्थायिक झाला होता असे निश्चित म्हणता येते.

सारांश चरित्रकारानी दिलेले प्रभाकराचे चरित्र बरेच अविश्वसनीय दिसते. आता ही गोष्ट खरी आहे की यमुनाबाईनी सांगितलेली हकीकत स्थलकाळदृष्ट्या विपर्यस्त असली तरी त्यातल्या सगळ्याच गोष्टी चूक नसतील, हे आम्हासहि कबूल आहे. आणि म्हणूनच पोवाडयांतील अंत:पुरावा, खुद्द यमुना बाईसाहेबानी सांगितलेली हकीकत यांचा ताळमेळ पाहून व त्यांचा समन्वय करून प्रभाकराच्या चरित्राची रूपरेखा काढतो.

प्रभाकराचे सबंध नांव प्रभाकर जनार्दन दातार चित्पावन कोकणस्थ ब्राह्मण. मूळ गाव कोकणात रत्नागिरी जिल्ह्यांतील मुरूड. प्रभाकराचे वडील जनार्दनपंत हे प्रथम कोकणातून देशावर आले व नाशिकाजवळ गंगापुरी राहिले नंतर काही दिवसानी ते पुण्यास गेले व पेशवे सरकारच्या फडांत कारकून म्हणून लागले. सन १७८३ नंतर ते वारले. जनार्दनपंताना एकंदर तीन मुलगे झाले. त्यातला थोरला प्रभाकर. बाकीच्या दोघांची नांवे उपलब्ध नाहीत. चरित्रकार प्रभाकर मधला मुलगा असे सांगतात. परंतु आजोबाचे नांव जेष्ठ नातवास ठेवण्याची तेव्हाची रूढ पद्धत लक्षात घेता प्रभाकरच जेष्ठ चिरंजीव असावा असे उघड दिसते. प्रभाकराच्या या दोन धाकट्या भावापैकी एक अल्पवयात म्हणजे पहिल्या विशीतच वारला आणि दुसरा कोठे घरातून कायमचा नापत्ता झाला.

प्रभाकराचा जन्म सन १७५३।५४ च्या सुमारास झाला. वयाच्या पंधरा सोळा वर्षापासूनच याची कवित्वशक्ति अंकुरित होऊ लागली. या वेळी गंगु हैबतीचा शाहीरीफड पुण्यात फार गाजत होता. त्या फडातील

गंगु हैबती महादबा सुतार गुणिराज गंगाधर वगैरे गुणी लोकाची व प्रभाकराची ओळख पडली व नंतर लौकरच तो त्यांच्या फडात सामील झाला. गंगु हैबतीचा फड फारच नावाजलेला होता. स्वतः गंगु हैबती हा उत्कृष्ट कवी होता. महादबा गुणिराज गंगाधर प्रभाकर वगैरे त्याच्या फडातील कवी व गायक त्याला गुरुस्थानी मानीत. 'गंगू हैबती भले शाहिर वरदी रे' 'गंगू हैबती पुण्याचे फंदी महादेव गुणीराज गुरूचे त्रिकाळ पद वंदी' 'पुणे शहर दक्षणेमधि बादशाही तक्त। वस्ताद गंगू हैबती तेथिल रहिवाशी' 'महाशूर गंगूहैबती विख्यात ज्याचे नाव' 'गंगू हैबतीचा आहे लौकिक जगभर गाण्याचा' वगैरे अनेक शब्दानी त्यानी आपला आदरभाव प्रकट केला आहे. या फडात सामील झाल्यानंतर प्रभाकराने लगेच आपली छाप पाडावयास सुरुवात केली आणि थोडयाच दिवसात लावणी प्रभाकराने मात्र करावी आणि बाकीच्यानी म्हणावी येथपर्यंत स्थिति आणून ठेवली. सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत रंगाचा मोठा समारंभ झाला. त्यावर प्रभाकराने पोवाडा रचला. तो पोवाडा खुद्द पेशव्यानी दरबारात गाववून घेतला असे त्या पोवाडयाचा शेवटच सांगतो. सवाई माधवरावाच्या कारकीर्दीतील दुसरे दोन महत्वाचे प्रसंग म्हटले म्हणजे एक खर्ड्याची लढाई व दुसरा सवाई माधवरावाचा मृत्यु. या दोन्हीही प्रसंगावर प्रभाकराचे पोवाडे असून ते अत्युत्कृष्ट आहेत. सवाई माधवरावाच्या मृत्यूच्या पोवाडयाच्या शेवटी प्रभाकर म्हणतो "महादेव गुणिराज श्रुत गादीचे नवे नूतन नव्हती शाईर जदीद वादिचे" यावरून प्रभाकरी फडाला पेशव्यांचा आधार होता असे दिसते.

सवाईमाधवरावाचे मृत्यूनंतर बाजीरावीत तर प्रभाकराचा फारच बोलबाला झाला. बाजीरावाची प्रभाकरावर अगदी बहाल मर्जी बसून गेली. हे कृतोपकार प्रभाकरानेंही सव्याज फेडले. खुद्द बाजीरावाच्या विलास वर्णनपर ३५–३६ लावण्या त्यानें रचल्या. त्याचप्रमाणें दोन तीन पोवाडेही रचले.

चरित्रकार प्रभाकर रास्त्यांच्या कारकुनी फडात नोकरीस होता व त्याचे उत्तर वयांत रास्ते याजकडून त्याला वार्षिक ८० रुपयाचे वर्षासन होते असे म्हणतात.

अठराशे अठरानंतर प्रभाकराची अगदी दारिद्र पीडित अवस्था झाली व ज्याने स्वराज्यांत कीर्ती व पैसा जोडला त्यालाच पोटाकरता दारोदार भटकण्याची पाळी आली. १८४३ साली तो मरण पावला. त्याची औरस संतती हयात नाही.

रामजोशी, होनाजी बाळ, अनंतफंदी, सगनभाऊ आणि परशराम हे पाची शाहीर आपापल्या परीने श्रेष्ठ आहेत परंतु प्रभाकराची तुलना करण्याला यापैकी एकही शाहीर टिकाव धरू शकणार नाही. रामजोशी हा व्युत्पन्न व संस्कृत भाषेशी चांगला परिचित आहे. परंतु तो प्रभाकराप्रमाणे भाषाप्रभु नसून नुसता शब्दप्रभु आहे. एकाद्याला शब्दकोश पाठ असला तरी त्याला रसिकांचा हृदयकोश उमलवून दाखविता येणार नाही. ते साधावयाला शब्दांचे अर्थानुकारित्व औचित्य समजावे लागते. रामजोशाजवळ त्याचा सर्वस्वी अभाव आहे. त्याच त्याच अक्षरानी भरलेल्या बाराखड्याप्रमाणे त्याच्या अनुप्रासमय ओळी वाटतात. मटमट, चटचट, फटफट असली आचरट खटपटच त्याच्या काव्यांत दिसून येते. आणि हाच त्याचा विशेष. होनाजीबाळात प्रसाद आहे पण प्रतिभा नाही. विषयवैचित्र्य आहे पण वर्णनाचा विलास नाही. त्याच्या काव्यात भावना आहे पण ती व्यक्तपणाने वठवण्या इतपत भाषाप्रभुत्व नाही. अनंतफंदी आणि सगनभाऊ यांचा उल्लेखहि केला नाही तरी चालण्यासारखे आहे. येऊन जाऊन परशराम तेवढा प्रभाकराशी थोडासा टिकाव धरू शकेल. प्रभाकराचे पुष्कळसे गुण त्याचे कवितेत आढळतात. त्याची प्रतिभा उज्वल आहे, त्याची वर्णनशैली अचुक आहे, भाषा जोरदार आहे, विषयवैचित्र्य भरपूर आहे. या गुणात तो प्रभाकराची थोडी फार बरोबरी सुद्धा करू शकेल. परंतु रसांचा गाढपणा आणि भाषेचे प्रौढ नाजुक प्रसादपूर्ण परंतु तितकेच ललित स्वरूप हे जे प्रभाकराचे विशेष गुण त्याचा मात्र परशरामात अभाव आहे. त्याची भाषा ठोसर आहे व रसाविर्भाव प्रभावी नाही.

रामजोशी, होनाजीबाळ वगैरे प्रत्येक शाहीरानें आत्मस्तुति मुक्तकंठानें गाइली आहे. परंतु ती त्यांना शोभत नाहीं. उलट प्रभाकरानें मात्र जी स्वतःची प्रौढी ठिकठिकाणीं सांगितली आहे ती त्याच्या अतुलनीय सरस कवित्वामुळें अगदीं यथार्थ वाटते. त्यानें स्वतःच्या तोंडानें आपले जे गुण

म्हणून सांगितले आहेत अगदी तेच कोणीहि रसिक टीकाकार प्रभाकराचे विशेष गुण म्हणून सांगेल. "किति प्रभाकराचें कवन मधुर दिलदारी। भरी अर्थ यमक अंत्यामधि रंग करारी" "प्रभाकराचें कवन प्रतिष्ठित सभेंत गायाला।" "प्रभाकर गातसे सदा दिलखुलासी" "प्रभाकराची जडण अमोलिक जसा शिरीं शिरपेंच तुरा" "प्रभाकर कविची कविता अमृता-समान" "प्रभाकराची जडण घडण खडखडित म्हणायाला" "काय प्रभाकराची वाणी। शुद्ध आधी वाणी। अर्थ खुब छाणी। करा कुणि पाहाणी। सरळ कडी गुंफली" इत्यादि उक्तींत प्रभाकरानें स्वतःचे जे गुण सांगितले ते अगदी खरेखुरे आहेत. "इतर कवीश्वर केवळ गोटे। अर्थप्रास लावितात खोटे। पगड्या फिरवुन डौल मिरविती" असा, किंवा "अरे कवीश्वराच्या मुला। काव्य करण्यांत गम्य नाहीं तुला" असा जेव्हां प्रभाकर इतरांचा आधिक्षेप करतो तेव्हां तो पोकळ आहे असें कधींच वाचकास वाटत नाहीं. कारण प्रभाकराच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे "प्रभाकराचें कवन मुलाखुन सरस्वतीनें पाठविलें."

---

# ऐतिहासिक पोवाडे
## किंवा
# मराठ्यांचा काव्यमय इतिहास

## छत्रपति शिवाजीमहाराजांचा पोवाडा
### [ अफजलखान–वध ]

पोवाड्यांच्या एकंदर संख्येच्या मानाने पाहिले असतां खुद्द शिवचरित्रासंबंधी दोनच पोवाडे प्रसिद्ध आहेत. संख्येनेच मोजले तर तीन म्हणावे लागतील. पहिला शाळिग्राम ह्यांच्या १८७९ साली छापलेल्या पहिल्या आवृत्तींत आलेला मूळ पोवाडा; दुसरा त्याच्याच पुढच्या आवृत्तींत छापलेला व तिसरा 'कोल्हापूरचे पोवाडे' या पुस्तकांत छापलेला. यांपैकी कोल्हापूर आवृत्तींतील पोवाडा नं. २ चीच नक्कल आहे. क्वचित् पाठभेद आहेत. कांहीं नांवे कमी आहेत तर उलट एखादा चौक स्वतंत्रच आला आहे. पण सामान्यतः ते एकच आहेत.

कै० रा० भावे यांनी विश्ववृत्तांत आपल्या 'शिवाजीमहाराजांचा पोवाडा' ह्या परिश्रमपूर्वक लिहिलेल्या निबंधांत नंबर एकचा पोवाडाच पुढें शाहिरानें वाढविला असें दाखवून दिले आहे. ते म्हणतातः " दोन म्हणण्यापेक्षां लहान पोवाडा सुधारून जास्त वाढवून मागाहून मोठा केलेला आहे असें म्हणणें बरें, हें चाणाक्ष वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल. जरी दोघांचा मतलब बहुतेक एकच आहे, तरी दोघांची सुरवात सारखी नाहीं; दोघांचा शेवटहि सारखा नाहीं. पहिल्या पोवाड्यांतील तत्कालीन कवित्वदर्शक 'भावू', 'महादेवू', 'जीवू', 'गवू' वगैरे जुनीं रूपें दुसऱ्यांत मुळींच बगळलेलीं

आहेत. पहिल्यांत ११ चौक आहेत; पण दुसऱ्यांत ३७ आहेत. सारांश, शाळिग्राम म्हणतात त्याप्रमाणें हे दोन्ही पोवाडे एकाच्याच प्रति आहेत असें मात्र आम्हांस म्हणतां येत नाहीं. लहान पोवाड्यांतील भाषापद्धती-वरून आणि आपल्या मुलाला विजय मिळाला तेव्हां त्या प्रसंगाला अनुरूप असा आनंदप्रदर्शक पोवाडा करण्यास घाईनें 'बाईनें ( जिजाबाईनें ) शाहीर बोलाविले' आणि अज्ञानदासानेंहि पण तडाक्यानें त्या प्रसंगाचा 'कडाका गाइला'. ह्यावरून हा लहान पोवाडा प्रथम करविला असावा व मागाहून फुरसत सांपडल्यानंतर लांबलचक, तपशीलवार, विशेष माहितीनें भरलेला असा पोवाडा त्यानें सुधारून बनविला असावा हें जास्त सयुक्तिक आणि संभवनीय वाटतें." ( भावे, शि. म. पो. पा. ८१५)

प्रस्तुत पोवाडा खुद्द शिवकालीनच असावा हें दोन तीन प्रमाणांवरून ठरवितां येतें:

१. शेवटच्या चौकांत शाहीरच आपल्या तोंडानें सांगतो "आपल्या मतें अज्ञानदासानें । वीरमाल राज्याचा गाइला । शिवाजी सरजानें इनाम घोडा बक्षिस दिला । शेरभर सोन्याचा तोडा हातांत घातला ।" नुसत्या येवढ्या उल्लेखावरून तो तत्कालीनच असला पाहिजे हें म्हणणें एखादे वेळी घोक्याचें ठरण्याचा संभव आहे. कारण असा विचित्र प्रकार 'कोल्हापूरचे पोवाडे' या पुस्तकांत छापलेल्या तानाजी मालुसऱ्याच्या पोवाड्यांत घडला आहे. त्यांत स्वतः तानाजी मालुसऱ्यानेंच पोवाडा करविला असें शाहीर सांगतो व मी यत्किंचित्‌हि चुकलो नाहीं अशी प्रौढीहि तो मिरवितो. त्या पोवाड्यांतील तानाजीनें पन्हाळा जिंकला, उदयभानूचे ऐवजीं एक दुसराच मुसलमान बादशहा मारिला व मग स्वतः जिजाबाईची भेट घेण्यास तो आला आहे !!!

२. पण जेधेशकावलीत व जेध्यांच्या करीन्यांत या अंतर्गत पुराव्याला उपोद्बलक असे दोन उल्लेख उपलब्ध आहेत. जेधेशकावलीत अफजल-खानाच्या वधाची माहिती इतर माहितीहून थोडी अधिक विस्तृत देऊन शेवटीं अशी नोंद केली आहे. 'पवाडा केला. त्यामध्यें आहे कीं हानुमंत अंगद रघुनाथाला जेधे बादल शिवाजीला' ( जेधे शकावली, पा. ५) हा उल्लेख पोवाड्यांतील 'सिलीमकर खोपड्या, काकड्या, सुरव्या, लोटला ॥

अंगद हनुमंत रघुनाथाला । पायचे पायदळ शिवाजी राजाला ।' ह्या ओळीशीं जुळतो. जेधे यांच्या करीन्यांत खानाच्या वधाची हकीकत दिल्यानंतर खालील उल्लेख आहे. "फत्ते जालियावरी शाहिरांनीं पवाडा केला त्यांत हनुमंत अंगद रघुनाथाला। जेधे बादल राजश्री शिवाजी राज्याला व वरकडहि देशमुखांचीं नांवे घालून पवाडा दरबारीं गाइला. राजश्री स्वामींनी येकोन खुशाल जाले शाहीरास सिरपाव बक्षीस दिल्हे."

३. पोवाड्यांत एके ठिकाणीं 'राजा नवगजींत बसला' असं वर्णन आहे. नवगजी हा शब्द फक्त राजव्यवहारकोशांतच सांपडतो. त्यानतर आतांपर्यंतच्या कोणत्याहि कोशांत सांपडत नाही. राजव्यवहारकोशापूर्वीच्या राधामाधव-विलास चंपूंतहि हा शब्द पान २३५ वर आलेला आहे. नवगजीचा अर्थ कचेरी, सदर, राजमंडप किंवा सभामंडप असा आहे. हा शब्द शिवकालानंतर पुढें केव्हांहि प्रचारांत रूढ दिसत नाहीं. नवगजी-ऐवजीं सदर, कचेरी, सभा किंवा असा कांहीतरी तदर्थक शब्द उपयोगांत असलेला आढळतो.

४. पण ह्या सर्वांहूनहि बलवत्तर असे प्रमाण हे होय कीं, शिवभारतांतील माहिती व पोवाड्यांतील माहिती फारच मिळती आहे. शिवभारत हे परमानंद कवीनें खुद्द शिवाजीचे सांगण्यावरून लिहिले असल्यामुळे अगदीं तत्कालीन म्हणून सर्वच दृष्टींनी तो पहिल्या प्रतीचा पुरावा ठरतो. त्यांतील हकीकत मुद्दाम ह्या पोवाड्याशीं ताडून पाहण्याकरितां निराळी दिली आहे.

## शिवभारतांतील हकीगत

शिवाजीनें जावळी घेतली; अहमदनगरादि शहरांना कडक शिक्षा केली, दंडाराजापुरी लुटली; सिंहगड, लोहगड, पुरंदरगड, चाकण, नीरा आणि भीमा यांच्यामधला प्रदेश हिसकावून घेतला. कल्याण भिवंडी मारली. असा मोठा प्रळय त्यानें उसळून दिला. तेव्हां विजापूरच्या अल्लीशहानें आपला सेनापति अफझलखान यास शिवाजीला जिवंत पकडून आणण्याकरितां पाठविण्याचें ठरविलें.

अफझलखानानें पैजेचा विडा उचलला. तेव्हां बादशहानें खूप होऊन आपली स्वतःची रत्नजडित कट्यार त्यास अर्पण केली. अनेक युद्धकुशल

सरदार त्याच्या मदतीस दिले व कोट्यवधि खजिना बरोबर दिला. रत्न-खचित खोगीरें असलेले उंट व घोडे, अलंकारानें सजविलेले भद्र जातीचे हत्ती, नाना प्रकारचीं चिलखतें, शिरस्त्राणे, शस्त्रें, वस्त्रें, स्वतःचीं बिरुदें, पालख्या, शिरोभूषणें किती म्हणून सांगावीं ?

अंबरखान, याकुदखान, मुसेखान, हसन पठाण, रणदुल्लाखान, अंकुशखान, गुलामबर्बर हिलाल हे मुसलमान सरदार व घोरपडे, पांढरे नाईक, खराटे नाईक, कल्याण यादव (जाधव), शिवाजीचा चुलता मंबाजी भोसले, घाटगे, काटे व आणखी दुसरे अनेक मराठे सरदार बरोबर दिले.

मुहूर्तावर अफजलखान विजापूरच्या बाहेर पडला; परंतु त्यास अपशकुन झाले. विजापुराबाहेर अर्ध्या योजनावर त्याने आपला तळ दिला व नंतर खान कूच करून तेथून तुळजापूरमार्गें वांईस गेला. वाटेत तुळजापूरच्या भवानीचा त्यानें मोठा अपमान केला.

या वेळीं शिवाजी पुणे प्रांतीं होता. असे असतां खान वांईस जाण्याचें कारण असें कीं, चंद्रराव मोऱ्याच्या कत्तलींत वांचलेला त्याचा भाऊ प्रतापराव यानें विजापूर दरबारीं नोकरी धरून आपलें राज्य परत मिळण्याच्या अटीवर भेद सांगून खानास वांईस आणलें. 'ज्याच्या ताब्यांत जावळी आहे त्याच्या ताब्यांत वांईप्रांत पूर्ण आहे. त्याचप्रमाणे सह्याद्रि व समुद्रकिनाराहि आहे' असें अफजलखानास वाटलें.

अफजलखानाची वार्ता कळतांच शिवाजीनें पुणे प्रांताचा उत्तम बंदोबस्त केला व तो स्वतः पायदळासह जावळीस आला व तेथें ठाणें देऊन बसला.

कपटी खानानें शिवाजीस बळकावलेला सर्व मुलूख सोडून देऊन शरण येण्याबद्दल निरोप पाठविला व कौलाला यावें असें बोलणें लाविलें.

हेरांकडून सर्व बारीक माहिती आणवून शिवाजीनें खानाकडे उलट वकील पाठविला व त्यास कळविलें कीं, मी सर्व किल्ले व जावळी सोडून देईन व आनंदानें हातांतील कट्यार आपल्यापुढें ठेवीन.

या निरोपानें खान हुरळून गेला; व शिवाजीच्या बोलावण्याप्रमाणें जावळीस त्याची भेट घेण्याकरितां तेथें जाण्यास तो तयार झाला. बरोबरच्या सरदारांनीं त्याचें निवारण करण्याचा प्रयत्न केला, पण तें त्यानें मानलें

नाहीं. भेटींत माझें बोलणें शिवाजीनें कबूल केलें नाहीं तर मी देवता भ्रष्ट करीन व आपली प्रतिज्ञा पार पाडीन अशी बडबड त्यानें चालविली.

इकडे शिवाजीनें प्रतापगडावर आपल्या सेनापतींबरोबर बसून मनसुबा केला. ठिकठिकाणीं सैन्य झाडींत दडवून ठेविलें, सर्व व्यवस्था केली व स्वतः करार करूनसुद्धां जर अफझलखानानें संधि केला नाहीं तर दुंदुभी-च्या इशाऱ्याबरोबर जावळींत खान बुडविण्याचा हुकूम देऊन ठेविला.

खानाचें सैन्य अत्यंत कष्टानें हत्तीघोड्यांसहित घाट चढलें. त्यांत शेकडों लोक व जनावरें मेलीं. बांबूंच्या बेटांतून व झाडींतून वाट काढीत असतां त्याच्या सैन्याचीं निशाणें व छत्रें फाटून गेलीं. याप्रमाणें रडतोंडीचा घाट चढून खालीं पाताळांतच जणुं काय वसलेल्या जावळींत ती सेना उतरली.

तेथें शिवाजी व खान यांनीं आपापले वकील कुशल विचारण्याकरितां एकमेकांकडे पाठविले.

भेटीची व्यवस्था अशी ठरलीः एकट्या अफजलखानानें स्वतः सशस्त्र पालखींतून सदरेस यावें. दोनतीनच सेवक बरोबर असावेत. मग इकडून शिवाजीनेंहि सशस्त्र येऊन गौरवानें यथाविधि भेट घ्यावी. प्रत्येकानें आपापल्याबरोबर एकनिष्ठ असे दहा दहा मर्दानें आणून बाणाच्या खाचेवर दूर उभे करावे.

ठरल्या वेळीं उपाध्यायानें सांगितलेले सर्व विधि उरकून, देव-ब्राह्मणांस वगैरे नमस्कार करून शिवाजी चालला. त्यानें अंगांत चिलखत घालून वर केशरी शिडकाव मारलेला अंगरखा घातला होता व पांढऱ्या पागोट्यास तुरा लावला होता. त्याच्या एका हातांत तरवार व दुसऱ्या हातांत पट्टा होता.

शिवाजी समोर येतांच अधिक विश्वास दाखविण्याकरितां खानानें आपली तरवार आपल्या जवळच्या सेवकाजवळ दिली व खोटा स्नेह दाखवून आढ्यतेनें म्हणाला कीं, "तूं कोणच्याच मुसलमान पादशहाशीं इमान राखीत नाहींस. मी तुझें शीर विजापूरच्या बादशहापुढें नमवीन आणि मग तुला मोठें वैभव मिळवून देईन." असें भाषण करून त्यानें शिवाजीस आपणच आलिंगन दिलें व डाव्या हातानें त्याची मान दाबून उजव्या हातानें त्याच्या कुशींत कट्यार खुपसली. शिवाजीनें अंग चोरलें, मोठ्या शिताफीनें वार चुकविला व 'मला धर' असें म्हणत आपली तरवार

पाठीपर्यंत त्याच्या पोटांत खुपसली. खानाचीं आंतडींच बाहेर आलीं. रक्ताचीं कारंजीं फुटलीं व आपल्या हातानें पोट दाबीत त्यानें ओरड केली; तोंच मधांशीं ज्या ब्राह्मणाजवळ त्यानें आपली तरवार दिली होती तोच शिवाजीवर चाल करून आला. शिवाजीनें त्याचे वार अडविले. पण ब्राह्मण म्हणून त्यास मारले नाहीं. नंतर त्यानें आपल्या पट्ट्यानें खानाचें डोकें कापलें.

घन्यास मारल्याचें कळतांच अबदुल सय्यद, बडा सय्यद, (सैद बडा), खानाचा पुतण्या रहिमखान, पिलाजी व शंकराजी मोहिते असे शिवाजीवर चालून आले. पण शिवाजीनें पट्टा फिरवीत आपल्या भोंवतीं तटच केला. इतक्यांत शिवाजीकडील संभाजी कावजी, काताजी इंगले, कोंडाजी व येसाजी कंक, कृष्णाजी गायकवाड, जिवा महाला, विसाजी मुरुंबक, संभाजी करवर व इभ्राहिम शिद्दी बर्बर हे धावून आले.

सैद बंड्याचा वार शिवाजीनें अडवून त्याचे तुकडे केले. अशा रीतीनें शके १५८१ विकारीनाम संवत्सरीं मार्गशीर्ष मासीं शुक्लपक्षीं सप्तमी गुरुवारीं भर दुपारीं देवद्वेष्ट्या अफजलखानास शिवाजीनें ठार मारलें.

इकडे दुंदुभीचा इशारा गडावर होतांच कमळोजी सोळंखे, येसाजी कंक, तानाजी मालुसरे, कोंडाजी वरखल, रामजी पांगारकर व पंच हजारी नारो ब्राह्मण हे आपापल्या जमावानिशीं बाहेर पडले व त्यांनीं शत्रूची लांडगेतोड केली. " शिवाजीच्या पायदळरूपी मेघांतून शेकडों तरवारींच्या विजा पडल्या."

मुसेखान, याकुतखान, अंकुशखान, अफजलखानाचा वडील मुलगा फाझलखान हे पळून गेले. मंबाजी भोसला ठार झाला. रणदुल्लाखान, अंबरखानाचा मुलगा, राजाजी घाडगे, अफजलखानाचे धाकटे दोन मुलगे दस्त ( कैद ) केले गेले. त्यांना हात बांधून शिवाजीपुढें सैनिकांनीं हांकून आणलें. अशा रीतीनें जयवल्लीनें ( जावळीनें ) आपलें नांव सार्थ केलें.

# अफजलखान-वध

१

## [ शाहीर-अज्ञानदास ]

माझें नमन आधीं गणा। सकळिक ऐका चित्त देऊन॥ नमियेली सारज्या। त्याली जडिताचें भूषण॥ अज्ञानदासाचें वचन। नमिला सद्गुरु नारायण॥ सद्गुरुच्या प्रसादें। संपूर्ण अंबेचें वरदान॥ *गाइन वजिराचें भांडण। भोंसल्या सरजा दलभंजन-॥ फौजेवर लोटतां। यशवंत खंडेश्वरी प्रसन्न॥ अज्ञानदास बोले वचन। गाइन राजाचें भांडण॥ देश इलाइत। काबिज केलें तळकोंकण॥ १

गड मी राजाचे गाइन। कोहज माहुली भर्जन॥ पारगड कर्नाळा। प्रबळगड आहे संगिन। मस्त तळा आणि घोसाळा। रोहरी आनसवाडी

**गण**-गणपति किंवा पोवाडा लावणी म्हणावयाचेपूर्वी गोंधळी गण म्हणतात तो. **सारज्या**-शारदा. **जडिताचें भूषण**-जडावाचे अलंकार. **वजिराचें भांडण**-अफजलखान नामक सरदाराशीं झालेला द्वंद्वप्रसंग. **वजीर**-सरदार. **भोसल्या**-भोंसला. **सरजा**-सिंह. **दलभंजन**-दलविध्वंस करणारा. **इलाइत**-विलायत, स्वदेश, मुलूख. " विलायतिर्जनपदो " राज्यको १

**कोहज**-डों. ठाणें, वाड्याच्या प. [शिसो ८५]. [केलु ५५३] **माहुली**-[चित्र १२८] [रु १.९९] [शिसो ८५] डों. ठाणें शहापुरचे वा. चार मैलांवर. **भर्जन**-मर्दनगड का भर्जनगड का गर्जनगड ? मर्दनगड [रु १.९८] गर्जनगड [केलु ५५२] हा किल्ला वेलूरप्रांतीं होता. **पारगड**-[सभा ८४] डों. बेळगांवच्या प. तीस. चांदगडाजवळ सह्याद्रीवर [शिसो ७८]. **कर्नाळा**-हा किल्ला पनवेलच्या दक्षिणेस आठ मैलांवर आहे [ किले १]. **प्रबळगड**-[सभा ८५] पनवेलच्या पूर्वेस आठ मैलांवर. **संगीन**-मजबूत. **मस्त**-बळकट. **तळा घोसाळा**-घोसाळगड रोह्याचे दक्षिणेस सहा मैलांवर रेवदंड्याची खाडी व साळव्याची खाडी यांच्यामध्यें जो डोंगरी प्रदेश आहे त्यापैकी एका टेकडीवर बांधिला आहे. तळें तळगड डों. कुलाबा, माणगांवचे वा. अकरा मैलांवर [शिसो ७४]. **रोहरी**-रोहिडा (?). **आनसवाडी** (?)

दोन ॥ कोरला कासागड मंडन । दर्यात दिसताती दोन ॥ गड बिरवाडी पांचकोन । सुरगड अवचितगड भूषण ॥ कुबल गड भीरिका कुर्डुगडाचें चांगुलपण ॥ धोडप तळकोंकणचे किल्ले, घाटावरले गड गाइन ॥ २

गड आहे रोहिडा । जावली प्रतापगड मंडन ॥ मकरंदगड वासोट । सिंहगड वृंदावन ॥ पुरंधराचे चांगुलपण । उंची झुलवा देत गगन ॥ सोन्याची सुवेळा आहे राजगड संगिन ॥ कोंडाण्यापासून तोरणा वर्ता । कोर गेग्विली

**कोरला**–हा किल्ला रेवदंड्याच्या दक्षिणेस १० मैलांवर रेवदंड्याच्या किंवा रोह्याच्या खाडीच्या दक्षिण तीरावर आहे. **कासागड**–[केळु ५५३] **मंडन**–[शिभा ३१, २६] पालीजवळ आहे. **बिरवाडी**–रोह्याच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर रोहें तालुक्यांतून नैर्ऋत्य दिशेनें जी डोंगराची रांग पसरली आहे तिच्या शेवटीं आहे. [किल्ले. १]. **पांचकोन** (?). **सुरगड**–रोह्यापासून आठ मैलांवर [किल्ले.१] [सभा ८]. **अवचितगड**–रोह्यापासून तीन मैलांवर रोहें, अलिबाग व पेण या तालुक्यांमध्यें असलेल्या एका डोंगरावर [किल्ले. १]. **भूषण**–[चित्र १२८] खटाव तालुक्यांत वडूथच्या नैर्ऋत्येस. अकरा मैलांवर **कुबल**–बळकट, भक्कम. **गड भीरिका**–कोंकणांत आहे. **कुर्डूगड**–[सभा ८३] **धोडप**–बागलाण प्रांतांत [ केळु ५५१]. डों. नासिक चांदवडच्या नैर्ऋत्येस १५ [शिसो ७६]. २

**रोहिडा**–[चित्र १२७] रोहिडा ऊर्फ विचित्रगड डों. पुणें. भोरच्या नै. चार [शिसो ८८] **मंडन**–या नांवाची द्विरुक्ति झाली आहे. डों. रत्नागिरी बाणकोटच्या पूर्वेस १२ [शिसो ८३]. **मकरंद-गड**–माल्कम पेटेच्या वायव्येस सात मैलांवर. **वासोट**–[सभा. ८३]. जावली तालुक्यांत तांबी गांवाच्या ईशान्येस पांच मैलांवर; **वृंदावन** (?). **उंची झुलवा देत गगन**––अतिशय उंच असलेला गगनगड घेरी आणतो. ज़ुल ( हिंदी न. पु.-दगा ) गगनगड ऊर्फ बावडा डों. कोल्हापूरच्या नै. ३६ [शिसो ७२]. **सोन्याची सुवेळा**–सुवेळाचळावर सोन्याची लंका बांधिली होती त्या लंकेप्रमाणें बळकट व समृद्ध असलेला राजगड. रायगडाआधीं राजगड हीं राजधानी होती. २ " मुख्य किल्ल्यास राजगड असें नांव देऊन तेथें एक मोठी इमारत उभारिली, व तीन माच्यांस सुवेळा, संजीवनी, पद्मावती अशीं नांवें दिलीं. ह्याप्रमाणें हे चार

घाटमाथा ॥ तुंग आणि तुकोना । विसापुर लोहगड झुलता ॥ गड राहेरी-ची अवस्था । तीन पायऱ्या सोन्याच्या तक्ता ॥ दुसरा प्रतापगड पाहतां । अवघड दिसे घाटमाथा ॥ ३

मस्त हुडे दुर्गांचे खण । माहाल राजाचे गाइन ॥ पुणें भिस्तका दरगा । शेकसल्ला पीर, पाटण ॥ शिरवळ सुपे देस । घेतला ज्यानें इंदापुरापासुन ॥ महाड गोरेगांवापासून । घेतले शिणगारपूर पाटण ॥ असे तुळजेचे परिपूर्ण । सोडविलें चवदा ताल कोंकण ॥ घेतलीं बारा बंदरें । भाग्य राजाचे संगिन ॥ ४

देश दुनया काबिज केली । बारा माउळें घेतलीं ॥ चंद्रराव कैद केला । त्याची गड जाउली घेतली ॥ चेतपाउली काबिज केली । ठाणीं राजाचीं बैसलीं ॥ घेतली जाउली न् माहुली । कल्याण भिवंडी काबिज केली ॥ सोडविलें तळकोंकण । चेउली ठाणीं बैसविलीं ॥ कुबल, बांकी घरें । शिव-

नवेच किल्ले तयार केले" **वर्ता**–वरल्या बाजूस. **कोर रेखिली घाटमाथा**–क्षितिजावर चंद्रकोर निघावी त्याप्रमाणें घाटमाथ्यावर हा किल्ला शोभतो. **गड राहेरीची अवस्था तीन पायऱ्या सोन्याच्या तक्ता**–मूळ पोवाड्यांत कालांतरानें भर पडल्याचें एक उदाहरण. खानाचे वधाचे वेळीं रायगड राजधानी नव्हती. रायगडाच्या तक्ताला तीन सोन्याच्या पायऱ्या आहेत याविषयीं महाडास मुलींच्या व बायकांच्या गाण्यांतही उल्लेख येतो. **दुसरा प्रतापगड पहातां अवघड दिसे घाटमाथा**–प्रतापगडानें घाटमाथा रोखून धरिला आहे असा भावार्थ. ३

**मस्त**–बळकट **हुडा**–बुरूज. **खण**–अंबार, कोठार, तळघर इ०. **महाल**–प्रांत **भिस्तका दरगा**–(?). **देस**–देश. **सिणगारपूर**–शृंगारपूर. **तुळजेचे**-तुळजादेवीचे. **सोडविलें**-ताब्यांत घेतले बळकाविले. **चवदा ताल**–चवदा भाग ? कोंकणाचे चवदा भाग कोणचे (?). **बारा बंदरें**–कुलाबा, रत्नागिरी, विजयदुर्ग, सिधुदुर्ग, खांदेरी–उंदेरी. पद्मदुर्ग, सुवर्णदुर्ग, राजकोट, अंजनवेली, सरजाकोट इ०. ४

**बारा मावळें**–नांवें सा. खं. ४, ७८।७९ पहा. **चेतपाउली**–[केळु ५५२] हा गड बेलूर प्रांतांत आहे. **चेऊल**–चौल. **बांकी**–बळकट. **घरें**–ठाणीं

राजाच्या हाता आली ॥ मुलाना हामाद । फिर्याद बाच्छायाप गेली ॥ बाच्छायजादी क्रोधा आली । जैशी अग्न परजळली ॥ जित धरावा राजाला । कुलवजिरांला खबर दिली ॥ ५

बाच्छाय ( ये ) पाठविलें प्रमाण । वजीर बोलावा तमाम ॥ अबदुल-खान, रस्तुम जुमा ॥ सिद्दी हिलाल, मुशेखान ॥ मेळविले वजिरांला । बाच्छाय बोलावि कवणाला ? ॥ बोलावी बाजी घोरपड्याला । घाटग्या जुंझाररायाला ॥ बोलावी खऱ्या कोबाजीला । त्या नाइकजी पांढऱ्याला ॥ देवकांत्या जीवाजीला । मंबाजी भोसल्याला ॥ बावीस उंबराव मिळुनी । आले बाच्छाय सभेला ॥ ६

बाच्छायजादा पुसे वजिरांला । धरीसा आहे कोण शिवराजाला ॥ बावीस उंबराव आले सभेला । विडा पैजेचा मांडिला ॥ सवाई अबदुल्या बोलला । 'जिता पकडूं मै राजाला' । निरोप दिला कुलवजिराला । अबदुल सदरे नवाजिला ॥ विडा पैजेचा घेतला ( म्हणून ) । तुरा मोत्याचा लाविला ॥ गळां घातलीं पदके । ग्वान विजापुरीं बोलला ॥ फिरंग घोडा सदरे दिला । बाच्छायानें नवाजीला ॥ तीवरमांची मोहिम । घेऊन अबदुल्या चालला ॥ ७

**हामाद**–मुलाना अहमद. **बाच्छायाप**–( विजापूरच्या ) बादशहापर्यंत. **बाच्छायजादी**–वडी साहेबीण. विजापूरचा बादशहा अल्पवयी होता म्हणून कारभार मुख्यतः वडी साहेबीणच पाहात असे. **अग्न**–अग्नि **परजळली**–प्रज्वलित झाली. पोवाडा वाङ्मयांत अग्नि शब्द नेहमी स्त्रीलिंगी वापरलेला आढळतो जसे:—'अग्न लावली'. **जित**–जिता. जिवता ( शितूनप्रत ). **कुल**–सर्व. **वजीर**–सरदार. **खबर दिली**–अफजलखानास साहाय्य करण्याबद्दल आदिलशहानें मावळच्या देशमुखास काढलेलें आज्ञापत्र. यांत शिवाजी व शिवाजीचे साहाय्यकर्ते यांना ठार मारून निर्मूळ फडशा करण्याबद्दल आज्ञा आहे [शिसा १२०]. ५

**बाच्छाय**–बाच्छायें–पादशहानें. **प्रमाण**–फर्मान, हुकूम. **उंबराव**–उमराव. ६

**धरीसा**–धरील असा. **नवाजिला**–नावाजिला सत्कार केला गौरव केला. **बोलला**–बोळला, बोळवण केली, निरोप दिला. ७

खान कटकबंद केला। कोटाबाहेर डेरा दिला ॥ मोठा अपशकुन जाहला। फत्यालसकरा हत्ती मेला ॥ खबर गेली बाच्छायाला। बिनीचा हत्ती पाठविला ॥ बारा हजार घोडा। अबदुलखानालागीं दिला ॥ ८

संगात कुंजर मस्त हत्ती। घेतली झगड्याची मस्तुती ॥ आरोब्याच्या गाडया। कोतवालतेजी धांवा घेती। सातशें उंट आहे बाणांचा। करडा लष्करी खानाचा। वजीर अबदुलखान। त्याच्या दळाची गणती। बारा हजार घोडा। उंबराव ताबिन चालती ॥ ९

तेथुनि कुच केलें कटकाला। अबदुल फौजेनें चालिला ॥ मजलीवर मजल। अबदुल तुळजापुरा आला ॥ फोडिली तुळजा। वरती ममुदच बांधिली ॥ मसुद बांधुनी। पुढें गाय जब केली ॥ अबदुलखान फोडी देवीला। 'कांही एक अजमत दाव मला' ॥ कोपली भद्रकाळी। बांधुनी शिवराजाप दिला। अंबा गेली सपनांत(ला)। कांहीं एक बोले शिवराजाला ॥ 'बत्तीस दातांचा बोकड। आला वधायाला ॥' १०

तेथून कुच केलें कटकाला। अबदुल दरमजली चालिला ॥ मजलीवर मजल। अबदुल माणकेश्वरा आला ॥ तेव्हां त्या अबदुलखानानें।

**कटकबंद केला** सैन्यसामुग्री दिली. **कटक**–सैन्य. ८

**संगात**–संगती, बरोबर. **कुंजर मस्त हत्ती**–कुंजर आणि हत्ती अशी पुनरावृत्ति कां? शिवभारतांत भद्र जातीचे हत्ती म्हटलें आहे त्याप्रमाणें कुंजर हा हत्तींचा विशिष्ट प्रकार तर नव्हे? **झगडयाची मस्तुती**–नावार्थ सामान किंवा सरंजाम असा असावा, पण मस्तुती याचा बरोबर अर्थ लागत नाही. भरतुती कि. भर्तुकी तर नव्हे? भरतुक कि. **भरताड**–मालाची ओझीं. **आरोब्याच्या गाडया**–तोफखाना. **कोतवाल तेजी**–(१) कोतवाल घोडे आणि तेजी घोडे (२) तेज–तीक्ष्ण चलाख. अरबी घोडयालाही तेजी म्हणतात. **बाणांचा**–आगीच्या बाणांचा. **ताबिन**–ताब्यांत. ९

**कुच केलें कटकाला**–कटकाला म्ह. सैन्याला कुचाचा हुकूम दिला. **जब केली**–जेब केली, मारली. **अजमत**–थोरवी चमत्कार करामत. हिरण्यकशिपूसारखें खानानें देवीस आव्हान दिलें. **शिवराजाप**–शिवराजाला. १०

हाल मांडिले देवाला ।। तेथुनि कुच केलें कटकाला । अबदुल फौजेनें चालिला।।
मजलीवर मजल । अबदुल करकंभोशा आला ।। तेथुनि कुच केलें कटकाला ।
अबदुल दरमजली चालिला ।। मजलीवर मजल । वेगीं पंढरपुरा आला ।।
फोडिला विठोबा । पुंडलिक पाण्यांत टाकिला ।। ११

खान (ने) कुच केलें कटकाला । अबदुल फौजेनें चालिला ।। मजलीवर
मजल । वेगीं महादेवासी आला ।। तेव्हा त्या अबदुलखानानें । दंड बांधिला
शंभुला ।। हाल हिंदुंच्या देवाला । अबदुलखान (नें) धाक लाविला ।। तेथुनि
कुच केले कटकाला । अबदुल दरमजली चालिला । मजलीवर मजल । अबदुल
रहिमतपुरा आला ।। १२

अबदुल आलासे बोलती । धाकें गड किल्ले कांपती ।। वजीर उंबराव
बोलती । 'शिवाजीस गडे कांढू', म्हणती ।। अबदुल सारा आहे किती ।
त्याच्या दळाची गणती ।। बारा हजार घोडा । उंबराव ताबिन चालती ।।
सौंदळीं भांडतां । मग कणकीला मीठ किती ? ।। १३

**हाल**–दुर्दशा. **पुंडलिक पाण्यांत टाकिला**–पुंडलीकाचें देऊळ नदीवर अगदीं वाळवंटात असल्यासारखेंच आहे. अफजलखानाचा वध या निबंधांत कै० भावे यांनीं खानाच्या या क्षेत्रविध्वंसक कृत्यांना बखरकारांच्या गप्पा म्हणून संबोधिलें आहे. पण तुळजापूर व पंढरपूर येथले प्रसंग सर्वस्वीं सत्य होते. शिवचरित्र साहित्य खं. १, ६८: सा. खं. २० लेखांक २१७ व शिव-भारत ह्यांत प्रत्यक्ष तत्कालीन अस्सल पुरावे आहेत. ११

**महादेव**–शंभु महादेव. **दंड बांधणें**–खंडणी बसविणें. १२

**गडे**–गडांत. **सौंदळीं भांडतां इ०**–मूळ शब्द संवथळ असावा; **मोलस्वर्थ** त्याचा Table land असा अर्थ देतो. सौदळ कि. सवदळ असा शब्द कोशांत सांपडत नाहीं (१) घाटमाथ्यावर येवढ्या प्रचंड मुसलमानी सैन्याशीं लढाई होऊन त्याचें पीठ होणार तर त्या पिठाला किती अगणित मीठ लागेल ! किंवा (२) भाकरी करितांना पिठांत मीठ घालतात: पण तें अर्थातच थोडें असावें लागतें. त्याप्रमाणें खानाच्या येवढ्या प्रचंड सैन्याशीं असल्या अवघड ठिकाणीं गांठ घालायला कितीसे मराठे लागणार ? थोडेसेही पुरेत असा भावार्थ. (३) म. सारस्वत तिसरी आवृत्ति पा. १९१ मध्यें सवदळी असा शब्द आला आहे.

तेथुनि कुच केलें कटकाला। अबदुल वांईलागीं आला॥ आपुल्या मुलखांत राहिला। कोट बांधुन पिंजरा केला॥ बरेपणाचा कागद (देऊन)। हेजिब महाराजाप गेला॥ राजा पुण्यात मस्त झाला। देश पाठीशीं घेतला॥ सोडुन दिले किल्ले। डेरा जाउलींत दिला॥ राजा जाउलींत राहिला। हेजिब अबदुल्याचा आला॥ १४

हेजिब बोले महाराजाला। 'खान बऱ्यापणाशीं आला॥ खानाला भेटतां। थोर बाच्छाये सल्ला झाला'॥ राजा बोले हेजीबाला। 'कशाला बोलावितां वांईला?॥ किल्ले गड कोट। दवलत खानाच्या हवाला॥ जाउली खानाच्या हवाला। लिहून देतों हेजिबाला॥ बैसूं दोघेजण। खान बुध सांगेल आम्हांला',। लुगडीं दिलीं हेजीबाला। हेजीब वेगीं रवाना झाला'॥ १५

हेजीबाची खबर ऐकुनी। अबदुल महाभुजंग झाला॥ अबदुलखान(नें)

त्याचा अर्थ भावे, शिपाई असा देतात. तोच सर्वांहून अधिक ग्राह्य वाटतो. **सवदळी भांडतां**–शिपाई लढतां. १३

**आपुल्या मुलुखांत**–खान पूर्वी वरीच वर्षे वांईचा सुभेदार होता. वांईजवळील बावधन गांवाचें जुनें नांवही अफजलपूर असें होतें; **कोट बांधुनी पिंजरा केला**–कट बांधुनी पिंजरा केला. कपट रचून सांपळा तयार केला. **बरेपणाचा कागद**–सल्ल्याचा मजकूर असलेलें पत्र. **राजा पुण्यांत मस्त** इ०–" मागें सांगितलेले कान्होजी जेध्यांची शपथक्रिया वगैरे प्रकार प्रतापगडावरच झाले. नंतर त्यानें जेध्यांचे कबिले ढमढेऱ्यांच्या तळेगांवास सुरक्षितपणें नेऊन ठेवविले यावरून पुणें प्रांतांत शिवाजीचा अम्मल चांगला असून तिकडील दळणवळणाचे मार्ग शिवाजीनें शाबूत राखून ठेवले हें उघड आहे " [अवभा २०]. १४

**बऱ्यापणाशीं आला**–सल्ला करण्याकरितां आला. **खानाला भेटतां इ०**–खानाची भेट घ्याल तर तो विजापूरकरांशीं सल्ला करून देईल. **बुध**–बुद्धि, मसलत, उपदेश. **लुगडीं**–मूळ हिंदी शब्द लुगडा. (न. पु ) कपडा. लुगडीं–वस्त्रें. **वेगी**–वेगीं, सत्वर. १५

**महा भुजंग झाला**–चढून गेला. 'गरुरी'च्या पहाडावर आरूढ झाला;

कउल दिला । रोटीपीर पाठविला ॥ 'भिउं नको शिवाजी भाई । आहे तेरा मेरा सल्ला ॥ तुझे गड तुझ्या हवाला । आणिक दवलत देतों तुला ॥ तुझी थोडीशी गोष्ट । क्रिया शहाजीची आम्हाला' ॥ इकडे कउल पाठविला । (पण) शीलचा राउत निवडिला ॥ हत्तीचे पायीं तोरड । लाविला गजढाळा ॥ नदरे पडतां । दस्त करा शिवराजाला ॥ १६

राजा हेजीबासि बोलतो । "खंड काय मला मागतो ॥ चउआगळे चाळीस गड । मी अबदुलखानालागीं देतों ॥ मजवर कृपा आहे खानाची । जावलींत सदरा सवारितो ॥ तेथे यावें भेटायाला । मी खानाची वाट पाहतों" ॥ हेजिब तेथुनि निघाला । अबदुलखानाजवळ आला ॥ अबदुलखानामोहरे । हेजिब(बें) टाकिला प्रमाण ॥ अबदुल पाहतो वाचुन । "खुंटलें गनिमाचें मरण" ॥ हाता आले गड किल्ले । खुशी जाहला अबदुलखान ॥ १७

हिगडे सल्ला कउल दिला । खासा राउत निवडिला ॥ चार हजार घोडा । हालका धराया चालला ॥ हत्तीचे पायिं तोरड ज्याला । वरी सोडिल्या गजढाला ॥ फौजामागें फौजा । भार कडक्यानें चालला ॥ रडतोंडीच्या घाटाखालीं । अबदुल सारा उतरू दिला ॥ इसारत सरज्याच्या लोकांला । ज्यांणीं घाट वळकाविला ॥ मागल्याची खबर नाहीं पुढिल्याला । कटकाची खबर, कैची त्याला ॥ जाऊं जाणें येऊं नेणें । ही गत झाली अबदुल्याला ॥ जावलींत उतरूनी । अबदुल दिशीभुला जाहला । १८

**अबदुलखान**–अबदुलखानानें. **कौल**–अभय. **रोटीपीर**–पिराचा प्रसाद (शालि) 'रोटी शिरपाव' पाठ शितृतप्रत. **आणिक**–निराळी, अधिक. **क्रिया**–शपथ. **शील**–चिलखत. **तोरड**–तोरड्या. **लाविला गजढाळा**–ढाल–निशाण. ढाला–निशाणें. निशाणाचा हत्ती सज्ज केला. **दस्त**–कैद. १६

**खंड**-खंडणी. **चऊ आगळे चाळीस**–चार अधिक चाळीस, चव्वेचाळीस. **सदर**–कचेरी, सभा. **सवारणें**–शृंगारणें; **हेजिब**–दूत, वकील. १७

**हिगडे**-हिकडे. **सल्ला कउल दिला**–सल्ल्याचा कउल दिला. सल्ल्याचें अभिवचन दिलें. **हालका**–जलदीनें मूळ हिंदी शब्द हाल म्ह. जलदी. **ज्याला**–(?). **कटकाची खबर कैची त्याला**–कटकाची खबर म्ह० अवस्था

राजानी सदरा सवारिल्या । गाद्या पडगाद्या घातल्या ॥ तिवाशा जमखान टाकिले । सदर पिकदाण्या ठेविल्या ॥ सुरंग चारी खांब सदरेचे। वरी घोंस मोतीयांचे ॥ माणिकाच्या भरणी । हारी मोत्यांच्या बसविल्या ॥ दुसरे सदरेची मांडणी । सूर्य लखलखितो गगनीं । माणिकाचे ढाळ । सदरे सुवर्णाचें पाणी ॥ काचबंदी पटांगणाचा ढाळ। कापुर कस्तुरी परिमळ ।१९

तिसरे सदरेची मांडणी । हिरे जोडिले खणोखणीं ॥ खासियाचे पलंग । ते ठेवोनी मध्यस्थानीं ॥ वाळियाच्या झांजी । दवण्याचे कुंड घालोनी ॥ बराणपुरी चिटाचे । आडोआड पडदे बांधुनि ॥ चाहुंकोनी चारी समया । चांदवा जडिताचा बांधोनी ॥ घोंस मोतियांचे । वर ठिकडी नानापरिची ॥ अवघी जडिताची लावणी । हिरे जोडिले खणोखणी ॥ बहुत सवारिल्या सदरा ॥ ऐशी नाहीं देखिल्या कोणी ॥ २०

---

वार्ता अशी कीं तें कैचींत घातल्याप्रमाणें कोंडलें गेलें. **जाऊं जाणें येऊं नेणें**–जाऊं जाणें नेणें, येऊं जाणें नेणें. परत जातां येईना पुढें चाल करून जातां येईना. १८

**पडगादी**–गालिचा. **तिवाशी**–चित्रासन. गादी **जमखान**–सतरंजी. **सदर पिग्दाणी**–कचेरींत टेवावयाची मौल्यवान् पिकदाणी. **सुरंग**–रंगी बेरंगी. **भरणी** मूळ शब्द **भरणें**–खांब व पिढें यांच्यांत बसविलेला लाकडाचा तुकडा. **हारी**–रांगा. **ढाळ**–प्रभा. **सदरे सुवर्णाचें पाणी**–सदरेला सोन्याचे कळस होते त्यास अनुलक्षून " त्या डेऱ्यास चंदाराई कळस सोन्याचे लाविले होते " [अवभा २७]. **काचबंदी** इ०–पटांगणाचा ढाळ असा होता कीं, त्यानें कांचबंदी व्हावी, डोळे दिपून मिटले जावेत. 'तुझ्या काचा फुटल्या का ? दिसत नाही का ?' असा डोळ्यांच्या अर्थी काचा या शब्दाचा उपयोग आपण करतोंच. २ कदाचित् 'कांचा' म्हणजे आरसे वगैरेही असतील. **पट**–वस्त्र. **पटांगण**–सदर. १९

**खासीयाचे**–खाशा स्वारीचें. **झांजी**–पंखे, विंझणे, ताट्या (?). **कुंड**–कुंड्या. शोभेकरितां व वासाकरितां. **चीट** चित्रविचित्र वस्त्र. **चांदवा**–छत अस्मानगिरी. **ठिकडी**–नक्षी. **लावणी**–जडवणूक, शृंगार किंवा

राजानीं सदरा सवारिल्या । होजिब अबदुल्यास धाडिला ॥ मोरो ब्राह्मण पाठविला । अबदुलखानासी बोलाविला ॥ " चार हजार घोडा । कोण्या कामास्तव आ..गिला ?" (म्हणून) त्यानें बाहेर निराळा ठेविला । दहा पांचांनिशीं चालिला ॥ " एकांतीच्या गोष्टी । तेथें दहा पांच कशाला ॥ पालखी दुर करा भोईयाला ।" खासा अबदुल चालला ॥ " हात चालावा व्हा । दुर करा " म्हणे खानाला ॥ वस्त्रे केलीं हेजीबाला । शामराज नवाजीला ॥ २१

भवानीशंकर प्रसन्न ज्याला । तुळजा मदत शिवराजाला ॥ भोग पुरला खानाचा । अबदुल जावळीत आला ॥ बिनहत्याराविण मोकळा । अबदुल सदरेलागीं आला ॥ अबदुल पहिले सदरे गेला । सदर देखुनि सुखी झाला " ऐशी सदर नव्हती । आमच्या आली इदलशाला " ॥ खान दुसरे सदरे गेला । सदर देखुनि सुखी झाला ॥ " ऐशी सदर नव्हती । नवरंगशा बाच्छायाला " ॥ अबदुल तिसरे सदरे गेला । सदर देखुनि सुखी झाला ॥ " ऐसी सदर नाहीं अवरंगशा बाच्छायाला " ॥ अबदुलखान बोलिला । " शिवाजीस आणा भेटायाला " ॥ २२

आराम बहुतेक सर्व बखरकारांनीं या सदरांचीं मोठीं भरघोस वर्णनें केलीं आहेत. पोवाड्यानंतर बऱ्याच वर्षांनीं बनलेल्या बखरींनीं तसें करावें हे ठीक. पण शिवभारत हा समकालीन काव्यग्रंथ असूनही त्यांत या सदरांचें यत्किंचितहि वर्णन नाहीं ही आश्चर्याची गोष्ट होय. अज्ञानदासानें हिरे-माणकांचा पाऊस पाडून आधीं फार अतिशयोक्ति केली आणि त्या अति-शयोक्तीची अतिशयोक्ति पुढें बखरकारांनीं केली. २०

**शामराव**–शामराव निळकंठ पारसनीस रोझेकर. **हात चालवा व्हा**–हानचा लव्हा हा (भावे) लव्हा- मोठी तरवार. २१

**नवरंगशा**–भूषणकविकृत शिवाबावनी काव्यांत औरंगजेबाचा उल्लेख चारपांच ठिकाणीं नौरंग या नांवानें केला आहे [शिसो २३]. **अवरंगशा**–औरंगजेब गदाधर प्रल्हाद शकावली पा. ६७ वर औरंगजेबाचा उल्लेख अवरंगशा असा केलेला आहे. २२

राजा नवगजींत बैसला। मोरो, शाम बोलाविला ॥ रघुनाथ पेशवे। नारो शंकर पाचारिला ॥ दहातोंड्या माणकोजीला। त्या इंगळ्या सुभानजीला ॥ देवकांत्या जीवाजीला। राजानें बोलाविलें तुम्हांला ॥ कानखन्या सुभानजीला। बेलदारा पिलाजीला ॥ सरसुभाजीला। पालीकर नेतोजीला ॥ त्या बोबड्या बहिरजीला। सरदार आले भेटायाला ॥ २३

राजा विचारी भल्या लोकांला। "कैसें जावें भेटायाला" ॥ बंककर कृष्णाजी बोलला। "शिववा सील करा अंगाला" ॥ भगवंताची सील ज्याला–। आंतून, (तो) बारीक झगा त्याला ॥ मुसेजरीच्या सुरवारा। सरजा (जें) बंद सोडुन दिला ॥ डावे हातीं बिचवा त्याला (त्याला)। वाघनख सरज्याच्या पंजाला ॥ पटा जिव म्हाल्याप दिला। सरजा बंद सोडुन चालिला ॥ २४

"माझा रामराम दादानु" ॥ गडच्या गडकऱ्या बोलिला ॥ जतन भाईनु करा। आमच्या संभाजीराजाला ॥ सराईत उमाजी राज्य (राजा) होईल तुम्हांला ॥ गड निरवितो गडकऱ्याला राज्य निरवितो नेतोजीला ॥ निरवानिरव दादानु। विनंति केली सकलीकाला ॥ "येथुनि सलाम सांगा। माझा

**नवगजी**–दरबार कचेरी सदर "नौगजी राजमंडपः" राव्यको–व राधाचंपू–२३५. २३

**बंककर**–बंक म्ह. चौकी, पहारा, नाकें. नाकेबंदी कर (?). **मुसेजरी**–एकप्रकारचें कापड. **सुरवार**–विजार. **सरजा बंद सोडून दिला**–सरजा शिवाजीनें विजारीची नाडी लोंबती ठेविली. **बिचवा**–लहान पण वाकडी तीक्ष्ण कट्यार. **वाघनख**–भावे आपल्या निबंधांत वाघनखाची गोष्ट असत्य मानतात तेंच बरोबर दिसतें. शिवभारतांतही वाघनखांना आधार नाहीं. **बंद सोडून चालला**–पट्याचा बंद सोडून चालला. २४

**सराईत**–पटाईत. **उमाजी**–हा शिवाजीचा पुतण्या. कनकगिरीस मारला गेलेल्या शिवाजीच्या थोरल्या भावाचा–संभाजीचा मुलगा. हा त्या वेळीं सहा वर्षांचा होता. **राज्य**–राजे, राजा. **निरवणें**–ताब्यांत देणें. २५

शहाजी महाराजाला "॥ खबर गेली जिजाऊला । शिवबा जातो भेटायाला ॥ पालखींत बैसुनी । माता आली भेटायाला ॥ २५

शिवबा बोले जिजाऊ सवें । "बये वचन ऐकावें ॥ माझी आसोशी खानाला । बये जातों भेटायाला " ॥ जिजाऊ बोले महाराजाला । " शिवबा न जावें भेटायाला ॥ मुसलमान बेइमान । खान राखिना तुम्हांला "॥ राजा बोले जिजाऊला । " येवढी उंबर झाली भेट दिली नाहीं कोणाला ॥ येवढी गोष्ट माते । आज द्यावी मला ॥ आई अबदुल्खान आला ॥ यानें धाक लाविला देवाला "॥ जिजाऊ बोले महाराजाला । " शिवबा बुद्धिनें काम करावें । उसनें संभाजीचें घ्यावें " ॥ २६

जिजाऊ घेती अलाबला । " शिवबा चढती दवलत तुला ॥ घे यशाचा विडा "। शिवबा स्मरे महादेवाला । गळां घातली मिठी । मातेच्या चरणासी लागला ॥ ध्यानीं आठवुनी भगवंताला । शिवाजी राजा सदरे गेला ॥ २७

" पहिला सलाम । माझा भवानीशंकराला ॥ दुसरा सलाम । माझा शहाजीमहाराजाला । तिसरा सलाम । अमचे अबदुलखानाला " शिवाजी सरजे सलाम केला । अबदुल्खान(नानें) गुमान केला ॥ मनीं धरलें कपट । घुरतें कळलें महाराजाला ॥ मग तो शिवाजी सरज्याला । खान दापुनी बोलला ॥ " तूं तो कुणबीका छोकरा । सवरत बाच्छाई सदरा " ॥ २८

**आसोशी**–मू. श. असोस कि. असोसा–हाव, उत्कट प्रेम. **खान राखिना तुम्हाला**–अफजलखानानें कनकगिरीच्या वेढयांत संभाजीस दगा करून मारिलें त्यास अनुलक्षून. **उंबर**–उमर. **उसनें**–सूड, बदला. **संभाजीचे** इ०-कनकगिरीच्या लढाईत याच खानानें दगा करून संभाजीस मारलें त्यास अनुलक्षून. २६

**अलाबला घेणें**–दृष्ट काढणें. २७

**सरजे सलाम केला**-सरजानें सलाम केला. **गुमान**–ताठा, गर्व. अफजलखानानें गुमान म्हणजे गर्व केला, शिवाजीचा सलाम घेतला नाहीं. **दापुनी बोलला**–दरडावून बोलला. **सवरत**–शृंगारत. **सवारणें**–शृंगारणें. **बादशाही सदरा**–बादशहाच्याच ऐश्वर्याला शोभतील अशा. २८

इतक्या उपरी राजा बोले। त्या अबदुलखानाला ॥ "खाना ज्याची करणी त्याला। कांहींएक भ्यावें रघुनाथाला ॥ तुम्ही जातीचे कोण। आम्ही जाणतों तुम्हाला ॥ तूं तरी भटारनीका छोरा। शिवाजी सरज्यापर लाया तोरा" ॥ यावर अबदुल बोलला ॥ "शिवा तुम चलो बिजापुराला" ॥ "शिवाजी सरजे नेतां। बहुत दिन लागतील खानाला ॥ कळला पुरुषार्थ। तुमचा बसल्या जाग्याला" ॥ २९

"अबदुल जातका भटारी। तुमने करना दुकानदारी" ॥ इतकिया उपरी। अबदुल मनीं खवळिला पुरा ॥ कव मारिलि अबदुल्यानें। सरजा गवसून धरला मारा ॥ चालविली कट्यार। सीलवर मारा न चाले जरा ॥ सराईत शिवाजी। त्यानें बिचव्याचा मारा केला। उजवे हातीं बिचवा त्याला। वाघनख सरजाच्या पंजाला ॥ उदरच फाडुनी। खानाची चरबी आणिली द्वारा ॥ ३०

खान "लव्हा लव्हा" बोलिला। खानाचा लव्हा बेगिन आला ॥ राजानें पट्टा पडताळिला। अबदुलखानानें हात मारिला। शिरींचा जिरेटोप तोडला। सरजा(ला) जरासा लागला। भला सराईत शिवाजी। पट्ट्याचा गुंडाळा मारिला ॥ मान खांदा गवसुनि। जानव्याचा दोरा केला ॥ अबदुलखान

**ज्याची करणी त्याला**-ज्याच्या अंगांत करामत किंवा सामर्थ्य असेल तोच अशा गोष्टी करील. आम्ही देवाशिवाय कोणास भीत नाहीं. **भटारणी-का छोरा**-खाणावळवालीचा मुलगा. **सरजापर लाया तोरा**-सरजापुढें ऐट मारतोस ?. **सरजा**-सिंह. २९

**कव मारणें**-मिठी घालून आंवळणें. **गवसुन धरणें**-दाबून धरणें, हाल-चाल न करतां येईल असें धरणें. **सील**-चिलखत. **जरा**-जरा सुद्धां. **बिचवा**-विंचवाच्या आकाराची वांकडी कट्यार. **द्वारा**-बाहेर, दाराला. ३०

**बेगिन**-घाईनें, ताबडतोब. **पडताळणें**-बाहेर काढणें. **जिरेटोप**-शिरस्त्राण. **सरज्या**-सरजाला. **गुंडाळा** (?). **जानव्याचा दोरा केला** (१) जानव्याचे पदर दोन निरनिराळे करावे, त्याप्रमाणें दोन शकलें केलीं

शिवाजी दोनी । भांडती दोनी धुरा ॥ बारा हजार घोडा । सरदार नाहीं कोणी तिसरा ॥ ३१

अबदुलखान झाला पुरा । कृष्णाजी ब्राह्मण उठावला ॥ शिवाजी राजा बोलला । "ब्राह्मणा मारूं नये तुला । तुजशीं मारितां शंकर हांसेल आम्हांला" ॥ नाइकतां ब्राह्मणें । हात दुसरा मारिला । "ब्राह्मणा मारूं नये तुला। क्रिया शहाजीची आम्हांला" ॥ कृष्णाजी ब्राह्मण(णें) । हात तिसरा टाकिला ॥ (तरी) होईल ब्रह्महत्या भोंसल्यासी । (म्हणून) शिवाजीनें राखिला ॥ कृष्णाजी ब्राह्मण मागें सरला । सैद बंडु मोहरे आला ॥ जवळ होता जिऊ म्हाल्या । त्यानें सैद पुरा केला ॥ ३२

संशय खानाचा फिटला । खान(नें) पळता पाय काढिला ॥ मेळविला भोयांनीं । पालखींत घालून चालविला ॥ कावजीचा संभाजी भोंसला । मोठे उडीनें आला ॥ जखमा केल्या भोयांच्या पाया(ला) । खटारा धरणीवर पाडिला ॥ शिवाजीराजा वेगिन आला । शिर कापुनी गडावर गेला ॥ जगाचाच मंदिल । शिरीं त्या संभाजीचे घातला ॥ फाजिलखाना क्रोध

(१) जानव्यासारखा डावे खांद्यावरून वार ओढला. दोनी-दोघेच दोघे. धुरा-(प्रा. वि.) श्रेष्ठ किंवा अढळ. दोन बाजूकडचे दोन नायक. ३१

**पुरा झाला**–ठार झाला. **कृष्णाजी ब्राह्मण**–खानाचा वकील. "हा वांईचा कुलकर्णी. हल्लींचे वांईचे कुळकर्णी याचेच वंशज आहेत. [अवभा २१]. **सईद बंडु**–"प्रतापगडावर सदरेच्या ठिकाणीं याचीही एक कबर आहे." अवभा ३१, शिभा २१, श्लो. ७५-७८. **जिउ म्हाल्या**-"याचें उपनांव सकपाळ. हा जावळी प्रांतांत मौजे कोंडवली येथील राहणार. वरील प्रसंगीं यानें बजावलेल्या कामगिरीवरून 'होता जिवा म्हणून वांचला शिवा' अशी पडलेली म्हण या प्रांतांत चोहींकडे ऐकूं येते [अवभा ३२, ३३ फुटनोट]. (२) शिवभारतकार शिवाजीनेंच सैद बडा खपवला असें म्हणतो. ३२

**खान**–खानानें. **मेळविला भोयांनीं**–भोयांनीं उचलिला, खानाचीं शकलें एकत्र केलीं. **कावजीचा संभाजी भोसला**–संभाजी कावजी भोसला,

आला । बाण आणि बंदुखा थोर वर्षाव एकच केला ॥ शिवाजीराजाचा चपाटा । फाजिलखान बारा वाटा ॥ हाल महाराजाचे झाले । अबदूलच्या लोकांला ॥ ३३

प्रतापगडाहुनि केला हल्ला । मारिती खुण सरज्याच्या लोकांला ॥ धरल्या चारी वाटा । ज्यांनीं घाट बळकाविला ॥ दळ त्या समई । पायदळाचा कडका आला ॥ सिलीमकर, खोपड्या, । काकड्या, सुरव्या, लोटल ॥ अंगद हनुमंत रघुनाथाला । पायचे पायदळ शिवाजीराजाला ॥ "फिरंग ठेवी त्याला जाउद्या, त्याला । राखु नका तुम्ही उगारल्या पाइकाला" ॥ फत्ते महाराजाची झाली । वाट दिली कुलवजीराला ॥ ३४

पळतां फाजिलखान । त्याचा दुमाळा घेतला ॥ माघारा फिरोनि । ज्यान (नें) हातीचा आरोबा दिला ॥ शिवाजीचे हाल । फाजिलखान घाय (ये) पुरा केला । घोडा आणि राऊत । ज्यांणीं पाडाव केला ॥ वळल्या हाती-वरल्या ढाला । चार हजार घोडा अबदुल्या जावळींत बुडविला ॥ भवानी-

**खटारा**–मेणा. **चपाटा**–मार. **बारा वाटा**–बारा वाटा केला किंवा पळतां भुई थोडी केली. **हाल महाराजाचे झाले**–महाराजांच्या फौजेनें त्याचें सैन्य रगडलें. ३३

**खुण मारणें**–संकेत किंवा इशारा करणें. **दळ**–घोडदळ (?). छत्रपतींचें सप्तप्रकणात्मक चरित्र—साने यांचे--पा. १५८ मध्यें मावळे सरदार म्ह. पायदळाचे सरदार व मराठे सरदार म्ह. घोडदळाचे सरदार असा अर्थ दिला आहे. येथेंहि दळ आणि पायचे पायदळ असे शब्द आहेत त्याअर्थी दळ म्ह. घोडदळ ह्याच अर्थ बरा दिसतो. **उगारल्या पाइकाला**–जो शिपाई शस्त्र धरील त्याला. ३४

**दुमाळा घेणें**--पाट घेणं, पाठलाग करणें. **ज्यान**–ज्यानें. **हातीचा आरोबा दिला**–ज्यानें हत्तीवरचा तोफखाना सुरू केला. **शिवाजीचे हाल**–शिवाजीच्या फौजेनें केलेले हाल. **फाजीलखान घाय पुरा केला**–"फाजलखान जखमी होऊन पायांला चिरगुटें बांधून पळून गेला." **वळल्या**–वळवून

शंकर प्रसन्न ज्याला । यश राज्याला खंड्याला । सरज्या तोरड माहीमोर्तब शिवाजीला । फत्ते झाली महाराजाची ते वेळ पन्हाळा घेतला ॥ ३५

अज्ञानदास विनवी श्रोत्याला । राजा अवतारी जन्मला ॥ नळ नीळ सुग्रीव जांबूवंत । अंगद हनुमंत रघुनाथाला ॥ एकांतीं भांडन । जैसें राम-रावणाला ॥ तैसा शिवाजी सरजा । एकांतीं नाटोपे कवणाला ॥ दृष्टी पर्यंस शिवाजीला । कलीमधीं अवतार जन्मला ॥ विश्वाची जननी । अंबा बोले शिवाजीला ॥ मोठे भक्तीचें फळ । महादेव भाकेला गोंविला ॥ जिकडे जाती, तिकडे यश राज्याच्या खडाला ॥ ३६

माता जिजाऊ बोलली । पोटीं अवतार जन्मला ॥ शंकपाळ शिवाजी महाराजानें केला । आतां मी गाईन । भोंसले शिवरायाच्या ख्याति ॥ दावा हेवा जाण । अखेर संग्रामाच्या गति ॥ राजगड राजाला । प्रतापगड जिजाऊ-ला ॥ धन्य जिजाऊचे कुशी । राजा अवतार जन्मला ॥ आपल्या मते अज्ञानदासानें । बीरमाल राज्याचा गाइला ॥ शिवाजी सरज्यानें । इनाम घोडा बक्षीस दिला ॥ शेरभर सोन्याचा । तोडा हातांत घातला ॥ यश जगदंबेचें । तुळजा प्रसन्न शिवराजाला ॥ ३७

आणिल्या. **खंड्याला—खांड्याला, खांडा**—एक तऱ्हेची तरवार. **सरजा तोरड माहीमोर्तब शिवाजीला**—सरजा शिवाजीला तोरड व माहीमोर्तब (अलंकार, सरंजाम) इ० लूट मिळाली. [शिभा २२, श्लो. ५७ ते ७०]. **ते वेळ पन्हाळा घेतला**—" मार्गशीर्षमासीं शुद्धपक्षीं अफझलखान जिवें मारिला. मार्गसीर्ष वद्य ९ ममवारीं राजश्री स्वारींनीं पन्हाळा घेतला." [जेधेश]. ३५

**दृष्टी पर्यंस शिवाजीला—दृष्टी परी** यश—जिकडे दृष्टि टाकील तिकडे यशच. **राज्याच्या खडाला**—जुन्या भाषेंत राजाबद्दल राज्या असें अनेक वेळां लिहितात. **खडाला**—इ. सं. भोसल्यांचे कुलाचार या प्रकरणांत जाबता सिगाइनखाना ह्या कलमांत खाडा असें शस्त्राचें नांव आलें आहे. ३६

**शंकपाळ**—सकपाळ? शकपाल? (?). **दावा हेवा**—हेवादावा. **अखेर संग्रामाच्या गती**—ज्या हेव्यादाव्याचें—भांडणाचें पर्यवसान अखेर संग्रामांत झालें. **बीरमाल**—भावे यांनीं हा शब्द मूळ परिमळ असावा असें सुचविलें

होतें. पण तो मूळ हिंदी शब्द आहे. **बरमला** (वि.)–प्रसिद्ध, प्रख्यात-त्यावरून ख्याति किंवा प्रख्याति कीर्तिवाचक **बीरमाल** शब्द बनला असावा. हा शब्द कोल्हापूरचे पोवाडे या पुस्तकांत पान २० वर असाच आला आहे. त्याचा अर्थ को.पो. प्रतींत वीररसप्रधान वर्णन असा दिलेला आहे. ३७



# तानाजीचा–पोवाडा

या पोवाड्याचा कर्ता तुळशीदास शाहीर. पोवाड्याचे शेवटीं त्यानें आपलें नांव, राहण्याचें ठिकाण, त्याचप्रमाणें सदर पोवाडा कोणाच्या हुकुमानें तयार केला इत्यादि हकीकत दिली आहे. त्यावरून पोवाडा तत्कालीन असावा असें दिसतें.

या पोवाडयाचे ५५ चौक आहेत. इतका विस्तृत पोवाडा दुसऱ्या कोणासंबंधानेंहि नाहीं. बखरी, शकावल्या इत्यादिकांतून तानाजीसंबंधीं चुटपुटते उल्लेख आहेत. पण आज ३०० वर्षेंपर्यंत ज्याच्या अद्भुतरम्य समरप्रसंगाची माहिती पितृपुत्रन्यायानें आबालवृद्धांना अवगत आहे त्याचें सर्व श्रेय या उत्कृष्ट पोवाडयालाच द्यावें लागेल.

शाळिग्राम व आक्वर्थ यांनीं इतर पुष्कळ पोवाडे जमविले पण हाच तेवढा पोवाडा त्यांना मिळत नव्हता आणि दुर्दैवानें त्यांना तो न मिळता तर ज्या एकस्याच एका अति वृद्ध गोंधळ्याला तो येत होता त्याच्याच बरोबर तो नाहींसा झाला असता. आक्वर्थसाहेब आपल्या प्रस्तावनेंत या पोवाडयासंबंधानें म्हणतात.

"If I had not been myself at Satara and if Dajirao Shirke had not been a resident of the same locality as the minstrel in question, this ballad would probably never have been got hold of and might have been altogether lost on the death of the latter, a man advanced in years."

सदर पोवाडयाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत शाळिग्राम तुळशीदासाला अज्ञानदासाचा संबंधी म्हणतात, त्याचा उलगडा होत नाहीं. दोघांच्याहि नांवांत 'दास' आहे म्हणून ते एका कुटुंबांतले किंवा नात्यांतले असावेत असा त्यांचा तर्क असल्यास न कळे. मात्र "अज्ञानदासाचा अफझुलखानाचा पोवाडा तुळशीदासानें पाहिलेला असावा. कारण कित्येक ठिकाणीं या दोन्ही पोवाडयांच्या ओळीच्या ओळी जमतात" असें ते म्हणतात

तें बरोबर दिसतें. उदा० १ ला चौक पहा—शके १५८७ पासून शके १५९१ अखेरपर्यंत जेधे-शकावलींत जे उल्लेख आहेत त्यांवरून राजगड हेंच शिवाजीनें आपलें मुख्य ठाणें ठेविलें होतें असें दिसतें. त्यावरून शाहिराचे 'राजगड राजाचा' हें म्हणणें सार्थ आहे असें म्हणतां येतें खरें परंतु 'खबर त्या विजापूरला गेली' या पुढच्या उल्लेखावरून त्याचें वरील बिनचूक माहितीबद्दलचें सर्टिफिकीट फुकट जातें. कारण 'विजापूरला' खबर न जातां 'दिल्लीस' जावयास पाहिजे होती. दिल्ली येथून सुटून आल्यानंतर गेलेलीं ठाणीं शिवाजीनें परत मिळविलीं त्यांत माहुली वगैरे ठिकाणें होतीं. परंतु तीं सिंहगड किल्ला घेतल्यानंतर मिळविलेलीं आहेत. प्रस्तुत पोवाड्यांत उलट प्रकार झाला आहे. कारण सिंहगडच्या मोहिमेच्या आधींच्या हकीकतीचा चौक अगोदरच माहुली वगैरे ठिकाणें घेतल्याचें सांगतो. (चौ. १) पण ही चिकित्सा सोडली तरी नुसत्या पाहण्यानेंहि असें उघड दिसून येतें कीं, अफजलखानाच्या वधाच्या पोवाड्यांतील पहिल्या चौकांचें हें अंध अनुकरण आहे.

तानाजीच्या या सिंहगडच्या मोहिमेविषयीं अस्सल ऐतिहासिक पत्रांचा आधार उपलब्ध नाहीं. त्याच्या खालोखाल ज्याला विश्वसनीय म्हणतां येईल असे शकावल्यांतील दोन उल्लेख आहेत. पण ते किती चुटपुटते आहेत हे इतरत्र ते उद्धृत केले आहेत त्यावरून कळून येईलच. याखेरीज बखरींतून या मोहिमेची माहिती आहे पण त्यांवरूनहि पोवाड्यांतील माहितीचा तपशील खरा खोटा म्हणतां येणार नाहीं.

या पोवाड्यांत पौराणिक पद्धतीच्या अलौकिक दैविक चमत्कारांचा बराच गोंधळ आहे.

पांडव वनवासांत असतांना एक दिवस दुर्वास ऋषि आपल्या असंख्य ऋषींच्या तांड्यासकट प्रकट झाले व इच्छाभोजनाची याचना करून त्यांनी द्रौपदीचें सत्त्व पाहिलें या गोष्टीशीं जिजाबाईने राजगडावर तानाजीच्या बारा हजार फौजेस जेवण घातलें या गोष्टीचे कितीतरी साम्य आहे. श्रीकृष्णानें कंसवधाचे वेळीं राजवाड्यासमोर कंसाच्या हत्तीशीं केलेली लढाई आणि तानाजीनें सिंहगडावर उदेभानाच्या 'चंद्रावळी' हत्तीशीं केलेली लढाई यांत फरक कोठे आहे ? हजार हत्तींचें बळ असलेले किंवा गाडेच्या

गाडे अन्न खाणारे पौराणिक बकासुरी राक्षस, आणि 'सवामण तांदुळ, दीड गाय आणि दीड शेळी एका वेळेला खपवणारा, अठरा खंडीचे किनखाप घालणारा आणि बारा आतबडीचे म्हणजे बारा गुरांच्या कातड्याचे जोडे घालणारा उदेभान मोगल यात किती साम्य आहे ? पुराणांत कीचकाला त्याच्या सारखेच बलवान् शंभर अनुकीचक नांवाचे भाऊ असतील तर उदेभानाला तसे १२ मुलगे होते येवढाच फरक ! देवतांनीं प्रकट होऊन अभय देणें किंवा ऐन वेळीं कल्याण दरवाजा उघडून देणें असले पौराणिक चमत्कार शाहिरानें निःशंकपणानें दडपून दिले आहेत. पुराणांतील वर्णनां-तून पावलोंपावलीं आढळून येणारी अतिशयोक्ति समकालीन प्रसंगाच्या वर्णनांतही तुळशीदासानें कमी केलेली नाहीं.

वरील पौराणिक थाटाच्या गोष्टी सोडल्या तरीहि दुसऱ्या अनेक चुका तुळशीदासानें केल्या आहेत. सिंहगडाची लांबीरुंदी केव्हांहि वाढणं शक्य नाहीं, पण त्याने ती सपाटून वाढविली आहे. " तिन कोसांचा आहे या घेरा। दीड कोसाची आहे या रुंदी." येवढासा सिंहगड पण तानाजीनें नऊशे मुसलमान मारले तरी उदेभान जागा झाला नाहीं. आणि ती बातमी-हि त्याला 'बांब्या'नें दिली तेव्हा कळली. शेत कापून झाल्यावर कापणीला आलेल्या लोकांनीं जरा विसावा घेत तंबाकू चोळीत बसावें त्याप्रमाणें गडावरचे नऊशें पठाण कापल्यावर कांहीं आरडाओरड गोंधळ गलबल न होतां त्या निस्तब्ध अंधारांत बटवा सोडून पान खायला तानाजी व शेलार-मामा बसतात ! ! पुढें सिद्दी हिल्लालाच्या मृत्यूचीहि बातमी बांब्यानें आणली तेव्हां, उदेभानाने काय केलें ? 'तर पत्र मोगलानें लिहिलें। धाडलें बाराजण छोकऱ्यांला' जणुं काय सात आठ कोस ते दूर होते! एकना दोन, अशा अनेक विचित्र चुका झाल्या आहेत.

पण हे सर्व प्रकार जमेस धरूनहि या पोवाड्याचें माधुर्य रतिभरहि कमी होत नाहीं. याचें कारण एक त्याची साधीसोपी, रांगडी, तडफदार, जिवंत भाषासरणी, दुसरें त्यांतील प्रसंगांची मांडणी व तिसरें त्यांमुळें सहजच उत्पन्न होणाऱ्या रसाची उभारणी हें होय.

तानाजीच्या अद्‌भुत कथानकाची ही पद्यमय कादंबरीच होय. मुख्यतः याच पद्यमय कादंबरीवरून कै० आपटे यांनीं आपली गद्यमय कादंबरी

'गड आला पण सिंह गेला' ही तयार केली आहे. मात्र आपट्यांचा इतर कादंबऱ्यांतील पाल्हाळ ह्यांत सांपडावयाचा नाहीं. एखादी जोराची वावटळ आपल्या मार्गांतील वस्तूंना जोरानें झपाटून पुढें जाते, त्याप्रमाणें हा शाहीर आपल्या कथानकाचें कथन करीत जातो. तो मुद्दाम थांबून एखाद्या प्रसंगाचें विस्तारानें वर्णन करीत नाहीं किंवा उपमादिकांच्या मोहांत गुरफटत नाहीं.

या विस्तृत पोवाड्यांत तानाजी, शेलारमामा, शिवाजी व जिजाई यांचीं सुंदर स्वभावचित्रें काढलीं आहेत. ऐशीं वर्षांच्या पोक्त आणि अनुभवी शेलारमामाचा आपल्या भाच्याबद्दलचा पक्षपात व प्रेम हीं फार सुरेख रंगविलीं आहेत. लग्नमंडपांतच शिवाजीचा हुजऱ्या आला त्याच वेळीं त्या धोरणी म्हाताऱ्यानें 'सिंहगड किल्ल्याची वार्ता। काढूं नको तानाजी सुभेदारा।' असें म्हणून त्यांस मोडून काढलें. पुढें वेशींत पालखीचें तोरण तुटून पडलें आणि तास पक्षी आडवा गेला असे अपशकुन झाले. तेव्हांहि त्यानें तानाजीस 'तानाजी सुभेदार मोहरे बरें नाही होणार' असें परोपरीनें सांगून पाहिलें. पण तानाजी ऐकेच ना, तेव्हां भाच्याकरितां त्याला राजगडास जावेंच लागलें. पण तेथेंहि गेल्यावर त्या व्यवहारी, अनुभवी व हिकमती म्हाताऱ्यानें आपल्या सुभेदाराचें हित पाहाण्यास सोडलें नाही. त्यानें जिजाईस साफ सांगून पाठविलें कीं, "ही बारा हजार फौज तुमच्या लढाया लढण्याकरितां आणली आहे, गाढवं वळायला आणलेली नाहीं, तेव्हां त्यांना एकदां पोटभर गोडाधोडाचें जेवण घातले पाहिजेस." याप्रमाणें एक जेवण घेतल्यानंतर तानाजीला निरोपाचा पोषाक मिळाला तेव्हांहि यानें तो पोषाक आम्ही एकटे घेत नाहीं, 'देशील तर द्यावा बारा हजाराला' असा हेका धरून जिजाबाईकडून सर्व सैन्याला पोषाक व शस्त्रें मिळविलीं. नंतर सिंहगडाच्या बारीला येऊन दबा दिल्यानंतर किल्ल्याचा भेद पाहणें जरूर होतें. पण तानाजीनें जावें असें त्याला वाटत नव्हते म्हणून त्यानें हिकमत काढली. त्यानें सर्व सैनिकांपुढें पैजेचे विडेच मांडले. हेतु हा कीं, सैनिकांपैकीं कोणी तरी हें बिकट काम पत्करील. 'पण ज्या वीरांच्या वरती माना। त्यांनीं खालती घातल्या'. असा प्रकार होतांच तानाजीनेंच ईर्षेनें आणि घाईघाईनें तो विडा उचलला आणि त्या प्रेमांध म्हाताऱ्याची युक्ति सपशेल फसली. पुढें तानाजीला भेद काढून यावयास वेळ

लागल्याबरोबर म्हाताऱ्याच्या काळजाचें पाणी पाणी झालें; आणि त्यानें बहिरोबाला तेवढ्यांत नवस सायासहि केले. शेवटीं तानाजी मरून पडल्यानंतर म्हाताऱ्याच्या अंगांत संचार झाला आणि त्यानें एक शिवी देऊन उदेभानाला दोही हातांनीं असा कांहीं जोराचा कचका दिला कीं, उदेभान तत्काळ मुर्दा होऊन पडला. म्हातारा समयज्ञ आणि प्रसंगाचें औचित्य जाणणारा होता हें त्यानें सूर्याजीला दिलेल्या थापेवरून चांगलें दिसून येतें.

तानाजीचेंहि स्वभावचित्र फार उमदें आहे. 'आधीं लगीन सिंहगडाचें मग करीन रायबाचें' असें म्हणून शिवाजीच्या शब्दांकरितां आपल्या मुलाच्या लग्नाची मुहूर्तमेढ आपल्या पायानें लाथाडून देण्यांत त्याच्या स्वामिभक्तीचा कळस झाला आहे. पतिव्रता स्त्रीचा आदिदेव किंवा महादेव म्हणजे तिचा पतीच होय त्याप्रमाणें धनी हा सेवकाचा महादेव होय. "नाहीं आम्ही बहिरोबा जाणित। साडे तीनशें देव पाणी रांजणांत भरतात ऐसा शिवाजी महाराजा। आहे तळकोकणचा राजा"॥ "शिवाजी महाराजाचें देणें अढळपदीं सोनें." इत्यादि उद्गार त्याच्या निस्सीम स्वामिभक्तीचे द्योतक आहेत. त्याची उडी सर्वांच्या पुढें. पैजेचा विडा त्यानेंच उचलावा, छाती करून भेद काढून आणण्याला त्यानेंच पुढें सरसावावें, मेटकरी नायकांना त्यानेंच फितवावें, सोलाला पहिला हात त्यानेंच घालावा, सोल तुटून अवघे पन्नास लोकच वर राहिले तरी शेलारमामाचा अपमतलबी सल्ला झिडकारून शरीराचा करार करण्याला सिद्ध असावें, आणि घोरांदर रण करून प्रतिज्ञेप्रमाणें शेवटीं लढतां लढतां मरून जावें हें सर्व त्या सत्तावीस किल्ल्यांच्या सुभेदाराला शोभण्यासारखें होय यांत शंका नाहीं.

'कोल्हापूरचे पोवाडे' या पुस्तकांत तानाजी मालुसऱ्याचा एक दुसरा लहानसा पोवाडा छापला आहे. हा पोवाडा महादू शिवा चिकुर्डेवाला या शाहिरानें रचला. खुद्द, तानाजीनेंच लखोटा लिहून त्याला बोलावून आणला व त्याचेकडून पोवाडा रचविला. येवढेंच नव्हे तर 'हातीं ढोलकी देऊन पोवाडा रचला। कुठें नाहिं हो चुकला' अशी फुशारकी स्वतः शाहिरानेंच शेवटच्या चौकांत मारली आहे. असल्या अद्वितीय पोवाड्यांतली हकीकतहि अद्वितीयच असणार! थोडक्यांत माहिती अशी कीं, प्रतापगडावर जिजाई व

शिवाजी सारंगफाशानें खेळले, राजा हरला. जिजाईनें पन्हाळगड पाहिजे म्हणून सांगितलें. तेव्हां तो मातृभक्त शिवाजी तिच्यावर खेसकुन म्हणाला 'आग लागो त्या किल्ल्याला'. मग बाईनें शिवाजीस न कळत उंबरठ्याचा ( हुंबरठ्याचा ) तानाजी नाईक बोलावून त्याला तें काम सांगितलें. तानाजी सैन्य घेऊन गेला. तेथल्या रेणूखान बाच्छायाला व सैन्याला मारून किल्ला सर करून जिजाबाईस येऊन भेटला व शाहिरास बोलावून जिवंतपणीं आपला पवाडा श्रवण केला !!!

## ऐतिहासिक माहिती

" या उपरांतिक पेशजी औरंगजेब बादशहा याचे ताब्यांत सत्ताविस गड दील्हे होते ते सिवाजी राजे यानी ते गड फिरोन परत घ्यावे ही तजविज करोन मोरोपंत पिंगळे पेशवे व निळोपंत व मुजुमदार व आणाजीपंत सुरनिस यासी सांगितले की तुम्ही राजकारणी आहां तर तुम्ही यत्न करोन गड घेणें आणि खासे स्वमुखें मावळ लोकांस सांगीतलें कीं तुम्ही गड घेणें त्यावरून तानाजी मालुसरा म्हणोन हजार मावळे लोकांचा सरदार होता त्याणे राजियास अर्ज केला कीं मी कांडाणा गड घेतो त्याजवरून राजे यांणीं त्याजला वस्त्रे व विडे देऊन त्याजबरोबर मनुष्ये हजार गडाचे येत्नास निवडक मावळे लोक तयार करोन ते रात्रीस गडाचे खालें जाऊन कड्यांवरोन वानर न्यायें चढोन गडावर जाऊन तेथून माळ लाविली आणि वरकड लोकांसमवेत व मानाजी मालुसरा हा ३०० लोकांचा सरदार हा मागाहून गडावरी चढोन सदरहू प्रमाणे गेले. किल्लेदार उदेभान रजपूत तो दिल्लीवाल्याकडील सरदार होता. त्यासी सिवाजी राजे याचे लोक गडावरी चढोन आले. ही खबर रजपुतास कळोन कुलरजपुतांनीं कंबरबस्ता करोन ते तोंडावर येऊन हिलाल व चंद्रजोती लावून बाराशे माणूस व तोफा व तिरंदाज व बरछीवाले व पटाईत व सरईवाले आडहत्यारी ढाला हातास चढवून राजे याचे लोकांवर चालून आले तेव्हां मावळे लोकांनीं त्याजवर हरहर महादेव मुखे उच्चार करून नीट रजपुतावर चालोन गेले तो एक प्रहर मोठें युद्ध जाहालें....व शुरत्वे-करून येकावरती येक वार करीत चालले व तानाजी मालुसरे याची डाव्या हाताची ढाल तुटोन पडली व दुसरी ढाल समयास मिळाली नाहीं मग

त्याणें हाताची ढाल करून उभयेता मिळून येकाचा हात येकावर पडून दोघेही ठार झाले. मग ते समयीं मानाजी मालुसरा तानाजीचा धाकटा बंधु याणें हिमत धरोन लोकांस सावरून व हिमत देऊन रजपुतावर एक हीकरी केली. किती एक रजपूत मारले, किती एक गडाचा तट उडोन पळाले व किती एक तटावरोन पडून मेले, असें १२०० माणूस मारिले. आणि गड फते केला, आणि गडावरी पागा होती तीस आग लाविली..."

मराठी दप्तर–रुमाल १ ला, पान ५७।५८.

"माघ वद्य नवमी सुक्रवार, कोंढाणा घेतला उदेभान किल्लेदार मारिला. तानाजी मालुसरा राजश्रीकडील हशामाचा सुभेदार पडिला."

—जेधे शकावली.

"माघ वद्य ९ शुक्रवारी, मोंढावर्त घेतला. उदयभान किलेदार मारिला तेव्हां तानाजी मालुसरा राज्याकडील हाशम सर सुभेदार पाडिला कलम १ जेध्याकडील लोक व मावळे निवड करून तानाजी मालुसरा सरदार करून पाठविला किला घेतला तानाजी मालुसरा पडला."

शिवापूरकर शकावली, शिवचरित्र प्रदीप, ६१।६२.

---

# तानाजी मालुसरा

## २

### [ शाहीर—तुळशीदास ]

[ " चाल—सांग सखे सुंदरी इ० " ]

राजगड राजाचा । प्रतापगड जिजाबाईचा ॥ सिंहगड पन्हाळा । पहा त्या मोंगलाचा ॥ सरजा शिवाजी शिवभजन । काबिज केलें तळकोंकण ॥ गड माहुली घेतली । कल्याण भिंवडी काबिज केली ॥ खबर त्या विजापुराला गेली। ठाणें राजाचें बसलें॥ शिवाजी महाराज। राजगड किल्ल्यावर बसले ॥ जिजाबाई माता । आहे प्रतापगडावरी ॥ सोमवाराच्या दिवशीं। हातीं हस्तनाची फणी ॥ उगवते बाजुला नजर केली । नजर सिंहगडावर गेली ॥ १

बारा मावळ पुण्याखालीं । बारा मावळ जुनराखालीं ॥ पुण्याच्या तोंडाला जेजुरीच्या बारीला । किल्ला सिंहगड पाहिला ॥ नवें कोंबडीचें अंडें । ऐसा किल्ला झळकला ॥ ऐसा पंतोजी तो काका । त्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ " जावें राजगड किल्ल्याला । सांगा शिवाजीमहाराजाला ॥ जेवावें राजगड किल्ल्याला । अंचवावें प्रतापगडाला " ॥ २

**शिवभजन**—ज्याचें भजन कल्याणकारक आहे असा **हस्तनाची**—हस्तिदंताची. भावार्थ जिजाबाई वेणीफणी करीत बसली होती. ' **नजर सिंहगडावर गेली**—चूक. प्रतापगडावरून सिंहगड दिसत नाहीं. १

**बारा मावळ पुण्याखालीं बारा मावळ जुनराखालीं**—[सा. खं. ४, ७८]. **बारीला**—बारी म्ह. डोंगर झाडी यांच्या आश्रयानें वाघ किंवा चोर असण्याचा संभव अशी जागा. येथें जेजुरीच्या बारीला म्ह. जेजुरीच्या डोंगराच्या फाट्यावर. **ऐसा पंतोजी तो काका**—पंताजी गोपिनाथ बोकील. हा शहाजीचे वेळेपासून नांवलौकिकास चढला होता. याजवर जिजाईची मर्जी विशेष होती. [अवभा २२ टीप]. **ऐसा**—(?). **जेवावे राजगड किल्ल्याला अंचवावें प्रतापगड किल्ल्याला**—भावार्थ तांतडीनें या. २

शिवाजीमहाराज पांच पोषाख नटला । पाईं तुमानी सुरवारी चढविल्या ॥ अंगीं किनखाप घातले । शिरीं जिरीटोप घातला ॥ हातीं वाघनखें घालून । कृष्णघोडीला जिन केला ॥ ढाल पाठिवरी टाकिता झाला । सोनसाळी पट्टा हातांत घेतला ॥ कृष्णघोडीला चाबुक केला । आला मढ्याच्या घाटाला ॥ घाट मढ्याचा उतरला । आला बिरवाडी गांवाला ॥ गांव बिरवाडी सोडिला । आला पोलातपुराला ॥ पोलातपुर सोडिलें । घाट पाराचा वेघला ॥ आले प्रतापगड किल्ल्याला । सलाम जिजाबाईला केला ॥ ३

" धाडला तुम्हीं हुजराचा जासूद । काम सांगावें आम्हाला " ॥ " शिवाजी-महाराज ! । डाव फांशाचा खेळावा " ॥ " डाव खेळावा उमाजी यानें । तूं माता मी तुझा पुत्र ॥ डाव खेळावा मातेसंगें । हे आमचे महत्त्व नव्हे " ॥ " मायलेंकरांचा डाव । ह्यामधिं कांहीं गुंता नाहीं " ॥ येवढ्या जाबावरून । ज्याने तिवड मांडिली ॥ हातीं फांसा ह्यानें घ्यावा । " डाव पहिला येऊं दे तुला ॥ मी बायकोची जात । पहिला डाव येऊं दे तुझा " ॥ ४

हातीं फांसा जो घेतला । बारा बारा तो बोलला ॥ फांसा जमिनीवर

**पांच पोषाख नटला**–सदर पोवाड्यांत पांच पोषाख, पांच कर्णा, पांच पत्रे पांच हत्यारे असे शब्द आलेले आहेत. त्यामुळें ते कांहीं विशिष्ट वस्तूंचें नांव दर्शवितात, कां संख्या दर्शवितात याचा नक्की उलगडा होत नाहीं. हे शब्दही कोशांतून सांपडत नाहींत. **सुरवारी**–सुरवार (हि. स्त्री.) पायचोळणा, विजार. **किनखाप**–भरजरीचें वस्त्र. **जिरीटोप**–शिरस्त्राण. **जिन केला**–जीन चढविलें. **सोनसाळी पट्टा**–सोनेरी पट्टा. २ ज्या पट्ट्याचा सळ म्ह. बंद सोनेरी असा (?) **चाबुक केला**–चाबुक लावून इशारा केला. **वेघणें**–चढणें. ३

**हुजराचा जासूद**–खास मुख्याचा स्वतःचा जासूद. **उमाजी**–मागें अफजुल-खानाच्या पोवाड्यांत आलेला शिवाजीचा पुतण्या. **महत्त्व**–योग्यता. **गुंता**–अडचण. अनुचितपणा. **ज्यानें**–त्यानें. येथून पुढें जेथें जेथें 'ज्यानें' असा शब्द आला आहे, तेथें तेथें त्याचा अर्थ 'त्यानें' असा घ्यावयाचा. **तिवड**–चौरंग (?) पट (?). **तिवड मांडली**–तीन फांसे जोडले [शाळी ४]. ४

फेंकला। त्याचा तिरपगडा पडला ॥ तिरपगडा बोलला। त्याची बेती हो पडली ॥ बेती हो बोलला। त्याचे बारा जे पडले ॥ तिन डाव गेले ज्याचे त्या शिवाजीमहाराजाचे ॥ " जिजाबाई ग माते। आतां डाव येऊं दे तुझा " ॥ येवढ्या जाबावरून। बाईनें हातीं फांसा घेतला ॥ " प्रताप-गडची भवानी देवी। तूं पाव माझ्या नवसाला "। बारा रे बोलली बाई। बाईचे बारा रे पडले ॥ बाई बेतीन बोलली। बाईचे बेतीन पडले ॥ तिर-पगडें बोलली। बाईचें तिरपगडें पडलें ॥ जिजाबाईचे डाव पुरे झाले। बाईचे डाव पुरे रे झाले ॥ ५

" ऐक जिजाबाई। सत्ताविस किल्ल्यांचा मी राजा ॥ माग माग जिजाबाई। जें मागाल तें देतों तुज ॥ नाशकाची बारी सांवताची वाडी। ह्यांतून किल्ला मागून घ्यावा ॥ तुंग तिकोना लघुगड किल्ला विसापुर। ह्यांतून कन्चा मागून घ्यावा " ॥ " ह्यांतून नको मला बाळा। पुण्याचे तोंडाला ॥ आहे जेजुरिच्या बारीला। पुरंदर किल्ल्याला ॥ बारे पुरंदर किल्ला(ल्ल्याला)। आहे सिंहगड किल्ला ॥ घेऊन द्यावा मला। आयुष्य मागेन तुझ्या राज्याला " ॥ नांव घेतां सिंहगडाचें। राजा थरथरां कांपला ॥ " हा किल्ला उदेभान मोगलाचा। बाई उदेभान मोगलाचा ॥ जे उमराव गेले सिंहगडाला। त्यांच्या पाठी ग पाहिल्या ॥ नाहीं पुढे पाहिले। किल्ला

---

**तिरपगडा**–फांशाच्या खेळांतलें एक दान. **बेती आणि बेतीन**–फांशा-च्या डावांतलें एक दान. ५

**कनूचा**–कोणचाही. **लघुगड**–लोहगड ?. **पुरंदर किल्ल्याला। बारे पुरंदर किल्ला**–बारे म्हणजे बारीला, रांगेला. " सिंहगड हा किल्ला सह्याद्रिच्या पूर्वेकडील बाजूस आहे. पुरंदर किल्ल्याच्या टेकड्या ह्या किल्ल्यापर्यंत आलेल्या असून इ०" [किलु ३१६]. **आयुष्य मागेन इ०**–तुझ्या राज्याला हित चिंतीन **त्याच्या पाठी ग पाहिल्या। नाहीं पुढें पाहिले**–गड घ्यावयास गेलेले कधींहि परत आले नाहींत–तिकडेच मेले. **पुढा**–पुढचा भाग. **किल्ला आहे वाघाचा जबडा**–वाघाच्या जबड्यांत तोंड घातलें असतां ज्याप्रमाणें

आहे बाघाचा जबडा ॥ सत्ताविस किल्ल्यांची बारी । ह्यांतून मागावा बाईनें "॥ "नाहीं सिंहगड किल्ला दिल्या । मी शाप देईन ॥ राज्य जाळून टाकीन उभे "। "नको बाई चल माझ्या राजगड किल्ल्याला "॥ ६

बारा भोयांची पालखी । आंत बाईला बसविली ॥ राजगड किल्ल्याला । शिवाजीमहाराज जाऊन तक्तावर बसले ॥ ज्यानें वात लावूनी । जात शोधाया लागले ॥ 'सिंहगड किल्ला घेणें । मला कोणी उमराव दिसेना' ॥ प्रहर रात्रीपासूनि । बारांचा अंमल झाला ॥ प्रतापगडाखालीं । उमराठ्या गांवाला ॥ ज्यानें उमराव शोधिला । माझा तान्या मालुसरा ॥ तानाजी सुभेदार । पन्नास माणसांचा सरदार ॥ शिवाजीराजाचे राज्यास । ऐसा उमराव होणे नाही ॥ किल्ला घेईल सुभेदार । तानाजी सुभेदार ॥ खरखर लखोटा लिहीला । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ " जावें उमराठ्या गांवाला । तानाजी सुभेदाराला ॥ तीन दिसांचा वायदा जो केला । बारा हजार फौज ती घेऊन भेटावें तिसऱ्या दिवसाला " ॥ ७

मनुष्य जिवंत परत येणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें सिहगड किल्ल्यावर जाऊन तो जिकणें शक्य नाहीं. **सत्तावीस किल्ल्यांची बारी**–सत्तावीस किल्ल्यांची ओळ किंवा रांग. ६

**वात लावुनी**–वाद लावुनी (?). **वाद**–खल. वात हा शब्द वाद या शब्दाचा अपभ्रंश तर नसेल? (२) **याद**–सूचि, स्मरण. हा शब्द स्वीकारल्यास 'शिवाजीनें स्मरण करून पाहिलें कीं आपल्या इतक्या सरदारांतून या कामाला योग्य असा मर्दाना शिपाई कोण आहे ?'. जात–समुदाय [आपटे]. **जात शोधाया लागले**–आपल्या सरदारांच्या समुदायांतून निवड करूं लागले. **वायदा**–करार. येथें तीन दिवसांत १२००० फौज घेऊन भेटीस यावें असा हुकूम दिला, हा भावार्थ. **हुजरा**–हुजऱ्या. **कोलातपुराला**–पोलातपुराला–**उमराठ्या गांवाला**–मुळांत वास्तविक येथेंच आठवा चौक पुरा झाला असला पाहिजे.

" The course taken and villages passed by Shivaji in proceeding from Rajgad to Pratapgad, by his herald Pantoji in going from Rajgad to Umrath and by Tanaji and his

पंतोजी तो काका। ज्यानें लखोटा घेतला॥ ज्यानें राजगड तो सोडिला। आला येल्याचे पेठेला॥ पेठ येल्याची सोडिली। आला डोणीचे पाण्याला॥ घाट मढ्याचा उतरला। आला बिरवाडी गांवाला॥ हुजरा तेथून निघाला। आला कोलातपुराला॥ तेथून निघाला। गेला उमराठ्या गांवाला॥ सवा-प्रहर दिवस आला। तानाजी सुभेदार राजा सदरेला बैसला॥ ८

जासूद महाराजांचा पाहिला। तानाजी सुभेदार सुखी झाला॥ पोटीं रायाबा तो बेटा। सयंवर बाळाचें मांडिलें॥ काढल्या पंचमीच्या हळदी। काढलें षष्ठीचे लगिन॥ लगिन बाळाचे मांडिले। आली सिंहगडची कामगिरी॥ लगिन रायाबाचे राहिलें। ज्याने उमराव बोलाविले॥ ज्याचा शलोर तो मामा। ज्याचा सूर्याबा तो बंधु॥ येसा कणकर रुमाजी दादा। ज्याने सरदार बोलाविला॥ 'माझ्या शेलार तूं मामा। आली सिंहगडची कामगिरी'॥ दादा परपर बावाजी। ज्याने हुजऱ्या बोलाविला॥ भिषा तोड मकाजी। ज्यानें हुजऱ्या बोलाविला॥ ९

मामा बोलाया तो लागला। ऐशीं वर्षांचा म्हातारा॥ " लगिन राहिलें

forces in marching from Umrath to Rajgad are given with sufficient distinctness and I have been able.........to identify most of them.........**वेल्याची पेठ** is between Rajgad and **डोणी**. "Doni Water" further on, and only three or four miles from **मढाघाट** is a well known spring renowned for the purity and coldness of its water which is collected in a trough chiselled out of the rock. **डोणी** means a trough......**उमराठ** is a small village at the end and at the foot of a spur of the ghauts jutting out into the Mahad Taluka from a point between the Chandragad and **प्रतापगड** forts." [*B.M.* 120.] ७८

**पोटीं रायाबा तो बेटा। सयंवर बाळाचें मांडिलें**-आपल्या पोटचा जो रायाबा नांवाचा मुलगा त्याचें लग्न काढलें. २ रायाबाला जवळ घेतला होता, पोटाशीं घेतला होता, आपल्याजवळ घेऊन बसला होता. **हळदी**-लग्नाचे अगोदर सुमुहूर्तावर होणारा एक संस्कार. ९

रायबाचें तो मजला सांगावी ॥ माझ्या तानाजी सुभेदारा। जे गेले सिंहगडाला ॥ त्याचे पाठिरे पाहिले। नाहीं पुढारे पाहिले। ज्यानें आंबारे खाईला। बाठा बुरजा लाविला ॥ त्याचें झाड होउनि आंबे बांधले। किल्ला हातीं नाहीं आला ॥ सिंहगड किल्ल्याची वार्ता। काढूं नको तानाजी सुभेदारा ॥ जे गेले सिंहगडाला। ते मरूनशानी गेले ॥ तुमचा सपाटा होईल"। "असें बोलूं नकोरे मामा ॥ आम्ही सूरमर्द क्षत्री। नाहीं भिणार मरणाला" ॥ १०

मग रायाबा तो बेटा। बाबाच्या जवळ आला ॥ "ऐक ऐक माझ्या बाळा। जातों आम्ही सिंहगडाला"॥ "माझें लगिन करील कोण ?"। रायाबा पुसे बाबाला ॥ "साता नवसांचा माझा रायाबा। त्याचे लगीन मागीन ॥ भिऊं नको माझे बाळा ! जातों राजगड किल्ल्याला। जाऊन

**तो मजला सांगावी**–मज्हला, मझेला–(पुल्लिंगी) संकट, पेंच (पट). रायबाचें लग्न थांबण्यापर्यंत पाळी आली असा कोणचा पेंच किंवा संकट आलें तें मला सांग. **त्याचे पाठिरे पाहिले नाहीं पुढारे पाहिले**–ते जातांना त्यांच्या पाठी दिसल्या पण ते येतांना त्यांचीं तोंडें दिसलीं नाहींत. भावार्थ, जिकण्याकरितां गेले पण तिकडेच खपले. **बुरजा**–बुरजाला ( गडाच्या ). भावार्थ, गडाजवळ. **बाठा**–बाठ, कोय. अपाड आंबा. **आंबे बांधिले**–आंबे लागले, फळें आलीं.

**ज्यानें आंबारे खाईला। बाठाबुरजा लाविला। त्याचें झाड होउनी आंबे बांधिले। किल्ला हातीं नाहीं आला**–कोणी एकानें आंबा खाऊन त्याची कोय रुजत घातली आणि पुढें पुष्कळ वर्षांनीं ती रुजून वाढून तिला आंबेही लागले; इतका काळ गेला तरी किल्ला हातीं आला नाहीं. महिकावतीच्या बखरींत थेट असेंच वर्णन आहे. "भेसं दुर्गावर चालले. वेढा घातला. बारा वर्षें वेढा पडला; परंतु किल्ला हातीं आला नाहीं. चिंचांचें चिंचवणी खाऊन त्याच्या चिंचोऱ्या ज्या पडल्या त्या रुजून त्याचे वृक्ष होऊन त्यांच्या चिंचा केशवदेवाच्या सेवकांनीं खादल्या. पण गड हातीं येतां दिसेना." [महिका प्रस्तावना–पान ४०]. **सपाटा होईल**–नाश होईल. **सूरमर्द**–शूरमर्द. **क्षत्री**–क्षत्रिय. १०

**लगीन मागीन**–लग्नास बोलावणें करीन; **लग्न करा म्हणून** विनवीन.

सांगतों महाराजाला ॥ सात दिवसांचा वायदा । घेऊन येतों तुझ्या लग्नाला ॥ आहें मी महाराजांचा चाकर ” । लखोटा हातांत घेतला ॥ ज्यानें एका लखोट्याचे । बारा लखोटे केले ॥ धाडले कागद खोऱ्याला ॥ मोठ्या मोठ्या सरदारांला ॥ पंधरा गांवचे पारूंचे । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ दसपटिचे मोकाशी । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ उमराठ्याचे शिरके । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ नांदविचे सावंत । त्याने आपणाजवळ बोलाविले ॥ वडघरचे नाईक । त्याने आपणाजवळ बोलाविले ॥ सिलमाचे ठाकूर । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ बारा हजार फौजेला ॥ ज्याचा लखोटा पोंचला ॥ ११

'अरे फलाणाचे फलाणा । घाव घाला निशाणा' ॥ बारा हजार लोक, बिनहत्यारी । होते. सैन्य बोलाया लागलें ॥ बिनहत्यारी लोक । कसे जाऊं महाराजांचे भेटिला । ज्यानें सैन्य पाहिलें । बारा हजार लोक बिनहत्यारी

आश्वासन घेईन. **एक लखोट्याचे बारा लखोटे केले**—एक पत्र लिहून त्याच्या बारा नकला केल्या. **खोऱ्याला**—निरनिराळ्या खोऱ्यांतील लोकांना. **पंधरा गांवचे पारूंचे**—पारूंचे—आडनांव (?) 'पंधरा' गांवाचें नांव कीं काय ? पंधरा गांवचे फार उंचे बोलाविले असें तर नसेल ? उंचा—श्रेष्ठ किंवा मातबर.

**दसपटी**—" **दसपटी** is said to be the title of a group of villages in the Ratnagiri district to the south. **नांदवी** is a village in the **माणगांव** taluka of Kolaba. There is still a family of Sawants there. **वडघर** is not far from it. Shilima—village near the two last mentioned. I can throw no light on the identity of Parooche of the fifteen villages. The gondhali from whom I obained the ballad was a resident of **वडघर**" **साखर** is a village two miles from **राजगड** on the way to **सिंहगड** and **खामगांव** about 8 miles further. [*B. M. 122.*] ११

**अरे फलाणाचे फलाणा । घाव घाला निशाणा**—**फलाणा**—अमुक अमुक. **अरे अमक्याच्या अमक्या** म्हणजे अरे गोम्याच्या सोम्या कोण आहे तो, निशाणावर घाव घाला म्हणजे डंका द्याः कुचाचा नगारा करा. **निसाणू**—

आले ॥ आंकड्या कोयत्या त्या कमरेला । टापसीच्या खोळा डोईवर घेतल्या ॥ हातीं सोटा घेऊन । सलाम त्यांनीं केला सुभेदाराला ॥ माझे तानाजीची हिम्मत। म्हणून मिळाली जमात ॥ ज्यानें पेटारा उघडिला। बारा हजार रुपया बाहेर काढिला ॥ बारा हजार मनुष्यें । त्यांचे हातां-मधिं दिला ॥ " दाढि डोई रे करावी । चिरी मिरी रे घ्यावी ॥ चला महाराजांचे भेटिला। राजगड किल्ल्याला " ॥ १२

बारा हजार फौज बोलूं लागली । मनीं विचार त्यानें केला ॥ " जातो राजगड किल्ल्याला । धनगर अडविल बायकोला ॥ अन्न घेईल आमुची " । बारा हजार रुपया त्यानें मागे लावून दिला ॥ सुभेदार बोले त्या सेनेला । " बारा हजार रुपया काय केला ॥ घेतलें धनगराचे घोंगडे । त्याला मागे लावून दिला " ॥ बारा भोयांची पालखी सवारिली । तोरण पालखीला बांधिलें। पाय दिला पालखीमध्यें । हात पालखीला दिला ॥ रायाबा तो बेटा । बाबाच्या आडवा येणार झाला ॥ " माझें लगीन करिल कोण ।

नगारा. फलाणा हा शब्द फुलान या पर्शिअन शब्दावरून आला असावा. टापसीच्या खोळा डोईवर घेतल्या–पागोट्यावरून घ्यावयाच्या कांबळ्याच्या खोळा घेतल्या. माझे तानाजीची हिंमत–हें शाहीर बोलत आहे. जमात–सैन्यः समुदाय. पेटारा–खजिना. दाढी डोई रे करावी–श्मश्रु करवावी. १२

मनीं विचार त्यानें केला–त्यानें म्हणजे त्या फौजेंतील प्रत्येक सैनिकानें. धनगर अडविल बायकोला–प्रत्येक शिपायानें एकेक घोंगडें धनगराकडून स्वारीकरितां घेतलें होतें. तेव्हां सैनिक म्हणाले, आम्ही स्वारीवर गेल्यावर मागें आमच्या बायकांना धनगर घोंगड्यांच्या पैक्याकरितां तगादा लावील. त्यानें मागे लावून दिला–त्यानें–प्रत्येक सैनिकानें. त्याला मागे लावून दिला–त्याला–त्या धनगराला. मागें लावून दिला–पैसा लावून दिला. सवारिली–शृंगारिली. तोरण–माळेसारखें लांब आम्रपल्लवाचें किंवा सुंदर पुष्पांचें शुभसूचक केलेलें असतें तें. [ शाळि.] आडवा येणार झाला–आडवा येता झाला, आडवां आला. १३

तुम्ही जातां सिंहगडाला " ॥ " भिऊं नको माझे बेटा । तुझे मी येतों लग्नाला । आधीं लगीन सिंहगडचें । मग करीन रायाबाचें " ॥ १३

हुकूम ज्यानें भोयांला केला । आले नगरीचे वेशीला ॥ तोरण पालखी-चें तुटून उजव्या बाजूवर पडलें ॥ माझ्या शेलार तूं मामा । आम्ही जातों सिंहगडाला ॥ अपशकुन झाला । माझ्या तानाजी सुभेदाराला ॥ तानाजी सुभेदारानें । ह्याचा गुमान नाहीं केला ॥ गेला गांवाच्या शिवेवर । ज्याला आडवा तास गेला ॥ मग तो शेलार मामा बोलला । तानाजी सुभेदाराला ॥ " तानाजी सुभेदारा । मोहोरं बरें नाहीं होणार "॥ " राजा शिवाजीचें देणें । अढळपदीं सोनें ! " ॥ १४

" अपशकुन मानूं नये । ज्याने हर हर वाहिला " ॥ गांव उमराठें सोडिलें । पांचकर्णांचा बाजा केला ॥ आले त्या पोलातपुराला । पांचकर्णांचा बाजा केला ॥ गेले बिरवाडी गांवाला । पांचकर्णांचा बाजा केला ॥ घाट मळ्याचा वेघला । गेले डोणीचे पाण्याला ॥ गलीम तेथुनि निघाला । गेला येल्याच्या पेठेला ॥ गलीम तेथूनि निघाला । गेला राजगडच्या पोटाला ॥ बारांच्या अंमलांत । गेले किल्ल्याच्या पोटाला ॥ बारा हजार फौज चाले । धुरळा गगनास गेला ॥ १५

हिरव्या बुरजावरून । जिजाबाईनें पाहिला ॥ " माझ्या शिवाजीमहाराजा । गलीम वैरियाचा आला ॥ तोफांला आग घाला । गलीम मारावा किल्ल्या-

**गुमान नाहीं केला**–क्षिती बाळगली नाहीं. परवा केली नाही. **राजा शिवाजीचें देणें । अढळपदीं सोनें**–राजा शिवाजीचें देणें देऊन टाकल्यानें अढळपदीं देहाचें सोनें होतें. **एकाद्याचें सोनें होणें**–मरणोत्तर उत्तम गति प्राप्त होणें [ आपटे ]. भावार्थः–शिवाजीकरतां प्राण दिला तर मरणानंतर उत्तम गति मिळून मोक्ष ( अढळपद ) प्राप्त होईल. १४

**गलीम वैरियाचा आला**–आपल्या शत्रूंचा कोणी मराठा सरदार स्वारी करून येत आहे. " आम्ही गनीम शिवाजी महाराजांचे शिष्य आहों " हें नानासाहेब पेशव्यांचें वाक्य सुप्रसिद्ध आहे. मराठे स्वतःस गनीम म्हणवीत.

खाला "॥ शिवाजीमहाराजानें । गलिम नजरेनें पाहिला ॥ तो शिवाजी महाराजाचा । भगवा झेंडा ओळखिला । "माझे जिजाबाई माते । आमचा तानाजी सुभेदार आला" ॥ नांव घेतलें सुभेदाराचे । बाई गदगदां हांसली।। सेना तानाजीची पाहिली । मनांत संतोषित झाली ॥ १६

बारा हजार फौज घेऊन । सुभेदार दरवाजाला आला ॥ पहिल्या सदरे जमाडिला । सूर्या गगनीं लखाकला ॥ दुसऱ्या सदरेमधीं । कमरकमर कापुस टाकला ॥ तिसऱ्या सदरेमधीं । ज्यानें चांदवे बांधिले ॥ चवथ्या सदरेमधीं । हंड्या झुंबर बांधिले ॥ पांचव्या सदरेमधीं । महाराज शिवाजी बैसले ॥ सुभेदार सलामाला गेला । महाराजावर रुसा केला ॥ "मागचे दिवस मागल्यापरी । मोहरिल दिवस मोहरल्यापरी ॥ माझ्या बेट्याचे लगीन, तुम्ही जासूद धाडिला । तुमचा काय वाद केला ? ॥" "ऐक तानाजी सुभेदारा।

**हिरवा बुरुज**–हा रायगडावर जो उंच बुरुज आहे त्याचें नांव [शालि.] पण शाळिग्रामांची ही टीप चुकीची असावी. या पोवाड्यांत रायगडचा संबंधच येत नाहीं. १६

**पहिल्या सदरे जमाडिला । सूर्या गगनीं लखाकला**–याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. तीन अर्थ बसवितां येतात. (१) पहिल्या सदरे जम मांडिला (जमाडिला) । सूर (शूर) या गजनी लखाकल्या. **जमाखाना**–सत्रंजी, **गजनी**–" A kind of cloth. It is half silk and half cotton and has waving stripes." शूर (तानाजी) पहिल्या सदरेत आला तेथे बैठक घातली होती व गजनीचे पडदे झळकत होते. (२) **जमा दिला**–बैठक दिली, बैठक घातली. (३) पहिल्या सदरेंत बैठक घातली होती तेथें तानाजी सूर्या-सारखा शोभला. मागील पोवाड्याचें अनुकरण. **मागचे दिवस मागल्या-परी इ०**–मागचे दिवस मागच्यासारखे. आतांचे दिवस निराळे. मागें तूं वाटेल तेव्हां काम सांगितलेंस तरी हजर होत होतों व तें योग्य होतें. पण आतां तुम्हां कामें करावयाला अनेक लोक (सरदार) आहेत. असें असतां माझ्या मुलाच्या लग्नकार्यांतून मला बोलावणें पाठवून हात धरून ओढून आणल्या-सारखें कां बोलावून आणलेंस ? **तुमचा काय वाद केला**–तुमचा काय गुन्हा

आमची कामगिरी नव्हे तुम्हांला ॥ जिजामातेनें बोलाविलें "। दोघांचा जबाब जिजाबाईनें ऐकिला ॥ जिजाबाई बोलाया लागली । " मी जातीनें बाईल ॥ आतां सुभेदार येईल । माझी अबरू घेईल " ॥ १७

सर्व शृंगार नटली । घांबा अंबाबाईचा मांडिला ॥ " भले भले अंबाबाई । तानाजी सुभेदार आला ॥ इच्छेप्रमाणें होऊं दे । " सिंहगड किल्ल्याची पंचारती केली ॥ गेली सुभेदाराला ओवाळायाला । " तुझें जाऊं अलाबला ॥ तानाजी सुभेदारा । चढत्या दवलतीचें राज्य येऊं दे तुला " ॥ सुभेदाराला ओंवाळितां । त्याचा राग निघून गेला ॥ ज्याला वर्तली चिंता । ही आहे महाराजांची माता ॥ इच्या आरतीला । मी घालूं काय आतां ॥ ज्यानें मंदिल काढिला । बाईचे पायांवर ठेविला ॥ जिजाबाई बोलली । तानाजी सुभेदाराला ॥ " माझा सुभेदार शाहाणा । " हात मस्तकीं ठेविला ॥ " माग माग जिजाबाई । जें मागशील (ते) देतों तुला " ॥ " काय मागूं सुभेदाराला ? । ह्या म्हातारपणीं सिंहगड किल्ला ॥ घेऊन द्यावा मला । आयुष्य मागेन तुझ्या राजाला ॥ माझा शिवाजी थोरला माझा तानाजी धाकटा । लेकाचें वाण दिलें त्याला " ॥ १८

सुभेदार तेथुनि निघाला । आपल्या सेनेमाधिं आला ॥ शेलार त्याचा मामा । त्याला पुसाया लागला ॥ " गेला बाईच्या भेटीला । तुम्हीं काय मजकूर केला " ॥ "काय सांगूं शेलार मामा । जाणें आहे सिंहगडाला " ॥ जावें जावें बाईच्या भेटीला । बारा हजार फौज आली तुझ्याग कामाला ॥ नाहीं गाढव वळायाला । जेवण कर बारा हजारांला मग आम्ही जाऊं

केला. (२) तुम्ही जासूद धाडिला तुमचा ( हुजूरचा ): काय याद केला ? याद–आठवण. (३) कैवार, कैवाड केला (?) माझी अब्रु घेईल–अपमान करील, टाकून बोलेल. १७

तुझें जाऊं आलाबला–अलाय बलाय–दुःख, संकटः इडापिडा. तुझे दुःख किंवा इडापिडा या दूर होवोत. वर्तली–पडलीः उपस्थित झाली. १८

काय मजकूर केला–काय भाषण झाले. नाहीं गाढव वळायाला–

सिंहगडाला "॥ "माझ्या सुभेदार बाळा। तुजवर घातलें गडाचें ओझें "॥ "भला भला सुभेदारा। यावें जेवायाला॥ आहे गडाची रे वस्ती। येथें अन्नरे मिळेल॥ नाहीं मिळायाचें पाणी। जावें गुंजवन्या नदीला॥ आंघोळ करायाला। मग यावें जेवायाला "॥ १९

बारा हजार फौजेनिशीं। सुभेदार गडाखालीं उतरला॥ गडाखालीं उतरून। ज्यानें विचार काढिला॥ मग त्या शेलार मामानें। विचार काढिला॥ "भलाभला रे सुभेदारा। तीन कोस जावयालां वेळ फार झाला॥ धोपर संध्यारे करा। चला जाऊं रे जेवणाला"॥ बारा हजार फौजेतुन। एकटा सुभेदार गेला॥ गुंजवन्या नदीला। आंघोळ करायाला॥ ज्यानें आंघोळ संध्या केली। आला आपल्या फौजेमधीं॥ बारा हजार फौज घेऊन। आला दरवाज्याचे तोंडीं॥ ज्यानें सैंपाक पाहिला। बारा हजार पाट मांडला॥ बारा हजार दुरून। बारा हजार पंचपात्री॥ बारा हजार लाविला टाव। सैंपाक वाढून त्वरीत झाली(ला)॥ २०

ज्यानें सैंपाक पाहून। हुर्द ज्याचें भरून आलें॥ "आग लागो जेवणाला। माझा बाळ अंतरला"॥ ज्याचा शेलार तो मामा। बोलाया लागला॥ "भला भला सुभेदार। ऐशीं वर्षांची उमर॥ ह्यारे जिजाबाईची। एकटी वाढील रे कुणाला"॥ मामा बोले सुभेदाराला। "अठरा शाखा अठरा भाज्या॥ एक ठिकाणीं करा। जेवण वाढिले फौजेला"॥ अर्धे

उगाच गाढवं वळायला आली नाहीं. तुझे कामाकरितां तयार होऊन आली आहे. **गडाचें ओझें**–गड घेऊन देण्याचें ओझें–जबाबदारी. १९

**धोपर संध्या रे करा**–धोपरसंध्या. गुडघ्यापर्यंत पाय धुणें. भावार्थः–हात पाय धुवा. **दुरून**–द्रोण. **टाव**–पु. केळीचें पान पत्रावळ [आपटे]. ३ तो सैंपाक पाहून गायवाच्या लग्नांत जें जेवण त्यास द्यावें लागलें असतें त्याची सुखकर कल्पना मनांत येऊन व सध्यांचा प्रसंग पाहून त्याचें हृदय भरून आलें. **हुर्द**–हृदय. २०

**ऐशीं वर्षांची उमर यारे जिजाबाईची**–अतिशयोक्ति. **अर्धे उठून उभे**

उठून उभे राहिले। बारा हजार फौजेनें एकच गर्दी केली ॥ कोणी करितो पोळी पोळी। कोणी करितो खिर खिर ॥ कोणी करितो भाजी भाजी। कोणी करितो डाळ डाळ। त्यानें एकच गर्दी केली। जिजाबाई माता बहुत श्रमी झाली ॥ धांवा अवघा मांडिला। "प्रतापगडची भवानी धांव संकटाला ॥ सातारगडची मंगळाई पुण्याची पर्वती ॥ माझे पाराचे वरदानी पाव ग संकटाला"॥ पांचजणी देवी। धांवुनिया आल्या ॥ सैंपाक वाढाया लागल्या। ऐकेनीत कुणाला ॥ ज्याचा मापस्याचा आहार। त्याचा अधोलीचा झाला ॥ ज्याच्या मोहरें पांच पोळ्या ॥ त्याच्या पंधरा पोळ्या झाल्या ॥ खाववतील त्याने खाव्या। उरतील त्यांनीं गडाखालीं टाकाव्या ॥ २१

बारा हजार फौज। जेऊन तृप्त झाली ॥ तानाजी सुभेदार गेला। शिवाजिच्या मुजऱ्याला ॥ "आम्ही जातो सिंहगडाला। आमचा रायाबा संभाळा ॥ जर आलों सिंहगडाहून। लगीन करीन रायाबाचें ॥ जर गेलों तिकडे मेलों। लगीन करा रायाबाचें ॥ मज बापाची सरदारी। द्यावी रायाबा बेट्याला। दिवटी बुदलीची जहागीर। द्यावी रायाबा बेट्याला ॥ डोणगांव द्यावा पानसुपारिला। मालसऱ्याचा दंड द्यावा इनाम खायाला"॥ सुभेदार तेथून निघाला। आला बाईचे भेटिला ॥ डोईचा मंदिल काढला। बाईच्या चरणावर ठेविला ॥ "आम्ही जातों सिंहगडाला। माझ्या बेट्याला सांभाळा"॥ बाईनें पेटारा उघडिला। पांच पोषाख काढिले ॥ त्या ग सुभेदाराला दिले। 'यांतून जरि जगून (जिंकून ?) तूं आलां ॥ नवा पोषाख करिन तुला'। ज्याने पोषाख तो केला फौजेमधीं गेला ॥ २२

**राहिले**–अर्धवट उठून उठून आधाशासारखे मागत होते. **पाराचे वरदानी**–पाराची रामवरदायिनी देवी. २१

**दिवटी बुदलीची जहागीर**–मशालीचा मान (तिचा खर्च सरकारांतून मिळावयाचा). **डोंजगांव द्यावा पानसुपारीला**–डोणजगांव. **मालुसऱ्याचा दंड** [**चौक ५५ वरील मालुसऱ्याच्या** दंडाची टीप पहा]. **त्या ग सुभे-**

शेलार मामानें पाहिला। "माझ्या ऐक सुभेदारा ॥ बारा हजार फौज। आली रे तुझ्या कामाला ॥ हा पोषाक तो घ्यावा नेऊनशानी द्यावा। देशील तर द्यावा बारा हजारांला" ॥ येवढ्या जाबावरून। बाई मनीं चरकली ॥ काय सांगूं सुभेदाराला। देईन बारा हजाराला ॥ चढविन सिंहगडची पायरी। बाईनें कोठार उघडिलें ॥ 'मोहरे येर' बारा हजार तलवार। बारा हजार काढिल्या ढाला ॥ बारा हजार गुर्दा। बारा हजार सिगडा ॥ बारा हजार चौकडा। बारा हजारांना तोडा ॥ बारा हजार पोषाक। बारा हजारांना केसरी झगा ॥ घेरदार, बारा हजार। कोणी उमराव समजेना ॥ एकापेक्षां एक अधिक। दादा फौज निघाली ॥ २३

'माझे जिजाबाई माते। माझ्या बाळाला सांभाळा' ॥ तानाजी सुभेदार। बारा भोयांचे पालखीमधिं बसला ॥ सर्व सेनेला मग तो मुजरा केला। बसा बसा दादांनो ॥ आम्ही जातो सिंहगडाला। आमचा रामराम तो घ्यावा ॥ ज्यानें राजगड तो सोडीला। पांचकर्णाचा बाजा केला ॥ गलीम तेथून निघाला। साखरेच्या मुक्कामीं गेला ॥ पांचकर्णाचा बाजा केला। गलीम तेथून निघाला ॥ गेला खामगांवाला। पांचकर्णाचा बाजा केला ॥

---

**दाराला**—असें स्त्रीवाचक 'ग' कां संबोधिलें आहे? अनेक पोवाड्यांतून असा प्रकार आहे. २२

**देईन बारा हजाराला। चढविन सिंहगडची पायरी**—हरकत नाहीं १२००० फौजेलासुद्धां पोषाख देईनः पण त्यांकडून किल्ला घेतल्याशिवाय सोडणार नाहीं. **मोहरे येर बारा हजार तलवार**—पुढे ये, या बारा हजार तलवारी घे. **गुर्दा**—गुडदा, लोखंडी सोटा. **सिगडा**—सिगाडा, दारू ठेवावयाची पिशवी अगर शिंग काखेखालून बांधतात तें. [पेडा भाग ३]. **चौकडा**—कानांतला दागिना. **घेरदार**—हें झग्याचें विशेषण. **कोणी उमराव समजेना। एकापेक्षां एक अधिक**—सर्वांना एकसारखे उंची पोषाख दिल्यामुळें त्यांतील वरिष्ठ कनिष्ठ प्रतीचे लोक ओळखूं येईनासे झाले. २३

**साखरे**—हे येल्याच्या पेठेच्या जवळ राजगडासमोर मावळांत आहे

गलीम तेथून निघाला। गेला डेऱ्याच्या मुक्कामीं॥ पांचकर्णांचा बाजा केला। गलीम तेथून निघाला॥ गेला सिंहगडच्या पोटाला। तेथुनि कर्णा बंद केला॥ २४

गलीम आनंदी, बारीला। दबा दिला भला॥ माझ्या शेलार मामानें काळी घोंगडी हांतरिली। विडे पैजेचे मांडले॥ "'ज्यानें विडा उचलावा। त्यानें जावें सिंहगडच्या माहितीला॥ माहिती काढून येईल त्याला। छत्री घोडा इनाम त्यालं, बारा गांव इनाम देईन त्याला"॥ ज्या वीरांच्या वरती माना। त्यांनीं खालती घातल्या॥ हात कोणी लाविना विड्याला। तानाजी सुभेदार भला॥ त्यानें हात विड्याला घातला। विडा मंदिलीं खोंविला॥ २५

"सूर्याजी रे बंधु आरता येरे माझ्या दादा। आम्ही जातो सिंहगडाला॥ जगुनशानि आलों। लगीन करूं रायाबाचें॥ गेलों तिकडे मेलो। लगीन करा रायाबाचें"॥ तानाजी सुभेदार त्यानें पोषाख काढिला। पाटलाचा थाट केला॥ जंगल लागलें दारुण। वेळु करकरां वाजती॥ लागलें चिंबारीचें रान। लागलें आळविचें रान॥ आरीबोरीचे दारुण। वाट नाहीं रे जावयाला॥ काळोखी रात्र। वाट नाहीं रे जावयाला॥ वन धुंडाया लागला। वाट मिळेना जावयाला॥ सुमार पाहाया लागला। बारे धोंडीवर चढला॥ गेला

---

[सा.खं.४, पा.१०७]. **सिंहगडच्या पोटाला**–सिहगडाच्या घेऱ्यांत, पायथ्याला किंवा पायथ्याजवळ. २४

**गलिम आनंदी, बारीला। दबा दिला भला**–गलीम आनंदित झाला आणि त्यानें डोंगराखालीं दबा दिला. **विडा मंदिलीं खोंविला**–पैजेचा विडा उचलून पागोट्यांत खोवला. २५

**आरता**–इकडे, जवळ, अलीकडे. **चिंबारी**, आळवी, आरी–हे वृक्ष-विशेष. **सुमार पहावया लागला**–सुमार–अंदाज. माऱ्याची जागा किंवा वाट. **बारे धोंडीवर चढला**–धोंड–A large mass of stone or rock. बारीच्या म्ह. डोंगराच्या कड्या–कडप्या–दरडीवरून चढून गेला. **ग्याटाला**–

-कोळ्याचे ग्याटाला । बाराजण कोळी होते पहिल्या ग्याटाला ॥ त्यानें सुभे-दार पाहिला । "मारा मारा ह्या चोराला" ॥ सुभेदार बोलाया लागला । "भ्यालों ह्यां चोराला ॥ हे ठार मारतील मला"। "चोर असलों ठार मारा ॥ साव असलो तर काय मारतां । बायकोच्या याराला ? ॥ जरा बत्ती तुम्ही लावा । यावें मला पाहावयाला" ॥ २६

पहिल्याने सरदार पाहिला । "धन्य याची नारायणा ॥ कोण तुमचे नांव गांव । येवढे सांगावें आम्हांला" ॥ "मी साखरेचा पाटील । गेलों होतों पुण्याला ॥ मंडईच्या वाड्यांत । गेलों होतों पट्टी लावायाला ॥ जात होतों घराला । तेथे वाघाने आडविला ॥ तुमच्या आलों आश्रयाला । भलेभलेरे दादांनो ॥ घाईनें निघालों । पान खायाला विसरलों" । पान द्यावें खायाला ॥ ऐक ऐक दादा । ह्या बारा वर्षांमधीं पान खाल्ले नाहीं" ॥ बटवा खाकेचा सोडिला । यानें विडे जे काढिले ॥ बारा त्या कोळ्यांला । यानें बारा विडे दिले ॥ अफुमाजुमाचे विडे कोळ्यांला दिले । कोळी झिंगूनशानी गेले ॥ २७

बारा बाराजण कोळी । पहिल्या दरवाज्याचे गेटकरी ॥ "बारा असामींचा कोण सरदार सांगावा" । "आहे मी खंडोजी नाईक बारांचा सरदार" ॥ "ऐक खंडोजी नाईक । तुमची तैनात सांगावी" ॥ "तीन रुपयांची तैनात । मला सरदाराला मिळती" ॥ ह्यानें कंठी जी काढिली । दिली खंडोजी नायकाला ॥ ज्याने तोडा जो काढिला । दिला विठोजी

श्री० राजवाडे यांनीं या शब्दावरून ही ओळ क्षेपक ठरविली आहे; परंतु सदर शब्द म्याटाला असा असावा. मूळ शब्द मेटे, मेट. (फा०) पु०—चौकी, पहाऱ्याची जागा, घस्त असा आहे. म्याट आणि ग्याट यांचा घोंटाळा होणें संभवनीय दिसतें. राजव्यवहारकोशांतहि हा शब्द सांपडतो. **साव असलो तर इ०**—आपण एकायास दम भरतांना म्हणतों "मी तुझा बाप लागून गेलों आहें" किंवा "हा पहा मी तुझा नवरा येथें उभा आहें" ह्या धर्तीचीच थोडी अधिक ग्राम्य दमबाजी आहे. **यार**—मित्र, स्नेही, जार. **जरा बत्ती तुम्ही लावा**—जरा उजेड करून तुम्ही पहा. २६

**पट्टी लावणें**—सरकारी धारा भरणें. २७

कोळ्याला ॥ चौकडा काढिला । दिला मालोजी कोळ्याला ॥ बारा कोळ्यांला बारा। ऐशा वस्ता त्यानें दिल्या ॥ कोळी फितूर ते केले। "ऐक ऐक पाटीलबोवा ॥ मोठ्या वस्तू आम्हांला जिरतील कशा। काम सांगा आम्हांला" ॥ "काम तुम्हांला सांगेन। भाक द्यावी रे मजला" ॥ इमान ज्याने दिलें। कोळ्यांनीं इमान दिले ॥ "मी आहें कोणाचा कोण। नांव सांगतों रे तुम्हाला ॥ राजा शिवाजीचा उंबराव। आहे मी तानाजी सुभेदार ॥ पन्नास माणसांचा सरदार। आहे मी, एकला ॥ आलो सिंहगडच्या माहितीला। लांबी रुंदी सांगा मला" ॥ २८

नांव घेतां शिवाजीचें। कोळी खालती बसले ॥ "ऐक ऐक तानाजी सुभेदारा। शिवाजीचे कुत्रे नाहीं येत सिंहगडाला" ॥ ज्याने वस्ता घेतल्या। त्याने सुभेदाराच्या पुढे ठेविल्या ॥ "घे रे सुभेदारा। आल्या वाटेने जावे राजगडकिल्ल्याला" ॥ "ऐक खंडोजी नाईका। इमान तूं रे मला दिले ॥ द्यावी सेजेची बाइल। पण इमान देऊं नये" ॥ येवढ्या जाबावरून। कोळी सांगायाला लागला ॥ "ऐका सिंहगडची माहिती। तिनकोसांचा आहे बा घेरा ॥ दिडकोसाची आहे बा रुंदी। आहे अठराशे पठाण सिंहगडाला ॥ आहे उदेभान मोंगल। दीड गाई दिड शेळी सवामण तांदूळ वेळेला ॥ अठराजणी बिब्या। आहेत त्याच्या पलंगाला ॥ घेतो तेल्याची पहार। मणगटावर घालतो ॥ सरी करून घालतो। बिबिच्या गळ्यांत ॥ चांदवडी रुपया। दोहों बोटांनीं तोडितो" ॥ २९

"आहे बाच्छायाचा हत्ती। त्याचें नांव चंद्रावळी ॥ एक बाच्छायाचा हत्ती। करिल सब दुनियेची माती ॥ उदेभानाचा प्रधान। आहे सिद्दी हिलाल ॥ एक शेळी अर्धा गाई। आदमण तांदुळ त्याचे एका वेळेला ॥ नउजणी बिब्या। सिद्दी हिलालाच्या पलंगाला ॥ बाराजण होते लेक। उदे-

---

**गेटकरी**–मेटकरी असें पाहिजे. **भाक**–इमान, शब्द, वचन. २८

**मनगटावर घालतो**–दोन मनगटांनीं दाबून टाकतों. २९

भानाच्या पेक्षां भारी ॥ उगवत्या बाजुला । कडा आहे डोणागिरी ॥ तेथें आहे सोलाची जागा । डोणागिरीच्या कड्याला " ॥ ३०

" बसावें सरदारांनो । जातों आपल्या गोटाला " ॥ बारा जण कोळी चरण धरुन । तुम्ही काय सांगतां आम्हांला ॥ त्या मर्दाला पाहुन । कोळी रडाया लागले ॥ " शिवाजीच्या राज्यांत कोणीं । तुजसारखा सरदार नाहीं पाहिला । " भिऊं नको रे दादांनो । हा किल्ला हातीं आला तर ह्या किल्ल्याची सरदारी देईन तुम्हांला ॥ हजाराची तैनात देईन बारा असामी-ला " ॥ तानाजी सुभेदाराने दिला हातचा लखोटा । त्या खंडोजी कोळ्याला ॥ ३१

सुभेदार तेथुनि निघाला । आला आपल्या फौजेला ॥ ज्याचा शेलार तो मामा । त्याच्या पुढे धांवत आला । " तुम्ही गेला सिंहगडाला । नवस केला बहिरोबाला ॥ माझा सुभेदार येऊं दे । बारा बकरे देईन तुला ॥ तुम्ही चला हो किल्ल्याला । जातो नवस फेडायाला " । " ऐक ऐक शेलार मामा बारा द्यावयाचे ते चोवीस देऊं । पण किल्ला येऊं दे हाता-ला " ॥ " बहिरोबा आहे ओंगळ । त्याचा नवस पाहिजे फेडला " ॥ " ऐक ऐक शेलार मामा माझ्या महाराजाचें देणें । अढळ पदीं सोनें ॥ नाही आम्ही बहिरोबा जाणित । साडेतिनशें देव पाणी रांजणांत भरतात ॥ ऐसा शिवाजीमहाराजा । आहे तळकोंकणचा राजा " ॥ ३२

चला माझे दादांनो । हुकूम सैन्याला केला ॥ बारा हजार फौज गेली । कल्याणदरवाज्याला ॥ ज्यानें पेटारा उघाडिला । काढिली यशवंत घोरपड ॥ सात शेर शेंदुर । तिच्या मस्तकीं थापिला ॥ भांग मोत्यांचा भरला । चरणीं

**माझा सुभेदार येऊं दे**—भेद काढावयास गेला आहे तो सुखरूप परत येऊं दे. **ओंगळ**—रागीट, कडक, घाणेरडा, अमंगळ. **बहिरोबा आहे** इ०—हें शेलारमामाचें भाषण. ३२

**भांग**—एक तऱ्हेचा मोत्यांनीं गुंफलेला दागिना. ह्या दागिन्यांत मोत्यांचा

मस्तक ठेविलें ॥ सांखळी कमरेला बांधिली । यशवंत घोरपड ज्यानें किल्ल्याला लाविली ॥ अर्ध्या किल्ल्याला गेली । घोरपड माघारी परतली ॥ आउक्ष तानाजीचें समजली । घोरपड फिरली ती सुभेदारानें पाहिली ॥ "सत्ताविस किल्ले मीं घेतले । घोरपड कधीं मागें नाहीं फिरली" ॥ राग आला त्या मर्दाला । "मी आहें मराठ्याचा पोर नाहीं भिणार मरणाला ॥ एक हात टाकीन । अठरा खांडोळीं पाडीन, शिळ्या भाकरीसंगें खाईन" ॥ त्या मरणाचे धास्तीनं । सात वेढे जी फिरली नखे रोंऊन बसली ॥ ३३

"जावें जावें शेलारमामा सोल बघायाला" । ज्यानें टिचकीनें मारिली ॥ सोलाला जोरानें लागली । काळी घोंगडी जी सोडली ॥ ज्यानें बटवा जो सोडिला । बारा विडे काढिले ॥ "कोण शूर मर्द आहे क्षत्री । त्यानें विडा उचलावा, हात सोलाला घालावा" ॥ ज्या वीरांच्या वरती माना । त्यांनीं खालीं घातल्या माना ॥ सुभेदार बोलतो । "भरा बायकांच्या बांगड्या" ॥ एवढ्या जाबावरून । राग आला त्या सैन्याला ॥ मोहिता म्हणतो धार माझी । धाग म्हणतो धार माझी ॥ चवाण म्हणतो धार माझी जाधव म्हणतो धार माझी । गायकवाड म्हणतो धार माझी । शिरके म्हणतो धार माझी ॥ माहाडिक म्हणतो धार माझी । बारा हजार फौजेनें एकच गर्दी केली ॥ ३४

एक सर डोक्यांतील भांगाच्या रेघेवर पडतो. **सात वेढे**—वेढा—वळसा, चक्कर, फेरा. ३३

**ज्यानें टिचकीनें मारिली**—टिचकी रे मारिली. (?) **टिचकी**—टचका, **टचका**—हिसका ( आपटे ). **म्हणतो धार माझी**—(१) म्हणं (म्हणे) तोधा (तोदा) र ! माझा. तोदा (फा.)—लक्ष्य, निशाण. प्रत्येक सैनिक ईर्षेनें "ही माझी शिकार आहे—( मी आधीं सोलावरून चढणार )" असें म्हणूं लागला. (२) धार—तरवार. या शब्दावरूनच धारकरी म्हणजे शिपाई असा शब्द बनला. प्रत्येक जण शिपाई "माझ्या तरवारीची हिम्मत आहे" असें म्हणून ईर्षेनें सोलाला इतरांआधीं हात घालूं लागला. ३४

अरे फलाणाचा फलाणा। घाव घाला निशाणा ॥ गस्त आली मोगलांची। त्यानें कानोसा घेतला ॥ हांक मारिली गेटाला (मेटाला)। खंडोजी माय्काला ॥ "किस्का गलबला मेरे भाई। एवढा सांगावा आम्हांला"॥ खालून कोळ्यानें जबाब दिला। "जंगलमें धनगराचा वाडा ॥ त्यामध्ये बडा वाघ शिऱ्या। गांईकी बचडीं खाते ॥ रांड पोर किचाड करते। वरती सुखी राज्य करा"॥ ३५

सुभेदार बोलतो सेनेला। "पहिली सोल शिवाजीमहाराजाची ॥ दुसरी सोल अंबाबाईची। तिसरी सोल तानाजी सुभेदाराची"॥ पट्टे घेतले तोंडामधीं। सोल धरली हातांमधीं ॥ आपल्या बेताचे माणुस पन्नास मोजीले। सुभेदार गडावर चढले ॥ पन्नास कमी बारा हजार फौज। खालीं होती, त्याने एकच गर्दी केली ॥ सूर्याबा जो बंधु। त्याने एकच गर्दी केली दादा वरती गेला (म्हणून)। बारा हजार फौजेने हात सोलाला घातला ॥ तीन पुरुष वरती गेले। सोल मधींच तुटली ॥ पन्नास कमी बारा हजार। फौज धरणीवर पडली ॥ ३६

सुभेदार तो वरती जाऊन। त्याला दोन घटका झाल्या ॥ माझ्या "शेलार तूं मामा। कां वेळ लागला फौजेला तूं जावे बघायाला"॥ सोल पाहून मामा। धोतरांत ×× ला ॥ "काय सांगूं सुभेदारा। सोल ते तुटली आली मरणाची वेळा" सुभेदार बोलाया लागला। "नाहीं सोल रे तुटली माझं आयुष्य तुटलें ॥ ऐक ऐक शेलार मामा। माझ्या रायाबा बेट्याला रामराम सांगा"॥ ३७

शेलार मामा बोलतो। "ऐक ऐक मी तुला एक तोंड सांगतों ॥ आहे अठराशें फौज। किल्ल्याला अठराशें पठाण ॥ आहे उदेभान मोगल। आहे सिद्दी तो हिलाल, आहे चंद्रावळी हत्ती ॥ उडी टाका किल्ल्याखाली।

**बचडीं**–वांसरें, पोरें. **किचाड**–गलबला. ३५

**तीन पुरुष वर गेले**–तीन पुरुष उंचीइतके वर गेले. ३६

म्हणजे पहायाला नको "।। " भला भला शेलार मामा। उडी टाकिली तरी प्राण जायाचा ।। पन्नास माणसाचा सरदार। सत्तावीस किल्ल्यांचा मी सरदार, नाहीं भिणार मरणाला " ।। शूर मर्दाची कीर्ति। धांवा केला अंबाबाईचा ।। प्रतापगडची भवानी। पाव माझ्या नवसाला ।। सातारची मंगळाई। मग पुण्याची पर्वती ।। तुळापुरची (.तुळजापूरची) भवानी। माता पाराची वरदानी ।। ३८

पांच देवी पुढें धांवत आल्या। गळ्यांत कवड्यांच्या माळा ।। हात मारिला पाठीवर। "भिऊं नको सुभेदारा ।। यश तुझ्या तरवारीला "। बळ देवीचे सांपडलें ।। जोर हातींचा चढविला। मागची पुढची आशा सोडली ।। खुन डोळ्यावर चढला। " ऐक माझ्या शेलारमामा ।। जेथे सुभेदाराचा पटा। तेथे पन्नासांचा पटा ।। जेथें सुभेदाराचा मान। तेथे पन्नासांची मान चलचल माझ्या मामा " ।। ३९

गेले पहिले दरवाजाला। ज्यानें दिंडीनें पाहिला ।। होती आरबाची जात। होती मोगलाची जात ।। होती मुसलमानाची जात। रुफु माजुम खाल्ली ।। मदनमस्त झाली। ज्याने डाव जे मांडिले ।। कोण बारा बारा बोलती। कोण ग्यारा रे बोलती ।। ह्यानें एकच गर्दी केली। खणाखण वाजिती ।। व्हाळ आसुदाचे वाहती। रक्त अंगाला लागले खुन डोळ्याला चढला ।। कोण करितो खुदा खुदा। बुधा धरणीला पडला ।। कोण करितो अल्ला अल्ला। खालीं काला जो पडला ।। ४०

**भलाभला**—भले भले, वा! वा! ३८

**जोर हातींचा चढविला**—त्याच्या मनगटांत अधिक शक्ति घातली. भावार्थ, त्याला दुप्पट बळ आलें. ३९

**ज्यानें दिंडीने पाहिला**—ज्यानें दिंडीतून पाहिलें. जात—पहाऱ्यावर अरब, मोंगल, मुसलमान इ. जातींचे लोक होते किंवा पहाऱ्यावर अरब, मोंगल इत्यादिकांचा जमाव (जात—जमाव) होता. **एकच गर्दी केली**—एकाएकीं जोराचा हल्ला चढविला, लांडगेतोड सुरू केली. **व्हाळ**—वहाळ, पाट. **आसुदाचे**—अशुद्धाचे, रक्ताचे. **बुधा**—योद्धा (?). **काला**—रक्तमांसाचा चिखल. ४०

पहिला दरवाजा मारिला। गेला दुसऱ्या दरवाजाला ।। काळोखी रात्र, पार-। रात्रीचा अम्मल झाला ।। दुसऱ्या दरवाजाला होता। तिनशें पठाण, ज्यानें दिन दिन वाहिला ।। मुसलमानी लोक दादा। बिनफिकिर होते, नाहीं गलीमाची माहित ।। तानाजी सुभेदार, जैसा ठाणांत। वाघ लोटला, सेनांत।। पांच पट्टयाचा मारा केला। सवाघटकेमधिं तिनशें पठाण कापिला।। गेला तिसऱ्या दरवाजाला। होता चारशें पठाण ।। दिन दिन ज्यानें वाहिला। चारशे पठाण कापिला ।। एकंदर हिशेब नऊशे मनुष्यांचा झाला ।। ४१

"ऐक शेलार मामा। गलीमाचा हिशेब घ्यावा ।। एक ह्याने कमी। नउशे पठाण झाला" ।। त्यांत बोंब्या निघून गेला। उदेभान मोंगला-पाशीं गेला ।। अठरा तो पेले अफूचे। उदेभान एकटा प्याला ।। भंगीच्या जुड्या। आणि अफुच्या वड्या खाल्या ।। उदेभान मोगल मगरमस्त झाला। आठरा पलंग ज्यानें बिब्यांचे सवारिले ।। ज्यानें लुंगिज सोडिली। ज्यानें खुंटीवर ठेविली:।। चोन कराया चालला। तो म्होरें बोंब्या अवचित गेला ।। "मेरे उदेभान मोगला। आग लागो तुझ्या चोन्याला। सिंहगड किला डुब होया। भाई नऊशें पठाण कापिला ।। काळोखी रात्र, नाहीं गलीमाची माहित। नऊशें पठाण काप्या" ।। "* * हमारे पर बैठ्या। आम्ही नाही

**मारिला**-जिंकला, काबीज केला, सर केला. **पार**-प्रहर. **ठाणांत**-गुरांच्या किंवा बकऱ्यांच्या वाडग्यांत. **सेनांत**-सैन्यांत. **एकंदर हिशेब नउशें मनुष्याचा झाला**-शाहीराच्या मतानें तीनशें अधिक चारशें मिळून नऊशें होतात! ४१

**बोंब्या**-हाकारा करणारा नोकर. गुजराथी शब्द. (बोंब्या ह्या शब्दाचा मोल्स्वर्थसाहेब यांच्या कोशांतच अर्थ सांपडतो तो असा. An official person at Gaya who when a company of pilgrims arrives walks before them beating his mouth). **भंगीच्या**-भांगेच्या. **लुंगिज**-मूळ शब्द लुंगी. लंगोटी, लंगोट, पंचा इ० **चोन**-चैन, विलास. **डुब होया**-बुडाला, हातचा गेला. **माहित**-माहिती (मराठे किती आहेत तें

चोऱ्याला सोडताया ॥ जा बालेकिल्लयाला। जाऊन सांगा हत्तीच्या महाताला ॥ अठरा घागरी कुसुंबा पाजा हत्तीला। अठरा अफूचे ते पेले ॥ अठरा माजुमाच्या वड्या, पांच पटे त्या (ग्रा) सोंडेला। चंद्रावळीचा हत्ती जाऊंदे कल्याणदरवाज्याला ॥ ४२

सुभेदारानें काय केलें। सुभेदार बोलतो मामाला ॥ "नउशें पठाण कापिला। माझा जीव श्रमी झाला बटवा सोडा पान खायाला" ॥ शेलार तो मामा शिणल्यावर "दादा पोट रे फुगले"। "भला भला माझ्या मामा ॥ बाराच्या ठोक्याला। किल्ला सई करून देतों तुला ॥ पान खाऊंदे मला"। पान जो खातांना मोहरें हत्ती धांवत आला ॥ "किस्का उमराव। मेरा भाई सांगावा मजला" ॥ "उंबराव शिवाजी महाराजाचा। मी आहें तानाजी सुभेदार" ॥ "नउशें पठाण कोणी काट्या, सांगावे मजला"। "नउशें पठाण आम्ही काट्या" ॥ महाता बोले सुभेदार। "कुणब्याच्या पोरा काय तुझा एवढा तोरा ॥ जंगलामधीं तूं रे जावें। लकडी तोडावी त्याची मोळी बांधावी जाऊन बनियाला ओपावी ॥ ज्यानि धानोऱ्या आणाव्या। रांडा पोरा रे घालाव्या ॥ एवढ्या बड्या बड्या सरदारी एवढ्या बड्या तल्वारी। कोठ होत्या तुझ्या बाला ?" ॥ सुभेदार बोले महाताला। "एक भुसाऱ्याच्या पोऱ्या जाऊन ताग तूं पेरावा ॥ गोणी तादुक वळावा। यावें

समजत नाहीं ) **पांच पट्टे ग्रा सोंडेला**—पूर्वी हत्तींना लढाईचें शिक्षण देत असत. ही पद्धति पुष्कळ पुरातन काळापासून चालत आलेली असावी. पारसनिसांचें 'पेशव्यांचे माहूत' हें टिपण पहा. (२) [ हरि ब ६१ ]. ४२

**बटवा सोडा इ०**—हें वर्णन विचित्र दिसतें. पानतंबाखू खाण्याला त्यांना अवसर मिळाला हें जरा अद्भुतच आहे. जणुं कांहीं शत्रुपक्षाकडील लोक कांहींच हालचाल करीत नव्हते. **दादा पोट रे फुगलें**—इतक्या लोकांची आहुती घेतली, कीं त्यानें भरपूर जेवण मिळावें तसें मला झालें आहे. **सई**—सर. **लकडी**—लाकडें. **काटया**—काटला, मारला. **धानोऱ्या**—धान्य-विशेष. **गोणी तादुक वळावा—गोणी**—धान्य भरण्यासाठीं तागाची केलेली. **तादुक**—गोणपाट. काठीचें जसें काटुक तसें तरटाचें तादुक.

कुणब्याच्या वाड्याला ॥ भात रुपयाचें घ्यावें। तुझ्या रंडीनें भरडावें ॥ कणी कोंडा आपण खावा। तांदूळ बनियाला ओपावा ॥ एवढ्या बड्या बड्या अंबाऱ्या एवढ्या बड्या तल्वारा। कोठें होत्या रे मुसंड्या तुला ? ॥ ४३

सलाम सलाम मेरे भाई। पहिला हात येऊंदे रे तुझा" ॥ पैलवान हत्तीवर बसला। शिवी दिली हत्तीला ॥ "तेरी रंडीका नर। ह्याला पाहून घ्यावा" ॥ हत्ती सात पावलें मागें गेला। पांच पट्याचा मार केला ॥ "संभाळ संभाळ मेरे भाई। आतां संभाळ सुभेदारा ॥ हा हत्ती बाच्छाईचा।" "मी रे आहे महाराजाचा" ॥ पहिला हत्तीनें डोईवर मारा केला। सुभेदार भला, हत्तीच्या पोटाखालून निघून गेला ॥ हत्तीनें मारा केला। बंदुकीचा गजभर चिरा जो तुटला ॥ वरून पहिलवान बोलला। "सहाही पाताळ गाडिला!" ॥ राग आला सुभेदाराला। सात हात जमीन उडाला लाथ मारिली महाताला ॥ अल्ला म्हणून बोलला। शब्द हत्तीनें ओळखिला ॥ हत्तीनें उलटा पाठीवर मारा केला। ह्या वैऱ्याला मारायाला, ॥ सुभेदार सराईत भला। कावा नदरेचा राखिला ॥ सळ पट्याचा सोडिला। नऊ तुकडे सोंडेचे नऊ सांखळीचे ॥ अठरा खांडोळीं पाडिलीं। सुभेदार खालीं उतरला ॥ पन्नास माणूस लागले हत्तीला भोकाया। शेलार मामा धांवत आला ह्याचा "भोचु दे रे बो*" ॥ ४४

**कुणब्याच्या**–शेतकऱ्याच्या. ४३

**पइलवान**–पीलवान, महात. **पांच पट्याचा मार केला**–या पोवाड्यांत 'पांच पट्याचा मारा केला' 'पांच कर्णोचा बाजा केला' असे शब्दप्रयोग आले आहेत. या 'पाच' शब्दाचें वैशिष्टय काय तें कळत नाहीं. **बंदुकीचा गजभर चिरा जो तुटला**–(चिरा–पागोटें, मंदील). 'बुंदकीचा गजभर चिरा जो तुटला' असें पाहिजे. बुंदकी म्ह. लहान ठिपका किंवा बुट्टा (आपटे) ज्यावर बुट्टे किंवा ठिपके होते असा नानाजीचा फेटा, पट्याच्या माऱ्यानें गजभर कापला गेला. **कावा नदरेचा राखिला**–हत्तीचा मोहरा ओळखला. **भोकाया**–भोकणें–खुपसणें. **भोचूं दे**–भोसकूं दे. ४४

तिथून बोंब्या निघून गेला। " मेरे उदेभानभाई आग लागो तुझे चोन्याला ॥ सिंहगड किल्ला डुब होया " । " हम चोन नाहीं सोडताई ॥ जा पिराच्या दरग्याला । सांगा सिद्दी हिलालाला ॥ पांच हत्यारें घेऊन जावें । कल्याणदरवाजाला " ॥ सिद्दी हिलाल भला । ज्याच्या नऊजणी बिब्या पलंगा निजायाला ॥ चोन कराया लागला । लाखोटा मोगलाचा दिला ॥ सिद्दी हिलालानें । त्यानें वाचून पाहिला ॥ सिंहगड किल्ल्याला गर्लीम बहुत आला । तुम्हीं जावें लढायाला ॥ सिद्दी तो हिलाल पांच पोषाग नटला । दोहीं हातात दोन पट्टे नऊजण बिब्या हारोहारीनें उभ्या केल्या ॥ ज्यानें पहिला हात टाकिला । अठरा खांडोळीं पाडिलीं ॥ आसुदाचा टिळा त्याला । उमराव तेथून निघाला सुभेदारापाशीं आला ॥ ४५

" सलाम सलाम मेरे भाई । किस्का तूं उमराव ऐसा सांगावा मजला " ॥ " उमराव आहे शिवाजीचा । मी तानाजी सुभेदार " ॥ " ऐक कुळंब्याच्या पोरा । पागोट्याच वेढे घाल गळ्यामधीं शरण यावे सरदाराला " ॥ सुभेदार त्याला बोलता झाला । " घ्यावे तोडांत तृण, घ्यावी डोईवर वहाण, शरण यावें सुभेदाराला ॥ पहिला हात येऊंदे तुझा सिद्दी तूं हिलाला " । पहिला हात जो टाकिला सात हात जमीन उडाला ॥ हातांमधीं हात त्यानें अठरा टाकिला । सुभेदार गुंजभरं•नाहीं ढळला ॥ " अरे सिद्दी तूं हिलाला । दुसरा हात

**चोन्याला**–चैनीला, विलासाला. **पागोटयाचे वेढे घाल गळयामधिं**–तोंडांत गवत घेण्याप्रमाणें हा एक शरण आल्याचा संकेत आहे. **बत्तीस वेढे पागोटयाचे । बत्तीस वेढे मंदिलाचे । बेंबीपावेतों ।चिरीत नेला**–सुभेदारानें एवढ्या जोरानें वार केला कीं, पागोटयाच्या आणि रुमालाच्या बत्तीस वेढ्यांना कापून शिवाय बेंबीपर्यंत चिरून गेला. पण एकाच वेळीं पागोटें व रुमाल घालणें कसें शक्य आहे ? मराठे लोक लढतांना पागोट्या-वरून व गळयाखालीं हनवटीवरून एक वस्त्राची जाड पट्टी ल्यावळीत असत, असे वर्णन व अशीं चित्रेंहीं आहेत. तोच अर्थ येथें अभिप्रेत दिसतो. **हातामधीं हात त्यानें अठरा टाकिला (?)** बुध्या–योद्धा. ४६

येऊंदे तुझा " ॥ सुभेदार बोलला " संभाळ संभाळ मेरे भाई। आतां हात येतो सुभेदाराचा ॥ नऊ हात जमीन उडाला। मारा सुभेदारानं केला ॥ बत्तीस वेढे पागोट्याचे। बत्तीस वेढे मंदिलाचे ॥ बेबीपावेतो चिरित नेला। खुदा खुदा रे बोलला बुध्या धरणोवर पाडिला ॥ ४६

बोंब्या तेथुनि निघाला। उदेभानापाशीं गेला ॥ " मेरे उदेभान भाई आग लागो तुझ्या चोन्याला। सिंहगड किल्ला डुब होया ॥ नऊशे पठाण कापिला। बाच्छाईचा हत्ती कापिला ॥ सिद्दी हिलाल कापिला। हमकु किल्ला डुब होया " ॥ " हम चोन नाहीं सोडताई। जावें जळमंदिराला ॥ आहेत बारा-जण छोकरे। जावें कल्याणदरवाजाला लढायाला " ॥ पत्र मोगलाने लिहिले। धाडले बाराजण छोकऱ्यांला ॥ " कल्याणदरवाज्याला। तुम्हीं जावें लढाईला" ॥ बाराजण भाऊ, केला मरणाचा पोषाग, पांच हत्यारं घेतली। तेथुन निघाले आले सुभेदाराजवळी ॥ " सलाम सलाम मेरे भाई। किस्का तू उमराव सांगावे आम्हांला " ॥ " उमराव शिवाजी महाराजाचा। आहे मी तानाजी मालूसरा " ॥ " सुभेदार भाई। पहिला हात येऊंदे तुझा "। " तुम्हीं आहां मोगलाचे बाळक। पहिला हात येऊंदे तुमचा " ॥ बाराजण लडक्यांनीं। चोविस हात जे टाकिले ॥ सुभेदार भला। नाहीं तो जाग्यावरून हालला ॥ सुभेदार भला। त्याने धांवा अंबेचा मांडला ॥ अंबाबाई तूं पावगे माझ्या नवसाला। नऊ हात जमीन उडाला ॥ बाराजण लडक्यांची। चोवीस खांडोळीं पाडिलीं ॥ ४७

तेथून बोंब्या निघून गेला। उदेभानाच्या जवळ आला ॥ " मेरे उदेभान भाई आग लागो ह्या चोन्याला। सिंहगड किल्ला डुब होया ॥ नऊशे पठाण काट्या। बाच्छाईचा हत्ती काट्या ॥ सिद्दी हिलाल काट्या। तुम्हारे

---

**मरणाचा पोषाख**–केशरी पोषाख. रजपूत लोक अत्यंत निकराचे संग्रामाचे वेळीं केशरी पोषाख करीत हें प्रसिद्ध आहे. **मोंगलांचे बाळक**–मोंगलांची अवलाद. ही चीड आणण्याकरितां दिलेली शिवी. **लडका**–मुलगा, पुत्र. ४७

**बारा लडके काट्या !"** ॥ **लडक्याचा तो जाब ह्याच्या कानावरतीं गेला ।** उदेभान मोगल ज्या बिबीXXXबसला होता तेथून उठेनासा झाला ॥ लेंकांचा तो दुःखाचा शब्द । ज्याच्या उरामधीं बसला ॥ खरखर लखोटा लिहिला त्या बोब्यापाशीं दिला ॥ " जाऊन सांगा उमरावाला । उदेभान तो मोगल पळून पुण्याला गेला ॥ झेंडा लावा सिंहगडाला । यश तुमच्या तलवारीला "॥४८

उदेभान तेथुन निघाला । आला पिराच्या दर्ग्याला ॥ फोडल्या कापसाच्या उर्दा । ओतले तेलाचे बुधले ॥ ज्यानें आग जी लाविली । ज्याने उजेड तो केला ॥ गलीम किती मोजून पाहिला । पन्नास माणूस ह्याच्या आले हिशोबाला ॥ उदेभान माणूस पाहून । त्याच्या भुजा ज्या थरारल्या ॥ पन्नास माणूस माझी आंबाडाची भाजी मोगल मागे परतला । गेला आखाडखान्यामधीं ॥ पायीं तुमानी सुरवारा घातल्या । अठरा खंडीचे किनखाप त्याने आंगांत घातलें ॥ बारा आतबडीचा जोडा । त्यानें पायां-मधीं घातला ॥ ज्यानें वाघनखे चढाविलीं । जिरेटोप डोईस घातला ॥ अठरा जागीं बिब्या । हारोहारीनें उभ्या केल्या ॥ सळ पट्याचा सोडिला ।

**जाब**–लेकांचा तो दुःखाचा शब्द म्ह० आपल्या मुलासंबंधींची दुष्ट वार्ता. [जाब– ( अरबी जवाब् पु०) उत्तरः म्हणणें ]. **उरामधीं बसला**–हृदयाला बोंचला किंवा दुःख देता झाला; शोक उत्पन्न करता झाला. **जाऊन सांगा** इ०– सदर भाषण पुत्रशोकानें, त्राग्यानें केलेलें दिसतें. ४८

**उर्दी**-ठिक्याः–पिराजवळ ऊद जाळून त्याचा अंगारा प्रसादार्थ घेतात ती. **थरारल्या**–त्याला स्फुरण आलें. **अखाडखाना**–शस्त्रांचा अखाडा. **तुमान**–सैल विजार **सुरवारी**-तंग विजार. **अठरा खंडीचे किनखाप** इ०–अठरा खंडी वजन होईल इतके कपडे, असले जाड मोठे कपडे. सर्वच बकासुरी कारखाना. **आतबडी**-मूळ शब्द अधवड किंवा अधोड–मेलेल्या ढोराचें अर्धें कातडें, (सध्यां चांभार मोठें अखंड कातडें अशा अर्थी तो शब्द उपयोजितात.) अठरा खंडी वजनाचे कपडे घालणाऱ्या राक्षसाला १२ गुरांच्या कातड्याचा जोडा लागावा हें ठीकच. **वाघनखें घातलीं**–मागील पोवाड्याचें अनुकरण. **सळ**–बंद.

अठरा बिन्यांचीं खांडें केलीं ॥ आसुदाचा टिळा ल्याला। गामणीगाई जो काटली ॥ गेला पिराच्या दरग्याला। सवामण उद जाळिला ॥ एका हातीं गुरदा एका हातीं घेतला पट्टा। दोपट्टयाचा मारा केला। आला कल्याणदरवाज्याला। ज्यानें सलाम वाहिला ॥ दादा नउशें पठाण। ज्याने दिमतीला घेतला ॥ ४९

"सलाम सलाम मेरे भाई। उंबराव किस्का सांगावा मजला" ॥ "उंबराव शिवाजीमहाराजाचा। आहें मी तानाजी सुभेदार"। उंबराव मोगलानें पाहिला। "ऐसा भला आहेस रे दादा ॥ तुझ्यासारखा भाई पाठीला असावा। खाणं घालावं वजिराला वजीर पाळावा बाजूला ॥ सोड महाराजांची चाकरी। कर माझी मोगलाची चाकरी ॥ हवाला देतों सिंहगडाचा। हजार रुपयांची तैनात देतों बसून खायाला" ॥ सुभेदार बोले मोगलाला। "सोड सिंहगडाची गादी ॥ चल माझ्या राजगड किल्ल्याला। चलावे महाराजाचे भेटीला ॥ राजगड किल्ल्याचा हवाला। उदेभाना देतों तुला" एवढ्या जाबावरून। घुस्सा आला मोगलाला ॥ "पहिला हात येऊंदे तुझा"। "उदेभान हात येऊंदे तुझा"॥ तानाजी सुभेदार धांवा अंबेचा मांडिला। धांवधांव अंबाबाई ॥ अंबा त्या बाईनें घोस गाईचा पाहिला। देवी मागें जी सरली ॥ मोगलासमोर उभारिला। गर्भगाळ कोसळला ॥ नऊ हात जमीन उडाला। मोगलाला माराया गेला ॥ हातामधीं हात

**दोपट्टयाचा**–दोन हातांतील दोन पट्टयांचा (?). **दिमतीला**–मदतीला. समागमें. ४९

**तुझ्यासारखा भाई पाठीला असावा इ०**–तुझ्यासारखा वीरपुरुष आपल्या पक्षाला असावा किंवा ठेवावा. **खाणं घालावं वजिराला। वजीर पाळावा बाजूला**–तुझ्यासारख्या सरदाराला तैनात सरंजाम देऊन आपल्या पक्षांत सामील करून घ्यावा. **हवाला**–हवालदारी; किल्लेदारी. **घोस**–**गोस, घोस**–मांस (पट). **गर्भगाळ कोसळणं**–गर्भगळित होणें. **मोगलासमोर उभारिला। गर्भगाळ कोसळला**–याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. **अंबा त्या बाईनें**–मागें उदेभानानें गाभणी गाय काटली असा उल्लेख आहे.

ज्यानें अठरा टाकिले। गुंजभर नाहीं जो सरला॥ "ऐका उदेभान मोगला। पहिला हात माझा झाला॥ दुसरा हात येऊंदे तुझा"। सुभेदार बोलतो "मामा ऐक निर्वाणाची वेळा॥ लग्न करा रायाबाचें। दोहों हातांचा मुजरा सांगा शिवाजीमहाराजाला"॥ उदेभान मोगल बारा हात जमीन उडाला। वचक सुरबाईचा दाविला मारा कैफाचा केला॥ पन्नास वेढे पागोट्याचे पन्नास वेढे मंदिलाचे बेंबीपावेतों चिरित नेला। सुभेदार धरणिला लोटिला॥ ५०

पन्नास माणूस, त्यानें रोजन्या-। मांडिल्या, आमच्या सुभेदार धन्या॥ आम्हाला संभाळील कोण। आणलेस वाघाच्या रानाला॥ मग तो शेलार मामानें। मुर्दा मांडीवर घेतला॥ उदेभान बोलायाला लागला। दादा आपल्या सेनेला॥ "हात मी नउशें पठाण। पन्नास माणूस घेऊन जावें॥ कल्याणदरवाजाला। आऊत द्यावी ह्यांची बुरजाला"॥ लोक खळखळा रडती कैसे झालें नारायणा। दिन दिन पट्यानें वाहिला मारायाला लागला॥ सुभेदार मेलेला मुरदा इरयानें झाला। ऐंशीं वर्षांचा तो मामा त्याच्या आंगांत संचारला॥ यश आले मोगलाला। मोगल मागे जात होता॥ मग

त्या गाईचें मांस व गर्भ कापलेला पाहून (कोसळलेला पाहून) देवांच्या अंगावर भीतीनें शहारे आले (?) **वचक सुरबाईचा दाविला। मारा कैफाचा केला**-वचक सुरा बाईचा दाविला आणि कैफाचा मारा केला म्ह० दारूच्या आणि कैफाच्या अंमलांत अत्यंत जोराचा वार उदेभानानें केला.॰ ५०

**रोजन्या मांडिल्या**-रोजना-शोक: रडणें (आपटे) "नारायण मारियिला ढासळल्या माळ्या। रोजना करिल्या त्या पागच्या निळ्या घोड्या" **दादा**-शाहीर श्रोत्यांना उद्देशून म्हणत आहे. **हतमी नऊशें पठाण पन्नास माणूस घेऊन जावें**-हत मीं-येथें मी. येथें मी आहें. नऊशें पठाणांनीं या पन्नास मराठ्यांना कल्याण दरवाज्याकडे हांकून न्यावें व तेथील बुरुजावर कत्तल करावी. **सुभेदार मेलेला मुरदा इरयानें झाला**-सुभेदार (इरयानें) वर्यानें म्ह. पराक्रम करून मारला गेला, मेलेला मुरदा झाला. **दिन दिन पट्यानें वाहिला। मारायाला लागला**-दीन दीन अशी रणगर्जना करून पट्टा फिरवूं

तो सुभेदाराचा पट्टा। शेलार मामानें घेतला ॥ "फीर ग मर्दाचे लंडे फीर ग मर्दाचे लंडे"। मोगल मागे पहात होता ॥ दोही हातांनीं कचका दिला बेंबीपावता चिरित नेला ॥ खुदा खुदा बोलला। बुधा धरणीला पाडिला ॥ ज्याने भाव जो आंतला सोडिला मग तो नऊशें पठाण होता उदेभानाचा। ह्यांची लढाई चालली ॥ ह्याचे पन्नास माणुस ह्याच सुभेदाराचे। उदेभान मोगलाचे नऊशे पठाण राहिले ॥ नऊशे पठाण। मार माराया लागले ॥ त्यामध्यें एकटा शेलार मामा लढनेवाला। पन्नास माणसांतून पंचवीस माणूस पडला ॥ ५१

नऊशे पठाण बोलाया लागला। चला कल्याणदरवाजाला ॥ आहुत देऊं पंचवीस माणसांची। संकट पडले अंबाबाईला ॥ प्रतापगडची भवानी। उभी राहिली सांकड्याला ॥ पिवळें पातळ नेसली। गळीं कवड्यांची माळा ॥ संकट पडले देवीला। यश जातें शिवाजीमहाराजाचे ॥ देवीनें आपल्या हातून दरवाजा उघडिला। पन्नास कमी बारा हजार फौज किल्याला घेतली ॥ ज्याचा सूर्याबा तो बंधु। मामाला पुसाया लागला ॥ " शेलार रे

लागला. हरहर वाहणें असा शब्द या पोवाड्यांत दोन तीन वेळां आलेला आहे. उ०-" अपशकून मानूं नये। ज्यानें हरहर वाहिला।" **लंडे**-भित्रे भागूबाई. मर्दाचे लंडे (?) **लंडी**-दांडगा मनुष्य किंवा भेकड मनुष्य मर्दाचे लंडे हा, मर्दाचे लवंडे याचा तर अपभ्रंश नाहीं ? लवंडी-दासी, हलकट स्त्री. **कचका दिला**-जोराचा घाव घातला. **ज्यानें भाव तो आंतला सोडिला**-**भाव सोडणें**-भुतानें झाड सोडणें; भुतानें पछाडलेल्या मनुष्यास सोडणें. येथें उदेभानास खवीस किंवा पिशाच असें म्हटलें आहे. २ ज्यानें भाव सोडला इ०-ज्यानें प्राण सोडला असाही अर्थ होईल. भाव अस्तित्व (आपटे). **मार माराया लागले**-मारामारी करूं लागले. लढाई करूं लागले. ह्याचे म्ह० तानाजीचे पन्नास माणूसच होते व उदेभानचे ९०० पठाण होते ते यांच्यावर निकराचा हल्ला करून गेले. ५१

**सांकड्याला**-संकटकाळीं मदतीला उभी राहिली. **आहुत**-आहुती

मामा। माझा दादा रे कुठें आहे बंधुरे कुठें आहे "॥ शेलार मामा रे बोलला। जरी मेलासे बोललों तर सारी फौज बसेल॥ "सुभेदार आहे बाले सद्रेमधीं। मी आहें कल्याणदरवाजाला॥ नऊशे पठाण मारावा। मग जाऊं दादाच्या भेटीला "॥ मग त्या बारा हजार फौजेनें। ज्यानें हर हर वाहिला॥ एका एकाच्या मागे तिघे तिघे लागले। नऊशें पठाण कापिला॥ पांढरें निशाण उपटले। भगवा झेंडा शिवाजीचा॥ पांच तोफा जों मारिल्या। यशाच्या तोफा जों मारिल्या॥ त्या तोफांचा आवाज। गेला राजगड किल्ल्याला॥ शिवाजी महाराज बोलला। माझ्या सुभेदारानें सिंहगड सही केला॥ शिवाजी महाराजानें। यशाच्या दहा तोफा सोडिल्या॥ ५२

ज्याचा सूर्याबा तो बंधु। शेलारमामाला बोलला॥ चला जाऊ दादाच्या भेटीला॥ चला जाऊं दादाच्या भेटीला। शेलार मामानें सूर्याबा बंधूचे। पटे घेतले आपल्या हातामधीं॥ गेले मुर्द्याचे जवळ। वरून शेला उघडिला॥ मुर्दा दादाचा पाहिला। मुर्दा सुभेदाराचा पाहिला॥ "माझ्या सुभेदार दादा लग्न रायाबाचें राहिलं। ह्याचे लग्न करील कोण "। बारा मेटांचे (मेटाचे) कोळी निघाले। आले सुभेदाराजवळ॥ "आमचा सुभेदार धर्नी। आम्हांला तैनात देईल कोण आम्हाला हवाला देईल कोण "॥ सुभेदार बोलायाला लागला। "भिऊं नका रे दादांनो ह्या दादाचे वचन पुरे करीन॥ जातो राजगड किल्ल्याला। सागतो शिवाजी महाराजाला सिंह-गडचा हवाला देतो तुम्हाला "॥ अबिर गुलाल। ज्याचे मुर्द्यांत भरला॥

**सारी फौज बसेल**–सारी फौज कच खाईल किंवा बेहिम्मत होईल. **बाले सदरेमधीं**–बाले किल्ल्यांतील कचेरीच्या जागीं. बाले किल्ल्याच्या कोटांत. **पांढरें निशाण**–मुसलमानांचें निशाण. **पांच तोफा जों मारिल्या**–गंजीला आग लावली या रूढ समजुतीपेक्षां निराळी माहिती. कदाचित् तोफा मार-विण्यांत अफझलखानाच्या वधाच्या पोवाड्याचें अनुकरणहि असेल. ५२

**सुभेदार**–येथें सूर्याजी. **अबिर गुलाल ज्याचे मुर्द्यांत भरला**–अबीर

दोरा रेशमाचा घातला। मुर्दा पालखींत ठेविला ॥ पंचवीस कमी बारा हजार लोक सगळे घेतले। वाजतगाजत मुर्दा गेला राजगड किल्ल्याला ॥५३

आले किल्ल्याचे पोटाला। पांचकर्णांचा बाजा केला ॥ अवाज महाराजानें घेतला। सुभेदार किल्ला घेऊन आला ॥ सुभेदाराची पालखी। नेली राजाचे सदरेला ॥ शिवाजी महाराजाने। मुर्दा पाहिला सुभेदाराचा ॥ शिवाजीचे राज्यांत ऐसा। उंबराव होणें नाहीं सुभेदारासारखा ॥ जिजाबाई धांवत आली। पालखी पाहिली ॥ गर्व आला सुभेदाराला। 'नाहीं आला भेटायाला ॥ बाई पालखीपाशीं आली। बाईने शेला उघडिला ॥ मुर्दा सुभेदाराचा पाहिला। आंग धरणीला टाकिलें ॥ "सुभेदारासारखा। ऐसा क्षत्री होणार नाहीं ॥ बाजू गेली महाराजांची। बाजू गेली शिवाजीची" ॥ मग त्या शिवाजीनें चाकराचे साठीं। डोईला रुमाल बांधला ॥ बारा भोयांचे पालखींत। सुभेदाराचा मुर्दा जो घातला ॥ वाजतगाजत आणला उमराठ्या गांवाला। ह्याचे लेकाचे भेटीला. ॥ पांचकर्णांचा आवाज। रायाबा बेट्यानें केला (ऐकला ?) ॥ रायाबा बोलतो। बाबा आले माझे लग्नाला ॥ पालखीपाशीं धावत आला। मुर्दा बाबाचा पाहिला ॥ "साता दिवसांची मुदत। केली माझे लगनाला ॥ बाबा माझे लगीन करील कोण। यजमान होईल बाबा कोण? मंडपांत मिरवेल कोण? ॥ आग लागो ह्या लग्नाला। कां माझा बाबा निघून गेला" ॥ शिवाजी राजानें। मुलगा पोटासंगं धरिला ॥ "भिऊ नको माझे बेटा। शिवाजी महाराज तो गेला, तान्हाजी सुभेदार आहे तुला" ॥ बारा दिवसांचें सुतक धरलें। शिवाजी महाराजांनीं सुभेदाराचें ॥ ५४

मग त्या तेराव्या दिवसांत। संयवर बाळाचें मांडिलें ॥ ज्याने मंडप घातला। मंडपाला तोरण बांधिलें ॥ पहिली नवरी रद्द केली.। कडाशीचे

**—एक सुगंधी फूल, किंवा अबीर—चंदनादिकांचें चूर्ण, बुक्का.**—त्याच्या प्रेतावर बुक्का गुलाल उधळला. **दोरा रेशमाचा घातला**—रेशमानें त्याचें प्रेत बांधिलें. ५३

**डोईला रुमाल बांधिला**—अशौचदर्शक खूण म्हणून. ५४

**पहिली नवरी रद्द केली**—कारण तानाजीच्या मृत्यूमुळे ती वाईट पाय-

दरकराची केली रायाबा बेट्याला ॥ सयवर केलें रायाबाचें । रायाबा पुढें तो बसविला ॥ बापाची सरदारी । दिली रायाबा बेट्याला ॥ दिवट्या-बुदलीची जहागिर । दिली रायाबा बेट्याला ॥ डोणजं तें गांव । दिलें पानसुपारीला ॥ मालुसऱ्याचा दंड । दिला इनाम खायाला ॥ रायाबा तो बेटा ज्यानें संगतिला घेतला । आले राजगड किल्ल्याला ॥ ज्याने पंतोजी तो काका । ज्याने हुजऱ्या बोलाविला ॥ "पंतोजी तो काका । जावें पुण्याचे शहराला ॥ मंडईच्या बाजारीं । आहे तुळशीदास शाहिर ॥ घेऊन यावें त्याला । राजगड किल्ल्याला" ॥ तुळशी दास शाहिर । त्याने सदरेला आणिला ॥ डफ तुणतुणे घेऊन । मग त्या तान्हाजी सुभेदाराला ॥ शिवाजी महाराजांचा । पोवाडा कटिबंध केला ॥ हजार रुपयाचा तोडा । हातामधीं घातला त्या रे तुळशीदास शाहीराच्या ॥ शूरमर्दाचा पोवाडा । शूरमर्दानें ऐकावा ॥ शिवाजीचे राज्यांत । ऐसा उमराव होणें नाहीं ॥ पोवाडा गात्याला उद्राण ऐकत्याला घडो पुण्य । सत्य युगींचा पोवाडा कलयुगीं वर्तला ॥ सत्तावीस किल्ल्यांचा सरदार निघूनशानी गेला । ऐसा पुनः होणे नाहीं ॥ ५५

---

गुणाची ठरली म्हणून. **रायाबा पुढें तो बसला**-नवरीच्यापुढें बसविला. **मालुसऱ्याचा दंड**-दंड पु० निमोळता व क्रमानें उतरतां जो लांबट पूर्वतावयव तो. ( शास्त्री कोश ) narrow road along a hill declivous on both sides. 2 The curved ridge or projection running from top to bottom of a mountain. 3 A spur or off branching of a mountain. ( मोल्स.) वाकी गांवाच्या वरच्या डोंगरावर मालुसऱ्याचा दंड आहे. डोंगरावर दोन्ही बाजूला पाणलोट असून वरून जाण्यायेण्याला वाट आहे. त्यासच वरील नांव आहे. अगदीं जवळचा मोठा गांव वाकी व दंडावर वस्ति कोळी लोकांची. आसपास मालुसऱ्याचे वंशज आहेत. **मग त्या तानाजी सुभेदाराला । शिवाजी महाराजांचा पोवाडा कटिबंद केला.** (?) **गात्याला**-गाणाऱ्याला. **उद्राण**-उद्धरण, मुक्ति. **पोवाडा**-मोठेपणा,कीर्ति,पराक्रम. **कलयुगीं**-कलियुगीं. **वर्तला**-घडून आला. ५५

# बाजी पासलकराचा—पोवाडा

हा पोवाडा यमाजी शाहिरानें रचला आहे. यमाजी हा बाजी पासलकराचा आश्रित असावासें वाटतें. कारण पोवाड्याचे शेवटीं तो म्हणतो "सांगेन मर्दाची ख्यात बंदा बाजीचा म्हणवितो."

शिवाजीला जीवाभावानें मदत करणाऱ्या बाळपणच्या तीन संवंगड्यांपैकीं बाजी पासलकर हा एक होय असा आजपर्यंत एक समज होता पण तो घालवून, तो शिवाजीचा बाळमित्र असणें शक्य नाहीं; कारण दोघांच्या वयांत फारच अंतर होतें—शिवाजीच्या बाळपणीं बाजी पासलकर हा बराच वृद्ध होता, असें सिद्ध करण्यापलीकडे इतिहाससंशोधकांना फारशी माहिती उपलब्ध झालेली नाहीं. अर्थात् बाजी पासलकराची जी हकीकत या पोवाड्यांत आली आहे ती पडताळून पाहण्याजोगा ऐतिहासिक कागदपत्रांचा सांठा उपलब्ध नाहीं हें सांगणें नकोच.

पण तेवढ्या कारणाकरितां या पोवाड्यांत आलेली हकीकत काल्पनिक मानणें बरोबर होणार नाहीं. उलट ती बरीच विश्वसनीय मानणेंच युक्त होईल. कारण एक तर पोवाड्याची भाषापद्धति व दुसरें शाहिरानेंच शेवटीं दिलली साक्ष. तिसरेंही एक कारण असें आहे कीं, तानाजीच्या पोवाड्याप्रमाणें काल्पनिक पौराणिक थापा मारण्याची सवड असतांही त्यानें तसा प्रकार केलेला नाहीं. कै० राजवाडे यांनीं आपल्या चौथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत एके ठिकाणीं हेंच मत प्रकट केलें आहे. ते म्हणतात: "आक्वर्थ व शाळिग्राम यांनीं छापलेल्या पोवाड्यांपैकीं तीन पोवाडे शिवाजीसंबंधानें आहेत. पैकीं अफजलखानाचा व बाजी पासलकराचा पोवाडा अस्सल आहेत. अर्थात् ते ते प्रसंग झाल्यावर लागलेच लिहिलेलें आहेत."

सदर पोवाडा वाचून त्यावरून निघणारी माहिती थोडक्यांत सुसंगत देणें आवश्यक आहे. कारण पोवाड्यांतील एखादा चौक आगेमागें झालेला आहे, कांहीं चरण गळालेले आहेत आणि सामान्यतः चरणाचरणांतून फारसा संदर्भ किंवा संगति दिसत नाहीं.

बाजी पासलकर हा आठ गांवांचा देसाई कुरड्डू येथें राहात असे. हा गांवांतील महाजन होता. त्याचा रुबाब मोठा पाहाण्यासारखा असे. त्याला अंबाई व बिबाई नांवाच्या दोन बायका होत्या. घरांत शंभरांवर नोकर-चाकर होते. पंक्तीला नेहमीं पुष्कळ मर्दाने रजपूत असत.

बाजीजवळ एक उत्तम घोडी होती. तिचें नांव यशवंता. ती विजापुर-करांना पाहिजे होती. पण " त्या बाजीचा धाक थोर." शेवटीं जावळीस कांहीं धाडसी लोकांनीं ती घोडी मिळविण्याचा चंग बांधला. त्या लोकांत सोनु दळवी व बाजी पासलकराचा जांवई मकरतराव हे मुख्य होते. जावळीचा चंद्रराव मोरे तेव्हां विजापुरास गेला होता. त्याचेकडून विजापुरच्या बाद-शहाची अनुमति त्यांनीं मिळविली व पांचशेंपर्यंत जमाव घेऊन ते लोक कुरड्डू-जवळ आले व गांवाभोंवतालीं असलेल्या दाट कळकीच्या बेटांत लपून बसले.

चांगयान धोब्याला स्त्रीचा वेश देऊन भेद काढण्याकरितां पाठविलें व बाजी पासलकर वगैरे मंडळी निःशंकपणानें जेवणाखाण्यांत गुंतली आहेत, बाजीबोवाचे राव राणूजी, राव कृष्णाजी, येल्या माग वगैरे मर्दाने जवळ परगांवीं गेले आहेत अशी पाळत राखून त्यांनीं वाड्यावर हल्ला केला.

सोनू दळव्याच्या सैन्याच्या हुलीनें कुरड्डू गांवाजवळ रानांत चरणारीं हरणें भीतीनें उलट वाड्याकडे धावलीं व दरवाजे मोकळे दिसतांच आंत शिरलीं. हा सर्व प्रकार बुरुजावर टेहळ्या होता त्यानें पाहिला आणि आरडाओरड केली. आरडाओरडा होऊन दरवाजे बंद करीपर्यंत दळव्यांचा एकच रगडा झाला. व वाड्यात मोठी चकमक उडाली. या चकमकींत अनंत्या खुरचुला नांवाचा एक पोरका मुलगा बाजी पासल-करानें पाळला होता–चांगला पहिलवान होता, तो इमानाला जागला व " आज मुंढ्याच्या चिंध्या होती। तीन पायल्या हरभरे बाजीबोवाच्या कामा येती " असें म्हणून तो सोटा घेऊन धावला व त्यानें पुष्कळ लोकांना ठार मारले. शाहीर तर म्हणतो " पांचशें सोन दळवी वाडयाबाहेर घातले." या चकमकीत मकरतराव जांवयानें खुद्द सासऱ्यावरच हल्ला चढविला पण " सराईत होता बाजी। ज्याच्या मारा संभाळिला। मेणासुद्धां फटकारा दिला। जांवई धरणीला पाडला."

एवढ्यांत धावाधाव सुरू झालीच होती. येल्या मांगाला बातमी कळून

तो आला त्या वेळीं. सोनू दळव्याचें व अनंत्याचें झुंज सुरू होतें. नुसत्या एका सोट्यानिशीं अनंत्या, घोड्यावर बसलेल्या सोन दळव्याशीं विषम स्थितींत लढत होता. इतक्यांत येल्यानें येऊन मागून सोन दळव्याचें शीर उडविलें. अशा रीतीनें सोनू दळवी व मकरतराव जावई हे म्होरके पडल्यानें शत्रूची दाणादाण झाली.

## ऐतिहासिक माहिती

बाजी पासलकर — हा पुणे जिल्ह्यांतील मुसेखोऱ्याचा देशमुख. मावळां तील देशमुखांचे वतनी तंटे मोडण्यात हा प्रमुख असे. त्यानें अनेकांचे वतनी व इतर तंटे तोडल्याचे उल्लेख आहेत. फलटणचा वणगोजी नाईक निंबाळकर, मावळांतील ह्या देशमुखाची मर्जी संभाळून असे. एकाद्या देश-मुखाचा खून वगैरे होऊन त्याचीं बायकामुलें देशोधडीस लागल्यास बाजी पासलकर त्यास आश्रय देत असे. देशमुखास कर्जाबद्दल किंवा चांगल्या वर्तणुकीबद्दल जामीन राहून त्यांच्या उपयोगी तो पडत असे. अशा इभ्रती चा बाजी पासलकर हा मावळा देशमुख शिवाजीस आढळताच त्यास त्यानें हाताशीं धरलें. बाजीचें पूर्ण नांव बाजी वल्लद बापूजी यशवंतराव पासलक असें होतें. 'यशवंतराव' हा किताब होय. ज्या प्रमुख मंडळीचें शिवाजीस चांगलें पाठबळ होतें; त्यांपैकीं बाजी हा एक होय. शिवाजीचें विजापुर-कराशीं युद्ध सुरू असतां एके समयीं (१६६०) बाजी पासलकर यास वाडीच्या सावंताचा बंदोबस्त करावयास सांगितलें होतें. तेथें त्यानें चांगला पराक्रम केला. त्याचें नांव सन १६४० तें १७१७ पर्यंत आढळतें. त्या-नंतर तुळाजी व रामाजी यांचीं नांवें देतात. हे बहुधा त्याचे पुत्र असावेत.

—मराठी रियासत, भाग १.

शाळिग्राम खालील माहिती देतात—बाजी पासलकर हे आठ गांवचे देशमुख असून रायगडाखालीं छत्रीनिजामपुराजवळ कुर्डू या नांवाचे खेड्यात रहात असत आणि खिंडीचें नाकें संभाळीत. यांचेजवळ यशवंता घोडी. गजली फिरंग आणि अजगर ढाल हे तीन जिन्नस अप्रतिम असत. त्यात घोडी तर एक अपूर्व रत्नच होतें. ती घोडी लाटण्याकरितां विजापुरकरांनी काय काय खटपटी केल्या त्याचें वर्णन या पोवाड्यांत आहे.

"सांगेन मर्दाची ख्यात बंदा बाजीचा म्हणवितों" या शाहीराच्या उद्गारावरून यमाजी हा बाजी पासलकराचा आश्रित असावासें दिसतें.

# बाजी पासलकर

## ३

### [ शाहीर–यमाजी ]

[ चाल—"लक्षुमि गर्वे निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती"—प्रभाकर.]

पाहिलें नमन माझें देवा नारायणाशीं । दुसरें नमन माझें सद्गुरूच्या चरणाशीं ।। जाउलीच्या मैदानीं बैसले शिपाई मजलशीं । मिळून बारा मराठे कधीं न येती जाउलीशीं ।। "येथून जोहार पाठवा मोऱ्या चंद्रावाला । बादशाहा देईल आज्ञा तरी मी जाईन कुरडुंला ।। लाटिन त्या बाजीची घोडी भेटवीन तुम्हाला" । पैंजेचा विडा सोनू दळव्यानें घेतला ।। १

कुरडुंच्या मैदानीं नांदे बाजी पासलकर । आठगावचा देसाई त्या बाजीचा धाक थोर ।। दंडाएवढी मिशी बाजी पाच्छाई महाजर । आनंत्या खुर्चुला घरीं शिपियाचा पोर ।। आनंत्या नित्यनेम उठतो दंड सवाशें काढितो । तीन म्हशींचें दुभतें एकला आनंत्या जेवितो ।। आलिया मर्दाचे फटकारे संभाळितो । सांगेन मर्दाची ख्यात बंदा बाजीचा म्हणवितो ।। २

**मजलस**–(आरबी स्त्री.) सभा; बैठक. **मिळून बारा मराठे कधीं न येती जाउलीशीं**–जमाव करून जावळीवर चालून येण्याची मराठ्यांची प्राज्ञा नव्हती. **जोहार**–रामराम; नमस्कार. **येथून जोहार पाठवा इ०**–यावरून यावेळीं चंद्रराव मोरे विजापुर दरबारीं असावा. **लाटणें**–पळविणें. **बाजी पाच्छाई महाजर**–(महजर) आरबी. पु. करारनामा; हुकूमनामा. परंतु हा अर्थ जुळत नाहीं. महजरच्या ऐवजीं–महाजन तर नसेल? महाजन–An hereditary officer in a village, Kasba or city. His business is to superintend the trade and to assist in collecting the tax from certain classes of traders [मोल्स.] महाजन–शहर, गांव येथील एक अधिकारी आहे [शास्त्री कोश.] **दंड**–जोर. **सवाशें**–सहाशेंच असावयास पाहिजे! कारण तीन म्हशींचें दूध एकटा पचविणार! **आलीया मर्दाचे फटकारे संभाळितो**–हल्ला करणाऱ्यांचे हल्ले किंवा वार झेलतो किंवा परतवितो. **ख्यात**–कीर्ति; ख्याति. **बंदा**–सेवक. २

पांचशें पायदळ खासा सोनू दळवी चालला । दळव्याचा भार कुरङ्कुं-च्या मैदानीं गेला ॥ हांटल्या कळकी जाळया, दळवी जाळयांत लपला । चांगयान धोब्यानें रूप अस्त्रीचें घेतलें ॥ कानीं नाहीं बाळया (म्हणून) वरून सारफळया त्याला । कपाळीं नाही कुंकू ज्यानें विटकर उगाळिला ॥ नयनीं नाहीं काळज ज्यानें काजळ घातला । घागर चुंभळ घेऊन कुरङ्कुंच्या पाणवठ्यावर गेला ॥ ३

रावराणूजी रावकृष्णाजी गेले पारणें सोडायाला । आमचा येल्या मांग बायकोला मूळ गेला ॥ खंड्यायान महार शिंदी पिऊनि पडला । आमचा बाजीबोवा नेटका जेवाया बैसला ॥ बाजीच्या पंक्तीला चवदा रजपुत जेविती । उठल्या अंबाई धाकली बिबाई वाढिती ॥ एका आगळे बंदी शंभर मंदिरात वागती । चागयान धोब्यानें पाळत घेतली पुरती ॥ ४

मकरतराव जांवाई ज्याच्या वाड्यांत शिरला । बुरजीं होत्या टेहळ्या धाडधाडसा बोलला ॥ उठल्या अंबाई उंच दरवाजा लाविला । धांवली

---

**भार**–सेना, समूह. **हांटल्या**–मोडक्या (?) **दळवी**–दळव्याचें सैन्य. **अस्त्रीचें**–स्त्रीचें, अस्तुरीचें. **सारफळया**–सरफळी (स्त्री) सर्पाच्या आकाराचें भूषण [ आपटे ]. **सारपा**–( पु० कोंकणी ) काष्ठ तासलें असतां किंवा तोडिलें असतां लहान लहान ढलप्यांचा समुदाय जमतो तो [ शास्त्री ]. " कानीं नाहीं बाळया म्हणून वरून तो सारफळ्या त्याला." सरफळी हें कर्ण-भूषण आहे. लांकूड रंधल्यानंतर जी पातळ सुरनळी निघते तशापैकी कांहीं घेऊन त्याचा त्यानें सरफळीसारखा उपयोग केला. कुंकवाऐवजीं विटकर उगाळून लावणें किंवा काजळाऐवजीं कोळसा घालणें या पुढच्या विक्षिप्त क्रियांशीं हा अर्थ जुळून दिसेल. ३

**पारणें** सोडणें–उपवास सोडणें. **मूळ जाणें**–बोलवावयाला जाणें. **शिंदी**–शिंदीपासून तयार केलेली दारू. **नेटका**–नुकताच [ मोल्स ]. पुढें मल्हारराव होळकराचा पोवाडा पहा " मल्हारजी होळकर नेटके करित बसले देवपूजा " **एकाआगळे बंदी शंभर**–एकशेंएक चाकर. ४

**टेहळया**–टेहळणी करणारा. **धाडधाडसा बोलला**–ओरड केली. **उंच**

बिंबाई परस दरवाजा लाविला ॥ पांचशें दळव्याचा ज्याचा एकच रगडा झाला । अंबाईनें बिंबाईनें ज्यानिं उरावर हाटिलें ॥ "ह्याच जांवायाने आमचे घर ग बुडविलें । यासुद्धां तिनदां येऊनि घरावर घातले" ॥ बिंबाई बोलली "रावराणूजी नाहीं घरीं । आमचा येल्या मांग शंकर अंतरला दूरी ॥ असता खेड्या महार (तर) फोडता दळव्याची कोटगिरी । त्याच्या बायकोला देल्यें गळ्यांतील बिलगिरी" ॥ ५

रोही रानांत चरले आज बाजीच्या आखरा आले । फरक देखिली जागा, रोही वाड्यांत शिरले ॥ 'मारीन मुसळा घाय' आनंत्या शिंपी याचा बोल । बाहेर मकरतराव दळवी गदगदां हांसले ॥ मकरतराव बोलला 'अरे तूं शिंपीयाच्या पोरा । तीन पायल्या हरबऱ्यास रे घेतला खराखुरा ॥ मारीन फिरंगीचा हात एवढा का रे करशी तोरा । तुझ्या पूर्वजांस उणे, झडकरी येई तूं सामुरा' ॥ आनंत्या बोलला 'आज मुंढ्याच्या चिंध्या होती । तीन पायल्या हरबरे बाजीबोवाच्या कामा येती' ॥ ६

**दरवाजा**–पुढील मोठा दरवाजा [शालि]. **परस दरवाजा**–मागील दरवाजा. **रगडा**–गर्दी. **ज्यांनीं उरावर हाटिलें**–त्यांनीं ऊर पिटून घेतले. **घरावर घातले**–घरावर हल्ला केला. **यासुद्धां**–ही वेळ धरून. **शंकर अंतरला दूरी**–देवासारखा साहाय्यकर्ता येल्या मांग दूर राहिला. **कोटगिरी** (?) **बिलगिरी**–गळ्यांतील दागिना विशेष [ शालि ]. पण कोशांतून हा शब्द सांपडत नाहीं. शालिग्रामांचा अर्थ कल्पनेचा दिसतो. ५

**रोही**–एक प्रकारची हरणाची जात. **आखर**–(न)गुरांचे गोठण, विश्रांति-स्थान [ आपटे ]. गांवची सीमा [ मोल्स ]. **मारीन मुसळा घाय**–मुसळाचा घाव मारीन. **मुसळ**–मोठा सोटा [आपटे]. **फरक देखिली**–फट, अवकाश, जागा. **तीन पायल्या इ०**–म्ह. तुला तीन पायल्या दाणे देऊन विकत घेतला, तुझी किमत काय ? हा खुर्चुल्याच्या कुळीबद्दल टोमणा आहे. आई-बापांचा पत्ता नाहीं अशा पोरक्या तुला दारावर दाणे देऊन विकत घेतला. **फिरंगीचा हात**–तरवारीचा वार. **तुझ्या पूर्वजांस उणें**–तूं बदअवलादीचा आहेस. **सामुरा**–सामोरा, समोर. **आज मुंढ्याच्या चिंध्या होती इ०**–

कास कासली, वरून ज्यानें कंबरबस्ता केली। आनंत्या खुर्चुला याची धुम रे द्वारा गेली ॥ रागयानें क्रोधें किल्ली कवाडा मोडिली। उंच द्वाराचे दळवी ज्यानें परसद्वारा नेले ॥ चवदा यानें मुडदे ज्यानें वाड्यामध्ये केले पांचशें सोन दळवी वाड्याबाहेर घातले ॥ ७

त्यानें म्हून घोडा दटाविला बाजीच्या अंगावर घातला। आणिक फिरून 'संभाळ मामा' बाजीबोवाला बोलला ॥......................... । सराइत होता बाजी ज्याचा मारा संभाळिला ॥ मेणासुद्धां फटकारा दिला जांवई धरणीला पाडला। होती अजगर ढाल जांवई ढालेनें दाबिला ॥ ८

येल्याची म्हातारी येल्याशीं सांगूं गेली। "काय बसलास येल्या तुझी कुरडूं मारून नेली" ॥ आनंत्या बोलला "हांग आला माझा भाई। काय पाहतोस दादा हाणतो घोड्याच्या रे पायीं ॥ मप नाहीं हत्यार मुसळाचा

आज बाजीबुवाच्या कामीं मी येईन. तीन पायल्या हरभरे मजकरितां बाजीबुवास द्यावे लागले, त्याचें सार्थक आज त्याच्याकरितां लढून मी करीन. मुंढा-खांदा. ६

**कास कासली**-कास कसली. -**वरून कंबर बस्ता केली**-कंबरबस्ता केली, कंबर बांधिली; बद्धपरिकर झाला. **धूम**- धांव; उडी. **रागयानें**-रागं यानें-रागानें यानें. **चवदा यानें चौढाळणें**-To intermingle confusedly and thus to disorder and spoil [मोल्स]. एकदम गर्दी करून ज्यानें म्हणजे त्यानें पुष्कळ लोक तोडले. चवदा यानें हा चौढाळ्यानें या शब्दाचा अपभ्रंश होय. ७

**घोडा दटाविला**-घोड्यास इशारा केला. **मामा**-सासऱ्या या अर्थी संबोधन. **सराईत**-अनुभवी, कुशल. **मेणासुद्धां**-म्यानासुद्धां म्ह. तरवार बाहेर न उपसतां तसाच म्यानासुद्धां. **अजगर ढाल**-"बाजी पासलकराजवळ यशवंता घोडी, गजली फिरंग आणि अजगर ढाल हे तीन जिन्नस अप्रतिम असत" [शालि]. ८

**कुर्डूं मारून नेली**-कुरडूं गांव उध्वस्त केला, लुटला. **हांग**-छान! संतोषदर्शक उद्गार. **घोड्याच्या रे पायीं**-घोड्याकरितां, घोडी मिळविण्या-

घाव लागला "। त्यानें मग घोडा दटाविला येल्याच्या अंगावर घातला ॥ सराईत होता येल्या, ज्याचा मारा संभाळिला। मागल्यान हस्तकें ज्याचें शिर उडविलें ॥ रुमालांत घालून बाजीला दावायासी नेलें। काय आज्ञा यमाजीला गुरूची कृपा आहे त्याला ॥ बाजीयान बोवाचा ज्यानें पवाडा रचिला। सव्वाशेराचा लंगर ज्यानें हातामधीं घातला ॥ ९



करितां. **मप**–मजपाशीं. **मुसळाचा घाव लागला**–सोटयाचा घाव लागला. **मागल्यान हस्तकें**–मागें असलेल्यानें हातानें. **लंगर**–सोन्याचा मोठा व जड असा कांहीं एक दागिना. ९

# कर्नाटकच्या स्वारीचा-पोवाडा

सदर पोवाड्याचा कर्ता बाबू सवाई रामापाई हा होय. पोवाडा अपूर्ण आहे. म्हणजे सुरुवातीचे त्याचे कांहीं चौक गहाळ झालेले दिसतात.

सप्टेंबर १७२५ ते जून १७२६ पर्यंत मराठ्यांनीं कर्नाटककडे जी मोहीम केली त्याचें वर्णन ह्या पोवाड्यांत आहे. कर्नाटक प्रांत निजामाच्या सुभेदारींत गणला जात होता. आणि फत्तेसिंग भोसले यांचे तिकडे हित-संबंध असल्यामुळे त्यांच्याच आग्रहानें ही स्वारी उपस्थित झाली. या स्वारीची सर्वाध्यक्षता अक्कलकोटकर भोसले यांजकडे होती. केवळ शाहू-च्या आग्रहास्तव बाजीरावानें फत्तेसिंगाच्या हाताखालीं काम केलें. या मोहिमेंत जें काय यश आलें तें मुख्यतः बाजीरावामुळेंच आलें. राजवाडे यांच्या तिसऱ्या खंडांत या मोहिमेसंबंधींचें एक पत्र लेखांक ७ मध्यें छापलें आहे, त्यांत असे शब्द आहेत. "दौलतेंत कांहीं ताकद नसतां लौकिक उत्तमच केला. मुख्य गोष्ट राजश्री रावसाहेब पुण्यवंत त्यामुळें यश येतें." ह्या स्वारींत सरदारांच्या आपआपसांतील चुरशीमुळे फार नुकसान झालें. स्वारीचा हेतु फारसा सफळ झाला नाहीं. सैन्याचे हालही अतोनात झाले. कै० राजवाडे यांनीं आपल्या तिसऱ्या खंडांत हा पोवाडा छापला आहे.

## कर्नाटक-स्वारी—१७२६

### ४

### [ शाहीर—बाबू सवाई रामा ]

बुधीहाळ किला बाका ॥ दुरुन टाकी तोफाचे गोळे ॥ जसा अग्नीचा दिसतो लोळ ॥ श्रीमंताचे पुण्य प्रबळ ॥ सोडी तकटी निशान ॥ जातां जातां वसे वलगण ॥ चिनकहाळळी माहाबळळी जेर केली मौजेने ॥ किल्ला घेतला तमाशाने ॥ भोवती जेर करोनी कशी घेतली विशाळ ॥ अवघा प्राक्तनाचा खेळ ! ॥ १

तेथुन पुढ नंदिगड घेतले बाळापूर ॥ नागमंगळ जागा थोर मुळबागळ ॥

**बुधीहाळ**—म्हैसूर संस्थानामध्यें चितळदुर्ग तालुक्यांत. **बाका**—बळकट. **तकटी निशान**—तगटी निशाण. **तगट**—भरजरी वस्त्र [आपटे]. **तगटी निशाण**—जरीपटका. **वलगण**—वळघ-वेग [आपटे]. **वळघण वलगण**—वेढा. **चिनकहाळ्ळी माहाबळ्ळी**—चिकनाइकनहळ्ळीचा किल्ला फार बळकट. पुढें थोरल्या माधवरावसाहेबांच्या कारकीर्दीत हैदरअल्लीवर तिसरी स्वारी झाली तेव्हांच्या पत्रांतूनहि असेंच वर्णन आहे. "चिकनाइकनहळ्ळी अफाट. चाळीस बुरूज आहेत" [खरे १५०८]. **मौजेनें**—सहज. **तमाशानें**—जवामर्दीनें, पराक्रमानें. "**तमाशा**—पराक्रम. जुन्या पत्रांतून हा शब्द फार वेळां येतो. शिवाजीनें आपला सापत्न भाऊ व्यंकोजी यास जें उपदेशपर पत्र लिहिलें आहे त्यांतहि 'तमाशा दाखविणें' असाच उपयोग केला आहे. ज्ञानेश्वरींत तमाशा हा शब्द याच अर्थी आहे" [ब्रह्मेंद्र. ५४]. तसेंच हरिवंशाच्या बखरींतला याच अर्थी उपयोग पहा. "तो श्रीमंत म्हणाले कीं हें ठाणें येत नाही त्यास काय करावें ? मुरारराव म्हणाले कीं हे एकांडेन् + + बरोबर ! माझा तमाशा पहा" [हरिव. ३२]. **विशाळ**—१ हें एकाद्या ठाण्याचें नांव आहे ? कीं २ विशाळ हें प्राक्तनाच्या खेळाचें विशेषण ? ३ की विशाळ हें चिनकहळ्ळीचें विशेषण ? १

**नंदिगड**—नंदिदुर्ग. "चिक बाळापुराभोवते सिधोट, गणेशगड व नंदिदुर्ग हे प्रख्यात व मजबूत पहाडी किल्ले आहेत. व ते बेंगरुळास समीप आहेत. नंदिदुर्ग ज्या पहाडावर आहे तितका उंच पहाड त्या डोंगराळ प्रदेशांत सुद्धां

किल्ला बाका घटकेंत केला जेर ॥ शहा दिला बेंगरुळावर ॥ बहिरवदुर्ग आणि मांगडी पाहातां फिरती डोळे ॥ भोंवतीं झाडी अतीप्रबळ ॥ २

देवराय-दुर्ग भोंवते किल्ले घेतले प्रतापान ॥ पुढुनी जंगल महा-दारुण ॥ हाला करितां बहुत पडिले लोक तमाशानें ॥ खराबी फार केली किल्ल्यानें ॥ मारून गोळ्या झोळिस लोळ्या लाविल्या तुंबळ ॥ शेवटीं जेर केलें स्थळ ॥ ३

नळ—वाटेनें पोटें फुगतीं प्राण उरतो डोळा ॥ म्हणती कसें आलें कपाळा ! ॥ हागवणेनं व्याकुळ झाले ×× वाहे बुळबुळा ॥ भारी कर्नाटक उन्हाळा ! ॥ जेव्हां घरची आठवण होती तेव्हां रडे मुळमुळा ! ॥ कशी आठवती मुलेबाळें ! ( कसे आठवती मुलांबाळा ) ॥ ४

आजपासुन कर्नाटकची नको चाकरी, हारी ! ॥ शेत करुनि राहू घरीं ॥ रेती खातां पाणि लागतें सुख नाहीं शरीरी ॥ मोठि माहागाइ पडली भारी ! ॥ बाबु सवाई रामापाई कवि मत-वाला खेळ ॥ जबुन हे कर्नाटकचें जळ ॥ ५

---

दुसरा नाहीं" [ खरे १३९१ ]. बाळापूर—चिकबाळापूर. चिक म्ह. लहान दोड म्ह. मोटें. जसें चिकबाळापूर व दोडबाळापूर. **नागमंगळ**—श्रीरंगपट्टण च्या उत्तरेस अठ्ठावीस मैलांवर. **मुळबागल**—कोलारवर १८ मैलांवर **शहा**—शह. **बेंगरूळ**—बंगलोर. **बहिरवदुर्ग**—भैरवदुर्ग. "मजबूत पहाडी किल्ला बेंगरूळपासून आठ कोसांवर आहे. हा इ.सन १६०९ सालीं शहाजीराजे भोंसले यांनीं बांधला होता. तेथें भैरवाचें देवस्थान होतें" [ खरे १३८८ ] **मांगडी**—भैरवदुर्गासमीप **भोंवती झाडी अती प्रबळ**—"तो मांगडीच्या झाडीच्या आसऱ्यानें आला" [ खरे १७७९ ]. "म्हणोन आज्ञा त्यास फौज आली होती ती कांहीं पट्टणास गेली कांहीं मागडीच्या झाडींत राहिली आहे [खरे १६८५]. २

**देवरायदुर्ग.**—बुकापट्टणाचे सुमारास. **हाला**—हल्ला. **तमाशानें**—जवांमर्दीनें, पराक्रमानें. **झोळिस लोळ्या** (?). ३

**रेती खातां पाणि लागतें**—१ रेती मिसळलेलें घाणेरडें अन्न खावें लागतें २ रेती मिसळलेलें पाणी (खातां) पितांना तें लागतें म्ह० बाधतें. **जबुन**—दरिद्री. वाईट, घाण. ५

# त्रिंबकराव दाभाड्याचा पोवाडा

त्रिंबकराव दाभाड्यांचा हा पोवाडा ऐतिहासिक दृष्टीनें फारच महत्त्वाचा आहे. पोवाडे हें एक मराठी इतिहासाचें महत्त्वाचें साधन होऊं शकतें याचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणून या पोवाडयाकडे बोट दाखविण्यास हरकत नाहीं. कारण सन १७३१ मध्यें गुजराथेंत डभोईजवळ भिलापूर येथें बाजीराव पेशवा व सेनापति दाभाडे यांचेमध्यें जो झगडा झाला त्यासंबंधीं अस्सल ऐतिहासिक कागदपत्र, बखरी व इतिहास इत्यादिकांतून जी माहिती आली आहे त्यापेक्षां निःसंशय कांहीं थोडी अधिक माहिती या पोवाडयानें उपलब्ध होईल यांत शंका नाहीं. अस्सल ऐतिहासिक साधनांनीं निर्माण झालेली हकीकत व पोवाडयांतील बहुतेक सर्व हकीकत बरोबर आहे हें सांगणें नकोच.

बाजीरावाच्या कारकीर्दीसंबंधानें एकंदरींत ऐतिहासिक साधनसामुग्रीच फार अल्प आहे. रियासतकार रा० सरदेसाई म्हणतात "( बाजीरावाच्या कारकीर्दीसंबंधीं ) हल्लीं प्रसिद्ध असलेले कागदपत्र एकंदर वाचून त्यांच्या तारखा नक्की करून बाजीरावाच्या हालचाली व मुक्काम ठरविणें हें काम अत्यंत त्रासाचें आणि बऱ्याच प्रकरणांत माहितीच्या अभावीं अशक्य-ही झालें आहे." आणि म्हणूनच 'अशा स्थितींत केवळ पहिला उपक्रम' म्हणून रा० सरदेसायांनीं सर्व साधनें एकत्र करून त्यावरून बाजीरावाचा इतिहास सुसंगत लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

(१) या पोवाड्यांत त्रिंबकराव व बाजीराव यांच्या सैन्यांची हालचाल व त्यांचे मुक्काम, शकावल्यांत द्यावे त्याप्रमाणें एका पुढें एकेक दिले आहेत. इतके टीपवार मुक्काम दुसरीकडे कोठेंही सांपडत नाहींत.

(२) डभोईच्या लढाईत परस्परांकडे जे लोक होते व ज्यांचीं नांवें कागदपत्रांवरून आजतागायत उपलब्ध होतीं त्यापेक्षां अधिक लोकांचीं नांवें हा पोवाडा देतो. उदाहरणार्थ, लुमाजीराय म्हाडिक, अमृतराव, उदाजी बेलदार, गोरेखान पठाण, त्रिंबकराव जगताप, होनाजी साळ्या, बडेखान

पठाण, बापू पंडित सेनापतीचा दिवाण, देवजी ताकपीर, सुशिंग भोसला, गैबखान पठाण, मानसिंग, संताजी मोहिते इत्यादि.

(३) पुणे सोडल्यापासून प्रत्यक्ष लढाई होईपर्यंत बाजीराव दाभाड्याशीं सलुखाचीं बोलणी करीत होता, हें ग्रँटडफचें म्हणणें सदर पोवाड्यांतील 'जोडा बाजीरायाचा आला' असें अनेकदां आलेल्या उल्लेखांवरून खरें ठरतें.

या पोवाड्यासंबंधानें दुसरी सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे अफझल-खानाच्या पोवाड्याच्या भाषापद्धतीशीं त्याचें दिसून येणारें साम्य. दोघांनीं साधें गद्यमय ओवीवृत्तच स्वीकारलें आहे. धुरू, बोलू, दाणेदारू वगैरे-सारखीं उकारात्मक रूपें दोघांना समान आहेत. शब्दांची, वाक्यांची वा चरणांची लागोपाठ पुनरुक्ति करण्याची दोघांची धाटणी एकच आहे. पहिल्या पोवाड्यांत आलेले वजीर, बिरमाल हे शब्द त्याच अर्थानें दुसऱ्यांत आले आहेत. 'त्या'बद्दल 'ज्या'चा उपयोग दोघेही करतांना दिसतात. पहिल्या पोवाड्यांतील 'देवकांत्या जिवाजी' 'दहातोंडया माणकोजी' प्रमाणेंच या पोवाड्यांतही 'साठ्या होनाजी' 'ठोक्या भावासिंग' असा विशेषनामांच्या उच्चारांत, व्युत्क्रम स्वीकारला आहे. सारांश, तुळशीदासा-प्रमाणें मल्लारदासानें मजकुरांत जरी अज्ञानदासाचें यत्किंचित्‌हि आंधळें अनुकरण केलेलें नाहीं तरी अज्ञानदासाच्या भाषेची छाप मात्र मल्लार-दासावर पुष्कळच पडली आहे यांत शंका नाहीं.

मुळांत त्रेचाळिसाव्या चौकानंतर पोवाडा पूर्ण झाला असावा; कारण आपलें नांव तेथें शाहिरानें घातलें आहे. मागाहून कोणी तरी पुढचे चार चौक तयार करून घातले आहेत असा संशय येतो. सत्तेचाळीसावा चौक तर अफझलखानवधाच्या शेवटच्या चौकाचें अनुकरणच नव्हे तर फाजील अनु-करण दिसतें. बिचाऱ्या अज्ञानदासाला पोवाडा रचल्यानंतर, पायांत घाला-यला शेरभर सोन्याचा तोडा आणि बसायला घोडा बक्षीस मिळाला त्याचें वैषम्य वाटूनच कीं काय शाहीर सांगतो: 'मल्लारदासाला घोडा तर मिळालाच पण शिवाय हत्तीही नजर मिळाला. येवढेंच नव्हे तर त्रिंबकरावाच्या आईनें म्हणजे उमाबाईनें आपल्या मारल्या गेलेल्या मुलाचा शिरताज नांवाचा उंची शिरोलंकार त्याला बक्षिस दिला!!'

# ऐतिहासिक माहिती

दाभाडे हे तळेगांवचे पाटील. त्यांच्या वंशांतील येस पाटील नांवाचा एक पुरुष थोरल्या शिवाजीमहाराजाजवळ होता. त्याचा मुलगा खंडेराव दाभाडे. राजारामानें खंडेरावास सेनाखासखेल ही पदवी दिली. पुढें शाहू दक्षिणेंत आल्यावर खंडेराव त्याला मिळाला. १७१६त शाहूनें सेनापति-पद खंडेरावाला दिलें. खानदेश-बागलाण वसईपासून सुरतेपर्यंत कोंकण-प्रांत काबीज करून त्यानें शाहूस फार मदत केली. त्यास तीन मुलगे त्रिंबकराव, यशवंतराव व सवाई बाबूराव.

बाळाजी विश्वनाथ वारल्यावर १७२० मध्यें शाहूनें बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. त्यानंतर थोडक्याच काळांत बाजीरावानें सर्वांस हतप्रभ केलें. १७२९ मध्यें खंडेराव वारला. तेव्हां १७३० मध्यें शाहूनें त्रिंबकरावास सेनापतीचीं व यशवंतरावास सेनाखासखेलीचीं वस्त्रें दिलीं.

१७१९ मध्यें खंडेराव दाभाड्याचा हस्तक पिलाजी गायकवाड यानें सुरतेवर स्वारी करून मोगलांचा पराभव केला, तेव्हांपासून प्रयत्न करून १७२३ पर्यंत दाभाडे व गायकवाड यांनीं गुजराथप्रांतावर खंडणी लागू केली. १७२३पासून निजामाचा भाचा हमीदखान याच्या मदतीनें कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड यांनीं गुजराथेंत चौथाई बसविली.

गुजराथेंतील हा चौथाईचा उद्योग सेनापतीबरोबर पेशवाहि शाहूच्या आज्ञेनेंच करीत होता व त्यामुळें दोघांत प्रथमपासूनच चुरस फार होती. १७२९ मध्यें गुजराथच्या मोगल सुभेदारानें बाजीरावाशीं तह करून चौथाई कबूल केली. सदर तहांत, दाभाड्याचा हस्तक पिलाजी गडबड करील तर त्याचाही बंदोबस्त करून देण्याची हमी पेशव्यानें घेतली.

"चौथाई सरदेशमुखीच्या हक्कावर मराठे प्रबळ होऊन देश काबीज करीत चालले, व मराठशाही बुडविण्याचा औरंगजेबाचा हेतु बाजूस राहून उलट मराठेच बादशाही बुडवूं लागले याचा निजामास विषाद वाटे. म्हणून चंद्रसेन जाधव, कोल्हापूरकर संभाजी व प्रतिनिधि यांना जसें त्यानें फितविलें तसें या वेळीं दाभाड्यास फितविलें."

गुजराथची चौथ-सरदेशमुखी पेशव्यास मिळाल्यावर दाभाड्यानें ३५

हजार सैन्य जमविलें. तो लोकांत असेंही प्रसिद्ध करूं लागला, कीं आमचा धनी मराठा याचें राज्य बाजीरावानें घेतलें तें त्यास द्यावयास जातों. मराठी राज्याचे दोन हिस्से करून कोल्हापुरच्या संभाजीला पुढाकार द्यावयाचा असाहि निजाम-दाभाड्यांचा हा कावा असल्यामुळें शाहूलाहि त्वेष आला व त्याचे संमतीनेंच ता. १३ रोजीं पुण्याहून बाजीराव व चिमाजी आप्पा स्वारीस निघाले. पुणें सोडल्यापासून खुद्द लढाईच्या दिवसापर्यंत बाजीराव सलूखाचीं बोलणीं करीत होता; पण तीं दाभाड्यानें मानलीं नाहींत.

बाजीरावानें दाभाड्याची व निजामाच्या फौजेची गांठच पडूं दिली नाहीं. डभईजवळ भिलापूर येथें त्यास गांठले. बाजीरावाजवळ दाभाड्याच्या निम्म्यानेंहि फौज नव्हती. तरी स्वतः जातीनिशीं घोडा घालून त्यानें लढाई दिली. त्रिंबकराव दाभाडेहि अत्यंत शौर्यानें लढला. हत्तीवरून तिरंदाजी करीत असता त्याचीं बोटें कमानीच्या चिल्यानें सोलून निघालीं, इतकी भयंकर बाणांची वृष्टि त्यानें केली. पण शेवटीं गोळी लागून तो पडला.

खुद्द बाजीरावाचीं या लढाईसंबंधानें दोन अस्सल पत्रें आहेत त्यांपैकीं एक खालीं दिलें आहे.

"काल छ. ५ सवालीं आमचा मुक्काम डभई अलीकडे पांच कोसांवरी झाला होता. तेथें त्रिंबकराव दाभाडे, बांडे, गायकवाड, पवार, चिमणाजीपंत, कुल चालून आले. त्यांची फौज मारून शिकस्त केली. त्रिंबकराव व मलोजी पवार ठार पडले. उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडाव झाले, आनंदराव पवार, पिलाजी गायकवाड, यशवंतराव व जावजी दाभाडे, कुवरबाबा पवार जखमी होऊन गेले. आणखी पुष्कळ लोक त्याजकडील व आमचेकडील कामास आले व जखमी झाले. दोनही फौजांचे युद्ध बहुत इरेचें झालें. त्याची फौज व सामान बहुत होतें तें तुम्हांस ठावकेंच आहे. सारांश, धन्याचे पुण्यें यश आलें. लोकीं मेहनत बहुत केली."

—साधनें, खंड ३.

# सेनापति त्रिंबकराव दाभाडे

## [ डभईची-लढाई ]

५

[ जाहीर-मल्लारदास ]

केलें नमन गणेशाला। दुसरें नमन भोवानीला ॥ श्रोत्यांनीं सावधान। कडाखा सेनापतीनें केला ॥ ध्रु० ॥

खंडेराव सांगेन, धुरू। ज्याचा राज्यामधिं बोलू ॥ गाजीवली तरवार। शरला जाणे दाणेदारू ॥ १

खंडेराव दाभाड्याचे वंशीं। एक सेनापती जन्मला ॥ खासखेल सयन। यशवंतराव बाजू सांग ज्या मर्दाला ॥ सवाई बाबूराव नामोस राज्यामधिं केला। प्रधान पंत बाजीराव ठाण घातलें पायाला ॥ २

**श्रोत्यांनीं सावधान**–श्रोत्यांनीं अवधान द्यावें; सावधान असावें. **कडाखा**–नांव कीर्ति पराक्रम हि. श. a war-song, encouraging the soldiers in times of battle, Commemoration, mention. 'कडाखा सेनापतीचा केला' असें असतें तर अर्थ सुलभ होता. सेनापतीचें वीररसात्मक गाणें गाइलें असा अर्थ झाला असता. **खंडेराव**–खंडेराव दाभाडे. **धुरू**–( Mols ) ध्रुव, अखंड. **बोलू**–बोलबाला, ख्याति. प्रसिद्धि. **शरला जाणे दाणेदारू**–शरला–शरक (?) **दाणेदारू**–दानतदार (?) . **दानतदार**–प्रामाणिक सचोटीचा [पट.] **शरक**–मुसलमानी कायदा, मुसलमानी कायदा जाणणारा, भावार्थः—खंडेराव मोठा दानतदार कायदा जाणणारा म्ह० ( समजूतदार शहाणा ) होता. १

**एक**–अद्वितीय. **खासखेल सयन**–सयन–सैन. सेना खासखेल. **यशवंतराव**–खंडेरावाचा दुसरा मुलगा. **बाजू**–साहाय्यकर्ता, मदत. **सांग**–परिपूर्ण; उत्तम: यथायोग्य. **सवाई बाबूराव**–खंडेरावाचा तिसरा मुलगा. **नामोस (अरबी)**–कीर्ति. **ठाण घातलें पायाला**–पायागडाला (पावागडाला) ठाणें घातलें. पंचमहाल जिल्ह्यांतील डोंगरी किल्ला. चांपानेरच्या दक्षिणेस. २

रचला कळीचा । आरब जमाव तळेगांवीं झाला ॥ विचार ज्यात्ये स्वारीनें केला । सैनापति बोलाविला ॥ ३

त्रिंबकराव दाभाडे तुम्ही बाजीरायावर चला । दीन दीन भेस्तरवार पाहिला ॥ नगारा सैनापतीनें केला । सरदाराच्या फौजा । डेरे इंदुलीवर दिला ॥ ४

ती दिसाचे मोकाम । हात्या घडली त्या रायाला ॥ हात्या घडली त्या रायाला । घातले वडलाचें सराद ॥ सरदाराच्या फौजा डेरा कौंदुसावर दिला । शाहूराजा सदरे बैसला ॥ बसवंतराव बोलाविला । जाती उमाबाई तेथ संग्राम होईल भला ॥ ५

पंधरा हजार घोडा पेशवा नये सातार्‍याला । जोडा तळेगांवा आला ॥ विनंती सांग उमाबाला । "नको जाऊं तुम्ही हुकूम म्हाराजाचा झाला" ॥ ६

दीन दीन भेस्तरवार पाहिला । नगारा सैनापतीनें केला ॥ सरदाराच्या फौजा डेरा नारदगांवीं दिला । मोकाम धराचीचा झाला ॥ छत्रपतीच्या फौजा हणमंतपारीं उतरल्या । सरदाराच्या फौजा डेरा समंगनेरीं दिला ॥ ७

**रचला कळीचा आरब**–(?) रचला कळीचा आरावा (?) **जात्ये**–जातीनें: ज्यानें (?) ३

**दीन दीन**–दिन दिन **भेस्तरवार**–गुरुवार. **इंदुलीवर** इंदुरी हा गांव इंद्रायणी नदीच्या कांठीं तळेगांवाहून सुमारें चार मैलांवर आहे. येथें दाभाड्यांचा मोडून पडलेला वाडा आहे. **ती**–तीन. ४

**मोकाम**–मुक्काम. **हात्या**–हत्या (?) **सराद**–श्राद्ध. **कौंदुसावर**–**कौंदुस**–कडुस. **बसवंतराव**–हा शाहूच्या प्रीतींतला एक खोजा होता. याचें सबंध नांव वसंतराव कामुर्डे. याच्याकडे जनानखान्याची नोकरी होती. [रु. १,१२१] **उमाबाई**–त्रिंबकराव दाभाड्याची आई. ५

**जोडा**–जासूद जोडा (?) **सांग**–सांगे. **उमाबाला**–उमा अव्वाला; उमाबाईला. **आव्वा**–बाई. ६

**नारदगांवीं**–नांदूर गांवीं (?). **धराची**–धारावी. **वसईजवळ** ठाणें जिल्ह्यांत. **हणमंतपार**–हणवंतगांव किंवा हणमंतगांव असें नांव सांपडतें [पे. डा. १;३९,२६७]. **समंगनेर**–संगमनेर. ७

समंगनेरावरी तुरुज ताजखान भेटला ॥ विचार सैनापतीनें केला। सुरिंग भोंसला पाठविला ॥ कोंकण खेडयाचे बारीनें घाडा हाडता उतरला। गर्द्दब-खान पठाण आडवा दाभाड्याच्या आला ॥ ८

मावळला दिनमान मोकाम गीर नदीवर झाला। जोडा नबाबाचा आला ॥ सैनापतीनें वाचूनी पाहिला। "घोडयावर बैसुनी त्रिंबकराव भेटायाला चला" ॥ ९

"कसा करावा विचार" राव पुसे जाउबाला। खासखेल सैन यश्वंत बाबुराव घेतला ॥ जावजी दाभाडे, निंबाळकर अमृतराव चालला। १०

नबाब किलीजखान सैनापतीला भेटला। मान त्या सैनापतीचा केला ॥ वस्त्रें चढविलों रायाला। दिले चार घोडे मोंगल हत्ती नजर केला ॥ "झुज पडेल बाजीरायाचे कांहीं ऐक कुमक द्यावी मला"। पठाणाची फौज कुमर भादूर जोर आला ॥ ११

हा क्या मानसिग चिमाजी दामोदर चालिला। मावळला दिनमान मोकाम तारबाजवर झाला ॥ लष्कर चाल पेणोपेणीं घाटा हाडत उतरले ॥ १२

---

**तुरुज ताजखान**—तुरुक ताजखान [ पे. डा. १,३७ ]. **हाडता**—खालीं. ८

**दिनमान**—दिवस. ज्ञानेश्वरीत दिनमान म्ह० दिवस [ज्ञाने० १३, ९२२].९

**जाउबा दाभाडे**—जावजी दाभाडे [ सा. खं. ३,२६ ]. १०

**मोंगल**—मोंगलं, मोंगलानें. कोल्हापूर प्रतींत खालीं टीपेंत मोंगल म्हणजे हत्तीचें नांव असा अर्थ दिला आहे तो चूक आहे. **कांहीं ऐक**—कांहीं एक असें पाहिजे. **कुमर भादूर**—कुवर बहादुर. [ सा. खं. ३,२६ ]. ११

**हा क्या मानसिंग**—मानसिंग हाके. तेवीसाव्या चौकांतील ठोक्या भावसिंगप्रमाणें. **चिमाजी दामोदर**—चिमणाजीपंत दादा [ सा. ख. ३,२६ ] चिमणाजी दामोदर मोघे, डभईचे लढाईच्या वेळीं पेशव्याविरुद्ध लढल्यामुळें त्याची जहागीर जप्त करून फक्त रिगणगांव त्याचेकडे कायम केलें. [भा. षष्ठ सं. वृ. २०६]. **तारबाजवर**—तारबादेवर-ताहराबादेवर (?) **पेणोपेणीं**—पेण-मुक्काम. मुक्कामावर मुक्काम करीत. **घाटाहाडत**—घाटाखालीं. **लष्कर**

खबर कळली पोवाराला। राव उदाजी आनंदला ॥ पोवारमल्ल पाटील भेटला। पिलाजी गायकवाड भेटी झाल्या सरदाराला ॥ १३

हें येवढें ऐकुनी वेढा मांडवीस घातला। कोट दुमदुम भेरी वाजती ॥ नाला तुदु बाका सोडुनी देती। कितीक होती घायाळ मुर्दे दलामध्यें येती ॥ १४

विचार सैनापतीने केला। जोडा मल्लोजी धाडिला। मल्ल पाटील पोवार। तुम्ही चवकीवरी चला। सेनापतीची फौज चलोजी हरपाळ चालिला ॥ १५

---

चाल पेणोपेणीं घाडाहाडत उतरले–लष्कर मुक्कामावर मुक्काम करीत दर कूच घाटाखालीं उतरलें. १२

राव उदाजी आनंदला–उदाजी व आनंदराव पवार यांना [सा.खं.३,२६]. उदाजी पवार–उदाजी हा संभाजी पवार मलठणकर याचा मुलगा. फार शूर. १७०९ सालीं त्याने माळव्यांतील मांडवगड काबीज केला. बाळाजी विश्वनाथाबरोबर १७१८ सालीं हा दिल्लीस गेला होता. १७१९ मध्यें यानें गुजराथेंतील कांहीं प्रदेश काबीज केला. १७२८ सालीं बाजीरावानें उदाजीस माळवा व गुजराथ प्रांताचा निमा मोकासा करून दिला. १७२६ मध्यें शाहूनें उदाजीरावास गुजराथ व माळवा प्रांतांतील चवथाई व सरदेशमुखीचा अधिकार दिला. १७२७ मध्यें तो पुन्हा चिमणाजी आप्पाबरोबर गुजराथचे स्वारीवर गेला १७३१ चे आरंभीं दाभाड्यास मिळाला व डभोईच्या लढाईत बाजीरावाकडे पाडाव सांपडला. [धार संस्थानचा इतिहास, अर्वाचीन काळ, भाग १]. आनंदराव–उदाजीचा धाकटा भाऊ. हाहि दाभाड्यास मिळाला होता पण त्यानें पुढें बाजीरावाशीं तेढ धरली नाहीं. [धार संस्थानचा इतिहास, अर्वाचीन भाग १ ला.]

पोवारमल्ल–मलोजी पवार [सा. खं. ३, २६]. पिलाजी गायकवाड–[सा. खं. ३, २६] १३

दुमदुम–दुमदुमे. भेरी–नौबत, रणवाद्य. नाला तुदु बाका सोडुनी देती–नालातुन सलका देती (?) नाला–तोफा, गरनाळा, बंदुका. वगैरे. सलका–शिलका; फेरी. मुर्दे दलांमध्यें येती–रणांस–रणांत मुर्दे येतात, रणांत पडतात. १४

तडाड मल्ल पाटलानें केला। मारीत चौकीवरी गेला॥ तुडविली चौकी संग्राम रजपुताचा झाला। कितीक तोडील घाईघाई। कितीक पाडील धरणीठाई॥ १६

घोड्या राउता दाटण पाहीं पाहीं त्या मुर्कुड्या झाल्या॥ तरि गोळ्यांचे ठणक होती। रजूत निशाणसी भांडती॥ उडया पाण्यांत घालती। घालती मरणाभ्यानं॥ १७

मल्लोजीनें झगडा दिला। संग्राम रजपुताचा झाला। दुर्जेशिंग वचकला। वचकला मांडवीमध्यें॥ मोर्चा लाविला कोटाला। कोट बहुत जेर झाला। सैनापतीचा मोरचा आह्मी बुर्जाखालीं गेला॥ १८

कसा करावा विचार। दुर्जेसिंग वचकला। मंगलवारे दिनीं ज्यांनीं किल्ला खालीं केला॥ क्षीणमध्यें नवला वर्तला। रानोमाळ संहार रजपुताचा झाला॥ सैनापतीचें निशाण आधीं चढविलें कोटाला। देवजी ताजपीरराव ठाण्यावर ठेविला॥ किल्ला मांडवीचा घेतला। ठाणें दिलें पिलाजीला १९

**तडाड** (?) **संग्राम रजपुतांचा झाला**–रजपुतांशीं युद्ध झालें. **तोडील**–तोडिले कापले. १६

**दाटण**–गर्दी. **मुर्कुडया–मुर्कुडया झाल्या**–गर्दी झाली, उड्या पडल्या. **ठणक**–आवाज. मू. हिं. श. ठनाक–Jingle. **निशाणसी भांडती**–निशाणासी भांडती. **मरणाभ्यानं–भ्या**–भय, **भ्यानं**–भयानें, –मरणाच्या भयानें. १७

**झगडा दिला**–लढाई केली, लढाई दिली. **दुर्जेसिंग**–दुर्जनसिंग. हा मांडवी संस्थानचा राजा. पेशव्यांचा पक्षपाती म्हणून त्याचें गायकवाडाशीं भांडण झालें. १७५०मध्यें वरील कारणाकरितां, गुजराथ सरकारात आल्यामुळें मांडवीचें संस्थान त्याचें नांव चालविण्याबद्दलची सनद पहा [पे. डा. १, ३९]. **वचकला**–भयभीत झाला: मोडला गेला. १८

**क्षीणमध्यें**–क्षणामध्यें (?). **देवजी ताजपीरराव**–देवजी ताकपीरराव. [दाभाडे सेनापतीची हकीकत पा. ८] हा दमाजी गायकवाडाचा सरदार होता [ B. G. 1-1-358 ]. १९

सरदाराच्या फौजा डेरा फुलवाडीवरी दिला। सरदाराच्या फौजा डेरा खाडीवरी दिला ॥ शिमगा सैनापतीनें केला। कर्णोळ मांडवीचे घांटीं। राव नर्मदा उतरला ॥ सरदाराच्या फौजा डेरा त्येच्या तळ्यावरी दिला। अवसचे दिवशीं तारा डेऱ्यावरी पडला। पाडव्याचे दिवशीं राव आले डबईला। जोडा बाजीरायाचा आला ॥ २०

सैनापतीनें वाचुनी पाहिला। घोड्यावर बैसुनी सैनापती झुजायाला ॥ दोन दिवस भार केला। राव पर्तुन डेऱ्या आला। खुंटलें होतें निमित्त फुढें। कर्णे भगवानाला ॥ २१

भेस्तवारें दिनीं झगडा ज्या मर्दानीं दिला ॥ बाजीराव कचेरीला बैसला। चिमाजी आपा बोलाविला। जाधवराव पिलाजी खबर सांगे पेशव्याला ॥ २२

भिकाजीराव चालून आला। राणोजी शिंदा पाया हाडता उतरला। ठोक या भावे शिंग बोलला। प्रधानपंत बिन्नी द्यावी मला ॥ हें एवढें ऐकुनी कोप नारायजीला आला ॥ २३

ढमढेऱ्याचें बेंठ नांवं माझीया वडलाला। नामोस दिलीमध्यें केला

**खाडी**–गांवाचें नांव [ B. G. I-1-231 ]. **शिमगा सेनापतीनें केला**–शिमग्याचा सण साजरा केला. **कर्णोळ**–कर्णाळी, गांवाचें नांव. **तळयावरी**–तळावरी (?). **डबईला**–डभईवर. २०

**दोन दिवस भार केला**–दोन दिवस संभार केला–दोन दिवस सैन्याची जमवाजमव केली, तयारी केली. **खुंटलें होतें निमित्त फुढे। कर्णे भगवानाला**– **फुढें**–पुढें. परमेश्वराच्या इच्छेप्रमाणें त्याला मरण यावयाचेंच होतें; पण थोडें पुढें यावयाचें होतें. २१

**राणोजी शिंदा पायाहाडता उतरला**–पायागडाखालीं उतरला. **ठोक या भावे शिंग बोलला**–ठोक्या भावेशिंग बोलला–भावेशिंग ठोके बोलला. हा बाजीरावाकडे फितूर होता असें दाभाड्याचे बखरकार म्हणतात [पि.डा.१,१३२]. **नारायजी**–नारायणजी ढमढेरे [सा.खं. ३,२६]. २३

दिलें सोन्याचें कडें ॥ आनंत नारायजी नावाजीला । मावळला दिनमान मोकाम खाडीवरी झाला ॥ २४

सुदीन भेस्तरवार पाहिला । नगारा सैनापतीनें केला ॥ सिनगारिला हत्ती । हत्तीवर हौदा ठेविला । आंगीं घातलें डगलें, वक्तार चढीवलें आंगाला ॥ २५

राव हौद्यांत बैसला । शिरीं जिरटोप घातला ॥ शिरीं बांधिलें मंदील तुरा मोत्याचा लाविला । खासकेल सैन यशवंतराव बाबुराव घेतला ॥ २६

पिलाजी गायकवाड हातीं तोंडावर दिधला ॥ कडीकोट फौजेचा मिळाला । गगनीं धुरळा लागला । दणाणली मेदिनी चंद्रसूर्य झांकोळला । आले रणभूमीला ॥ विचार सरदारांनीं केला ॥ २७

त्रिकाळ दोपारणी दोघी मिळाल्या वैरिणी । चाळीस हजार घोडा मर्द दिली उठाळणी ॥ लष्करानीं मलपानी वजीर । वजीर करत्यात धांवणीं । जर फौजेला मिळते पाणी ॥ मोठी होतीं खणाखणी ॥ २८

---

**वक्तार**–बख्तर–चिलखत. २५

**पिलाजी गायकवाड**–पिलाजी गायकवाडें, गायकवाडानें. **हाती तोंडावर दिला**–हत्ती तोंडावर दिला. **कडीकोट फौजेचा मिळाला**–कडेकोट फौज जमली. **गगनीं धुरळा लागला**–आकाश सैन्याचे धुळीनें व्याप्त झालें. २७

**त्रिकाळ दोपारणी दोघी मिळाल्या वैरिणी–त्रिकाळीं**–At a late season or hour i.e. in the time after noon[*Mols.*] **वैरिणी**–हें दोन्ही दळांसंबंधी. मध्यान्हानंतर दोन्ही दळें भिडलीं असा भावार्थ. **मर्द दिली उठाळणी–मर्दें दिली उठाळणी**–मर्दांनीं उठावणी केली. **लष्करानी मलपानी वजीर करत्यात धांवणीं–मलपानी**–मल्लापांनीं. **वजीर वजीरें**–सरदारांनीं. **धांवणी केली**–उठावणी केली. **जर फौजेला मिळते पाणी मोठी होती खणाखणी**–दाभाड्यांची फितुरलेली फौज घोड्यास पाणी दाखवण्याच्या मिषानें पळून गेली या प्रवादास अनुलक्षून [का. सं. दाभाडे सेनापति यांची हकीकत पा. ९]. २८

दाभाडा सैनापती तरवार थोर करी निर्वाणी ॥ आंगीकार जाधवरायांनीं केला । जाव बाजीरायाला दिला । उजवी बाजू चिमाजीला ॥ २९

मार बाजीरायाला आला । मार करोलांनीं दिला । उदाजी आनंदराव पाडिला ॥ साठ्या होनाजी आपुण भला ॥ मर्द घोडा उचलिला ॥ भार बाजरियाचा आला ॥ ३०

मार करोलांनीं दिला उरीं बैसली गोळी साठ्या होनाजी पडला ॥ पोवार मल्ल पाटील भला । मर्द हत्ती चालविला । करी तिरंदाजी, वागूं नेदी राउताला ॥ ३१

जगताप त्रिंबकराव भला । तया मर्दानें झगडा दिला ॥ टाकली वारू हाडती उडी ॥ जगताप पाय उतारा आला । भार बाजीरायाचा आला । मार करोलांनीं दिला । ब्रह्मांडीं बैसली गोळी । पोवार मल्ल पाटील पडिला ॥ ३२

आव शिपायांनीं केला । हत्ती माघारा मुर्डीला । नास्का सीपायाचा झाला । इतक्या उपरी झगडा जाउद्यांनीं दिला ॥ अमृतरायाच्या लोकानीं ॥ बिकट केली खणाखणी ॥ ३३

झगडा झाला थोर संताजी म्होयता पडला रणीं ॥ रणीरण खर्दळ

**निर्वाणी**–निर्वाणी तर नव्हे ? **अंगीकार जाधवरायांनीं केला–अंगीकार करणें–अंगेजणी करणें.** २९

**भार**–संभार, मोड. **आपुण भला मर्द घोडा उचलिला**–स्वतः आतिनिशीं घोडा उचलला. **उचलला**–घातला, गर्दीत भिडविला. ३०

**वागूं नेदी राउताला**–आपल्या तिरंदाजीनें राउतांना पुढें येऊं देईना. ३१

**ब्रह्मांडीं–ब्रह्मांड**–कपाळ. ३२

**आव**–आवई (?). **बिकट**–रसाकसीची, भयंकर, निकराची. **नास्का**–चुथडा. ३३

**संताजी मोयता**–संताजी मोहिता. **रणीरण खुर्दैल मांडला–खुर्दैल**–

मांडला । उदाजी बेलदार पडला । म्हाडीक लुमाजीराया फुढें पुरा झाला । आंका बैसला भाला सयाजी गायकवाड पडला ॥ ३४

जाउबा लष्करी चांगला । हात फिरंग घातला ॥ तिरा गोळ्याचा ठणक, गोळी ॥ लागली फिरंगला । गोरेखान पठाण भला । मारीत ढिगांत लोटला ॥ जेणें केल्या घोड्याच्या पंया । गोरेखान पठाण पडला ॥ ३५

बडेखान पठाण भला मर्द सर्तीनसी भांडला ॥ जखमी झाला चूर क्षेत्री म्हणावें तयाला ॥ रणीं निवडलें रणशूर । भांडतो सैनापतीचा भार ॥ धड पाडिली दुधड, शिपाई घायाळ झाला फार । गाड वासुल्या नजरि गोजी मारमारी सिपायाला ॥ ३६

---

**खुंदल,** कुंदन कंदन युद्धभूमींत रणकंदन सुरू केलें. **पुरा झाला**–ठार पडला. **आंका**–आंखा. **आंख**–कान व डोळ्यांतलें मर्मस्थळ. **सयाजी गायकवाड**–पिलाजी गायकवाडाचा मुलगा [सा.खं. ३, २६]. ३४

**हात फिरंग घातला**–हात फिरंगीला तरवारीला घातला, तलवार उपसली, तलवार काढली. **मारीत ढिगांत लोटला**–मारामारी करीत गर्दीत मिसळला. **जेणें केल्या घोड्याच्या पंया–पंया**–जेधे यांच्या करीन्यांत [शिवचरित्रप्रदीप, पा. ४४] अफजलखानाच्या वधप्रसंगीं पुढील वाक्य आलें आहे–“पुढे जाऊन पालखीच्या भोयांच्या पंह्या मारिल्या (खानाची) पालखी राहिली” तेथें पंह्या याचा अर्थ पाय असा आहे. यावरून प्रस्तुत पोवाड्यांतील पंया आणि हा पंह्या हे एकत्र होत. अशिक्षित शाहीराच्या तोंडांत शब्दांचीं रूपें कशीं पालटतात याचे हें एक उदाहरण. ३५

**बडेखान पठाण**–पेशव्यांचा डायऱ्या भा. १ पा. १६ वर उल्लेखिला गेलेला बडेखान तो हाच कीं काय? **सर्तीनसी भांडला**–शर्तीनिशीं भांडला, शर्तीनें लढला. **क्षेत्री म्हणावें तयाला–क्षेत्र**–रण. **क्षेत्री**–क्षात्रिय, शूर. **धड पाडिली दुधड**–दुधड–दुभंग [आपटे] कत्तल करून शिरें उडवून देह दुभंग करून धडें पाडिलीं. **दुधड**–(Adverb) dividing a man or animal into head and trunk; also into two halves or portions. [*Mols.*] **गाड वासुल्या नजरि गोजी मार मारी शिपायाला**–नजरि गोजी–याचा मूळ शब्द नजर गुजारा (फा. पु.)–दृष्टादृष्ट असा असावा. हा शब्द घेतल्यास जो जो दृष्टीस पडे त्यास मारूं लागला. **गाड वासुल्या**–गांड वासुल्या (?) ३६

खंडेराव मल्हारराव तया मर्दांनीं झगडा दिला ॥ ब्राह्मण बापू पंडित भला ॥ भाला लागला मर्दाला ॥ सैनापतीचे दिवाण । जखम झाली तयाला ॥ भार बाजीरायाचा आला । त्रिंबकराव कुर्द सैन झाला ॥ ३७

आली वीरश्री हात कमान घातला ॥ सर्जा त्रिंबकराव भला । विदीत फौजेत चालिला ॥ किती पाडील घायाळ गणती नाहीं सांगायाला ॥ त्रिंबकराव नानाचा लष्करी । पंचमुख व्याघ्र जैसा पिंजारी । हारोळी देउनी खासा तीर जोडी उरी ॥ द्वापार युगामध्यें एक अर्जुन होऊन गेला ॥ ३८

कलयुगामध्यें एक अर्जुन म्हणावा रायाला ॥ दाऊदखान पठाण होऊन गेला ॥ हत्तीच्या हौद्यांत भांडला । सागाया झाली सीपत झगडा दाभाड्याने दिला ॥ चिमठ्या रायाचा सोलला । सांवा बोटांच्या राहिल्या ॥ ३९

भार बाजीरायाचा आला । मारठोक यांनीं दिला । ब्रह्मांडीं बैसली गोळी सैनापती पुरा जाहला । इतुक्या उपरी भणाण फौजेचा झाला ॥ त्रिंबकराव संग्रामीं पडला । बाजीराव दिलगीर झाला ॥ ४०

---

**त्रिंबकराव कुर्द सैन झाला**–**कुर्द**–क्रुद्ध. **सैन**–सेनापति. त्रिंबकराव सेनापति क्रुद्ध झाला. ३७

**हात कमान घातला**–धनुष्याला हात घातला. **कमान**–तिरकमठा. **त्रिंबकराव नानाचा लष्करी**–त्रिंबकराव नाना चाल करी (?). **पंचमुख**–पंचानन, सिंह. **पिंजारी**–खवळे, पिंजारतो, खवळतो. भावार्थ सिंह संतापून आयाळ पिंजारून जसा खवळतो तसा त्रिंबकराव दाभाडे खवळला, क्रुद्ध झाला. **हारोळी**–हरळी, आरोळी. ३८

**हत्तीच्या हौद्यांत भांडला**–हत्तीच्या हौद्यांतून लढला. **सांगाया झाली सीपत**–मु. हिं. श. सीफत्–कीर्ति. सांगाया ख्याति झाली. **चिमठ्या**–तर्जनी व आंगठा यांची चिमूट. भावार्थ, अंगटा व तर्जनी यांचा तिरंदाजी करतांना फार उपयोग झाल्यामुळें त्यावरील कांतडी सोलून जाऊन बोटांचें मांस दिसूं लागलें. **सांवा**–**सांव**–स्नायू, शीर, नाडी. ३९

**भणाण**–दाणादाण. ४०

उचलुनी मुर्दा रायें पालखींत घातला। हत्ती दाभाड्याचा फौजे म्होरे चालविला॥ थोर थोर सरदार मिळाले पाह्याला। ल्हान पराई होउनी शूरानें करडा हात केला। बावन उमराव मिळाले॥ ऐसा कवण नाहीं भांडला॥ ४१

मुर्दा डेऱ्यास आणला। येसू पाटील गाहिंवरला। सैनापती गेला आतां दादा म्हणावें कोणाला। आनंदी करीतसे आत्येसा। माझ्या भणीच्या को वंशा॥ ४२

कसें केलें जगदेशा जगदेशा नारायण॥ असे तिघे बंधू करिती रोदना॥ होतें सैनापतीचें मंडण। बोल मलारदास गाईन शूरांचे प्रेमाने॥ ४३

करी जुगदान जुगीं उद्धरण॥ मी व्हाल सरदार पाहाला॥ आज्ञा दिधली रायाला। केलें दानपून पालखी दिली ब्राह्मणाला॥ आस्त्री गिरजाबाई बोलली। "आज हरपला माझा चुडा। नाहीं फिटली आसोसी देव आउक दिला थोडा"॥ ४४

---

**ल्हान पराई होउन शुरानें करडा हात केला–लहान पराई**–अल्पवय. **करडा हात–पराक्रम.** भावार्थ, लहान वय असून नांवाजण्यासारखा मोठा पराक्रम केला. **कवण नाहीं भांडला**–कोणीही लढला नाहीं. ४१

**येसू पाटील**–यशवंतराव, त्रिंबकरावचा भाऊ. हे दाभाडे तळेगांवचे पाटील होते. **आत्येसा**–अतिशय, अतिशयसा. शोक केला. **माझ्या भणीच्या को वंशा–कोंवसा**–आश्रयस्थान, पाठीराखा. **भणीच्या**–बहिणीच्या. मला बहिणीला पाठीराखा असलेल्या. ४२

**जगदेशा**–जगदीशा. **तिघे**–तिसरा कोण? यशवंतराव व बाबूरावखेरीज कृष्णाजी दाभाडे कीं काय "हा कोणी जवळचा नातेवाइक दिसतो. हा ज्या अर्थी उमाबाईस मातुश्री असें लिहितो त्याअर्थी पुत्रवर्गापैकीं असावा [ब्रह्मेंद्र. पा. १९५ टीप पहिली]. **मंडन**–छत्र. **मंडन**–Canopy [*Mols.*] ४३

**करी जुगदान जुगी उद्धरण** (?) **मी व्हाल सरदार पाहाला** (?) **दान पून–दानपुण्य**–धर्म. **आसोसी**–उत्कट प्रेम, आवड. **आउक–आउख**–आयुष्य. ४४

जोडा साताऱ्याला आला ॥ राव कृष्णाजी दाभाड्याला । बहुतां प्रकारीं संबोखिला ॥ जोडा तळेगांवीं आला । विनंति सांग उमवाला ॥ ४५

'तुमची गुजराथ तुम्हांला । पायागड तुमच्या हवाला । येसू पाटील बाबूराव हायेत तुमचे सैनेला' ॥ जाब कानीं ऐकिला । उमावा बैसली सदरेला । मलारदास बोलाविला ॥ ४६

मलारदास कवीश्वर भला । ज्यानें बिरमाल गाईला ॥ सवाई बाबुराय ज्यानें घोडा बक्षिसी केला ॥ येसू पाटलानें ज्याने हत्ती नजर केला । माता उमावान लेकाचा शिर्ताज दीधला । शूरा संग्रामाचा ज्यानें बिरमाल गाईला । हेतूनशाई दाभाड्याची र ॥ शाई दाभाड्याची र । थोर मर्द ख्याती ज्याची र मर्द ख्याती ज्याची र ॥ ४७



**कृष्णाजी दाभाडे**–लढाईचे वेळीं कृष्णाजी दाभाडे साताऱ्यासच होता कारण त्यानें ब्रह्मेन्द्रस्वामींचे चरित्रांत साताऱ्याहून सदर लढाईसंबंधानें स्वामींस पाठविलेलें पत्र ( लढाईची बातमी आल्याबरोबर लिहिलेलें ) छापलें आहे. **संबोखिला–संबोखणें**–(संबोधणें, हांक मारणें, तृप्त करणें) समजावणें, समजूत घालणें. [आपटे] ४५

**शिर्ताज**–( फा. पु.) एक मस्तकीं बांधण्याचा अलंकार, मुगुटमणी. **हेतून शाई दाभाड्याची र हेतून शाई दाभाड्याची र–शाई**–अम्मल किंवा राज्य. **हेतून**–येथून. ४७

# पहिले बाजीरावाचा पोवाडा

प्रस्तुत पोवाडा एकाखडी म्हणजे प्रत्येक बाराखडींतील आद्याक्षर घेऊन करण्याची प्रतिज्ञा सुरवातीसच शाहिरानें केली आहे व ती सफळ झाल्या-चेंही शेवटच्या कडव्यांत किंवा तुकांत सांगितलें आहे. पण वास्तविक तशी गोष्ट नाहीं, हें पोवाडा नीट पहाणारास कळून येईलच. त्याचप्रमाणें या हठप्रयत्नांत शाहिराला 'धरणी'बद्दल 'ढरणी', 'दवलती'बद्दल 'डवलती' 'तोडून'बद्दल 'टोडून', 'नाना'बद्दल 'णाणा' अशीं हेंगाडीं रूपें तयार करावीं लागलीं आहेत. एका खेडवळ अशिक्षित शाहिराची कसरत येवढीच त्यांतील कौतुक करण्यासारखी गोष्ट. खुद्द पहिले श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे यांचे-बद्दलचा एकही पोवाडा उपलब्ध नव्हता तो झाला हेंच या पोवाड्याचें माहात्म्य आहे.

# पहिल्या बाजीरावाचा मृत्यु

## ६

### [ शाहीर—त्रिंबक साळी ]

एका खडी बोला काशि गत झाली बाजीला ॥ ध्रु० ॥ कक काशिबाई गहिंवरे । खख खबर गेली पुणियारे ॥ गग गाय जशि हंबरे । घरोघरीं झाला कहार ॥ देव कोपला ॥ कशि० ॥ १

नाना पुसतसे आपाला । चिमाजी गहिंवरें दाटला ॥ छछ छत्र होतें आम्हांला । जज जनम थोडा जाहला ॥ पहाड पडला । कशि० ॥ २

झझ झडकुनी आलें मरण । या देवानें केला खुन ॥ टट टोडुनी नेलें रतन । ठठ ठार झाला प्राण । नरमदेला ॥ कशि० ॥ ३

डवलतेचा खांब होता । ढढरणिवर पडला आतां ॥ णाणा म्हणे 'कुठें पाहुं पिता । ततारा झमकत होता ॥ अंधकळा' । कशि० ॥ ४

---

**एका खडी बोला**—बाराखड्यांतील प्रत्येक अक्षर घेऊन. **काशिबाई गहिंवरे**—" मृत्युसमयीं बाजिरावाची बायको काशिबाई व धाकटा मुलगा जनार्दनपंत हीं जवळ होतीं " [रियासत—म. वि. ४२८]. १

**पुणिया**—पुण्याला. **नाना पुसतसे आपाला**—बाजिरावाचे मृत्यूचे वेळीं चिमाजी आप्पा व नानासाहेब हे दोघे कुलाब्यास होते. मानाजी व संभाजी आंग्रे यांचा तंटा तोडण्यास गेले होते. [रियासत—म. वि. ४२८]. **जनम थोडा जाहला**—आयुष्य कमी पडलें. **पहाड पडला**—मेरू खचला अशा अर्थी. २

**झडकुनी**—झडकरी, अकस्मात. **खुन**—घात. **टोडुनी**—तोडुनी. **रतन**—रत्न. **नरमदेला**—नर्मदेला. नर्मदातटाकाला. रावेरखेडी येथें. ३

**डवलतेचा**—दवलतीचा. **ढरणीवर**—धरणीवर. **णाणा**—नाना. **अंधकळा**—अंधकला, अंधकारला, झाकुळला. ४

थथरकत बाजी बहिरी । ददलांत मोंगलावरी ॥ घघरुनि मोरचे मारी । नाना म्हणे श्रीहरी ॥ वैराकार केला ॥ कशि०॥ ५

पपप्यार शाहुराजाचा । फफरारा जरताचा ॥ बबाळाजी बाप त्याचा । मारांत उमराव दक्षिणेचा ॥ मोहरा गेला॥ कशि०॥ ६

माय म्हणे बाजीरायासी । रंगमाहालीं कधीं बैससी ॥ लोलाविला सर्वांसी । अंतरला ॥ कशि०॥ ७

ववजावुनी बैसला वनीं । ससमाया धरली कुणी ॥ खलवीत जन गेले टाकुनी । शाशा शाहीर वर्णील गुणी । उमरावाला ॥ कशि०॥ ८

हा पवाडा बाजीरायाचा । अलंक्षा एका खडी गायाचा ॥ झाडा जाहला अक्षरांचा । साळी त्रिंबक श्रीगोंद्याचा । अभंगाला ॥ कशि०॥ ९



थरकत-तळपत. बहिरी-शूर. श्रीहरी वैराकार केला-वैराकर (पु.) शत्रुत्व, वैर, वैराविर्भाव [मोल्स]. ५

प्यार-प्रिय. फरारा-निशाण. जरताचा-जरीचा. भारांत-भरांत, भरज्वानींत (?). ६

लोलाविला-लोल-आसक्त. सर्वांना प्रिय झाला होता. ७

वव जावुनी-येथें तर शाहीरानें कमाल केली आहे. व हें अक्षर कांहीं संबंध नसतां नुसतेंच ठेवून दिलें आहे. पुढील जावुनी या शब्दाशीं त्याचा कांहींएक संबंध नाहीं. साया (?). खलवीत (?). ८

अलंक्षा-अट (?). झाडा-हिशेब, आटोप. ९

# छत्रपति शाहूमहाराजांचे–पोवाडे

शाहूनें सन १७०७–१७४९ पर्यंत राज्यकारभार केला. मराठी राज्यांत शिवाजीच्या खालोखाल त्याची योग्यता आहे.

"त्याचें अंतःकरण कोमल, दयार्द्र व पापभीरु होतें. पेशवेसुद्धां त्याची मोठी मनधरणी करून असत. त्याचा स्वभाव मोकळा, निर्व्यसनी, सदाचरणी असून, मोठा उदार, दिलदार व व्यवहारांत धोरणी होता. स्वतः नुकसान सोसून राज्याचें हित जोडणारा, तंटे मिटविणारा, परदुःखानें गहिंवरणारा, परोपकारी व दाता असा हा शाहू छत्रपति मोठा भाग्यशाली व अत्यंत लोकप्रिय राज्यकर्ता झाला. त्याच्याशीं कोणत्या ना कोणत्या रीतीनें संबद्ध असलेलीं अनेक स्थळें आजतागायतही सातार्‍यास आहेत."

—मराठी रियासत

शाहूमहाराज मार्गशीर्ष वद्य ३ भृगुवारीं शके १६७१ शुक्ल संवत्सरीं सकाळीं चार घटका दिवसास परलोकवासी झाले. "सर्व जनास दुःख जाहलें. मनुष्य मात्र लहानथोर पदरचे. त्यांचा बाप प्रतिपालन कर्ता ते दुःख स्मरून क्लेश जाले ते लिहावयास असमर्थता आली. कारण असा प्रभु दयावंत दुसरा जाला नाहीं. धन्याचे राज्यांत अपराधी झाला तरी 'हत्यारें करून घ्या' परंतु 'मारा' असा शब्द त्याचे मुखी आला नाहीं. अजानुबाहू अजात शतु, पुत्र–मित्र–अरी एकरूप व्यवस्थेनीं वागवावयाचे. कोणास गैरभाषण केलें नाहीं. असा पुण्यश्लोक राजा निधन पावला." त्याचेबरोबर सकवार बाई व दोन नाटकशाळा सती गेल्या. 'अनेक वाद्यें, घरोघरीं हळदकुंकू, समारंभें करून माहुलीस मोठ्या गजगांनीं दोन लाख मनुष्यें जमा झालीं'. "तिसरे दिवशीं दुसरी राणी धाकली सखू सती गेली."

बादशहाचे कैदेंत असतां शाहूचीं दोन लग्नें झालीं. त्या दोन राण्या अंबिकाबाई व सावित्रीबाई आणि विरूबाई रक्षा होती. नंतर शाहूनें आणखी दोन बायका केल्या. एक सकवारबाई व दुसरी सगुणाबाई, शिवाय लक्ष्मीबाई व धाकली सखू अशा दोन नाटकशाळा होत्या.

—इ. सं. पेशवे दप्तर माहिती–पृष्ठ २—.

# शाहूमहाराज यांचा मृत्यु

## ७

## [ शाहीर—दादू ]

शाहूमहाराज शिव झाला । अवतार खचला ॥ ध्रु०॥

ज्याचे अवघें ऐवढें त्रिभुवन । सुख पावले जन ॥ निर्दाळिले शत्रू दुसमान । मोंगलाई तुरुकान ॥ हाबशी कापती ज्याच्या धाकाला १

शुक्रवार दिन चांगला ॥ शाहू मुक्त पावला ॥ नगरी धुंधकार पडला ॥ ऐसा मोहरा । घेउनी चला रे माहुलीला ॥ २

सखु कदमाची बोलली । धनीन चालली ॥ सती निघते म्हणून बोलली जाऊनी हौद्यांत बैसली । "घेऊन चला रे ह्या शाहूला" ॥ ३

धनीन बोलली लोकांला । "शाहू मुक्त पावला ॥ बेगी बोलावा पेशव्याला चौकण द्या रे चोरट्याला । दुःख देऊं नये रयतेला ॥ कैद करा शिरक्याला । शाहू होता तो निघून गेला" ॥ ४

धनीन सकवार बैसून । कीर्त केली तीन ॥ गेली वैकुंठा भुवन । शाहूसी घेऊन । इंद्रें जयजयकार मांडिला ॥ ५

---

**शिव झाला**—कैलासवासी झाला. **अवतार खचला**—अवतारी पुरुष गेला. **ज्याचें अवघें एवढें त्रिभुवन**—( अवघे—सर्व ) अखिल जगत् होतें, १

**शुक्रवार**—चूक. गुरुवार पाहिजे. **मुक्त पावणें**—मृत्यू पावणें. उ० "मुक्त पावले साहेब नाना देवा केल्या कशा तडातोडी !" **धुंदकार**—अन्धकार, आकान्त. **माहुलीला**—सातारा शहराची स्मशानभूमि. येथें कृष्णा व वेण्या यांचा संगम होतो. २

**सखु कदमाची**—"तिसरे दिवशी दुसरी राख धाकली सखू सती गेली" [ इ. सं. पेशवे दप्तर, माहिती, पा. २ ]; [ रि. वि. २,१५८ ]. ३

**चौकण**—चौकण देणें, चहूंकडून घेरणें. ४

**तीन**—तिनें. **वैकुंठा भुवन**—वैकुंठ भुवना "सहगमनाची सिद्धता करून

नाना चालले सरदार। आणि एक उमराव ॥ अन्न दिली हो संगमावर
मोठा झाला काहार। दादू चातुर बोलला ॥ ६



हळदकुंकूं वाणें दिलीं. गोप्रदानादि कित्येक प्रकारचे धर्म केले. अनेक वाद्यें घरोघरीं हळदकुंकूं समारंभें करून माहुलीस मोठ्या गजरांनीं दोन लाख मनुष्यें जमा झालीं. सहगमनविधि झाल्यानंतर सर्वांनीं स्नानें करून शहरांत येऊन दीपदर्शन घेऊन श्रींचे अवलोकनानें पुनित होऊन घरोघरीं गेले." [शा.म.ब. भारतवर्ष पा. ८६।८७]. ५

एक–किनीएक (?). चातुर–चतुर, शहाणा. ६

# शाहूमहाराज यांचा मृत्यु

## ८

## [ शाहीर-फिरंगु नाना ]

तुझे गुण मी वर्णूं किती छत्रपति । छत्रपति शिव झाला ।। जैसा चंद्रमा लपाला । अवघा धुंधुकार पडला ।। ज्यानें धनमाल सोडिला । गेला अंतीं तो झाला । इंद्रागती केली भक्ती ।। तो शतयुगीचा सती । कीर्त सांगती ।। १

चारी दिशा भुल झाली । अवघी नगरी आकातली ।। कैशी गत शाहूला झाली । खान रत्नाची खचली ।। दोर खुटला तो पछि होऊन गेला। झाल सोडिला ।। तो काळ कैसा हातचे हातीं ।। २

---

**धुंधुकार**–अंधकार. **धनमाल**–माल ( अरबी पु० ) संपत्ति. **धनमाल**–धनदौलत. **गेला अंतीं तो झाला । इंद्रागती, केली भक्ती । तो शतयुगीचा सती कीर्त सांगती**–पूर्व जन्मांतरीं शेंकडों युगें भक्ति केली, म्हणून तो अन्ती जातांच ( मृत्यु पावतांच ) इंद्रागती झाला म्हणजे इंद्रलोकाला गेला. त्याच्यामागून सती गेलेल्या स्त्रिया त्याची कीर्ति सांगत आहेत. "राजे लोकांच्या वैभवाचें व सत्कीर्तीचें वर्णन कर्तव्य असतां त्यांच्या शवावरोबर किती बायका व दासी सती गेल्या हेंहि मुद्दाम सांगण्यांत येई. वैभवाचें व सुकीर्तीचें अनुमान करण्यास हें एक गमक मानण्यांत येई" [ खरे: म. रि. म. वि. १६१]. १

**भुल झाली**–चारी दिशांना दिसेना. भावार्थ, सर्वजण किंकर्तव्यमूढ झाले. **आकांतली**-अक्रोश करती झाली, दुःखी झाली. **खान**–खाण. **दोर खुटला–खुंटणें**–तोडणें [शु. म. को.]. **दोर खुटला**–आयुष्याचा दोर तुटला, आयुष्यदोरी तुटली. **पाछि**–मू. श. पंछि–पक्षी. त्यावरून पुढें तयार झालेला शब्द. **पछीप्यारा**–पक्ष्यासारखा प्रिय, आवडता. येथें दोनही अर्थ संभवतात. **तो काळ कैसा हातचे हातीं**–तो काळ–ते काळ, ते काळीं. **हातचे हातीं**–हातोहातीं. त्या वेळीं तो हातोहात कसा नाहींसा झाला ? (२) **काळ**–लाल (?). ( मोडींतील घोंटाळा ? ) २

जसा गाईला घेरिला व्याघ्र। तैशी गत झाली सकवार॥ शाहूसारखा शंकर। गेला खरा परतुन न ये संसारा। टाकुनिया पसारा सर्व जाती॥ ३

कईकाचें गेलें अन्न। रडती संसारा कारण॥ धनी समर्थ नारायण। जग पाळिलें, नाहीं कोण्हां छाळिले॥ रत्न हरपलें ते, नांव त्याचें राहिलें सर्वां चित्तीं॥ ४

काय वर्णूं तयाचे गुण। जैसा खेळ खेळला कृष्ण॥ तैसें रूप गेलें झाकून झाले गुप्त। ते जनीं सांगती कीर्त साधुसंत॥ ते मानवले भगवंत बरवे रीती॥ ५

काशीहूनि एक राज। त्रिलोक्यांत नांव गर्जे (गर्ज)॥ शाहूसारखा महाराज। होईना ऐसा धन्य धन्य स्वामी जगदीशा! नेला कैसा। तो काळें घातला फांसा मोहनमती॥ ६

छत्रपती पुण्यपावन। रयत रक्षिली आबादान॥ घरोघर केलें सोनं अपरंपार॥ कौल त्याचा करार। शाहू थोर महाराज परमेश्वर॥ जन ध्याती॥७

जैसें रामानें केलें राज। तें पद पावले महाराज॥ काय वर्णु तयाचें तेज। फिरंगु नाना बोले सहज॥ करितो भक्ती। मन भाव धरूनि चित्तीं॥ तूं माझा हो भूपति। मज सारथी॥ ८

---

**जैसा गाइला घेरिला व्याघ्र**–वाघांनीं वेढलेल्या गाईप्रमाणें. **सकवार**–सकवारबाईला किंवा सकवारबाईची. ३

**ते मानवले भगवंत–बरवे रीतीं इ०.** सज्जन असे ते शाहूमहाराज प्रत्यक्ष भगवंतच कीं काय असें जनतेला मानवलें. प्रजेला ते प्रत्यक्ष परमेश्वरासमान वाटत होते. **काशीहून एक राज**–काशीपासून एकछत्री राज्य. **मोहनमती–मोहन–**अमिष [ मोल्स ]. काळें त्याच्या मतीस मोह घातला (?) २. **मोहन**–'मौन'चा अपभ्रंश [ मोल्स ]. काळानें शाहूच्या जिवाला फांसा घातला हें पाहून आमची मती मुकी झाली. (?). ६

**कौल त्याचा करार–कौल–**ईश्वरीवचन [पट]. **करार**–निश्चित, मुक्रर, कायम. परमेश्वराच्या शब्दाप्रमाणें त्याचा शब्द अन्यथा होत नसे. **ध्याती**–गाती, ध्यान करतात. ७

**पद**–पदवी. ८

# पानिपत येथील लढाई

प्रस्तुत पोवाडा मूळ अठरा चौकांचा आहे. पण ती प्रत रा० शाळिग्राम यांना मिळाली नाहीं. म्हणून आपल्या आवृत्तींत हा बारा चौकी पोवाडाच त्यांनीं छापला. या पोवाड्याच्या प्रस्तावनेंत ते लिहितात. "या पोवाड्याचे अठरा चौक तुळजापूर आणि अक्कलकोट येथील गोंधळ्यांजवळ आहेत म्हणून ऐकतों."

रा० शाळिग्राम यांच्या या वरील माहितीच्या सुगाव्यावर रा० शितूत यांनींही ती प्रत हस्तगत करण्याकरतां फार परिश्रम केले. पण 'जेथें जेथें शोध लागेल तेथें तेथें जाऊन आणि हिसके खाऊनहि' त्यांना ती प्रत उपलब्ध झाली नाहीं. शेवटीं शाळिग्राम यांच्याप्रमाणें एका बाराचौकी प्रतीवरच त्यांना समाधान मानावें लागलें.

वरील दोघां गृहस्थांच्या पुस्तकांत छापलेले हे पोवाडे म्हणजे मूळ एकाच पोवाड्याच्या नकला आहेत. दोघांत फरक आहेत ते असेः—

( १ ) कांहीं अंत्रे शितून प्रतींत जास्त आहेत तर कांहीं अंत्रे शाळिग्राम प्रतींत अधिक आढळतात.

( २ ) शितूत यांनीं गोंधळ्याच्या उच्चाराबरहुकूम किंवा गोंधळ्याच्या लिखितानुरूप पोवाडा छापला आहे. शाळिग्राम यांनीं मात्र तो व्याकरणदृष्ट्या शुद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्या प्रयत्नांत पुष्कळसे प्रास नष्ट होऊन पोवाड्याचें नुसतें गद्य वाचनहि कसेंसेंच वाटूं लागतें.

(३) दोघांनींहि आपापल्या पोवाड्यांना निरनिराळ्या चाली लावल्या आहेत. आणि बहुधा या चालींच्या बदलामुळेंच शितूत प्रतींतील चरणांत शाळिग्राम-प्रतींतील चरणांहून थोडीं अधिक अक्षरें येतात. बदलून चाल लावावयाची असल्यामुळें गोंधळ्यानें तशा अक्षरांची योजना केलेली असावी.

(४) शाळिग्राम प्रतींतील दोष शितूत-प्रतीवरून व शितूत-प्रतींतील दोष शाळिग्राम-प्रतीवरून दुरुस्त करतां येतात. उदाहरणार्थ—

| अशुद्ध पाठ<br>शाळिग्राम-प्रत | शुद्धपाठ<br>शितूत-प्रत |
|---|---|
| १ दणादण मेरूमंडळ धरणी कांपती | १ दणादण मेरू मांदार धरणी कांपती |
| २ पांडवदळीं बिभीषण आला कीं–<br>पाहतां वीर खवळला | २ पांडवदळीं भीमसेन आला—<br>कीं पार्थवीर खवळला. |
| ३ रास्ते पटवर्धन गमले | ३ रास्ते पटवर्धन नाहीं गमले |
| ४ चाळीस हजार सडक कर–<br>णाटक चकमती | ४ चाळीस हजार सडक (तरवार)<br>करणाटकची चमकती |
| ५ म्हवांगी | ५ लवंगी |
| ६ नीर देही अंतकाळ झाला | ६ निर्जीव आंतकाळ झाला |
| ७ राजा रणजीत | ७ राजा रंजीस |

| अशुद्धपाठ<br>शितूत-प्रत | शुद्धपाठ<br>शाळिग्रामप्रत |
|---|---|
| १ नगरगुणवाले | १ नरगुंदवाले |
| २ खंडाळा मोड लिंबाट | २ खंडावा मोडिल वाट |
| ३ पानाचा विडा | ३ पैजेचा विडा |
| ४ नेट उठविला | ४ वेठ उठविला |
| ५ पत्रें लिहिलीं यकत्यार | ५ पत्रे लिहिली एकच तार |
| ६ सराजम | ६ सरंजाम |

एकंदरींत त्यांतल्या त्यांत पाहतां शितूत-प्रत अधिक शुद्ध व थोडी अधिक माहिती देणारी आहे.

(५) परस्परांच्या प्रतींवरून परस्परांच्या चुका दुरुस्त करतां येतात ही एकच गोष्ट या संग्राहकांच्या विवेचकबुद्धिशून्यत्वाचें प्रदर्शन करण्यास पुरेशी आहे. दोघांच्याहि पोवाड्यांतून दुर्बोध अशीं बरींच स्थळें आहेत तीं निराळींच. उदाहरणार्थ, शाळिग्राम प्रतींतील 'सांडणीस्वार फेकला पंजाब पंचीन बहादर' आणि शितूत-प्रतींतील 'सांडणीस्वार फेकिले कडाज्या अपसैन्या बहादर' हे चरण पहा.

(६) शाळिग्राम-प्रतींत पानपतावर गेलेल्या लोकांच्या नांवनिशींत चारपांच नांवें अधिक आहेत.

(७) सैन्याची गणती करतांना किंवा रुपयांचा हिशेब देतांना दोनहि प्रती सारख्याच सढळ आहेत. आळीपाळीनें एकमेकांवर वरचढ करतात इतकेंच ! उदाहरणार्थ—

| शाळिग्राम-प्रत | शितूत-प्रत |
|---|---|
| १ चाळीस हजार करवल जमले. | १ ऐशि हजार करवल जमले |
| २ एकांडे पन्नास हजार रहदारी करून | २ एकांडे साठ हजार रहदारी-करून |
| ३ सात हजार बल्लमवाला | ३ साठ हजार बल्लमवाला |
| ४ आटोकाट जमले पठाण कुंज-पुन्यास साठ हजार | ४ अष्टकोट जमले फलटण—कुंजपुरास ऐशी हजार |
| ५ बारा हजार पेंढार भाल्याचे | ५ नऊ हजार पेंढार भाल्याचे |
| ६ नऊ कोट रुपये द्यावे धाडून | ६ नव्वदकोट रुपये द्या धाडून |

पण त्यांतल्या त्यांतहि शितूत-प्रतीला संख्येचा धरबंद काहींच नाहीं. केव्हां एक कोट, केव्हां नऊ कोट, केव्हां दहा कोट, केव्हां नव्वद कोट तर केव्हां शंभर कोट अशी लंकालूट केली आहे !

(८) शाळिग्राम यांच्या प्रतींत नवव्या चौकाच्या सुरवातीस जें दस्त्याचें किंवा दस्तनाचें कोष्टक आहे तें चूक आहे. शब्दशः अर्थ करावयाचा झाल्यास दोन दस्त्यांतील सैनिकांची संख्या २९२८२००होते. तसेंच शितूत-प्रतींतील कोष्टकाप्रमाणें तीच संख्या २६६२०००० होते. अर्थात् या दोन-हि संख्या अगदींच असंभाव्य ! 'अकराशांचे' या शब्दाचा पदच्छेद करून 'अकरा अशांचे' असे शब्द स्वीकारले तरी त्या संख्या अनुक्रमें २९२८२ व २६६२०० अशा येतात. त्या कमी असल्या तरी वरच्या इतक्याच अविश्वसनीय. बखरींतून शिवाजीमहाराजांच्या सैन्यगणतींचीं जी कोष्टकें प्रसिद्ध आहेत तीं सोडलीं तर त्यानंतर पेशवाईतील सैन्यगणतींचीं कोष्टकें ऐतिहासिक कागद-पत्रांतून कोठें प्रसिद्ध नाहींत. नाहीं म्हणावयास—खरे पान ३५४० वर, इंग्रजांशीं झालेल्या लढाईचें वृत्त लिहितांना स्वतः परशुराम-भाऊंनीं 'कुपणी' शब्दाचा उपयोग केला आहे व त्याचा अर्थहि दिला आहे.

ते लिहितात. " कुपणी म्हणणे शंभर माणसांची जमेत. त्यांत एक निशाण." पण तो आधार घेऊनहि शितूत-प्रतींतील " शंभराची कंपनी " हें कोष्टक बरोबर ठरवितां येणार नाहीं. कारण भाऊंच्या पत्रांत पलटण कंपू किंवा दस्ता यांचें 'कुपणी'शीं प्रमाण कोठें दिलें आहे ? ( रा०वा. गो. आपटे यांनीं आपल्या शब्दरत्नाकरांत हें अविश्वसनीय कोष्टक दस्ता या शब्दाचा अर्थ म्हणून जसें-च्या तसेंच उचलून घेतलेलें दिसतें.)

म्हणून हे दोन्हीही पोवाडे ताडून पाहून सरसनीरस पाठभेद ठरवून त्यांतल्या त्यांत ऐतिहासिक माहितीशीं किंचित् अधिक जवळ येणारे पाठ स्वीकारून त्या दोहोंपासून हा पोवाडा तयार केला आहे. दोनहि प्रतींत दुसऱ्या व तिसऱ्या चौकांत मुख्यतः सरदारांचीच नांवनिशी आहे. याकरितां ते दोनहि चौक एकांतच समाविष्ट केले आहेत.

निव्वळ काव्य या दृष्टीनें पाहिल्यास पोवाडा तडफदार आहे यांत शंका नाहीं. परंतु इतिहासाशीं ज्याचा थोडासुद्धां परिचय आहे त्याचा या पोवाड्यानें विरसच होईल. सर्वस्वीं विपरीत वर्णनें या पोवाड्यांत असतां रा० शाळिग्राम म्हणतात कीं, " या पुस्तकांतील सर्व पोवाड्यांत हा उत्तम प्रतीचा आहे. स्वारस्याच्या संबंधानें तर याविषयीं लिहिणेंच नको." रा० शितूतही म्हणतात कीं, " एकंदर पोवाड्यांमध्ये हा पोवाडा पहिल्या नंबरचा आहे असें मला वाटतें." आमच्या तर मतें सदर पोवाडा भाषेच्या दृष्टीनें बरा असला तरी इतिहासा-च्या माहितीच्या दृष्टीनें अगदीं अधम प्रतीचा आहे. पोवाड्यांत तरी निदान ऐतिहासिक माहिती ही काव्याच्या वस्त्राप्रमाणें नसते तर त्वचेप्रमाणें असते. रा० शाळिग्राम या पोवाड्याचे स्वारस्याविषयीं म्हूष आहेत, ते त्याच्या चालीबद्दल असतील तर आम्हास कांहीं म्हणतां येणार नाहीं. पण स्वारस्य म्हणजे भाषासरणी किंवा रसप्रतीति हा अर्थ त्यांस अभिप्रेत असेल तरीहि या पोवाड्याहून सर्व तऱ्हेनें सरस असे दुसरे अनेक पोवाडे आहेत.

सगनभाऊनें विस्तार फार केला आहे व आपल्या माहितीप्रमाणें पेशवे डेरेदाखल झाल्यापासून अखेर त्यांचा मोड होईपर्यंत त्यांच्या प्रत्येक हाल-चालीचें सुसंगत वर्णन करण्याचा आव घातला आहे. पण पोवाडा जितका विस्तृत आहे तितका त्यांतील चुकांचा व्याप मोठा आहे. आणि त्याहि चुका बारीकसारीक तपशिलाच्या नसून चांगल्या ढोबळ असल्यामुळें इति-

इासाच्या कसोटीवर घांसतांच त्याचें असत्यवादित्व चांगलेंच उघडें पडतें. ढोबळ चुकांची लांबलचक जंत्रीच खालीं देतों.

(१) शाहीरानें पानपतावर विश्वासरावांना भाऊसाहेबांबरोबर रवाना न करितां खुद्द भाऊसाहेबाबरोबर नानासाहेबांना रवाना केलें आहे एवढेंच नव्हे तर शेवटीं १० व्या चौकांत पानपतास त्यांची कत्तलहि उडविली आहे. पोवाड्यांत आलेला 'नाना' हा शब्द 'नाना पुरंदरे' यास अनुलक्षून असावा अशा समजुतीनें चाललें तरी ती समजूत फार वेळ टिकत नाहीं. १० व्या चौकांतील वर्णनावरून नानासाहेब पेशवे व गोपिकाबाई हीं दोघेंहि खुद्द पानपतास छावणींत किंवा जवळपास कोणच्या तरी मुक्कामावर होतीं असा पोवाड्यांत स्पष्ट उल्लेख आहे. कारण त्यानंतर चारपांचच ओळीनंतर नानासाहेब यांची कत्तल केली आहे व नंतर पानपतच्या प्रसिद्ध पळाचें वर्णन आहे. "नानाभाऊ तलवार धरून," "नानाभाऊनीं पोषाक करून चंदेरी तऱ्हा," "आले नानाभाऊ धासत हिंदुस्थानाला" या उक्तींत आणि सबंध १०व्या चौकांत शाहिराला नानासाहेब पेशवाच अभिप्रेत आहे हें स्पष्ट दिसतें. 'भाऊ बोले नानाशीं' (८ चौक) येथें मात्र नाना पुरंदरेच घेण्याची सोय आहे, कारण नानासाहेब पेशव्यास सदाशिवरावभाऊ कसा हुकुम करणार ? पण ही सर्व चिकित्सा व्यर्थ आहे. कारण कवि सर्वत्र नानासाहेब पेशवा व भाऊसाहेब पेशवा पानपतास गेले असें सांगतो. व याहूनहि विपरीत गोष्ट म्हणजे तो नानासाहेब पेशवे हजर असतां भाऊसाहेबांकडे मोहिमेची सर्वाध्यक्षता देतो !

(२) सबंध पोवाड्यांत विश्वासरावाची वार्ताहि नाहीं.

(३) भाऊसाहेब पानपतास जाण्याकरितां पुण्याहून निघाले असें शाहीर सांगतो. तेंच चूक असल्यामुळे पुढें पर्वतीला स्वारी गेली वगैरे अर्थातच काल्पनिक आहे.

(४) भोसल्यांपैकीं कोणीहि पानपतास गेले नसतांना (म. इ. सा. पानपत राज. टीप २९९, पान ३२५) शाहीर त्यांचा बेलाशक गोटगणतींत उल्लेख करतो. यावरून तशीं इतरहि कांहीं नांवें काल्पनिक असावींत असा जबर संशय येतो.

(५) पांचव्या चौकांतील हत्ती लढविण्याचा प्रकार व राघोबादादाचा प्रश्न पाहण्याचा सल्ला काल्पनिक किंवा ऐकीव माहितीचा असावा.

(६) होळकर व शिंदे वाटेत गंभीरा नदीच्या सुमारे भाऊस येऊन मिळाले असतां शाहीराने पुण्यासच त्यांची गोटगणती केली आहे. येवढेंच नव्हे तर मल्हारराबास फौजेत कुलअखत्यारहि देऊन टाकला आहे.

(७) 'दिल्लींत मुडदा माईना गंज पडला। भाउची खराबी गणीत नाहीं जखमेला ॥' असें दिल्लीच्या हल्ल्याचें शाहीराने वर्णन केलें आहे. पण याला ऐतिहासिक कागदपत्रांत मुळीच आधार नाहीं. मराठ्यांचे तेथें म्हणण्यासारखेंहि नुकसान झालेलें नाहीं.

(८) दिल्लीकिल्ला घेऊन 'बादशहा जेरदस्त (काबीज) केला' असें शाहीर म्हणतो! बादशहा होताच कोठें?

(९) भाऊंनीं नानाबरोबर गोविंदपंत बुंदेल्यास पानपतावरून रसद मिळविण्यास पाठविलें असें शाहीर म्हणतो; पण गोविंदपंत किती दूर होता तें प्रसिद्धच आहे.

(१०) भाऊसाहेबांनीं अगोदर दिल्ली घेऊन नंतर कुंजपुरा घेतला. नंतर त्यांना दिल्लीस येतांच आलें नाहीं. असें असतां शाहीराने कुंजपुऱ्यानंतर पुन्हा दिल्लीस चकमक उडविली आहे व तख्तहि तेव्हांच फोडविलें आहे.

(११) 'गोळ्यासारखा भाऊ उडाला। दारू महात झाल। चकाचूर' भाऊसाहेब मेलेले कोणींच पाहिले नाहींत व ते शेवटच्या गर्दींत घोड्यावरून पायउतारा होऊन शिरले अशी खरी हकीगत आहे.

(१२) तारखा, वार चुकले आहेत. शेवटच्या लढाईचा दिवस शाहीर रविवार देतो. खरा वार बुधवार होय.

सारांश, पोवाड्यांत विसंगति, व्युत्क्रम आणि कल्पना यांचें फार मिश्रण आहे. अतिशयोक्तीचा अतिरेक सैन्याच्या संख्येत पहावा. 'नउ रात्र नउ दिवस' अहोरात्र गिलचे पेशव्यांना लढवून भारतीय युद्धाची निम्मी कसर भरून काढली आहे; वगैरे वगैरे.

शाळिग्राम म्हणतातः "शाहीर शेवटच्या बाजीरावाचे वेळीं विद्यमान होता. हा पुण्यात राहणारा असतांहि हा पोवाडा पुणे प्रांतांत प्रसिद्ध नसून

सातारा, फलटण, मिरज, सांगली इत्यादि ठिकाणीं दक्षिणेंत मात्र आढळतो." बरोबरच आहे. इतकी खोटी माहिती पुणें-प्रांतांत कोण ऐकून घेईल?

हा पोवाडा पुण्यापासून दूर साताऱ्यास बसून एका मुसलमान शाहिरानें मूळ सांगोवांगी ऐकलेल्या हकीगतीवरून रचलेल्या दुसऱ्या एका उर्दू पोवाड्याच्या आधारानें रचला. ( शाळिग्राम आवृत्ति पाहा ) माधवरावाचा राज्याभिषेक प्रसंगहि शेवटच्या चौकांत आहे त्यावरून पानपतनंतर बऱ्याच दिवसांनीं, पानपतच्या हकीगती शिळ्या झाल्यानंतर किंवा त्यांत काल्पनिक गोष्टींची भर पडल्यानंतर तो लिहिला गेला असें म्हणावयास हरकत नाहीं. रा० शाळिग्राम यांचे वेळीं अस्सल ऐतिहासिक साधनांची विपुलता असती किंवा त्या वेळीं उपलब्ध असलेल्या साधनांनींसुद्धां पोवाड्यांतील तपशील त्यांनीं ताडून पाहिला असता तर सदर पोवाड्यावर लिहिलेली टीप त्यांनीं खास छापली नसती. त्या टीपेंत ते सांगतात कीं, या अप्रतिम पोवाड्याचें श्रवण करून पेशव्यांनीं पानपतावरून धरून आणलेले साडेसातशें कैदी सोडले!!!

# पानपतचा पोवाडा

## १

### [ शाहीर–सगनभाऊ ]

[ चाल—तुझी काळजी मला राजसा जासुद पिटवा इथुन ]

भाऊ नाना तलवार धरून। गेले गिलच्यावर चढाई करून ॥ ध्रुपद ॥

सवाई बाजीराव पेशवे पुण्यवान प्रधान। नाना भाऊ गादीवर शूर जन्मले जैसे अर्जुन ॥ शहर पुणें वसविलें मोहरा पुतळ्यांला नाहीं कांही उणें। चमके नंगी तलवार सैन्य हे सारें लष्कर पाहून ॥ गर्व कोंदला फार जैसा लंकापती रावण। होणारासारिखें अक्षर कैसें लिहिलें ब्रह्याने ॥ ( चाल ) ॥ नामांकित सरदार थोर। नामें ऐका तपशीलवार ॥ बोलावून अवघे वजीर। सजवूनया सभा सदर ॥ मग कैसा केला विचार। पत्रें लिहिलीं एकच तार ॥ अष्टप्रधान मानकरी सार। जरीपटकाऐशीं हजार ॥ गाईकवाड सैनापती भार ॥ भाला ऐशीं हजार होळकर। बारा हजार बाणांची कतार। चाळीस हजार भोसले नागपुरकर ॥ वीस हजार अरब सुमार। तीस हजार हपशी बरोबर ॥ आले मल्हारराव होळकर। फौजेमध्यें कुल अकत्यार ॥ अठगपगड लोक सार ॥ आपल्याला मिसलीवर ॥ ( चाल ) ॥

**होणारा मारिखें अक्षर कैसें लिहिलें ब्रह्यानें**–पुढें जें होणार तें ब्रह्मदेवानें कपाळीं लिहून ठेवलेंच होतें त्याप्रमाणें बुद्धि झाली व रावणासारखा गर्व आला, असा भावार्थ. **वजीर**–सरदार, मानकरी. **सदर**–सदरेला; कचेरीच्या जागीं. **सजवूनया सभा सदर** सदर म्ह० कचेरीला सभा सजविली. म्ह० दरबार भरविला. **एकच तार**–एका फर्म्याचीः एका मजकुराची. **जरीपटका ऐशी हजार**–जरीपटक्याची फौज ऐशीं हजार. **कतार**–उंटाची रांग. **बारा हजार बाणांची कतार**–बाण लादलेल्या बारा हजार उंटांची रांग. **सुमार**–संख्या; गणती; अदमास. **कुल अकत्यार**–सर्व सत्ता. **मल्हाररावा**-इतका वयोवृद्ध व अनुभवी सरदार त्यावेळीं दुसरा कोणी नव्हता म्हणून त्याचा बराच मान असे. **मिसल ( आरबी )**–दरजाप्रमाणें कोणी कोणच्या ठिकाणीं

चाळीस हजार पठाण नित्य तेघे चमकती। अर्बुज जात ही खंदी फिरे भोंवती ॥ सिंध जाट रोहिला नाहीं त्याला गणती। घोरपडे नाईक निंबाळकर नौबद वाजती ॥ घाटगे मोहिते माने पाटणकर झुकती। ढालेशीं ढाल भिडे जरीपटक्याचे हत्ती ॥ हे मानकरी भाऊचे ऐसें दुनया बोलती ॥ एक एकाबरोबर ऐसे पतके किती। चाळीस हजार सडक करनाटकची चमकती। बाराभाई जमले नाहीं त्यांची गणती ॥ सांडणीस्वाराची डांक फिरे भोवती। ............॥ अशी जमाबंदी करून। भाऊ नाना ॥ १

शाण्णव कुळींचे भूपाळ सारे मानकरी बरोबर। धायगुडे पायगुडे मोरे शेडगे पांढरे महाशूर ॥ खल्लाटे लोखंडे भिसे वाघमारे आणिक हटकर। शेळके बोळके काळे खचल खराडे नाहीं त्याला सुमार। शिरके महाडिक मिसाल पिसाळ बोधे बरगे आहेत बरोबर। जाधव धुळप पोळ चवाण ढफळे भोंसले गुजर रणशूर ॥ लिगाडे कदम फडतारे घाडगे यादव थोरात भापकर। आंगरे इगळे शेवाळे शितोळे रणदिवे बावळे खळदकर ॥ गाढवे रसाळे जगताप जगदाळे काकडे काटकर। बोबडे दुबल भोइटे लिंगाडे सांवत खिरसागर (क्षीरसागर)। गोडसे निकम दुधे फाळके धुमाळ गजरे वालकर तेरदाळकर। वागल कोकाटे कडमकर रणनवरे कालेवार आयरेकर ॥ हे सारे सुभे भाउचे उभे आपलाल्या बाजूवर ॥ (चाल) ॥ चाळीस हजार करवल

---

असावयाचें ती व्यवस्था. तेघे-मू. श. तेगा म्ह० रुंद पातीची तरवार. अर्बुज-अडदांड, अडाणी. खंदी-कडवी, उमदी, शूर. झुकती-डौलानें रमत चालतात. ढालेशीं ढाल भिडे-ढाल-निशाण. भावार्थ असा कीं, पथकाला पथक भिडलें होतें इतकी फौज जमली. निशाण याचा अर्थ निशाणाखालची फौज असाहि होतो. उदा० "हणा हणा म्हणोनी उठलिं निशाणें सारीं." पतके-पथकें. किंवा पथकांचे अधिकारी. सडक-लांब आणि सरळ तरवार. सडक करनाटकची चमकती-तरवारी घेतलेले कर्नाटकी शिपाई शोभत होते. जमाबंदी-संचणीः जमवाजमव. १

सुभे-सुभा-प्रांताधिकारी, सरदार. करवल-करोल, बंदुकस्वार.

जमले। सोडिले शिरावर समले॥ रास्ते पटवर्धन नाहीं गमले। ढमढेरे तळेकर तुमले॥ आले पंत जागा त्यांनीं आंखले। कितुरकर देसाई हातीं भाले। हैदराबादकर मोगल आले॥ मंत्री चिटणीस नरगुंदवाले। कोल्हटकर महाराज खटाववाले॥ कुडुकवाल्यांनीं खाजिने पाठविले। गोवेकर फरास पुढें गेले॥ लहान लहान मानकरी चुकले। थोर थोर जमेसी धरले॥ नाना फौज पाहतांना चकले॥ दलबादल डेरे दिधले। नगारखाने झडूं लागले॥ गोसावी त्यामधिं वायले। फक्कड ते सोटेवाले॥ मग लमाण कितीक आले। बावन पागा फारच झाले॥ (चाल)॥ कोतवाल घोडे सजविले श्यामकर्ण। भरगची

---

**समले**–शेमले. 'शिपाईगिरांची शर्थ व्हावी म्हणून उमेदवारांनें बिरदें बांधून समले सोडून ...... घोड्यास थापटून उभे राहिले' [ पानिपत बखर पा. २३]. **नाहीं गमले**–रास्ते पटवर्धन स्वारींत हजर नव्हते. **तुमले**–(१) हेंहि आडनांव असावें. (२) तुंबले तर नव्हे तुंबले म्ह० एकत्र सांटले. **पंत**–पंतप्रतिनिधि व पंतसचिव. पुष्कळ अंशीं विश्वसनीय असा पानिपतच्या बखरीचा कर्ता रघुनाथ यादव हा पंतप्रधान व पंतसचीव यांचीं नांवें देत नाहीं. पंतप्रधान व पंतसचिव हे दोघेहि मोठे मानकरी होते. भाऊसाहेबांबरोबर गेलेल्या बहुतेक सर्व मोठमोठ्या सरदारांचीं व मानकऱ्यांचीं नांवें त्यानें दिलीं आहेत त्यांत यांचीं नांवें नाहींत. शाहिरानें अदमासानें नांवें दडपून दिलेलीं दिसतात. **जागा त्यांनीं आखले**–आपला तळ पाडला, डेरे दिले, डेरे दाखल झाले. **चकले**–चकित झाले. **दलबादल डेरा**–भव्य व शृंगारलेला डेरा. मू. श. दिलबादल म्ह० शहाजहानाचा डेरा. **गोसावी**–ही एक लढवय्यी जात होती. पेशव्यांच्या सैन्यांतून यांचा नेहमीं बराच भरणा असे. **वायले**–वाइले, वेगळे किंवा निराळे, शिवाय. **सोटेवाले**–सोटा हें शस्त्र घेतलेले. "गुर्गुजा तु गदा सोटा मुद्गरोथश्विकंबिच" [रा. व्य. को.]. **लमाण**–सैन्यास धान्य पुरविणारे लोक. (२) पेंढाऱ्यांप्रमाणें सैन्याबरोबर असलेली लूट करणारी जात [ श्रीरंगपट्टण मोहीम पा. १५३]. **फारच झाले**–असा अतिशय जमाव झाला. **कोतवालघोडे**–स्वारीपुढें मिरवावयाचे घोडे. **सजविले श्यामकर्ण**–श्यामकर्ण वाजीप्रमाणें शृंगारले.

हत्तीवर झुला ।दिसे आरुण ।। अयन्याची अंबारी गगनीं तारांगण । आघाडीं चालली लगी भडक निशाण ।। सूतनाळी जंबुरे उंटावर रोखुन । खंडा पट्टा सुरे तिरकमान कटार लावून ।। ढाल फिरंग नवाजग्वाणी निशंग गगन लकेरी खुण । पिस्तुल बंदुक चकमक चमके सगीन ।। कराबीन बकमार याची खूण । राहिले एकदिल म्हूण करून ।। जमराडे सरदार झाबरे शूर अतिरथी । लई धनगर शाण्णव कुळींचे मराठे होती ।। हत्यार जमई जमदाड माडु घेऊन हाती । बिचवा लवंगी गुरगुज साग सोटा बरची

---

**भरगच्ची**-भरदार. **आरुण**-अरुण, गुलाली. **आयना**-आरसा. **तारांगण**-हत्तीवर उच शोभत असलेले हौदे व अंबाऱ्या आरशांनीं मढविलेल्या होत्या व त्या नक्षत्रयुक्त आकाशाप्रमाणें लखलखत होत्या. **लगी**-पताका लाविलेला सोटा; झेंडा [शालि] **सूत्र नाळी**-मुतरनाला, उंटावरच्या तोफा. **जंबुरा**-लहान तोफ. **खंडा**-खंडा किंवा खांडा. रुंद पात्याची दुधारी सरळ तरवार. **कमान**-धनुष्य. **फिरंग**-तरवार. **नवाजखाणी-नवाजखणी**-तीक्ष्णधारेचे [पट.] शालिग्राम या शब्दाचा तरवार असाहि अर्थ देतात. **निशंग**-तरवार किंवा भाता. **गगन लकेरी खूण**-(?). **संगीन** (मू. श. संगीत् )-बंदुकीच्या नळीला बसविलेला अरुंद पात्याचा लांब सुरा. बंदुकाना लावलेल्या संगिनी चमकत होत्या **कराबीन**-( फ्रे. इ. कार्बाइन ) रुंद तोंडाची आखूड बंदूक **बकमार**-लहान बंदूक, मोठें पिस्तुल. **खूण**-दूण पाहिजे ( मोडीची चूक ) **दूण**-दुहेरी रांग [ मोल्स.] **खूण करून**-दूण करून. दुहेरी रांग करून. **जमई** एक तऱ्हेचे शस्त्र [आपटे]. **जमदाड**-मोठी तरवार. **माडु**-काळविटाचे शिंगाची दोन टोंके असलेले एक शस्त्र. "हरणीची कोचीदार शिंगे दोन्ही बाजूंस असलेले व मध्यें धरण्यासाठीं मुठीसारखी योजना केलेलें असें जें हत्यार तो माडु होय" [दांडपट्टा ३५] **विचवा**-विचवांच्या आकाराची कटयार. **लवंगी**-मू. श. लोहंगी (स्त्री.)-लोखंडाची वेटाळी जागजागी लावून मजबूत केलेला प्राणघातक सोटा. **गुरगुज**-गदा 'गुर्गुजा तु गदा' [रा.व्य.को.] **सांग**-A spear or a javelin (esp. a spear) altogether of iron; भाला. **बरची-बर्ची** (फा ) लहान भाला. "लढवय्या इसमाच्या डोक्यापेक्षांहि उंचीचें, लोखंडी दांड्याचें, व शेवटी त्रिधारी गुप्तीप्रमाणें

फेंकिती ।। सुरसेप दारुचे कैफ धुंद लढयेती । फसत बालमपेंच खुबचार मार लई होती ।। देणें महाराजांचें परिपूर्ण । चाले फौज काय पाहतां दुरुन ।। भाऊ नाना०।। २

नाना भाऊंनीं विचार केला फौजा पहाव्या म्हणून । स्वारी निघाली बाहेर दर्शना पर्वतीच्या कारण ।। डंके झाले चहूंकडून घोड्यावर ठेविलें जीन । भले भले सरदार चालती आपआपल्या मिसलीन ।। पेढार पुढें तोफा चालल्या दारू गोळा बार भरून । हत्तीवर सूत्रनाळ उंटावर बाण भरून ।। बारा हजार उंट बाणांच्या कैच्या मागें चाले दबा धरून । कराबीन बकमार आरब सिंध रोहिले गोलचे गोल भरून ।। करवलवाले एकांडे पन्नास हजार रहदारी करून । बासडीवाले धनगर निवडक बाजूवर ठरून ।। (चाल)।। पुढें होळकर चालला । शिंदेशाई नाहीं(येत)गणतीला ।। साडेसातशें कोतवाल सजविला । त्यांला भरगची झुला ।। सहा हजार तोफा बार भरला । पायदळ निशाण कडक पुढें उडाला ।। चार हजार सोटेवाला । सात हजार बल्लम-

भोसकण्यासाटीं योजना केलेलें, अगर पान असून शेवटीं टोंक असलेलें असें जें शस्त्र त्यास बरची असें म्हणतात" [दांडपट्टा ८२]. **सुरसेप**–स्फोटक द्रव्य भरलेला गोळा. **कैफ**–कैफांत, कैफानें. **फसत बालम पेंच**–सैफ बल्लम पेचकबज (?) हीं सर्व हत्यारांचीं नांवें. त्यांचीं वर्णनें शिवाजी सोव्हीनीर यांत प्रो० माणिकरावांच्या "कांहीं ऐतिहासिक हत्यारें" ह्या लेखांत आलीं आहेत. **खुबचार**-डावपेंच. **देणें महाराजांचे**–शाहूमहाराजांची पूर्ण कृपा. २

जीन-खोगीर. **कैची**–(१)आगीच्या बाणांचा भाता. (२) आगीच्या २४ बाणांची जुडी [मोल्स.]. **दबा धरून**–दबाब असें असावें. **दबाव**–Awefulness, or authoritativeness (*Mols.*) गुरमाईनें, डौलानें. **करवलवाले**–करवलवाले–करोलवाले, बंदुकस्वार. **एकांडे**-**एकांडा**–खर्ड्याच्या लढाइच्या पोवाड्यावरील टीपा पहा. **रहदारी करून**–**रहदारी**–वर्दळ [पट.] भावार्थ–जमाव करून, जथ पाडून. **बासडीवाले**–भालेवाले. **बासडा**–भाला [मोल्स.]. **शिंदेशाई**–शिंद्यांची फौज. **शाई**-सैन्य. **नाहीं गणतीला**–गणना करितां येत नाहीं, अगणित. **झुला**–झुली. (मू. श. झूल.). **कडक**–

वाला ॥ गोलचा गोल नाईक आला । मागें फौज करनाटकवाला ॥ बावन पागा बारगीर जमला ॥ माय मोर्तब आले गणतीला । साठ मानकरी मोरचलवाला ॥ ( चाल ) ॥ रंगविले हत्ती पाखरा भरजरी जरा । अंबारी साडेसातशें मोती झालरा ॥ नाना भाऊंनीं करुन पोषाग चंदेरी तऱ्हा । गळा कंठीं पाच शिरपेंच मोत्यांचा तुरा ॥ कपाळीं केशरी टिळा चंद्र दुसरा । हौद्यांत बसून शाहीचा घेत मुजरा ॥ (चाल ) ॥ नऊ लाख सैन्य एकदिल घोडा शिरा । तीस हजार अबदागिरी बरोबर चाले ढिगारा । संगे झडती चौघडे शिंगें तुतारा ॥ पर्वतीचे दर्शन घेऊन येत माघारा । असा गर्वे गेला चढून ॥ शहर पुण्यास मुजरा करुन । भाऊ नाना०॥ ३

गर्जना, गोंगाट, गर्दी. **बल्लम**–आंखूड भाल्यासारखें एक शस्त्र. **गोल**–जमाव, सैन्य, समुदाय. **गोलचा गोल**–"याप्रमाणें नेमणूक करून गोलाचा गोल सात आठ घटका दिवस आल्यावर..." [भा. ब. १४४]. भावार्थ–विशिष्ट सैन्य रचना करून आलें. **बावन पागा बारगीर जमला**–पेशव्यांच्या बावन पागांतील बारगीर आले. "श्रीमंताच्या बावन पागा त्या मार्धि बावन सरदार." **नाईक**–नाईकवाडी, एक लढवय्यी जात. **माय मोर्तब**–**माही मरातब**–मत्स्य व दोन गोल सोन्याचे मिळून होणारे व हत्तीवरून मिरवावयाचें बहुमानाचें चिन्ह. हा मान फक्त राजांना व मातबर सरदारांना मिळालेला असतो. मायमोर्तब आले म्ह. मातबर सरदार दाखल झाले. **आले गणतीला**–गोट गणतीला आले, जमा झाले, हजर झाले. **मोरचलवाला**–मोर्चेल वारून घेण्याचा अधिकार असलेला, मातबर सरदार. **पाखरा**–झुली (मू. श. पाखर). **जरा**–जरीच्या. **मोती झालरा**–मोतिलग झालरी लावलेल्या अंबाऱ्या. **चंदेरी**–चंदेरी येथें झालेलें कापड. **शाहीचा**–सैन्याचा. **एकदिल**–एकचित्त, एकमताचा, निष्ठावंत. **घोडा**–घोडेस्वार **शिरा**–उत्तम. **अबदागिरी**–भावार्थ–अबदागिरीचा मान आहे असे मानकरी. तीस हजार अबदागिरींचा भार सैन्याबरोबर वागवावा लागत असे, इतक्या नांवाच्या असाम्या सैन्यांत होत्या. **ढिगारा**–समुदाय, समूह. **तुतारा**–तुतारी. ३

बाण बालम जिरीटोप बकतारे चाळीस हजार गणतीला। जामदारखाने फोडून पैसा साऱ्या सेनेशीं वांटिला ॥ कडी तोडे पोषाग कंठ्या दिल्या झाडून फौजेला। शांत केली चित्तवृत्ति मग मनसुबा काढला ॥ हत्ती लढविले गिलचे पेशवे यश आले शत्रूला। राघोबादादा म्हणे भाऊशीं प्रश्न पाहूं चांगला ॥ समस्तांनीं अर्जविले भाऊ ऐकेना कोणाला। दक्खनची सौभाग्य गळसरी तुटली त्या समयाला ॥ चाल केली गिलचावर डंके वाजवित चालला ॥ (चाल) ॥ धरिली दिल्लीची वाट। अजिंठ्याचा उतरला घाट ॥ बंडावे मोडल वाट। सातपुड्याची बारी दाट ॥ नऊ कोट मारवाडी नीट। त्याने येऊन घेतली भेट ॥ दिल्ली जमाबंदी चट। बादशहाने आणविला जाट ॥ लखनोरचे नबाब जवघाट। दीडलाख फौजेचा थाट ॥ सेना जमली

**बाण**-बाणवाले, आगीचे बाण घेऊन लढणारे. **बालम**-बल्लमवाले. **जिरीटोप**-शिरस्त्राण, जिरेटोप. **बकतारे**-बख्तर-चिलखत. **कडीतोडे पोषाग, कंठ्या इ०**-" लोकांचा दीलदिलासा करून तमाम नालबंदी दिली " [ म. इ.सा. पानपत राजवाडे लेखां.१६०. ]. 'याप्रमाणें वकिलांचीं कठोरपणाचीं भाषणे सदाशिवपंतांनी समजून घेऊन मजालस करून तमाम लहान थोर सरदार बोलावून आणून सरफराझ केला. मोत्यांच्या कंठ्या व शिरपेच व जडावाचीं कडीं व कलग्यातुरे, चौकडे व मंदाल व शालजोड्या...... सदरहू-प्रमाणें बक्षिसे देऊन एकदिल होऊन सर्वास स्तुतीनें गौरवून नांवाजिलें'. [ पा. ब.पान २०] ही हकीकत एक असली तरी प्रसंग निरनिराळे आहेत. पानपत बखरीमध्यें पानपत तळावर या गोष्टी घडल्या असें बखरकार म्हणतो व शाहीर पुण्यासच या गोष्टी घडल्या असें म्हणतो. सदर पोवाडा ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें अत्यंत अशुद्ध आहे. **मनसुबा**-मसलत. **हत्ती चढविले इ०**-गिलचे पेशवे-अशीं नावें देऊन हत्तींची लढाई लाविली. पण त्यांत गिलच्यांचे नांव दिलेल्या हत्तीचीच सरशी झाली. **प्रश्न**-शकुन [ आपटे ]. **बंडावे मोडले वाट**-बंडावे मोडिले वाटें-वाटें-मार्गें, मार्गानें, वाटेनें. अहीर वगैरे लोकांनी बंडें केलीं होतीं तीं वाटेनें मोडलीं. **नऊ कोट**-नवकोट; श्रीमंत; **पैकेपूर.** **दिल्ली जमाबंदी चट**-दिली जमाबंदी चट. **जबघाट**-(?).

अटोकाट ॥ ( चाल ) ॥ नाना-भाऊंनीं जाऊन यमुनेवर डेरा दिला । धारचे पवार जयपूर उदेपुरवाला । रातोरात पोंचली डाक सरंजामाला ॥ भिडविले मोर्चे लढती किल्लयाला ॥ किल्लेदार बडा रणशूर मार लाविला । बाराहजार तोफा सरबत्ती दिली तोफेला ॥ मोर्चे भिडती फौज लढती केली हल्ला । घेतला किल्ला जरबस्त बादशहा केला ॥ भाऊची खराबी गणीत नाहीं जखमेला । भाऊ दिलगिर फार दिला हुकूम तोफेला ॥ दिल्लींत माईना मुडदा गंज पडला । दिल्ली शहर घेतले सर करून । भाऊ नाना० ॥ ४

अटोकाट जमले पठाण कुंजपुऱ्यास साठ हजार । दोहिरी लाविल्या तोफा पुढें कोसाचा मार ॥ कुंजपुरा येईना हाती भाऊ जाहल मनीं दिलगिर । बोलावून पेंढारी मग त्यानीं काढला विचार ॥ होळकराशी हुकूम झाल । बाण मग सोडी नागपूरकर ॥ फराशीस पुढे गेले गरनाळा भरगोळ्याचा मार । पेंढाऱ्यानीं वेठ उठविला तोफखान्यासमोर ॥ ( चाल ) ॥ जागोजाग छबिने भाऊचे । राऊत पायदळाचे ॥ तट पाडिले किल्लयाचे । फार सैन्य पडलें भाऊचे ॥ चढले निशाण शिंद्यांचें । नऊ हजार पेंढार भाल्याचे । लूट

**धारचे पवार**-यशवंतराव पवार. **जरबस्त**-मू. श. जेरदस्त-काबीज, जेरजप्त. **जखमेला**-जखम्यांना, जखमी लोकांना. **गंज पडला-गंज**-ढीग, रास, ढिगारा. ४

**साठ हजार**-सात हजार पाहिजे [ म. इ. सा. पानपत राज० प्रस्तावना पहा.] **दोहिरी**-दोहों बाजूंनीं. **पुढें कोसाचा मार**-त्या तोफांचा मारा पुढें एक कोसभर होत असे **फराशीस**-फ्रेंच **गरनाळा**-गर्नाळ-एक प्रकारची तोफ. **भरगोळयांचा मार**-(१)एका पाठोपाठ सोडलेल्या गोळ्यांचा. (२) देवडमार. **वेठ उठविणे**-जमावानिशीं जोराचा हल्ला करणें. **छबिने**-चौक्या: पहाऱ्याच्या टोळ्या. **राऊत पायदळाचे**-राऊत-घोडेस्वार. स्वारांचे व पायदळांचे **नऊ हजार पेंढार भाल्याचे इ०**-भाले घेतलेल्या नऊ हजार पेंढाऱ्यांना लुटीची परवानगी दिली. **लूट मुभा दिल्लीचे**-दिल्लीसे (?) दिल्लीसे-दिली असे. दिल्लीच्या लुटीची मुभा दिली आहे. सैन्याला लूट माफ केली आहे. ५

सुभा तुम्हा दिल्लीचे ॥ ( चाल ) ॥ जाटानें येऊन हुजूर अर्ज केला । "जुनी गादी तक्त बाच्छाई नये हात लावू तक्ताला ॥ जो लागेल पैका तुम्हा देतो खर्चाला । शिवाय फौज देतो तुमच्या कुमकेला॥" नाहीं ऐकिले भाऊसाहेबांनीं अपमान केला ॥ फोडिले तक्त दिल्लीचें खजिना काढिला । लूट माफ होऊन दहा कोट खजिना धरला जमेला ॥ द्रव्यानें भरले छकडे बैलगाड्याला । लुटलें शहर सारें आग्न्यावर ढाला दिल्या ॥ लखनोरचा नबाब रातोरात पळून गेला ॥ राजा रंजीस जाट रणशूर लाहोरवाला ॥ लिहून धाडिलें पत्र रुमशामाला ॥ "चवदाशें कोस घोडा अटकेस पाणी पाजला"। रातोरात डाक गेली गिलचाला ॥ आले वकील सलाम करून । भाऊ नाना०॥ ५

वकील उभे हात जोडून बोलती नानाभाऊकारण । लंब धाडली, तुम्हा

लंब-निरोप. वकील उभे हात जोडून बोलती नाना भाऊकारण- "पन्नास हजार खासे लोक त्याचे होते. त्यांपैकीं पंचवीस हजार राहिले आणि पुढें लढाईनें गलीम जेरदस्त होतां दिसत नाहीं, लढाई टाकून जावें तर मुलकांत काय सांगावें ? मालका जमानी व सुजायतदौला यास पैका मागावा तर ते म्हणतात कीं, आमचें काम फत्ते करून द्यावें आणि जो पैसा आम्हीं कबूल केला तो घ्यावा, असा अघटित विचार जाहला. त्यास काय करावें म्हणोन सुजायतदौला व मालका जमानी व अबदलअल्ली वगैरे सरदार एकत्र होऊन तह केला कीं, कोणेही प्रकारें गलीमाशीं सलूख करावा. सांप्रत कोणी हरविले नाहीं व कोणी जिकले नाहीं, ऐशियांत सामदाम करून यश संपादावें. म्हणून अवघियांचें चित्तांत येऊन विचार केला आणि सादर्णीस्वार याजबरोबर पत्र पाठविलें कीं, परस्परें भांडोन मुलूख बुडवावा यांत विशेष काय आहे? जें जाहलें तें उत्तम. सांप्रत तुमचा मुलूख हाच कीं मुदामतप्रमाणें जे ठिकाणीं तुम्हीं अंमल करितां ते ठिकाणीं करावा, दिल्लीपतीची मर्यादा तुम्हीं व आम्हीं रक्षावी. याप्रमाणें लिहिलें आलें. तीं पत्रें श्रीमंत रा॥ भाऊसाहेबांजवळ दाखल जाहालीं. भाऊसाहेबीं तमाम सरदार लोक इब्राामखान गारदी यांस बोलावून आज्ञा केली कीं, लढाई तहकूब ठेवावी व पत्रें आलीं होतीं तीं अवघ्यास वांचून दाखविलीं आणि विचारलें कीं याचें उत्तर काय लिहावें ? आपल्या

खर्च झाला पैसा देईन ॥ पुण्यापर्यंत राज्य करावें दिल्ली अटकेपासून । क्रोध आला भाऊंशीं नऊ कोट रुपये द्यावे धाडून ॥ चवदाशें कोस आलों पुढें चवदाशें कोस जाईन । इस्तंबूल द्या किल्ला मुलुख रुमशामचा पाहीन ॥ दोन्ही हात बांधुन शरण यावें तेव्हां परतून जाईन । गिलचा बोले कोणी आशा ठेविली आलें आम्हा मरण ॥ फेरपत्र पाठविलें दातीं धरून यावे तृण । ............॥ (चाल) ॥ पत्र वाची त्या वेळेशीं । कळविलें अवघ्या फौजेशीं ॥ भाऊ बोले तेव्हां नानाशीं । दहा हजार फौज घ्या खाशी ॥ गोविंदराव बुंदेले बनशी ॥ दोन पतके बरोबर खाशी ॥ केला रवाना फौजेसी । दाणा वैरण आणवायाशीं ॥ अम्ब्यावर गेले त्या दिवशीं । खजिने भरले छकड्याशीं । रातोरात डाक गिलचाशीं ॥ आले चालून मग त्या-पाशीं । कापिले दहा हजार फौजेशीं ॥ शिर पाठविलें भाऊशीं । भाऊ म्हणे कोणे एकाशीं ॥ असे नऊ लाख माझेपाशीं । ............॥(चाल)॥ गिलचाची फौज आली चालून भाऊवर । भाऊ हटेना लढणार तोही रण-शूर ॥ केली हातघाई दिवस पहिला सोमवार । अरबांनीं केली गर्दी गोळी अपार ॥ गिलचाचे पडले मुडदे पळतां बेजार । धाडिले पत्र रुमाला गलीम शिरजोर ॥ बडा खंदा बम्मन नऊ लाख फौज रणशूर । पानपतावर छावणी खंदक चौफेर ॥ आम्ही तरी मरून जाऊं हातीं घेतले शिर । धाडा सडी

---

ठिकाणीं लढाईची स्थीत नाहीं असें बोलोन पत्राचें उत्तर त्यास लिहिलें कीं, तुम्ही म्हणतां तें आम्हांस कबूल, परंतु सातशें कोस आम्ही चालोन आलों, फौज किती अपार जाहाली आहे. सात कोट रुपये खर्च जाला तो तुम्ही आम्हांस द्यावा आणि आपले मुलुखास जावें, नाहींतर जें होणार तें होईल." [साधनें ३–१८४ होळकरांची थैली]. इस्तंबूल–कॉस्टँटिनोपल. **रूमशाम**–कॉस्टँटिनोपल. **आलें मरण**–आलें जरी मरण. **फेरपत्र**–पत्रोत्तर. **नानाशीं**—नाना पुरंदऱ्याशीं. **बनशी**–उमदा. **पतके**–पथकें. **दहा हजार कापिले फौजेशीं**–हा गोविंदपंत बुंदेल्याच्या वधाचा प्रसंग होय. **केली हातघाई**–हातघाईवर आला, निकरावर आला. **सडी**–फौज–घोडदळ.

फौज खाशी करून तय्यार ॥ चार दस्ते घोडा पाठवा एकदिल सार । ...
...... ..॥ धाडा खर्ची खजिना भरून । भाऊ नाना० ॥ ६

बाच्छायानें पत्र वाचतां झाले मनीं दिलगीर । इस्तंबूल मागतां किल्ला चवथाई द्यावी कोठवर । आऊक्षदोरी तुटली आम्हावर कोपला ईश्वर ॥ मरून खरें होऊं परंतु ना जाऊं ह्याचे हार ॥ सांडणीस्वार फेंकिले कंधार पंजाब, पंचीन, बहाद्दर। वजीर बोलावून, विडे दिले; गिलचांस केलीं वस्तर ॥ फत्ते करा तलवार बक्षिसा देईन मुलुख महामूर। गादीचें नांव राखावे गलिमाला करावें जेर ॥ (चाल) चार दस्ते घोडा बोलाविला । दिला पोपाग पिंवळ्या शाला ॥ दुराण्या राऊत बोलाविला । बादशहाने शिरीं हात ठेविला ॥ पुढें चालतां कडक उसळला ॥ हिरवे निशाण हिरव्या ढाला। फौजेचा ढग जसा वळला ॥ शहराबाहेर डेरा दिला ह्या दिवशीं मुक्काम केला । बोलाविलें अस्तरीला ॥ आम्ही जातों रणघराला। आतां आलें रांडपण तुला ॥ ( चाल ) ॥ तोडून गरसुळी फोडून हातची कांकण । झाली निरवानिरवी शिरीं बाशिंग बांधून ॥ पैंजेचे उचलिले विडे यश घेऊन।

**चार दस्ते**–दस्त किंवा दस्ता–सैन्याची तुकडी [आपटे]. **एक दिल**–विश्वासू. **खर्ची**–रकम. ६

**ना जाऊं ह्याचे हार** त्यांना हार न जाऊं. **फेंकिले**-तांतडीनें पाठविले. **कंधार**-कंदहार. **पंचीन**–पञ्चीन-पक्षी. **फेकले पंछीन बहाद्दर**- पक्ष्याच्या गतीनें पाठविले, पांखरासारखे फेकले (?). **वजीर**–सरदार. **महामूर**–भरपूर. **दुराण्या राऊत**–अबदालीनें राखून ठेविलेले कझलबाज घोडेस्वारांचें पथक. **कडक उसळला**–कडाका उसळला. **ढग**-वावटळ [आपटे] वावटळीप्रमाणें फौज आली. **अस्तरिला** अस्तुरीला, बायकोला. **रणघराला**–रणाला, रणमैदानाला, समरभूमीला. **रांडपण**–वैधव्य. **गरसुळी**–गळेसरी. “या लढाईपासून (२२।११।६० रोजीं जनकोजी शिंद्याशीं झालेली चकमक )अब्दालीनें चांगलीच शिकस्त खाल्ली.आपणास पुढें निभावण्याची फारशी आशा नाहीं असें पाहून बायकामुलांस मारून पळून जाण्याचीसुद्धां त्यानें तयारी केली.” [ म. रि. म. वि. १७९. ]. **शिरीं बाशिंग बांधून**–नवरे ही

चारदस्त पडतील तेव्हां रूम सोडीन ॥ बादशहास बोलती कधीं ना येऊं परतून । शंभर कोट रुपये खर्च दिला घाडून ॥ येईन किंवा जाईन मरून । भाऊ नाना० ॥ ७

शंभराची कुंपीन अकराशांचें एक पलटण । अकरा पलटणांचा कंपु अकरा कंपूंचें एक दस्तन ॥ अशीं दोन दस्त ठेविलीं रुमाच्या गादीला राखण । चारदस्त सरंजाम नदी सत्रंजी आले उतरून ॥ पिंवळे करून पोषाक नवरे तळहातांत शिर घेऊन । धाडिले वकील गिलचांनीं मसुदे बोलाया कारणें ॥ नाहीं ठरलें बोलणें भाऊसाहेबाशीं गर्व दारुण । वकील आले माघारे वृत्तांत कळविला जाऊन ॥ (चाल) ॥ गिलचांनीं कावा केला । तीन कोस सोडून भाऊला ॥ भंवता वेढा घातला । रस्ता चालूं देईना झाला ॥ वाणी उदमी बंद केला । पुढें धारण आली फौजेला ॥ दीडकोळवें दाणे रुपयाला । खरा खोटा घ्या दाखला ॥ मीठ मिरचीचा तोटा पडला । निर्जीव अंतकाळ झाला ॥ (चाल) ॥ नानाभाऊनी बसून डेऱ्यांत करिती

टीप पहा. दस्त–दस्तन–'मराठी फौजेंतले अकरा कंपू' [आपटे] आपट्यांनीं पोवाड्यावरूनच हा अर्थ दिलेला दिसतो. या पोवाड्याची प्रस्ता० पहा. ७

सत्रंजी–सतलज नदी. नवरे–रणनवरे. "अशीं मलकाजमानीचीं उत्तेजन वचनें ऐकोन, जसें पंकार्त म्हणजे चिखलानें भरून आर्त जाले ते गंगाप्रवाहीं निर्मल होतात, तसे सुजायतदौला, कुबुद्धिमलें व्यापिले होते ते मलकाजमानी-चें वचन गंगोदकजलें प्रक्षालून पूर्वीपेक्षां सुशोभित जाले आणि ते समयीं शहा-बानी नौबत केली. चित्तांत धैर्य धरून अबदलअल्ली यास बोलावूं पाठविलें. तों त्यांणीं एकमेकांशीं जावयाची सिद्धता करून, प्रस्थान करावयाचे विचारांत आहेत, इतकियांत सुजायतदौला याजकडील बोलावणारा गेला. त्याणें सांगितलें कीं, पातशाहाजादी व सुजायतदौला एके ठिकाणीं आहेत, तुम्हांस बोलाविलें आहे. अबदलअल्ली यानें उत्तर केलें कीं, आम्ही निश्चयांत आहों. म्हणून मृत्युवधू लग्नसाहित्य दाखविलें. बोलावणारा चाकरमाणूस होता. त्यानें उत्तर केलें कीं, हें कर्म काय करितां?" [साधनें ३, १८७ होळकर थैली]. मसुदे–मुद्दे. रस्ता चालूं देईना झाला–रसद मिळूं देईना. धारण आली–भाव

विचार। अन्न दृष्टि पडेना झालें आम्हा खोबरें ॥ पाण्याची किंमत रुपयास झाले शेर। निमे अन्न निमी शाङ्कु भक्षिती सार ॥ पोटाचें महादुःख सोसेना तिळभर। पोटावीण ओढून काचा बांधी कंबर ॥ म्हणे भांग तमाखू अफीम राहिली दूर। भाऊशीं बोलती मिळून अवघे लष्कर ॥ नेऊन घाला गिलचां-वर झालों निष्ठुर। हत्ती घोडे उंट मरती ठाणावर ॥ कां घेतां रांडपण ठरून भाऊ नाना०॥ ८

गिलचांनीं हिकमत करून भाऊ वेढिला बहुत युक्तीनें। जठराग्नी चेतला खवळला व्याघ्र पंचानन ॥ झांगड नौबत वाजती दणादण भेर बाजे संगीन। डंके झाले चौघडे घोड्यावर–जीनसामान ठेउन ॥ फौजा झाल्या तयार निष्ठुर करवलाचे मैदान(ना)। चोरडाक होती गिलचांची नाहीं कळले संधान ॥ भाऊस बातमी कळली जरीपटका गेला चालून ॥ (चाल) ॥ गिलजांनीं रणखांब पुजिला। भाऊशीं वर्तमान कळला ॥ काय पाहतां गलीम सांपडला। एकदांच हर हर केला ॥ रोखिले आघाडी जेजाला। कडाबीन सुत्रनाला ॥ एेशीं हजार होळकर भाला। शिंद्यांनी मार खूप दिला ॥ बाण सुटती तीर-

चढला, महागाई झाली. पोटावीण ओढून काचा बांधी कंबर–रित्यापोटीं पोट आंवळून. म्हणे भांग तंबाकू इ०-पोटापुरतें आवश्यक अन्न तेंहि मिळेना मग भांग तंबाकू या चैनीच्या वस्तु तर दूरच. ठाणावर बांधलेले जागीं रांडपण नाश, नादानपणा. ८

झांगड-अनेकवाद्यांचा कोलाहल, गजर. संगीन–अखंड, एकसारखी. पतकाच्या घोड्याव०-पथकें घोड्यांवर जीन घालून सज्ज झालीं. लढाई निष्ठुर करवलाच्या मैदाना–कठोर रणसंग्रामाला. करवल, करवाल–तरवार. संधान सूत्र, कावा. रणखांब पूजिला -'रणखांब पुरिला' असें मुळांत असावें. अघाडी-आघाडीला. जेजाला जेजाला (हिं. स्त्री.) लांब नळीची फिरकीची तोफ. कडाबीन-(फ्रेंच, इंग्रजी, कार्बाइन. स्त्री.) रुंद तोंडाची आखुड बंदूक. सूत्रनाळ-शुतरनाल, उंटावरची तोफ. होळकर भाला-बामडेवाला होळकर, भाल्यानें लढणारी होळकरांची फौज. बाण -आगीचे.

कमानीला। अरब हपशी तो रोहिला ॥ गोवासी धुंदकत चालला । करवलानें घोडा चमकाविला ॥ भाऊसाहेब अंबारींत दुल्ला । दादू महातानें हत्ती पुढें नेला ॥ तीरकमान हत्ती धरला । पांडवदळीं भीमसेन आला ॥ कीं पार्थवीर खवळिला। दिली सरबत्ती तोफेला । नऊ हजार गोळा उडाला ॥ (चाल)॥ तासे मर्फे ते तंबूर किती वाजती। कर्णे कितीएक रणबहिरी कर्कती ॥ गिलचांच्या तोफा कुलपी गोळे गर्जती । धुकोट बाण जशी ढगांत वीज चमकती ॥ दणादण मेरूमांदारधरणी कांपती । आडू माडू शिपाई व्याघ्र उढाण साठती ॥ वीरास वीर तरकून पुढें सरकती । झाली हमका शत्रुला बिगस विर घुमती ॥ केली खनाजंगी स्वारास स्वार धडकती । बारा हजार पालखी भाऊची झाली

---

तीर–धनुष्याचे अरब हबशी तो रोहिला ६०–पेशव्यांच्या सैन्यांत सर्व तऱ्हेचे सर्व जातीचे लोक असत. शीख, हबशी, शिद्दी, अरब, रोहिले. [थो मा. पे. यांची रोजनिशी पा. ३३६-३३७] " मराठी सैन्यांत येथून तेथून सर्व मराठेच होते असा प्रकार बिलकूल नाहीं. मराठे सैन्य पंचाभेळ असे. परदेशी, मराठे, मुसलमान, आहीर, अडारु, आरब, रजपूत वगैरे सर्व प्रकारचे लोक मराठी सैन्यांत असत. [पानपतप्रकरण, राजवाडे प्रस्तावना, पा. ९४]. (२) [खरे. ३६७० टीप पहा]. **गोसावी**–ही देखील एक लढवय्यी जात. **धुंदकत चालला**–धुंद होऊन चालला. **करवल**–बंदुकस्वार. **करवलानें घोडा चमकाविला**–घोडदळानें मांड उठविली. **दुल्ला**–शूर, बेदरकार, बेफिकीर. **तीरकमान हत्ती धरला**–तीर कमान हातीं धरला. **मर्फा**–एक प्रकारचा नगारा. **तंबूर**–एक चर्मवाद्य. **रणबहिरी**–रणशूर. बहिरी–शूर. रणांगणांत कानटळ्या बसविणारे. रणबहिरी हें वाद्याचें विशेषण घ्यावें किंवा रणबहिरी म्ह. रणशूर असें घ्यावें. रणबहिरी म्ह. रणभेरीहि असूं शकेल. **कर्कती**–कठोर शब्द करिती. **धुकोट बाण जशी ढगांत वीज चमकती**–बंदुका-तोफांच्या धुराचा कोटच बनला म्हणजे दाट आवरण पडलें व त्या धुरांतून, फेंकले जाणारे आगीचे बाण मेघांतल्या विजेप्रमाणें दिसत होते. **आडुमाडु**–शूर. **तरकून**–ओळखून **बारा हजार पालखी भाऊची रिती**–भाऊसाहेबांचे पालखीपदस्थ असे म्ह० अनेक मातबर सरदार मेले. **रिती**–मोकळी.

रिती ॥ तीन लाख घोडा गर्द जरीपटक्याचा हत्ती। ऐंशी हजार होळकर गुप्त नाहीं दिसती ॥ पायदळाचे गोळे जागोजाग पडले किती। सोकला कंठ मग पाणी पाणी बोलती ॥ जखमांची नाहीं गणती कबंध नाचती। झांकोळले गगन सूर्य गेला भिऊन। भाऊ नाना० ॥ ९

झाकोळला सूर्य गगनीचा मग पडला अंधकार। गलिमाने पुरविली पाठ भाऊ हटेना तो रणशूर ॥ पानपतावर सुरू लढाई भाऊ अंबारींत कमान तीर। बाण बंदुकीचे फेर झडती तोफेचे गोळे पडे जसे गार ॥ गोळ्यासरसा भाऊ उडाला दादू महात चकाचूर। बापासी लेक वळखेना धरणीमाय जागा देईना क्षणभर ॥ नानासाहेबाशीं डांक आली ते गेले हामी सादर। झाले घोड्यावर स्वार बाईस कळले धरला पदर ॥ बोले गोपिकाबाई पुण्याचे राज्य कोण करणार। भाऊसाहेब गेले आम्ही तरी काय राहून करणार ॥ब्राह्मणी राज्य पेशवाई बुडाली असे नाहीं होणार।............... ॥ (चाल) ॥ पैजेचा विडा उचलला। सारी शाही पाहती नानाला ॥ ढाला पट्टा मुग्ई दाबला। दोन लाख घोडा बरोबरीला ॥ रणामध्ये येऊन शिरला। झाली चकमक एकच हल्ला ॥ चाळीस हजार जिरेटोपवाला। नानापाशी कत्तल झाला ॥ होळकराने फितवा केला। हे ठाऊक नाही नानाला ॥ वैऱ्यांनी वेर साधिला। मग जखमा चढल्या नानाला ॥ जसा भीष्म कर्ण युद्धाला। मरदा

**गर्द**–नष्ट, धूळीभूत. **जरिपटक्याचा हत्ती**–निशाणाच्या हत्तीमुद्धां जरिपटक्याची फौज. **ऐशी हजार होळकर गुप्त, नाहीं दिसती**–ऐंशी हजार होळकरांचें सैन्य फितूरानें पळून दिसेनासें झालें. **गोळे**–मुडदे, प्रेतें. **सोकला**–शुष्क झाला. **कबंध नाचती**–धडें नाचूं लागलीं. **झाकोळलें गगन सूर्य भिउन**–सायंकाळ झाला. ९

**फेर**-फेरा. **गार**–गारा. **गोळ्यासरसा भाऊ इ०**–ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें अगदीं चूक. **हामीसादर**–हामी–(फा). स्वतः **असें नाहीं होणार**–असें होऊं देणार नाहीं. **कत्तल झाला**–मारला गेला. **धर**-शिस्त. **आदितवार**–चूक. **बुधवार पाहिजे.** पौष शुद्ध ८ शके १८६२. **कत्तल**

माईना धरणीला ॥ अरब हपशीपत्रें रोहिला । तो घारीवाणी उडाला ॥ घोड्याहून खालीं आला । लढण्याचा हेत नाहीं पुरला ॥ नाना पडला घर मग सुटला । गिलचानें मार खूप केला ॥ ( चाल ) ॥ खंदकांत माईना लोक उंट घोडे सारे । गिलचांचा एक दस्त यश रणशूर ॥ नऊ लाखांतले सातशें उरले सारे । तोफा बंदुका पडल्या सुने दिसती डेरे ॥ मोहरा पुतळ्या रुपयांचे जागोजाग पडले ढिगारे । पडलेल्या फौजेचे मागें कोण घेणार ॥ हत्ती उंटं मोकळे घोड्यांचें खिल्लार । कोणी लूट घेईना पळतां जीव बेजार ॥ गेले दाही दिशांवर पळून । भाऊ नाना० ॥ १०

शके सोळाशें पांसष्ट फाल्गुन वद्य षष्ठी आदितवार । नऊ रात्र नऊ दिवस लढाई मग फिरले माघार ॥ सातशांनीं धरली वाट पुण्याची निर्माल्य लष्कर । खेड्या-खेड्याचे पाटिल लुटती महार चांभार । बेदड घालिती छापे वाट चालेना तिळभर ॥ पुढे बिकट बारी कैसा तारील परमेश्वर । असे सांडाव देत आले अटक उतरून नऊ कोशांवर ॥ ( चाल ) ॥ तिथून अवघे फुटले पुण्याचे रस्ते भुलले ॥ फारदिसा धुळीमधें गुंगले ॥ नऊखंड फिरतां चकले । अन्नाविण वाळून सुकले ॥ भक्षिती झाडांचे पाले । गोसावी कितीएक झाले ॥ तुंबे हातीं घेतले । किती रामेश्वराकडे झुकले ॥ काशीचे रस्ते धरले । या रितीनें सैन्य खपलें ॥ दैवाचे पुण्याशीं आले । लाखोटे सदरेवर पडले ॥

**झाला**–मारला गेला. **पत्रें**–पथारु (?). आडारूप्रमाणें पथारू ही एकादी लढाऊ जात आहे कीं काय ? १०

**बेदड**–लुटारूं; लुगारू. **बारी**–डोंगराळ मुलूख. **अटक**–कटक (?) कटक **सांडाव देत आले**–लोक गळत सैन्य परत आले. **भुलले**–फसले; चुकले. **चकले**–फसले; भ्रमले **भक्षिती झाडांचे पाले**–खुद्द नाना फडणिसाचें पत्र " शुद्ध लंगोटी लाऊन बसलों......पण पादचारी अभ्यास नसतां सोळा, कोस अन्नोदकाव्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली तेव्हां बोराचा पाला खाऊन पाहिला इ० " [का. सं. प. या. ५३]. पानिपतच्या लढाईनंतर काशीहून लिहिलेले नाना फडणिसाचें पत्र प्रसिद्ध आहेच.. **फार दिसा**–फार

दुःखाचे सागर फुटले।................॥ (चाल)॥ लाखोटे वाचितां झाले अवघे घाबर। नानाभाऊ बुडाले पुण्यास आली खबर॥ नानाभाऊ बुडाले परंतु लौकिक दुनयावर। नवलाख बांगडी फुटली असा हाहाकार॥ दक्षिण बुडाली सती पडल्या महामूर। श्रीमंताच्या तक्तापाशीं भले भले मनसुबीदार॥ स्थापिले गादीवर माधवराव नेणार। सोन्याची जळली भट्टी उरले खापर॥ शाहु छत्रपतीचे देणे सांब अवतार। गातो सगनभाऊ ठिकाणा शाहुनगर॥ गातो फत्तेजंग पोवाडा करून। भाऊ नाना०॥ ११



दिवस. सती पडल्या महामूर–मृ.श.फा. मामूर–विपुलः पुष्कळ स्त्रिया सती गेल्या. नेणार–शब्द कोशांत सांपडत नाहीं. नेण असा शब्द सांपडतो. त्याचा अर्थ अज्ञान किंवा जास्त ज्ञान आलें नाहीं असें अर्भक असा आहे. तेव्हां नेणार किंवा नेणारु म्हणजे अज्ञान, अल्पवयी. पोवाडा वाङ्मयांत या शब्दाचा अज्ञान या अर्थी अनेक वेळा उपयोग झालेला आहे. उदा०—'काय कळतें त्या मुलाला बाळ नेणार।' आळत्याच्या लढाईचा पोवाडा. ११

# पानपतचा दुसरा पोवाडा

रा० शाळिग्राम यांनीं या पोवाड्याचे अठरा चौकच छापले आहेत. एका गोंधळ्याचें दप्तर चाळीत असतां आम्हास याच पोवाड्याची एक नवी प्रत उपलब्ध झाली. ती वीस चौकांची आहे. सबब आमचे प्रतीप्रमाणें या पोवाड्यांत त्या दोन चौकांचा योग्य स्थलीं समावेश केला आहे.

शाळिग्राम प्रतींतील पोवाडा आमचे प्रतीशीं ताडून पाहून, सरस पाठभेद स्वीकारून शुद्ध करून या पुस्तकांत छापला आहे. पाठभेदाची यादच खालीं दिली आहे ' त्यावरून कोणचे पाठ स्वीकारले व कोणचे स्वीकारले नाहींत ते कळून येईल.

| शाळिग्राम-प्रत | नवी-प्रत |
|---|---|
| १ अष्टप्रधान भाऊ बाजूला हवालले राज्याला | १ आस्टप्रधान भाऊ बाजूला आवळीले राज्याला |
| २ भाउनी हकारले राव सकळाशी | २ भावुनी पेइगम केला सकळांशीं |
| ३ कुळदक्षण भाइशी | ३ कुळदक्षन बाजुशी |
| ४ राया प्रभुरायाची करणी | ४ या त्रिभौण रायाची करणी |
| ५ विश्वासराव बसविले नेउनी | ५ विश्वासराव बसविले नेमुनी |
| ६ घडले टाकसाळी रुपये आणि | ६ टाकसाळा घले रुपय म्होरा |
| ७ म्होर रोग्विले कमानतीर | ७ मेरु स्होकला कमानतीर |
| ८ तुजला मारीन मी करीन वेड | ८ तुजला मारुन भरविन मी यड |
| ९ केले मोर्चे तकीप | ९ केले मोरसे हस्तक |
| १० भाउनी पैगम केला सकळांचा | १० भावुनी वेग केला सकळांचा |
| ११ भले राजकुमार मारितो फौजा हातीं तलवार | ११ राजकुवर मारतीवजा तलवार |
| १२ होउनी धीर | १२ होउनी स्थीर |
| १३ औंदा राखा बाजी | १३ बाजू राखा माझी |
| १४ शिरीं छत्र भावजी | १४ शिरीं छत्र सोभे जी |
| १५ चेतली जणु खूप लढाई | १५ जन कुप कुप चेतली लढाई. इ. |

सदर पोवाडा मागच्या पोवाड्यापेक्षां ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें पुष्कळच शुद्ध व सुसंगत आहे व यांतील करुणरस चटका लावणारा आहे.

# पानपतचा दुसरा पोवाडा

## १०

### [ शाहीर–रामा सटवा ]

[ चाल–'वारी संकट हरि दमाजीचें। कौतुक देवाचें'॥ ]

भाऊसारखा मोहरा। आम्हांवर कां रुसला पंचीप्यारा ॥ ध्रु०॥

बहुत दिवस झाले शाहूला। जावें निजभवनाला॥ नाना राखावें तुम्ही राज्याला। शिक्का दिधला त्याला॥ अष्ट प्रधान भाऊ बाजूला। हवालले राज्याला॥ मुलूख मारुन केला चकचुरा। दुसमान कांपे थराथरा॥ भाऊसारखा०॥ १

बारा वर्षे झाली राज्याशीं। कळून आलें त्याशीं॥ धाड पडो रे त्या मुलखाशीं। कुणिकुन आली इवशी॥ भाऊनें हकारलें राव सकाळांशीं। कुळ दक्षिणभाईशीं॥ दिली नौबद गेला दिल्लीशीं। हालीवलें तक्ताशी॥ रणखांब रोवुनि मारितो तलवारा। काशी तीर्थ अवधारा॥ भाऊ सारखा०॥ २

पंचीप्यारा–मू. श. पछी–पक्षी. प्यारा–प्रिय. **बहुत दिवस झाले शाहूला इ०**–"श्रीमंत महाराज राजश्री शाहूमहाराज छत्रपति यांणीं निजधामास जातेसमयीं राजश्री नानासाहेबांस व भाऊसाहेबांस सातारियाचे मुक्कामीं समक्ष बोलावून आणून .. शिक्केकटार हवालीं करून, मस्तकीं वरदहस्त ठेविला. आणि आज्ञा जहाली जे 'माझे मागें सकल पृथ्वीचें राज्य करणें तें तुम्हाशिवाय राज्यास धणी कोणी दिसत नाहीं' असें सांगून महाराज कैलासभुवनास गेले. मागें राजश्री नानासाहेब व भाऊसाहेब यांणीं आपल्या पराक्रमानें अटकेपर्यंत मुलूख कारबाज केला." [पा. ब. ७।८]. **हवालले राज्याला**–राज्याचा हवाला, अधिकार दिला. १

**बारा वर्षे झाली राज्याशीं**–बारा वर्षे सकल पृथ्वीचें राज्य केलें. [पा. ब. ७।८]. **इवशी**–विवशी, अवदशा, पीडा. **हकारलें**–हाक दिली, बोलाविलें, पाचारिलें. **कुळ**–कुल्–सर्व. **दक्षिण भाईशीं**–दक्षिणेंतील सरदारांना. **दिली नौबत**–कुचाचा नगारा केला. **अवधारा**–अवधारणें (क्रि.) ऐकणें, लक्षांत ठेवणें, खात्री ठेवणें. **काशीतीर्थ अवधारा**–काशीक्षेत्र असेंच समजा; पानिपतचें धारातीर्थ काशीतीर्थाच्या तोडीचें असा भावार्थ. २

तखत फोडुनि केली धुळधाणी । असा नाहिं झाला कोणी ॥ या त्रिभौंण रायाची करणी । नांव गेलें राहुनि ॥ विश्वासराव बसविले नेऊनी । लिहिलें होतें कर्मी ॥ घडलें टांकसाळि रुपये आणि मोहोरा । दिला अवघ्यांशीं रोजमुरा ॥ भाऊसारखा०॥ ३

पहिली लढाई झालि कुंजपुऱ्यावर । सकळ घेउनि दळभार ॥ म्होरं रोखले कमाणतीर । मार होती चौफेर ॥ कुतुबशहा मारुनि केला चकचूर । त्याचें कापिलें शिर ॥ लुटला कुचपुरा दौलत फार । झाले आभय लष्कर । आला दक्षिणचा राजा धुरंधर । (आणि) भाऊसारखा वीर ॥ सुटला अबदालीशीं दरारा । म्हणे आतां सल्ला करा ॥ भाऊसारखा०॥ ४

तखत फोडुनी–येथें तखत म्हणजे सिंहासन नव्हे तर तक्ताची जागा. "सदाशिवरावानें दिवाणी आमचें छत तोडून त्या चांदीचे रुपये पाडले. छतास बोटभर जाडीचा चांदीचा पत्रा असून वर सोन्याचें काम केलेलें होतें. छत तोडून रुपये केले ते तीनलाख झाले असें बखरकार म्हणतो." [म. रि. म. वि. ३ पा. १६०]. त्रिभौंण–त्रिभुवनीं. नांव गेले राहुनी–कीर्ति होऊन गेली. विश्वासराव बसविले नेउनी–विश्वासरावास तक्तावर नेऊन बसविलें. पण ही गोष्ट खोटी आहे. दिल्ली घेतल्यावर दरबार करून सदाशिवरावांनीं विश्वासरावास नजरा करविल्या, त्याचा विपर्यास नजीबखानानें मुद्दाम केला व विश्वासरावास बादशाहीपद दिल्याचा पुकारा केला. ही गोष्ट पुढें सदाशिव. रावास कळली तेव्हां मराठ्यांचा वकील शिवभट साठे अली गौहरजवळ होता, त्याचेमार्फत खटपट करून अली गौहराचा मुलगा जवान बख्त यास दिल्लीस आणून त्यास वली अहद म्ह॰ युवराज नेमण्याचा समारंभ १०-१०-६० रोजीं सदाशिवरावानें केला." [म. रि. म. वि. ३ पा. १५३] ३

म्होरं–मोहरें; पुढें. मार–हल्ला; हल्ले. कुतबशहा मारुनी केला चकचूर– "कुतुबशहा व अबदुस्समदखान दमाजीच्या फौजेस जिवंत सांपडले. दमाजीनें त्यास हत्तीवर बसवून सदाशिवरावाकडे रवाना केलें. त्याला पाहून सदाशिव-रावास दत्ताजीच्या वधाची आठवण झाली, व लगेच त्या दोघांचा त्यांनीं शिर-च्छेद करविला. [म. रि. म. वि. ३ पा. १६७]. [भा. ब अंक १०६ पा. १२१, १२२, १२३.] आभय–मूळांत आभर असेंच असलें पाहिजे. आभर म्ह. तृप्त दक्षिणचा राजा–विश्वासराव. ४

सल्ला ऐकेना झाला विघोड। अवघा मुलुख सोड॥ रुपये देत होता दोन क्रोड। धरिली भाऊंनीं आड॥ "तुजला मारिन मी, करिन वेड। कंधार पाहिन पुढं॥ रोवला रणखांब होती धडाधड। नदि जमुनेच्या कड॥ खेत्री हाणा म्हणती रणशूरा। कुळक्षेत्री धरिला थारा॥ भाऊसारखा०॥ ५

पहिली लढाइ झाली फार ठीक। केले मोर्चे तकीप॥ भोंता खांदलासे खंदक। मधे भाऊचे लोक॥ कुणिकुन आला लवंडिचा घातक। होती बातनी ठिक॥ दोन वेळा फिरविला माघारा। गिलचा केला घाबरा॥ भाऊसारखा०॥ ६

**विघोड**–बिघाड. **सल्ला ऐकेना झाला विघोड**–भाऊसाहेबांनीं तहाच्या अटी कबूल केल्या नाहींत. मुजाकडून सदाशिवरावाकडे लाविलेलें हें बोलणें होतें. पण ही हकीकत कुंजपुरा घेण्याचे आधीं घडली. या तहाच्या वाटाघाटींत "सरहिंदपावेतोंचा प्रदेश अबदालीनें मागितला (काशीराय) [म. रि. म. वि. ३ पा. १६२] **आड**–आडकाठी, हेका. **वेड** मू श येड. **येड करणें**–घोड्यास इशारा करणें. प्रेरणा करणें. चढे घोड्यानिशीं कंदाहारला जाऊं हा भावार्थ. "नंतर महादजी शितोळे यांणीं घोड्यास येड केली आणि टाच मारली आणि आंत शिरले" [हरि. ब. ७२]. **होती धडाधड**–तोफेच्या गोळ्यांची मारगिरी होत होती. **नदि जमुनेच्या कड**–जमुना नदीच्या कडे. **खेत्री**–क्षत्रीय. **कुळक्षेत्रीं–धरिला थारा**–कुरुक्षेत्रीं छावणी केली. "अबदुस्समान वगैरे मारले. त्याजवर अबदालीची गांठ पडली...... त्या आलीकडील मजकूर, यांणीं तोफखान्याचा आराबा पसरून खंदक खणून पाणिपत गांव पाठीशीं घालून, सड्या फौजा तोफेच्या मागें उभ्या, याप्रमाणे बंदोबस्तानें उभे राहिले आहेत. नित्य गोळागोळी होती" [नाना फडणिसाचें पत्र २८-१२-६० म. रि म. वि. ३ पा १५७]. ५

**तकीप**–तहकूप "तहकूप स्थापितं" रा. व्य. को. **केले मोर्चे तकीप** मोर्चे भक्कम केले! **लवंडिचा**–रांडलेक. **लवंडी**–दासी. **लवंडिचा**–दासीपुत्र. **बातनी**–बातमी. जु. कागदपत्रांतून बातमीबद्दल अनेक वेळां बातनी असा शब्द लिहिलेला आढळतो. ६

प्रथम पडला गोविंदपंत बुंदेला । केला भाऊनीं हल्ला ॥ विसा हजारांशी गिलचा आला । हुजरातीवर पडला ॥ मग साहिना बळवंतरायाला । ढिगांत जाउनि पडला ॥ भाऊ विनवितो बहादरा । रणीं राहिला चिचारा ॥ भाऊसारखा० ॥ ७

एक दिवस नेमला मरणाचा । वखत निर्वाणीचा ॥ भाऊनीं पैगम केला सकळांचा । धंवशा वाजे त्याचा ॥ शाइसीं हजार खासा नांवाचा । धुरंधर भाऊचा ॥ एकाएकी आला सामोरा । दिला कुचाचा नगारा ॥ भाऊ-सारखा०॥ ८

मोरचे वाटुन घिले लवकरी । तमाम फौजा सारी ॥ बुनगे घातलेसे माघारी । हाकारिली मग स्वारी ॥ जसा चंद्र निघाला बाहेरी । प्रभा पृथिमी-वरी ॥ यकायकी झाकळली बरी । धनकर त्याची थोरी । जनकुजी मार देतसे झराझरा । जसा आगनीचा आगारा ॥ ९

**प्रथम......चिचारा इ०.**–बळवंतराव मेहेंदळे मेला ती चकमक गोविंदपंत बुंदेल्याच्या मृत्यूच्या आधीं झाली हरहम्मेश थोडथोड्या चकमकी घडत होत्या. पण त्यांतल्या त्यांत कार्तिक शुद्ध १५ रोजीं जनकोजीचें, कार्तिक वद्य ३० रोजीं बळवंतरावाचें व मार्गशीर्ष शुद्ध १५ रोजीं, गोविंदपंत बुंदेल्याचें अशीं तीन रणें बरींच महत्त्वाचीं झालीं. पहिल्यांत मराठ्यांची सरशी झाली. दुसऱ्या दोहोंत बळवंतराव व गोविंदपंत मारले गेले." [ म. रि. म. वि. ३ पा. १७६ ]. **ढिगांत जाउनि पडला**–गर्दीत मिसळला. **भाऊ विनवितो बहादरा–बहादरा**–शूरास: बळवंतरावास हल्ला करून जाण्यास भाऊ परवानगी देत नव्हते. " मी हुजरात घेऊन एक वेळ युद्ध करतों म्हणून बहुतच आग्रह केला." तेव्हां भाऊंनीं " दुराग्रह जाणून " त्यास परवानगी दिली. [ भाऊसाहेब बखर ]. **रणीं राहिला**–रणास आला, खेत्रास आला. ७

**वखत**–प्रसंग. **पैगम**–पेगाम केला, बोलणें केले, विचार घेतला. **धवशा**–कीर्ति. मू. श. धोशा, धौशा–मोठी नौबत. **शाईसी**–सैन्यांत **शाई**–सैन्य **नांवाचा**–मातबर, प्रसिद्ध. ८

**बुनगे घातलेसे माघारीं** बुणगे मागें घातले. **पृथिमीवरी**–पृथ्वीवर.

गिलच्या मार देतसे चवुफेर। मधी उभे लष्कर ॥ विभ्रामखान खासा बिनिवर। यशवंत पवार ॥ दिवस उरला घटका दोच्यार। मग धरवेना धीर ॥ एकला तिथ टिकल कुठवर। सोन्या तुटली पाहार ॥ इभ्रामखान खासा खराखुरा। रणी आला पायउतारा ॥ १०

विश्वासराव शिपाई रणशूर। भले राजकुवर ॥ मारितो फौजा हातीं तलवार। रणात होउनि स्थीर ॥ भोवती गोळ्या वर्षती अपार। मधे उभे सरदार ॥ गिलचा कापला बेसुमार। भाऊ म्हणे मागे फिर ॥ अवचित गोळि लागली धुरंधरा। मुखीं बोलला हराहरा ॥ भाऊसारखा० ॥ ११

समशेर बहादर रणशूर रणगाडा। रणी वाजे चौघडा ॥ हटकुन गिलचे हाणितो धडाधडा। ढाल तरवार जमदाडा ज्याणे रणीं अडविला तीस धोडा। सन्मुख दावी मुखडा ॥ राव बाजीचा पुत्र जसा हिरा। येती जखमाच्या लहरा ॥ भाऊसारखा० ॥ १२

**यकायकी**–एकाएकीं, अकस्मात **झाकळली**–अंधकली, मलिन झाली **बरी**–उत्तम, उत्कृष्ट. **धनकर** धनत्तर. भावार्थ विपुल. **थोरी** थोरवी. **जसा चंद्र निघाला इ०**–चंद्र प्रकाशून त्याच्या विमल तेजाचा उत्कर्ष होत असतां अकस्मात त्यास ग्रहण लागून त्याची प्रभा नष्ट व्हावी त्याप्रमाणें प्रथम मराठ्यांची सर्वस्वीं सरशी असतां एकाएकीं विपरीत गोष्टी घडून येऊन मराठी फौजेची छबी मावळली असें म्हणण्याचा कवीचा आशय दिसतो. ९

**सोन्या तुटली पहार (?)** सोन्या तुटला पहाड असें तर नव्हे? सोन्याचा पहाड म्हणे मेरू खचला, असें शाहिराम इभ्रामखानाविषयीं म्हणावयाचें नसेल? १०

**रणगाडा**–रण गाटा. **हटकुन**–आव्हान देऊन **जमदाड**–मोठी तरवार **मुखडा**–सुंदर मुख **बाजीचा पुत्र जसा हिरा**–बाजीचा पुत्र जसा काहीं हिराच. समशेर बहाद्दर हा मस्तानीपासून झालेला मुलगा अर्थात तो खुप-सूरत गोरबिंदा असेलच. **लहरा**–आवेग, लहरी. १२

**जनकोजी शिंदे रणशूर रणगाजी। चढती तुरंग तेजी ॥ त्याला भाऊ-साहेब होते राजी । बाजू राखा माजी ॥ मग फुरारले राव जनकोजी। शिरीं छत्र सोभे जी ॥ नित्य नेम गिलचा कापतो चरांचरां। शिर धाडितो पहा नजरा ॥ भाऊसारखा० ॥** १३

चेतली जणुं खुप झालि लढाई। मार होती सवाई ॥ त्याचा रंग बारगीर बिलाई। गिलचा करितो घाई ॥ झाला मोड पळती कुळशाही। पालखिस गणती नाहीं ॥ एक एक पळुन आला माघारा। रणीं राहिला बिचारा ॥ भाऊसारखा० ॥ १४

सोनजी भापकर मानाजी पायगोडे। रणीं टाकिले घोडे ॥ तुकोजी शिंदे पडले पायांपुढें। जैसे अग्नीचे हुडे ॥ आणखी दमाजी गायकवाड।

---

तेजी-अरबी घोडा. १३

**जणु**-(?) **त्याचा रंग बारगिर बिलाई**-(?) **कुळशाही**-कुल्शाही म्ह० सर्व सैन्य. **पालखीस गणती नाहीं**-पालखीचा मान असलेले अनेक मातबर सरदार कामास आले. १४

**सोनजी भापकर**-[पा. ब. पान ९] "सरकारचे मुतसद्दी मातबर तमाम एकीकडे कुल पळून गेले ते समयीं सोनजी भापकर यांस भाऊसाहेब बोलिले कीं सोनुजीबाबा या समयीं निघावयाचें नव्हतें. तुमचा भरंवसा बहुत धरिला होता. तेव्हां बोलिले कीं, लोक पळतात त्यास माघारे फिरवितो. साहेबांस टाकून आम्ही कोठें जावें असें बोलून लोक फिरावयास म्हणोन गेले ते तिकडे-च गेले!". **पायगोडे-पायगुडे-मानाजी पायगुडे**-पेशव्यांचा एक पथक्या [सदाशिवरावाचें पत्र १६ जुलैचे]. **तुकोजी शिंदे पडले पायापुढें** "तेव्हां तुकोजी शिंदे म्हणूं लागले कीं "महाराज क्षत्रधर्माची शर्थ जाहाली. चोहींकडून आभाळ फाटलें. याउपरीं निघावें यांत उत्तम आहे. ....भाऊसाहेब तुम्ही वांचलां तर अवघ्यांचा सूड घ्याल. तेव्हां भाऊसाहेबांनीं उत्तर केलें कीं...असें म्हणतांच तुकोजी शिंदे याणीं घोडियावरून उडी टाकली, आणि जातीनिशीं हत्यार केले. तेथें मोठी मातबर मरदोमी करून मराठी धर्माची शर्थ करून खस्त केली. तेव्हां आकस्मात् गोळी लागून ठार झाले" [भा. ब.]. **पडले पायांपुढें**-

होळकर रणभिडे ॥ अवघ्या शाहीवर आली घाड । अवचित झाला मोड ॥ एकएक पळुन आले माघारा । का परतुन घातले सैन सारा ॥ भाऊसारखा०॥ १५

कशि गत झाली गड्यांनो भाऊला । जनकोजी शिंद्याला ॥ लोक पुसती एकुनेराला । आम्हीं नाहिं पाहीला ॥ भाऊसारखा मोहरा हरपला । काय सांगावें नानाला ॥ भाऊला नाहीं कोणाचा आसरा । वेढा घातला चौफेरा ॥ भाऊसारखा०॥ १६

ज्याला पडली भाऊची भ्रांत । ते राहिले रणांत ॥ फितुरी पळुनि आले दखणांत । वांचाविली दौलत ॥ त्यांचा ईश्वर करिल सत्यनाश । यश दिले गिलचांस ॥ भाऊची भ्रांत पडलि नारिनरा । सकळ जनां लहानथोरां ॥ भाऊसारखा०॥ १७

कागद आला राव नानाला । होते उजन्या नगराला ॥ कागद वाचिता आग टाकि धरणीला । माठा अतिशो केला ॥ आम्हांवर श्रीहरि देव

समोरच मरण पावले. हुडे–बुरुज. अग्नीचे हुडे–अग्नीसारखे तेजस्वी. पराक्रमी असा भावार्थ. दमाजी गायकवाड–[पा. व. पा. १] रणभिडे रणात भिडणारे, २ आटनांवहि असू शकेल. शाही–सैन्य. का परतुन घातले सैन सारा–का परतुन घातले नसे साऱ्या (?) असल्या पळपुट्यांना मारून पिटून परत रणांगणांत कां घातले नाहींत? घालावयास पाहिजे होते असा शाहिराचा भावार्थ. १५

एकुनेराला–एकमेकांला, आपापसांत [गोल्म]. १६

भ्रांत–काळजी, चिंता. फितुरी–हा मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव विंचुरकर इत्यादिकांस टोमणा. यांपैकीं बऱ्याच लोकांचीं उत्पन्नें नानासाहेबानें मागाहून तोडलीं होतीं. विठ्ठल शिवदेवानें पानिपतानंतर दादासाहेबांस पत्र लिहिलें त्यात तो म्हणतो, "पत्र न पाठवायचें कारण (दादासाहेबांनीं इतकेंच दिसांत आलें कीं हे (पानपतहून) वांचोन कशास आले...परंतु आम्ही आपल्या जीवास खातच आहों." [पारसनीस ऐतिहासिक चर्चा]. १७

होते उजन्या नगराला–वास्तविक भेलसा येथें. अतिशो–अतिशय

कोपला। विक्षोप आणिला राज्याला ॥ दाटला गंहिवर गोपिकाबाईला। अति कहर वर्षला ॥ नाना फिरुनि चालले माघारां। दिला कुचाचा नगारा ॥ भाऊसारखा०॥ १८

भाऊसाठीं झुरतीं जनावर। जंगलची पांखर ॥ राघू मैना आणि खबुतर। टाहो करिती फार ॥ कुणीकडे गेला आमचा मनोहर। सपन झाल खर ॥ पैसा मिळेना म्हणती सार। बंद झाले सावकार ॥ फुटला पर्वतीशीं घाम दरदरां। वाडा गजबजला सारा ॥ भाऊसारखा०॥ १९

आम्हीं पद बांधिले "वैताग। जिवास केला त्याग ? ॥ कोणीकडे गेले भाऊ श्रीरंग। नानाचे जिवलग ॥ कधीं भेट देइल आम्हां संग। जिवा होईल खुषिरंग" ॥ एथुन झाला पदाचा अभंग। म्हणे महादु कविरंग ॥ रामा सटवा म्हणे दातारा। वाट पाहतो खरोखरा ॥ भाऊसारखा०॥ २०

---

(शोक). ऐ. कागदपत्रांतून अशीं उदाहरणें बरींच आढळतात. उदा० 'त्यांनीं बहुतच अतिशय केला' म्ह० संदर्भानें शोक, आग्रह, पराक्रम, निकड फार केला असा अर्थ. अतिशय काय केला तो शब्द नेहमीं गाळलेला असतो. तो संदर्भानें जाणावयाचा. उदा० 'पर्जन्यानें अतिशय केला तो लिहितां पुरवत नाहीं'. [ खरे १०८ ]. **विक्षोप**-निक्षेप, खंड, अंतराय, संकट. १८

**सपन**-स्वप्न, दुष्टस्वप्न. १९

**पद बांधिले**-चरण रचिले, पवाडा केला. **वैताग**-वैतागानें. **जिवास केला त्याग**-भाऊसाहेबांनीं वैतागानें प्राणाचा त्याग केला की काय? **जिवा होईल खुषिरंग**-जीव होईल खुषिरंग. भाऊ आम्हाला भेटून फिरून आमचा जीव संतुष्ट केव्हा होईल? **एथुन झाला पदाचा अभंग म्हणे,महादु कविरंग**-पदाचाऽभंग-अभंग-येथोन पदाचा भंग झाला, पद संपलें असा भावार्थ दिसतो. म. इ. सा. खं. १६ ले. ६५ मध्यें त्यापण असा शब्दप्रयोग त्या+आपण बद्दल आला आहे. **दातारा**-देवा. **वाट पाहतो खरोखरा**-भाऊसाहेब मेलेले प्रत्यक्ष कोणीं न पाहिल्यामुळें ते जिवंत आहेत असा भ्रम पानपतानंतर अनेक वर्षे प्रचलित होता. २०

# पानपतचा तिसरा पोवाडा

## ११

मागच्या पोवाड्याप्रमाणें हा पोवाडाहि अत्यंत करुणरसपूर्ण आहे. मागच्या पोवाड्याचा शाहीर रामा सटवा आहे व याचा सटवा रामा आहे. नांवावरून एकाच शाहीराचे हे दोन पोवाडे असावेसे दिसतात.

[ शाहीर—सटवा रामा ]

[ चाल—'दो दिवसांची तनु हे साची मुरतरसाची करुनि मजा ।']

भाऊ नानाचं दुःख ऐकता हृदय फुटलं कडाकडी । मुक्त पावले साहेब नाना कशा केल्या देवा तडातोडी ॥ ध्रु० ॥

भाऊसाहेबाची अचळ बुद्ध, प्रसन्न त्याला भगवंत । अबदल्याची खबर ऐकता मनांत झाले दुश्चित्त ॥ बारा सरदार बारा उमराव बसोनि करिती खलबत । घटका तिथी भट सांगता बरवा आहे मुहूर्त ॥ बाईसाहेबाची आज्ञा घेतली जावं हिंदुस्थानात । ओट्यात घातले विश्वासराव केला हवाला म्हणवीत ।. अष्ट उमराव भाऊसाहेब घेउन गेले पानपतावरत ।...............॥

कडाकडी-कडाकड. मुक्त पावले मृत्यु पावले. मुक्ति पावले. तडातोडी-ताटातूट, ताटातोट. अचळ बुद्ध अचलबुद्धि. अबदुल्याची-अबदल्याची. अबदालीची. दुश्चित्त-खिन्न, उद्विग्न. बारा सरदार बारा उमराव.. ..खलबत पटदूर येथें एक आठवडा अहोरात्र खलबत्यांची वाटाघाट होऊन सदाशिवरावास उत्तरेंत पाठविण्याचा निश्चय पेशव्यांनी केला. ता १४ मार्च रोजी सदाशिवराव पटदुराहून शिवालिखिताच्या मुहूर्तानें निघाला. [म. रि म. वि. ३ पा. १३३]. भट-जोशी, ज्योतिषी, गणक. ओट्यांत घातले विश्वासराव केला हवाला म्हणवीत- विश्वासराव (तुमच्या) हवाला केला असें म्हणवीत (म्हणाल्या). पानपतावरत- पानपतावरती, पानपतावर.

केला हकारा दिला नगारा स्फुरण आलें त्याच घडी। बुद्धीचे सागर सदोबा घालुनि गेले कशी उडी ।। भाऊ नानाच० ।। १

हत्ती घोडे लावलष्कर ते एक एक होता हंबीर। त्यांचीं नांवें तुम्हां सांगतों ऐकुन घ्या जरा सत्वर ।। धाकले नाना कुळाक्षरि त्याच्या मोहरलें फुलशहर। महिपतराव तेहि पानसे तोफखान्याचे सरदार ।। गोविंदराव बुंदेले अग्नीचा पुल्ला गेला होता रस्त्यावर। बळवंतराव रणशूर खासा पडला नजरेसमोर ।। विठ्ठल शिवदेव मर्द जातीचा क्षणभर नाहीं धरला धीर। त्याच्या मागे पळोन गेले अंताजी माणकेश्वर ।। बाजी भिवराव अष्ट उमराव रणामाधिं झाले चूर। दिल्लीमधि तक्त स्थापलें ठेवले नारो शंकर ।। असे एक

**हकारा केला**—बोलाविलें, पाचारिलें. **दिला नगारा**—कुचाचा नगारा केला. **त्याच घडी**—तत्क्षणीं. नगाऱ्यावर टिपरी झडूं लागल्याबरोबर स्फुरण चढलें. १

**लावलष्कर**—लाव कि. लवा—निशाण. **लावलष्कर**—सैन्य, सरंजाम. **हंबीर**—शूर, लढवय्या, मातबर सरदार. **अंबीर**—सरदार. [ आपटे ]. **धाकले नाना**—नाना पुरंदरे. **धाकले नाना कुळाक्षरी त्याच्या मोहरलें फुलशहर**- (?). **कुळाक्षरी**—कुलाखत्यारी, कुलअखत्यारी (?) **महिपतराव**—महिपतराव चिटणीस. "श्रीमंत भाऊसाहेबासमागमें मुत्सद्दी रा० बळवंतराव गणपत व नाना पुरंदरे व महिपतराव चिटणीस ऐसे येत आहेत." [ म. इ. सा. पानपतप्रकरण लेखांक १६९ ]. **अग्नीचा पुल्ला**—पुला—जुडी, पेंडी, भावार्थं अग्नीसारखा तेजस्वी. **रस्त्यावर**—रसदेवर, रसद मारण्याकरितां. **बाजी भिवराव**—बाजी भिवराव रेटरेकर हा पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत तारापुरच्या मोहिमेंत मेला. बाजी भिवराव या नांवाचा दुसरा कोणी सरदार पानपतच्या बखरींत जी मोठी थोरली यादी दिली आहे तींत सांपडत नाहीं. हा बाजी हरि असावा. [म. रि. म. वि. ३ पा. २०५]. **ठेविले नारो शंकर**—"ऐशीयास आम्ही प्रस्तुत दिल्लींत रा० नारो शंकर यास तीन हजार प्यादे व तीन हजार राऊत व सामान सरंजामसुद्धां ठेऊन बंदोबस्त केला आहे." [ म. इ. सा. १७५०।१७६१ लेखांक

एक ब्राह्मण कितेक लढाऊ लाज वाटती मज थोडी। अशुद्धाच महापुर वाहती शिरें उडालीं झडाझडी॥ भाऊ नानाच०॥ २

पांडव दलचा जसा क्षत्रियवीर तारक अर्जुनाचा। इभ्रामखान व्याघ्र जातीचा सोबती झाला मरणाचा॥ ज्यानें सूड घेतला हेतु पुरविला गिलचांचा। असला दुसरा चाकर होईना निमकहलाल भाऊसाहेबाचा॥ वनीं राहिले विश्वासराव जीव गोपिकानानाचा। तिथें भाऊची शुद्ध हरपली सागर होता बुद्धीचा॥ अवघ्या लोकांनीं हिमत टाकिली ग्वांच बुडाला दौलतीचा। सज्जन म्हणती भाऊ बुडाले मोठा घात झाला आमुचा॥ दुर्जन म्हणती बरवें झालें कांच मिटला जगाचा। जे गिलच्यासंगें मळोन राहिले हरी ठाव पुसेल त्यांचा॥ भाऊसंगें ब्राह्मण मेले नाहीं लागत अर्धघडी। काय तयाची कीर्त सांगावी? साहेब नाम धडाधडी॥ भाऊ नानाच०॥ ३

होळकर भले झुंजार पळ काढिला लौकरी। जेव्हां गिलच्याचा मार

२३७]. लाज वाटती मज थोडी–नारो शंकर वगैरे दिल्लीहून पळून गेले त्यास अनुलक्षून. थोडी–जरा. झडाझडी–झटाझट. २

तारक अर्जुनाचा–'अर्जुन साचा' असें मुळांत असावें. हेतु पुरविला–रणकंडू शमविला. निमकहलाल विश्वासू, कराराचा, निष्ठावंत. वनीं राहिले–'रणीं' असावें. रणांत राहणें म्ह० खेतात राहणें खेतास येणें; पाडाव होणें. उदा० ' त्या मागून उज्जेनहून दुसरें पत्र आलें कीं रणांत पाटिलबोवा राहिले [म. इ. सा. १७५०–१७६१ लेखांक १६५] तिथें भाऊची शुद्ध हरपली इ.–विश्वासराव रणांत राहिल्यावर भाऊसाहेब बुद्धीचे जरी सागर होते तरी त्या-वेळीं त्यांचा धीर सुटला व शुद्ध नाहींशी झाली असा भावार्थ. ग्वांच–आधार. विश्वासराव हा युवराज होता. मळोन राहिले–मिळोन (?) फितूर होऊन. मळणे असा शब्द कोशांत सापडत नाहीं. ठाव पुसेल–झाडा घेईल. ठाव-ठिकाणा पुसेल. नाहीं लागत अर्धघडी–फार थोड्या वेळांत. साहेब–साहेबनौबत. नाम धडाधडी–कीर्तीचा घोष करिते. कीर्तीचे डंके वाजतात. ३

मुटला ठाव देईना त्याला धरत्री ।। सोनजी भापकर मानाजी पायगुडे रणांत राहिल्या रणभेरी । मोठमोठे सरदार जवळ पडला जनकोजी शिंदा यशवंत-राव धारकर ।। राव दमाजी निघून चालले असे गळाले क्षत्री । समशेर-बहादर रणीं थकले कर्त्यांची गत आहे न्यारी ।। भाऊ नानाच०।। ४

आम्हीं गाइलें पद साजना जिवा लागल्या झुरणी । भाऊसाहेबाच दुःख ऐकतां थरथर कांपे मेदिनी ।। रामचंद्रांनीं सीता टाकिली जशी येऊं दे भवानी । रडे गोपिकाबाई एकटी छत्र दिसेना नयनीं ।। विश्वासराव भाऊ बुडाले पानपताचे मैदानीं । भाऊवांचून आम्हांला कोण नेईल पैलतिरीं ।। श्रीमंत महाराज ह्याला प्रसन्न गौरासुरेपाणी । विश्वासराव भाऊ बुडाले पानपताचे मैदानीं ।। सटवा राम नित्य हमेशा चरणीं वाजतो चौघडा । हाच पोवाडा ऐक शाहिरा नित्य होती घडामोडा ।। भाऊ नानाच०।। ५



**सोनजी भापकर**–[भाऊसाहेब बखर पा. १५१ अं. १३४]. **मानाजी पायगुडे**–हा पेशव्यांचा सरकारी पथक्या होता. [म. इ. सा. १७५०–१७६१ प्रस्तावना पा. ७५]. **रणभेरी**–नौबती. **राव दमाजी**–दमाजी गाय-कवाड. "तेव्हा ते ( दादासाहेब ) परिच्छिन्न मान्य करीतना सर्वांचीं ज्ञानें हिमतमर्दानपणा मजला ठाऊक आहे. पानपतावर भाऊस टाकून आलेत ! याप्रमाणें दमाजी गायकवाड यांची रुबरू निर्भत्सना केली. अजापालकास (होळकरास) कनातेच्या आडून ऐसेच भाषण केलें." [खरे ४८१] **क्षत्री**–लढवय्ये; क्षत्रीय. **कर्त्यांची गत आहे न्यारी**–कर्तृत्ववान् पुरुषाची गोष्ट कांहीं निराळीच असते. ४

साजना–मूळ शब्द साजण–प्यार, प्रिय. **आम्हीं पद गाइलें साजना**–आम्हांला प्रिय असलेल्या भाऊसाहेबावर पोवाडा केला. **मेदिनी**–पृथ्वी. **रामचंद्रानी सीता टाकिली जशी येउदे भवानी रडे गोपिकाबाई एकटी छत्र दिसेना नयनीं**–रामानें सीतात्याग केल्यानंतर सीतेनें ज्याप्रमाणें भवानी-ची म्ह० भूमातेची आपणांस पोटांत घेण्याबद्दल प्रार्थना केली त्याप्रमाणें गोपिका-बाईला पृथ्वी आपणांस पोटांत घेईल तर बरें असें वाटूं लागलें. **एकटी**–निराश्रित **छत्र**–आधार. **गौरासुरेपाणी**–गौरीशूलपाणी [ शाळिग्राम ] **पार्वतीपरमेश्वर.** ५

# नानासाहेब पेशवे यांच्या मृत्यूचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

नानासाहेब पेशवे हे मंगळवार, ज्येष्ठ वद्य ८ शके १६८३ रोजीं दीडप्रहर रात्रीं पर्वतीवरील बंगल्यांत क्षयाच्या व्यथेनें मृत्यु पावले, मरणसमयीं जवळ कृष्णराव पारसनीस, कोन्हेर त्रिंबक, गोपिकाबाई व नाटकशाळा होत्या. त्यांचे दहन लकडीपुलाजवळ केलें. तेथें वृंदावन आहे.

त्यांच्या कारकीर्दीच्या सुमारास पेशवाईच्या उत्कर्षाचा परमोच्च बिंदु झाला. "मोहिमेच्या, यात्रेच्या, व्यापाराच्या वगैरे निमित्तानें लाखों लोकांचा संचार हिंदुस्थानाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत सारखा पन्नास पाउणशें वर्षे होत राहिला. त्यामुळें ठिकठिकाणचे रीतिरिवाज, कलाकौशल्य, आहार-विहार, देवधर्म वगैरे बाबतींत महाराष्ट्राचें जीवन पुष्कळ विस्तार पावलें. उत्तर हिंदुस्थानातील नक्षीच्या व कलाकौशल्याच्या चिजा महाराष्ट्रांत आल्या. आहारविहार, व्यवसाय वगैरे बाबतींतसुद्धां नवीन प्रचार उद्भवले. आणि महाराष्ट्रांतील गरीब राहणी बदलून जाऊन सुखोपभोग व ऐषआराम वृद्धि पावले. उत्कृष्ट घोडे, उत्कृष्ट शस्त्रास्त्रें, नाना प्रकारच्या पोथ्यापुस्तकें व ग्रंथ, नाटकशाळा वगैरे महाराष्ट्रांत आणण्याबद्दल त्या वेळच्या पत्रांतून भरपूर उल्लेख आहेत."

पुणें शहरावर नानासाहेबांचें अतोनात प्रेम होतें. "त्याची सुधारणा करण्याकडे त्यांचें सदैव लक्ष असे. हिंदुस्थानभर शेपन्नास वर्षे चाललेल्या त्यांच्या संचारांत जे जे प्रकार त्यांच्या नजरेस येत ते पुण्यांत शक्य तितके उतरून देण्याचा त्यांस हव्यास होता. मंदिरें, पेठा, रस्ते, वाडे वगैरे बाबतींत लोकांस सवलती व उत्तेजन देऊन त्यांनीं नगररचना करविली. मंदिरें, हौद, वाडे, पेठा वगैरे स्मारकें त्या वेळच्या स्थितीचीं निदर्शक आहेत."

* पर्वतीची स्थापना, पर्वतीचें तळें, सारसबाग, कात्रजचे नळ वगैरे अनेक गोष्टी नानासाहेबांच्या स्मारकरूपच आहेत.

" नानासाहेबास बादशाही थाटाची आवड होती, त्यामुळें त्यांजपाशीं निरनिराळ्या देशांतील प्रवासाचे उंची उंची सामान एकत्र झालें होतें. पेशव्यांचा तंबू लागावयाची जागा बिनीवाल्यांकडून आगाऊ साफ होऊन तिच्या भोंवतीं चारहि बाजूंनीं चित्रविचित्र कापडाची मोठी कनात भिंतीप्रमाणे लावीत. तिला चार मोठे दरवाजे ठेवलेले असत. तंबू मोठे विस्तीर्ण असून त्यांत निरनिराळी दालनें, उंची रेशमी जरतारी कापडाच्या कनातींनी केलेलीं व सर्व सोयींनीं परिपूर्ण अशीं असत. स्नानगृह, स्वयंपाकगृह वगैरे करितां निराळे लहान तंबू असून त्यांचे भाग लहान कनातीच्या भिंतींनी तोडलेले असत. सारांश, मोठ्या कनातीच्या आंत शिरल्यावर आंतील जागा एकाद्या टोलेजंग वाड्यासारखी भव्य दिसे. मुख्य दरवाजापुढें एक मोठें विस्तीर्ण मैदान मोकळें असून त्यांत शृंगारलेले हत्ती, घोडे नेहमीं पाळीपाळीनें उभे असत. मैदानाच्या चारही बाजूंस निरनिराळ्या रंगाचीं निशाणें फडकत असत. दर मुक्कामावर फौजेच्या उतरण्याची शिस्त बांधलेली असे. श्रीमंतांच्या तंबूपासून कोस दोन कोसपावेतों दोनही बाजूंनीं दुकानें लागलेलीं असत. हीं दुकानें लहान पालांतून मांडलीं असून त्यांत सर्व तऱ्हेचे जिन्नस विकत मिळत. दुकानांच्या मागें दोनही बाजूंस निरनिराळ्या पथकदारांच्या जागा नेमलेल्या असत. बहुतेक पथके राहुट्याच वापरीत."

शेवटच्या दोन तीन वर्षांत नानासाहेब रंगेल बनून त्यांस नाचरंग वगैरेचा शोक उत्पन्न झाला होता. वाड्यांत रंगाची चाल त्यांनींच चालू केली.

# नानासाहेब पेशव्यांचा पोवाडा

## १२

[ शाहीर–शिवराम पिंपळगांवकर ]

[ चाल—श्रीमंतपेशवेप्रधान बहु प्रीतीचे इ० ]

धन्य भगवाना नेलास मोतीदाणा। दख्खनचा बादशाह साहेबनाना ॥ ध्रु०॥

दिवाणखाना खुष रंगमहाल जोर मौज। तऱ्हेतऱ्हेचे पक्षी नानाची रिज ॥ काय गेंडिया सांबर आणिक सावज। भले भले पटाइत वाघ गर्ज ॥ खंडेरायाची जोडी विरळागत काज। नानापेशवे नांव तयाला साज ॥ उघड्या तार्टी मुलुख करितो राज्य। गरिबाची करीत होता बुज ॥.........। दुर्बळ ब्राह्मणावर फार त्याची रिज ॥ पूल पालख्या तमाम केल्या फन्ना। त्यांनीं पुल बांधिले नावा केल्या मना ॥ धन्य० ॥ १

**मोतीदाणा**–मोत्याच्या दाण्यासारखा सुंदर पुरुषः देखणा. "श्रीमंत महाराज पेशवे अमोलिक मुर्ती मोती." **दिवाणखाना खुष इ०**–"दिवाणखाना खुप जोरे ( खुषबो रे ! ) रंगमहाल मौज" असे असतें तर अर्थ लागला असता. **खुश्बो**–सुगंधी अत्तर. दिवाणखान्यांतील अत्तर-गुलाबाची आणि रंगमहालांतील विलासांची काय ती मौज ! **रिज**–आवड, शोक. **गेंडिया** गेंडे. **सावज**–सावजें, जनावरें (शिकारखान्यांतील). **खंडेरायाची जोडी**–खंद (न.)–एक तऱ्हेचा छोटा पक्षी. **रायाची**–राव्याची (?). **रावा** पोपट, राघू. भावार्थ निरनिराळ्या पांखरांच्या जोड्या. **विरळागत काज**–क्वचित घडणारें [आपटे]. अलौकिक **नाना पेशवे नांव तयाला साज** अशा नाना तऱ्हेच्या अलौकिक वस्तूंचा संग्रह त्याच्याजवळ होता तेव्हां नाना हे त्याचें नांव यथार्थच आहे. **उघड्या तार्टी मुलुख**–(?). **बुज करणें**–परामर्ष घेणें. कृपा करणें. **रिज**–रोष, कृपा, मेहरनजर. **पूल पालख्या तमाम केल्या फन्ना**–या चरणाचा बरोबर अर्थ लागत नाहीं. नदीवरील पूल या अर्थी 'पूल' शब्दाचा उपयोग पुढच्याच चरणांत असल्यामुळे या चरणांतील 'पूल' या शब्दाचा दुसरा कांहीं तरी अर्थ असला पाहिजे. पण तसा दुसरा अर्थ कोशांतून सांपडत नाहीं. म्हणून 'पूल' हा एकाद्या

**अघटित बुध त्याचे पत्रवाडे । खास हौसीचे राखिले घोडे ॥ तुरंगी टाकिले पायांत तोडे ।** ..................॥ टाकिले ऐसे तोडे, जरदाईत । घोडा काळा निळा बोर नळनळीत ॥ अबलक पंचकल्याणी कुमाइत, । बारा हजार

---

शब्दाचा अपभ्रंश असावा असें मानण्याकडे प्रवृत्ति होते. त्याचप्रमाणें 'फन्ना' या शब्दाची गोष्ट आहे. सदर चरणाचा योग्य अर्थ लागेल अशा तऱ्हेचा या शब्दाचा अर्थ कोशकार देत नाहींत. सबब तोही दुसऱ्या एखाद्या शब्दाचा अपभ्रंश असला पाहिजे. पुर् ( फारशी )—पूर्ण. फन–Skill, art. फुना ( पुल्लि )–अग्रभाग, गोंडा, झेंडा. [ शु. म. को.]. १ 'पुर पालख्या तमाम केल्या फुन्ना' म्ह० दरोबस्त पालख्यांना गोंडे लावून शृंगारल्या. २ 'पुर पालख्या तमामी केल्या फुन्ना' म्ह० ज्यांत उभें सूत जरीचें व आडवे रेशमाचें आहे अशा तमामी कापडानें पालख्या मढविल्या व त्यांना गोंडे बांधले. ३ 'पाल पालख्या तमामी केल्या फुन्ना' ? पाल–राहुटी चांदणी अशा अर्थी. आपल्या राहुट्या तमामी कापडाच्या केल्या आणि पालख्यांना गोंडे बांधून त्या सजवल्या. वरील सर्व पाठांत 'पाल पालख्या तमामी केल्या फुन्ना' हाच चरण ग्राह्य दिसतो. **ह्यांनीं पुल बांधिले नावा केल्या मना**–पूल बांधण्याच्या आधी परतीरास नावेंतून किंवा तरींतून जावें लागे. नानासाहेबानें पूल बांधिले; अर्थातच मग 'नावा मना' म्हणजे बंद केल्या. " याच वेळेस पुण्याचा प्रसिद्ध लकडीपूल घाईघाईनें सहा दिवसांत तयार करण्यांत आला. पुलाचे कामावर स्वारी नित्य जात होती." [ म. रि. म. वि. ३ पा. २३४ ]. १

**अघटित बुध त्याचे पत्रवाडे**–अघटित बुध त्याचे पवाडे (?). **तुरंगी टाकिले पायांत तोडे**–घोड्यांच्या पायांत तोडे घातले. **जरदाईत**–'जरदा–पिंगल, स्मृतः' [रा. व्य. को ]. पिवळट रंगाचा घोडा. **निळा**–'नीला कर्कः परिज्ञेयः' [रा. व्य. को.]. **बोर**–'शोणो बोर इति स्मृतः' [रा. व्य. को.]. **नळनळीत**–तुळतुळीत. **अबलक**–'कर्बुरस्तु अबलको नाम' [रा. व्य. को ]. पांढऱ्या व काळ्या दोन रंगांचा, बांडा, कबरा, घोड्याची जात. **पंचकल्याणि**–ज्याच्या अंगावर पांच शुभचिन्हें आहेत अशी घोड्याची जात. **कुमाइत**–'श्यामलस्तु कुमैतः' [रा. व्य. को.], सारंगा, मानेचे केंस व शेपूट काळें असा तांबुस रंगाचा

घोडा पुण्यांत कडकडीत ॥ याशिवाय झमकती पागा नाहीं गणित । भाऊ-साहेबासारखी बाजू अशी झाली मुक्त ॥ दादासाहेब मनात चिताग्रस्त । ................ ॥ विश्वासराव नानाचा पुत्र नगिना । तो माधवराव बाळ बत्तीसलक्षणा ॥ धन्य० ॥ २

नाना होते धुरंधर, नाहीं लक्ष्मीला पार । शितल छाया एक दयावंत पृथ्वीवर ॥ मोठे मोठे महंत तरले होत । त्याची अशी कीर्त साधुसंत ॥ श्रावणमासीं दक्षणा पुण्यात । मिळाले ब्राह्मण नाहीं गणित ॥ बुंदेलखंड माळवा काशी प्रांत । कर्नाटक तेलगण आणिक गुजरात ॥ हे अवघे तळ कोंकण सदोदित मिळालेत । ब्राह्मण पर्वतीस तेलगी ब्राह्मण डोकीं देतात ॥ ओंगाळ ओंगाळ रुपये नाहीं घेतात । शिव्या श्रीमंताला देतात ॥ रमण्या-

घोडा. काळा, निळा, बोर, अबलख, व पंचकल्याणि हे सर्व घोड्यांचे प्रकार **झमकती**–शोभतात. **गणित**–गणती. **भाऊसाहेबांसारखी बाजु अशी झाली मुक्त**–भाऊसाहेब पेशवे यासारखे उजवा हात असलेले मदतगार मेले. **बाजु**–आधार, मदत, साह्यकर्ता. **मुक्त होणें** मरणें. 'अशी झाली मुक्त' या शब्दरचनेवरून सदर पोवाडा नानासाहेबाचे मृत्यूनंतर लगेच रचला असावा असें दिसते. **दादासाहेब**–रघुनाथराव दादा. **नगिना** (फा. पु) रत्न, हिरा. **बत्तीस लक्षणा**–बत्तीस लक्षणी, सुलक्षणी. २

**मोठे मोठे महंत तरले, होत । त्याची अशी कीर्त साधुसंत** मोठे मोठे महंत तरून गेले त्यांच्याप्रमाणें याचा कीर्त होत, कीर्ति होते. पूर्वकालिन साधुसंतांप्रमाणे याचा कीर्त आला. **श्रावण मासीं दक्षणा पुण्यांत**– "श्रावण मासांत ब्राह्मणांस विद्वत्तेजनादाखल दक्षिणा वाटण्याचा प्रघात शिवाजीपासूनच पडला, तो पुढे पेशवाईअखेरपर्यंत चालत होता. सन १७५४ सालीं ८ लक्ष रुपये व सन १७५८ सालीं १८ लक्ष रुपये देकार झाल्याचे दाखले आढळतात. प्रथम हा समारंभ खबुतरखान्यांत होत असे. पण पुढे १७५८ पासून पर्वतावर होऊं लागला. दक्षणेशिवाय शिधे व खिचडी वांटीत." [म. रि. म. वि. ३ पा. २५५, २५६]. **डोकी देतात**–मुंडी देऊन बसतात, ठिय्या देऊन बसतात, अस पाडून बसतात. **ओंगराळ...श्रीमंताला शिव्या**

मधिं शिलबन चतुर शहाणा। काय अगाध करणी गोपिकाबाई सुलक्षणा ॥
धन्य० ॥ ३

नाना होते केवळ अवतार, गोपिकाबाईचें छत्र, कळस ढळला। पण नाहीं करुणा आली त्या देवाला ॥ काय द्वारका सोडुन कृष्ण निघाला। नळानें टाकिलें दमयंतीला ॥ भोळाशंकर होता पार्वतीला। रामचंद्रानें मोकलिलें सिताबाईला ॥ ..................। हरिश्चंद्र होता तारामतीला ॥ जंगलशिचा रमणा, सोडिला रमणा कैक हजार, आणिक बुंदेलखाना ॥
धन्य० ॥ ४

हत्तीघोड्यांचे केले रथ। आणिक जिनखानां नाहिं गणित ॥ नानासारखा समर्थ गेला पुतळा। सावलीच्या सुखं गोधनें गोळा ॥ त्या पिकल्या वृक्षा-

---

देतात-ओघराळ ओघराळ रुपये दिले तरी संतुष्ट न होतां श्रीमंतांना शिव्या देतात. **शिलबन**-शीलवान (?). ३

**कळस ढळला**-कळस मोडून पडला. **जंगलशिचा रमणा सोडिला रमणा**-जंगलशी असा शब्द सांपडत नाहीं. जंगला म्ह० वार्धक्यानें थकलेला मनुष्य अगर पशु असा अर्थ सांपडतो. त्यावरून " हे रमणा जंगलशिचा रमणा सोडिला " म्हणजे गोपिकाबाई म्हणते " हे प्रिया मज म्हातारीचा रमणा म्ह० घर तूं सोडलेंस, या म्हातारपणीं टाकून गेलास." (२) पर्वतीचे बंगल्यांत नानासाहेब वारले. म्हणून येथें जंगलशिचा रमणा याचा अर्थ रानांत, जंगलांत बांधलेला रमणा म्ह० बंगला, वसतिस्थान असाही घेतां येईल. (३) रमणा याचा गर्दी असाहि अर्थ आहे. त्यांनीं जंगलांत हौसेनें बांधलेला पर्वतीवरचा बंगला, कैक हजारों रमणा म्हणजे हजारों लोकांचा परिवार आणि बुंदेलखंडांतून मुद्दाम मागविलेल्या नाटकशाळा इतक्या सर्वांचा त्याग केला. " सरकारांत नाटकशाळांचें प्रयोजन आहे तरी जातीच्या, शुद्ध चांगल्या जरूर दोन, तीन तरण्या मिळवून पाठविणे " [ नानासाहेबाचें पत्र गोविंदपंत बुंदेल्यास. म. इ. सा. पानपत राजवाडे ३१९ ]. ४

**जिनखा**-(हिं. पु.) खोजा, जनानखान्यांतला नोकर. **सावलिच्या सुखें गोधनें गोळा इ०**-ज्याप्रमाणें गाईगुरें वृक्षाच्या सावलीस येतात त्याप्रमाणें

खालीं पक्ष्यांचा मेळा । त्याच्या गुणवती केशरी नाटकशाळा ॥ काय कातलें भगवंता वेळोवेळा । त्याच्या अठरा कारखान्यांच्या गेल्या कळा ॥ शिरींचे शिरपेच मोत्यांच्या माळा । राजपद गेले परमेश्वरा सगळें ॥ शिवराम गातो पिंपळगांव ठिकाणा । आम्ही वेडं बगडे गातो मनाशी आणा ॥ धन्य० ॥ ५



नानासाहेबाच्या छत्राखालीं येऊन प्रजा विश्राम पावत होती. **त्याच्या गुणवती केशरी नाटकशाळा**–" (नानासाहेब पेशव्याच्या) अंतकाळीं जवळ कृष्णराव पारसनीस व कान्हेर त्रिंबक होते. गोपिकाबाई व नाटकशाळा पर्वतीच्या खोलींत होत्या." [म. रि. म. वि. ३. पा. २३८]. गुणवंती आणि केशरी ही नाटकशाळांचीं नावें असूं शकतात. **कातलें**–कातणें किंवा कातणं To crimple the edges. २ fig. To contrive or devise. (Mischief or evil) ex. त्यानें मजवर फासें कातलें. ३ To harass, worry, vex, weary. **काय कातलें भगवंता वेळोवेळां**–ईश्वरा, वेळोवेळीं त्यानें तुझें काय अपराध केलें कुणास ठाऊक म्हणून तूं त्याला उचलून नेलास ? **अठरा कारखाने**–(१) तोफखाना, पालखाना, उष्ट्रखाना, शिलेखाना, फरासखाना, कोठी, लकडखाना, इमारत, बागा, कुरणें, वहानकोठी, रथखाना, पुणें पेठा, थट्टी, पोतें व जामदारखाना, जिन्नसखाना व वैद्यशाळा, पुस्तकशाळा, खासगी [पारसनीस जु. ऐ. गो. २६] (२) पोते खजाना जामदारखाना । बागा आणि पालखाना । जरगरखाना जिरातखाना । कोठी आणि मुदबख ॥ १३ ॥ थट्टी आणि सुतारखाना । अबदारखाना शरावखाना । फराशखाना अलमखाना शिकारखाना आणि कोठार ॥ १४ ॥ वांहलीमहाल आतसखाना । इमारती आणि अंबरखाना । या वेगळेंही नाना । आणिक असती ॥ १५ ॥ [राजारामकालीन मेस्तक पुस्तक भा. इ. सं. मं. अह. १८३४ पा. ८७]. **मनाशीं आणा**–मानून घ्या.

# रमाबाईचा पोवाडा

रमाबाईसाहेब ही सिवाजी बल्लाळ जोशी संगमनेरकर यांची कन्या. माधवरावाशीं तिचें लग्न ९-१२-१७५३ रोजी झालें. क्वचित् प्रसंगीं जवळच्या यात्रेंत किंवा स्वारींत रमाबाई माधवरावाबरोबर असे. एकदांच ती नवऱ्याबरोबर कर्नाटक स्वारींत गेली होती. ती अत्यंत नेमिष्ठ व पतिपरायण होती. उपासतापास करून तिनें शरीर फार कष्टविलें होतें.

माधवरावास आपण जगत नाहीं असें वाटल्याबरोबर त्यानें तिला सहगमनाचा उपदेश केला; पण हा बोध तिला करण्याची आवश्यकताच नव्हती. कारण तिचा निश्चय अगोदरच ठरला होता. पेशव्यांचा आजार बळावल्यामुळे त्या साध्वीनें केवळ दूध व गोमूत्र यांवरच प्राण रक्षण केले. एके दिवशीं श्रीमंतांचा अतिशय वाखा होऊन ते मरण पावल्याची हूल उठली. त्या वेळीं रमाबाईनें सती जाण्याच्या वेळचीं नेसावयाचीं पातळें आणण्याकरितां पुण्यास सांडणीस्वार पिटाळला. "तृतीयेचे दिवशीं उजाडतां हातावर उचलून आणून बर्वरींत आणून ठेविलें. नंतर प्रहर दिवसास काहिली झाली. त्या आवईत सौ० मातोश्री बाईसाहेबांनीं पातळें आणावयास कोणास नकळत सुतरस्वार पुण्यास पाठविला होता. त्याजवरून पुण्यांत दोन घटका नौबत व दुकानेंदेखील बंद ! अशी गडबड झाली. फिरोन वर्तमान कळतांच गडबड वारली, असें झालें होतें. गडबड कशावरून झाली ही चौकशी होत होती. सुतरस्वार उमगला. हात तोडा म्हणून खाशांनीं हुकूम केला होता. मग कोणी रदबदली केली न कळे, हात तोडला नाहीं." [ खरे, १९४१]. सती जातांना बाईसाहेबांनीं मोहोरांच्या पिशव्या जवळ ठेवून घेऊन जो नमस्कार करावयास आला त्यास, कनिष्ठासदेखील एक एक मोहोर दिली. "श्रीमंत बाबास हिऱ्याची अंगठी आंत गणपतीची मुहूर्त असलेली दिली. आंगठी चांगली दिली. भाऊंस ( परशरामभाऊंस ) पांचेची दिली तीही चांगली आहे. वरकडांस मोहरा दोन, चार, पांच अशा दिल्या." [ खरे, १९४४.]

**थेऊरास सतीचें वृंदावन आहे.**

# रमाबाईचा पोवाडा

## १३

[ पोवाडा अपूर्णच उपलब्ध असल्यामुळें शाहिराचें नांव अज्ञात.]

[ चाल—'राया अंजनीच्यासुता। तुम्ही वज्रशरीरी होता। माहित सर्वथा ॥']

सांग रमाबाई सत्त्वधीर। रावसाहेब ईश्वराअवतार ॥ ध्रु० ॥

नानासाहेब होते पुण्यपावन। उदरीं जन्मले एक रत्न ॥ विश्वासराव, राव, नारायण। जसे बंधु राम लक्ष्मण ॥ हिऱ्यारत्नांची जोडी विदूसलि कोण। ज्याची कळा तोच जाण ॥ (चाल) ॥ वाजे खणखण। धवशा दिला बसवून ॥ नाहीं गेले पुणें सोडून। केले काबीज झुंजल्याविण ॥ वसई मुरतेचें ठाणें। कुलाबा फिरंगाण ॥ आंग्रे आणिले धरून। ते बंदीशाळेंत अजून ॥ सोडवील कोण द्वाही त्याची फीर ॥ सांग० ॥ १

सांग—(वि.) सर्वतऱ्हेनें परिपूर्ण. रमाबाई सर्वतऱ्हेनें सत्त्वधीर होती. अत्यंत सोज्ज्वल सती होती, असा अर्थ. **रावसाहेब**—थोरले माधवरावसाहेब. **पुण्यपावन**—पुण्यवान, पुण्यकर्मांनें शुद्धता पावलेले. **राव**—थोरले माधवरावसाहेब. **विदूसली**—तोडली; फोडली. [नाहींशी केली, शालि.]. **ज्याची कळा तोच जाणे**—ज्यानें ही हिऱ्या रत्नांची जोडी उत्पन्न केली त्या ईश्वरालाच एक ठाऊक. **वाजे खणखण। धवशा दिला बसवून**—धवशा—दरारा, जरब. त्यांच्या पराक्रमाचे चौघडे वाजत होते. त्याचा दरारा बसला होता. **नाहीं गेले पुणें सोडून**—वसईस स्वतः न जातां चिमाजी आपाकडून ती काबीज केली. हे पहिले बाजिरावासंबंधीं. **झुंजल्याविण** 'झुंज लावुन' असेच असलें पाहिजे नाहींतर वसईच्या वेढ्यांत पेशव्यांचे पांच हजार लोक कामास आले त्याशीं भलतीच विसंगति उत्पन्न होईल. **फिरंगाण**-फिरंग्यांचा मुलूख. पोर्तुगीजांचा मुलूख. **आंग्रे आणिले धरून**—तुळाजी आंग्रे. **द्वाही त्याची फीर**—त्यांची दौंडी आज्ञा, हुकूम फिरतो. भावार्थ, त्यांचा इतका दरारा आहे कीं, आंग्र्यांना बंदिवासांतून काढून नेण्याची कोणाचीहि प्राज्ञा नाहीं. १

बुद्धीचे सागर रावसाहेब होते। कर्मी त्यांचे अघटीत ॥ त्यांचे बुद्धीचा न कळे अंत। हत्तीघोड्याचे मोठे परीक्षवंत ॥..................। स्वारी निघाली त्वरीत ॥ ( चाल ) ॥ संगें सडी स्वारी। संगें चौघड्यांच्या भेरी। काल्र वाजती नानापरी। बारगिरांची गत काय न्यारी ॥ पुढें धावती विटेकरी ॥ आयन्यांची खासी अंबारी ॥ गज सजवून तयामाझारी ॥............ । वर्णिती राव किंकर ॥ सांग० ॥ २

स्वारी पुण्याहुन गेली थेऊराला। त्या गणपतीच्या सेवेला ॥ रमाबाई विनवी त्या गणपतीला। "चुडेदान देइ तूं मजला ॥ एवढें वरीस राख साहेबांला। अवघा सोन्यानें मढवीन तुजला ॥ मंदिल मुंडासा शिरपेंच वाहिला। हिरे जोडीन तुझ्या मुकुटाला ॥ सोन्याचा कळस लावीन तुझ्या शिखराला "। पांचा लक्षांचा नवस केला ॥ ( चाल ) ॥ बाई विनविती। मज प्रसन्न व्हावें गणपती ॥ कशी हीन झाली तुझी मति। मंगळवाराच्या

---

**रावसाहेब**–थोरले माधवराव. **कर्मी त्यांचे अघटित**–त्यांच्या दैवीं अचाट गोष्टी होत्या. **हत्ती घोड्याचे मोठे परीक्षवंत**–"घोड्यांची पैदास बरोबर ठेवण्यांत त्याची दक्षता दिसून येते. मसकतहून उत्तम घोडे खरेदी आणण्याविषयी रघूजी आंग्र्यास माधवरावाच्या आज्ञा वारंवार आहेत." [म. रि. म वि ४ पा. २५८]. **चौघड्यांच्या भेरी**–चौघडे. **कालु**–एक तऱ्हेचें चर्मवाद्य **विटेकरी**–इटेकरी. इटा हें एक भाल्यासारखें शस्त्र आहे. एक इटेकरी आणि दहा पट्टेकरी बरोबर, अशी म्हण आहे. **आयन्यांची**–आरशांची. आरशांनीं मढविलेली. **तयामाझारी**–स्वारींत, सैन्यांत. **राव-किंकर**–लहानमोठे, श्रीमंतगरीब. २

**मंदिल मुंडासा शिरपेंच वाहिला**–**मंदिल**–उंची फेटा. **मुंडासा**–पागोटें. **शिरपेंच**–शिरोलंकार–देवास पोषाक अर्पण केला. **पांचा लक्षाचा नवस केला**–"नवससायासही बहुत प्रकारचे केले. गिरीच्या व्यंकटेशास त्यांनीं १० लक्ष रु. देण्याचा नवस केला." हा नवस स्वतः माधवरावानेंच केलेला होता. "ते ज्या दिवशीं थेउरास आले त्या दिवशींच मोत्यांचा तुरा १० हजार रुपयांचा त्यांनीं देवास दिला." **कशि हीन झाली तुझी**

रातीं ॥ साद्दष्ट आले गणपती । उभे ठाले ग बाई पाहती ॥ कर जोडून बोले गणपती । "काय आहे ग माझे हातीं"॥ कर जोडूनि सांगे गणपती । "कर्ता हर्ता तो श्रीपती ॥ मी मोदकाचा बहु पती" । ऐकून बाई हांसली चित्तीं ॥ पुढे उगवला दिवस बुधवार ॥ सांग० ॥ ३

दिवस उगवला बुधवार बुद्धिवंत । दिशा धुंदकारल्या समस्त ॥ गेले निजधामा रावसाहेब श्रीमंत । देवाज्ञा झाली त्वरित ॥ रमाबाई होती दुसऱ्या डेऱ्यांत । कळली बातमी आली धावत ॥ पदर टाकिला खांद्यावर त्वरित । धावत आली देवळात ॥ "जातो आम्ही नाही रहात । (चाल) करा बोलावणं । आम्हा निजधामासी जाणं"॥ तुळशी मंजरी तोडून । त्या माळा गळ्यात घालून ॥ सर्व शृंगार उतरून । हे निर्वाणीचे लेणं ॥ गोपिका-

मति-हीन-वाईट, दुष्ट. मति-बुद्धि. भावार्थ आजच तुझी बुद्धि कशी फिरली? साद्दष्ट आले-समोर आले, सन्मुख आले. उभे ठाले-उभे ठेले-समोर उभे राहिले. बुधवार-"आज भृगुवारी दोन घटका रात्रीस थेउराहून सांडणीस्वार पत्र घेऊन आला श्रीमंत पंतप्रधान कार्तिक वद्य ८ बुधवारी कैलासवासी झाले. ईश्वरें अनुचित गोष्ट केली." [खरे १९८५] ३

पदर टाकिला खांद्यावर त्वरित सौभाग्य संपल्याची खूण म्हणून वा सती जाणार अशा निश्चयाची खूण म्हणून! होळकरांच्या कैफियतींत मल्हार-रावाच्या गर्दीनंतर असाच मजकूर आहे 'इकडे कामास येताच (सवाई मल्हारराव) पांच कोस लोणी, तेथे बायकांनी (मल्हाररावाच्या) खांद्यावरी पदर टाकून बसल्या. सासू-सासऱ्याने निषेध केले का 'तुम्हास कशावरून समजलें' तो दोघांचा माणस आला त्याणी वर्तमान सांगितले नंतर त्यांणी सहगमन केलं." [होळकरांची कैफियत पान ७२]. (२) नरशिंगा शाहिरा या बदामीच्या पोवाड्यांतहि असाच एक उल्लेख आहे "पती पाहिली तिने वस्त्र ॥ राम स्मरून टाकिला पदर ॥ अंग टाकिलें धरणीवर ॥" जातो आम्ही नाही राहात-आम्ही निश्चयानं सती जाणार मागं राहणार नाही. बोलावणं बोलवणें; बोलावण. हे निर्वाणीचे लेणं-सर्व दागदागिने उतरून निर्वाण-पदाला जाण्याचे वेळीं उचित असे तुळशीच्या पत्राचे हार गळ्यांत घातले.

बाई म्हणे। जवळ बोलून नारायण। राघोबादादा येऊन:॥ हात वटींत घालून॥ राव निरविले नारायण॥............॥ वर्णिती राव किंकर॥ सांग० ॥ ४

बाई चालली थेऊरांतून। कुडी साहेबाची घेऊन॥ अबीर गुलाल गेली गर्दी होऊन। मुच्छदी उधळती पान॥ आणिक चवघडे वाजती खणखण।

सती जावयाचे वेळीं सर्व सौभाग्यालंकार घालावयाचे असा रिवाज होता. त्याला हें वर्णन विसंगत आहे. नारोकृष्ण शाहीरानें केलेला दुसऱ्या एका सती गेलेल्या रमाबाईचा पोवाडा आहे त्यांत आहे "गोठ पाटल्या चुडा हातामधि चाप भरून॥ नेत्रीं भरून काजळ इ०" गोपिकाबाई म्हणे–येथें रमाबाई म्हणे असें पाहिजे "त्याचप्रमाणें श्रीमंत सौ० मातोश्री बाईसाहेबांनीं शर्त केली. जवाहीर जें होतें तें आपलें आपलें हाताने वांटून धर्मशिलेवर उभे राहून श्रीमंत दादासाहेबास बोलावून आणून धाकटे श्रीमंतास त्यांचे हातीं दिलें. "सर्वांचें वडीलपणें यथास्थित चालवाव," म्हणोन सांगोन (सती गेली) [खरे १९८४]. गोपिकाबाई एकदां सन १७६४त पुणें सोडून गेली ती कायमचीच गेली. ती पुण्यास आलीच नाहीं. माधवरावानें हर प्रयत्न केले कीं मातोश्रींनी पुण्यास यावें पण ती आली नाहीं. सन १७६९ त भोसले पुण्यावर चालून येणार म्हणून गडबड उडाली. तेव्हां "पत्र पावतांच दादासाहेब व सौ० काकूबाई (आनंदीबाई) यांस सर्व वस्तभावसुद्धां सिंहगडास पाठवितों. आपण पत्र पावतांच नारायणरावांस घेऊन त्र्यंबकेश्वरास जावें. अनमान करावयाचा नाहीं, उपेक्षा करूं नये," असें नाना फडणिसानें मातोश्रीस रगडून लिहिलें पण ती गंगापुराहून हलली नाहीं. कुटुंबांतील कलह पाहून तिच्या मनास अप्रतिम उद्वेग उत्पन्न होऊन ती जी एकदां सन १७६४त पुणें सोडून गेली ती कायमचीच गेली." [म. रि. म. वि. ४ पा. २४५, २४६]. बोलून–बोलवून; बोलावून. हात वटींत घालून–हातें ओटींत घालून; आपल्या हातानें ओट्यांत घालून. ४

**कुडी**–देह, प्रेत, कलेवर. **मुच्छदी उधळती पानें**–संस्कृत वाङ्मयांत स्वारीच्या वेळीं दूर्वा व विड्याचीं पानें उधळण्याची वहिवाट होती असें आढळतें. पण तशीच वहिवाट या काळीं होती किंवा नाहीं, समजत नाहीं.

पुढें हुजराती घेऊन । मुळेच्या तिरीं उभी राहिली जाऊन । काशीचें पाणी आल्या कावडी भरून ॥ बाईनें केलें जलपूजन ॥ ( चाल ) ॥ रमाबाई पाषाण हिय्या केला । प्राण ज्योतिशीं मिळविला ॥ उभी धर्मशिळे ठाकली। हातची टाळी पिटली ॥ धवराळ जळूं लागली । हाक इंद्रसभेला गेली ॥ विमानें धाडून दिलीं । दोघे विमानीं बसविलीं ॥ सती शोभली जशी सुलोचना नार ॥ सांग० ॥ ५



पानें याचा अर्थ काय ? २ प्रेतावर विड्याचीं पानें उधळण्याची वहिवाट सध्यांहि कांहीं कांहीं ठिकाणीं आहे. परंतु ब्राह्मणांत नाहीं. शाहीर अब्राह्मण आहे हें त्याच्या भाषेवरून दिसतच आहे. पुढें हुजराती घेऊन "व परशरामपंत भाऊ यास माणकाची आंगठी दिली व रघुनाथराव दादा यांस पाचेची आंगठी दिली......मग परशुरामपंत भाऊ घोड्यावर बसोन फौजेंत उभे राहिले" [ भट पेशवेघराण्याची हकीकत म. द. रु. २. पान १७ ] पाषाण हिय्या केला–पाषाणासारखा कठोर निश्चय केला. मन निष्ठुर केलें. प्राण ज्योतीशीं मिळविला–नवऱ्याच्या प्राणाशीं आपला प्राण मिळविला. धर्मशिळा–सती जाणारी स्त्री. चितेंत प्रवेश करण्यापूर्वी स्वर्गलोकची पायरी म्हणून ज्यावर पाय टेवते तो दगड. हातचि टाळी पिटली–टाळी वाजवून चिता पेटता असा इशारा दिला. धवराळ–ढवराळ: चिता. सुलोचना नार–सती सुलोचना; इंद्रजिताची बायको. १

# नारायणरावाच्या वधाचे पोवाडे

शाळिग्राम यांच्या प्रचलित आवृत्तींत जो नारायणरावाचा मोठा पोवाडा छापला आहे त्यासंबंधीं महाराष्ट्र-सारस्वतकार भावे लिहितात कीं, "तो पवाडा तेरा चौकांचा असून तेराव्या चौकांत कवीनें आपलें नांव घालून सहीशिक्यानिशीं पुरा केला आहे. पण कोणा अजागळानें त्याला पुढें आणखी एका चौकाचें शेपूट जोडून हा चौदा चौकांचा बनविला." शाळिग्राम यांच्या आवृत्तींत तेराच चौक छापले आहेत. पण भावे ज्याला मूळ तेरा चौकांचा पोवाडा म्हणतात तोही कोणा 'अजागळानें'च वाढवून तयार केलेला दिसतो. कारण १८७९ सालीं छापलेल्या शाळिग्रामांच्या पोवाड्यांच्या पहिल्या आवृत्तींत सदर पोवाडा सहीशिक्यानिशीं सातच चौकांत पुरा झालेला आहे.

सहीशिक्यानिशीं पोवाडा पुरा छापलेला असला म्हणजे तो अस्सल हें म्हणणें वास्तविक निर्णायक नाहीं. कारण आद्यंताचे ड्रायव्हर गार्ड कायम ठेवून मधल्या चौकांचे डबे वाटेल तितके कमीअधिक करणें शक्य आहे. पोवाड्याच्या आद्यताचें कुलूप "सुदाम्या"च्या कुलुपाप्रमाणें शाबूत राहून इमानीपणानें पहाऱ्यावर हजर असतांहि पोवाड्याच्या पेटींतील शालजोड्या–गोधड्यांच्या संख्येत किंवा प्रकारांत भेसळ किंवा अदलाबदल झाली, तरी त्याला त्याचा पत्ता नसावयाचा ! नारायणरावाचा सात चौकी पोवाडा व तेरा चौकी पोवाडा यांचें आद्यंत एकसारखे असूनहि त्यांच्या मधल्या तपशिलांत जो फरक आहे तो ताडून पाहतां ही गोष्ट स्पष्ट होईल.

इतिहासाच्या कसोटीवर घासून पाहतां सात चौकी पोवाडा अस्सल व शुद्ध दिसतो. तो काढून टाकून पुढच्या आवृत्तींत तेरा चौकी पोवाडा छापतांना शाळिग्राम यांनीं त्याची नीट परीक्षा केलेली दिसत नाहीं.

(१) मोठ्या पोवाड्याच्या धृपदांत थोडा फरक आहे. "गुपीत घाला" नारायणरावापेक्षां माधवरावाकडे घेणें कसे युक्त आहे तें दु. पो. टीपांत दाखविलें आहे (२) पहिल्या चौकांत माधवरावाने मरणसमयीं दादासाहेबांबरोबरच आनंदीबाईचीही विनवणी केली असें आहे. पण त्याला इतिहासाचा

आधार नाहीं. 'बहुप्रकारें विनविलें आनंदीबाईला' असें शाहीर म्हणतो. यावरून आनंदीबाईचा कजाग, कपटी स्वभाव माधवरावाला पूर्ण माहीत होता असें दिसते. पण त्याला अस्सल पुरावा नाहीं. खुनाचे वेळीं तिचे वय फार तर १४।१५ वर्षांचे होतें. माधवरावाचे हयातींत ती बरीच लहान असल्यामुळें तिला कुटुंबांत वजन नव्हतें. 'माधवरावानें तिला कधीं अटक केल्याचा अगर दुसरा कोणताही त्यासंबंधीं बरावाईट उल्लेख तिच्याबद्दल सापडत नाहीं'. शाहीराला पुढें आनंदीबाईचें भडक चित्र रंगवावयाचें होतें म्हणून 'बहुप्रकारें विनविलें आनंदीबाईला' असें काल्पनिक वर्णन त्यानें केलेलें आहे. (३) दुसरा चौक शेवटच्या दोन तीन ओळी सोडून सर्व प्रक्षिप्त पण त्यांत ऐ. माहितीसंबंधानें विसंगतपणा तरी नाहीं. (४) तीन व चार चौक काल्पनिक. (५) चौक सातवा. खुनाच्या गर्दींत आनंदीबाईला व सुमेरसिंगाला एकमेकांकडे येऊन वाचवावा कीं मारावा याचें खलबत करण्याइतका वेळ मिळणें उघडच अशक्य. (६) नववा चौक. सबंध काल्पनिक. इतर सर्व पुराव्याविरुद्ध नानाफडणीस पुण्यास नव्हते असा एका पत्राचा पुरावा आहे त्याचा फायदा मात्र शाहीराला घ्यायला कांहीं हरकत नाहीं! (७) १०वा चौक काल्पनिक. (८) अकरावा चौक. 'तीन रोज मुर्दा राहिला'. निव्वळ कल्पना. (९) १२वा चौक. शेवटच्या ५।६ ओळी. टीप पहा. (१०) श्रावणमासाकरितां ब्राह्मण आले होते. ते पर्वतीहून आले असें शाहीर म्हणतो. 'मालाबादप्रमाणें श्रावण शुद्ध ६ (ता. २५ जुलई) पासून श्रावणमास दक्षिणा वांटण्यांत आली'. त्यानंतर ३६ दिवसांनीं खून झाला (मंगळवार ३० ऑगस्ट). तेव्हा अर्थातच पर्वतीला दक्षणेला गेलेले ब्राह्मण प्रेतयात्रेला आले हे खोटें. भाद्रपदांत गणपतीचा उत्सव पेशवे फार मोठा करीत. त्याकरिता ब्राह्मण राहिले असतील पण शाहीराच्या म्हणण्याप्रमाणें ते पर्वतीच्या रमण्यातून आले हे खोटें. पोवाड्यांतला हा प्रक्षिप्त भाग पुष्कळ मागून घुसडला असला पाहिजे. गाईने व चाकरांनी चितेंत उड्या टाकल्या असें लिहून शेवटी सर्वांवर कळस केला आहे!

# ऐतिहासिक माहिती

भाद्रपद शुद्ध त्रयोदशी शके १६९५ ता. ३० ऑगस्ट सन १७७३

या दिवशीं प्रातःकाळीं कुलाब्याहून नुकत्याच आलेल्या रघोजी आंग्र्यांची भेट घेऊन पेशवे पर्वतीस देवदर्शनास जाऊन वाड्यांत आले. त्या दिवशीं गारद्यांच्या मनांत कांहीं दंगा करावयाचा आहे ही बातमी पेशवे पर्वतीवर असतांनाच कोणीं सांगितली होती. नंतर पेशवे सासुरवाडीस सहकुटुंब भोजनास गेले व साखरभाताची मेजवानी घेऊन विडे वगैरे घेतात तों कोणीं फितुराची व दंग्याची बातमी दिली. तेव्हां त्याजवरच रागावून तसेच पालखींत बसून वाड्यांत आले. बागवर दोन वाजण्याचे सुमारास सुमेरसिंग इत्यादींनीं हजेरीच्या निमित्तानें सात-आठशें गारदी शनवारवाड्याजवळ गोळा केले. गारद्यांस पुढें काय करावयाचें होतें ते आगाऊच ठाऊक असल्यामुळें त्यांनीं एकदम दरवाज्यावरच चाल करून तेथें पहारेकरी होते त्यांपैकीं कित्येकांस ठार मारलें व कित्येकांस कैद केलें. गारदी वाडाभर पसरले. त्यांनीं लुटालूट केली. कत्तल केली. त्यांची एक टोळी घेऊन सुमेरसिंग पेशव्यास शोधीत हिंडत होता. श्रीमंत गलबल्यानें जागे झाले व तिसऱ्या मजल्यावर कबुतरखान्यापाशीं आले तों उभयता गारदी म्हणजे सुमेरसिंग व महमद युसफ हे तेथे आले आणि आमची तलब चढली. आतांच्या आतां लेखी दस्तऐवज द्या. नाही तर जिनासुद्धां उतरूं देणार नाहीं, असें म्हणाले. जवळ इच्छारामपंत ढेरे कारकून होता तो गारद्यांस त्याच्या वर्तनाबद्दल टाकून बोलतांच त्याला वार केले. तो दुसरे दिवशी मेला. श्रीमंत खालीं धावत आले, तों चौकांत पूजेच्या गाई दोन बांधल्या होत्या त्या गारद्यांच्या नागव्या तरवारी पाहून बुजाल्या व दावीं तोडून गारद्यांच्या अंगावर आल्या. गारद्यांनीं त्या कापल्या. श्रीमंत धावत पार्वतीबाईकडे गेले. तिनें त्यास लपविण्याचे कबूल केलें. तोंच नारायणरावांना दम न पुरून ते दादासाहेबांकडे धावत गेले तो गारदी यांणीं गांठले. कुणबीण होती ती आडवी झाली. तिलाहि ठार केलें. दादासाहेबांना दया आली पण गारदी म्हणाले. "आतां आम्ही यास जिवंत सोडणार नाही. हा वांचल्यास आमची रांडापोरें ढाणकास विकील. सर्पास दुखवून सोडतों कीं काय?" असें म्हणतांच दादासाहेब म्हणाले, "अरे, बाळास मारूं नका." असें म्हणून त्यांनीं हात पुढें केला. नारायणरावानें त्यांच्या गळ्यास घट्ट मिठी मारली. गारदी म्हणाले, "तुम्ही यास सोडा नाहींतर दोघेहि मरून जाल." सुमेरसिगानें

तरवारीचा एक वारहि केला. त्यानें दादासाहेबांच्या कपाळास व हातास जखम झाली. तेव्हां पेशव्यास त्यांनीं लोटून दिले. तुळाजी पवाराने पेशव्यांचे पाय धरून खालीं पाडले तो चापाजी टिळेकर पेशव्यांचा खिजमतगार त्यांचे अंगावर पडला. गारद्यांनीं पांच सात वार करून दोघांनाहि मारले. श्रीमत साखरभात भोजन करून आले होते तो पोटांतून तसाच पडला. याप्रमाणे खून पडल्यावर वाड्यांत शहाजणें वाजूं लागलीं. दादासाहेब सदरेस बसले. नारोबा नाईक नारायणरावाच्या मर्जीतला मनुष्य होता त्यास सर्व गर्दी आटपल्यावर दादासाहेबांनीं गारद्यांकडून मारविलें. नारायणरावाची स्त्री गंगाबाई सती जाण्याविषयीं आक्रोश करीत असतां 'सती कशी जातेस तुझी पाळी चुकली आहे' असे म्हणत आनंदीबाईने तिला खोलींत कोंडून घातले. गारद्यांच्या दंग्याची बातमी शहरभर पसरली. सखारामबापू, नाना फडणीस, त्रिंबकराव मामा, मोरोबादादा व इतर मुत्सद्दी, कोतवालचावडीस जमा झाले व त्यानीं स्वार जमा करून नाकेबंदी केली. नंतर नाना व मोरोबा यांस आपापलीं कामें करावींत अशी आंतून दादासाहेबांकडून ताकीद आली. सायंकाळीं दादांनीं त्रिंबकरावमामास बोलावून नेऊन नारायण-रावाच्या शवाची व्यवस्था करण्यास सांगितले. रात्रीं ब्राह्मण कोणी मिळेना. शेवटीं प्रयत्नाने दोन असामी तेलंगी ब्राह्मण मिळाले. नंतर गारदी दरवाजा उघडीनात म्हणून दिंडींतून प्रेत बाहेर काढून अग्निसंस्कार त्रिंबकरावमामांनीं केला. नंतर मध्यरात्रीचे सुमारास पागे पथके सारे निराश होऊन माघारे आले.

## एक जुनें स्त्री-गीत*

नारायण मारियिला ढासळल्या माड्या। रोजना करित्याती पागच्या निळ्या घोड्या ॥ नारायण मारियिला ढासळल्या भिती। रोजना करित्याती त्येच्या अंबारीचं हत्ती ॥ नारायण मारियिला पुण्या शेराच्या सावलीला। जासूदाच्या जोड्या गेल्या पुण्याच्या चावडीला ॥ नारायण मारियिला टाकिला खंदकातु। चुलती जेवती दुदभातु ॥ नारायण मारियिला गेल्या दिल्लीला

*भारत-इतिहास-संशोधक मंडळानें छापलेल्या जुन्या स्त्री-गीतांत सदर गाणें आढळले. रसदृष्ट्या गाणें सरस आहे. परंतु चौदाचौकी पोवाड्या-प्रमाणेंच त्यांत कल्पनेवर फार भर आहे.

भ्रातम्या। सखा मारिला पुतण्या॥ नारायण मारियिला हंबरत्या गाई। चुलत्या राजसाला कणाव आली नाहीं॥ नारायण मारियिला पुण्याच्या कोटामंदी चुलत्या राजसाच्या डोइ घालतो पोटामंदी॥ गोपिकाबाई म्हणी पुण्या शेराला काय करूं। फौजा राहिल्यात दिल्लीवरु॥ गोपिकाबाई म्हणी पुण्या शेराची झाली माती। नारायण बाळ दिला गारड्याच्या हातीं॥ नारायण मारिला दुइ दरवाज्याच्या मादि। वैऱ्या मनसुबा केला कदी?॥ नारायण मारिला पुण्या शेराचं झालं जोतं। गोपिकाबाई म्हणी बाळ वाणीचं माझं हातं॥ नारायण मारिला पुण्या शेराची गेली कळा। वाण्याउदम्यानं दुकानं केलीं गोळा॥ पुण्या शेरामंदि फुलं सांडलीं जाइचीं। सती मिरावली सून गोपिकाबाईची॥

# नारायणरावाच्या वधाचा पोवाडा

## १४

### [ शाहीर—लहरी मुकुंदा ]

[ चाल—पुरेपुरे रे वारंवार छळणा माझी।

चाल दुसरी—दिल्या छावण्या बाई कोण्या ठिकाणीं शिंदा।
खरोखरी सांगा बातमी जासुदा दादा ॥ ]

दक्खनचा दिवा मालवला हिरा हरपला। काय गुपीत घाला केला नारायणरावाला ॥ ध्रुपद ॥

एकछत्र करुनि गेले राव माधवराव। थरथरां कांपत होते अष्ट उमराव ॥ वसविलें हस्तिनापुर राज्य पाच्छाव। दादासि मोकळें केलें राज्य करावं ॥ तुटली आयुष्याची दोरी नाहीं उपाव। त्यांनीं मरते समयीं बोलविले नारायणराव ॥ ( चाल ) ॥ "दादासि मिळोन असावें। रयतेला दुःख न द्यावें ॥ द्वैत केवळ न करावें। प्रीतीनें राज्य करावें ॥ पुणें गादी

**गुपीत घाला**—गुप्त घाला; दगा. याच विषयावरच्या दुसऱ्या पोवाड्यांतील पहिली टीप पहा. **वसविलें हस्तनापुर राज्य पाच्छाव**—"वसविलें हस्तनापूरि तखत बाच्छाव" हा जुन्या पोवाड्यांतलाच पाठ बरोबर आहे. "तारीख १०–२–१७७१ रोजीं (दिल्लीचा) किल्ला मराठ्यांचे हस्तगत झाला. 'सरकारचे झेंडे दिल्लीस उभे केले. त्यांनीं शहाजाद्यास बादशहाचे नांवानें तख्तावर बसवून नजरा केल्या'." [म. रि. म. वि. ४ पा. २१९]. "तारीख २५ डिसेंबर १७७१ रोजीं मोठ्या समारंभानें बादशहानें दिल्लींत प्रवेश व सिंहासनारोहण केलें. येणेंप्रमाणें दोन वर्षांचा उद्योग फलद्रूप होऊन माधवराव पेशव्याचा हेतु सिद्धीस गेला; आणि सर्व हिंदुस्थाभर त्याच्या कारभाराची वाहवा झाली. वास्तविक मराठ्यांच्या कृत्यानें या वेळीं दिल्लींत नवी सृष्टि बनली." [म. रि. म. वि. ४ पा. २२१]. **दादांसि मोकळें केलें राज्य कराव**—"तरी दोन वर्षेपावेतों अहोरात्र कानींकपाळीं हा प्रश्न घाटत असून जानोजी भोसले वगैरे मोठमोठ्या सरदारांच्या शिफारसी आल्यावरून माधवरावानें चुलत्याकडून सन १७७२ च्या फाल्गुन मासांत करार लिहून घेऊन त्यास मोकळें केलें...

सांभाळुनि रहावें । माझ्या मोक्षपदाचें वचन संभाळावें " ॥ ( चाल ) ॥ आनंदीबाईला जवळ बोलाविलें । " बया आम्ही जातों मोक्षपदाला तुम्हा कळविलें ॥ ओट्यांत नारायणराव तुमच्या घातला " । बहु प्रकारें विनविलें आनंदीबाईला ॥ मग माधवरायानें प्राण सोडिला । कशी करुणा नव्हती भगवाना तुला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दवख० ॥ १

श्रीमंती राज्यामधिं पुण्याची महिमा कशी होती । जागजागीं अनुष्ठानें ब्राह्मणभोजनें होतीं ॥ तुपपोळी खायाला नव्हती ब्राह्मणांस निवंती । कशा नालख्या पालख्या घरोघर फिरती ॥ स्वारी

" रघुनाथराव वाड्यांत होते त्यास रामशास्त्रीसमवेत थेउरास आणवून स्नेहाच्या गोष्टी करून अवतार समाप्त केला." [म. रि. म. वि. ४ पा. २४०]. उपाव—उपाय. त्यांनीं मरतेसमयीं ...'माझ्या मोक्षपदचें वचन संभाळावें' " ज्वर येऊन गेला म्हणजे पेशवे कांहीं वेळ ग्लानीनें मूर्च्छित पडत. त्यांतून सावध झाले म्हणजे नारायणराव व दादासाहेब व सखारामबापू यांस पुढें राज्यकारभार कसा चालावा याविषयीं सांगत असत. दादासाहेब यांस कुटुंबांत कलह व राज्यांत फंदफितूर न करण्याविषयीं त्यांनीं अनेक प्रकारें बोध केला व नारायणराव यांचा हात त्यांच्या हातीं देऊन त्यांचा संभाळ करण्याविषयीं निरवणूक पुनः पुनः केली." [खरे पा. १८१४]. द्वैत—द्विधा भाव; वैर; शत्रुत्व. केवळ—मुळींसुद्धां; निखालस, यत्किंचितहि. पुणे—पुढें (?) मोक्षपदचें—मोक्षपदाचें, मृत्युशय्येवरील, मरणकाळच्या स्थितींतील. आनंदीबाईला जवळ बोलावलें इ०—याला ऐतिहासिक आधार नाहीं. कवीची कल्पकता. १

श्रीमंती राज्यामधिं—पेशव्यांच्या राजवटींत. या चौकांत नानासाहेब पेशवे व माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दींतील गोष्टी वर्णन केल्या आहेत. महिमा—ऐश्वर्य; वैभव. महिमा हा शब्द येथें स्त्रीलिंगी वापरला आहे. निवंती—न्यूनता. कशा नालख्या पालख्या घरोघर फिरती—वास्तविक नालखी हा शब्द येथें बरोबर नाहीं, कारण नालखीचा अधिकार पुढें सवाई माधवरावाचे कारकीर्दींत सवाई माधवरावास व महादजी शिंद्यास बादशहाकडून मिळाला. हा मान मुख्यतः

श्रीमंतांची नित्य पर्वतीला जाती । काय आरसेमहाल मजा दिसे वाड्याची ॥ सोन्याचा गणपती पूजा श्रीमंताची । बुधवारचा वाडा मसलत पंचाइतीची ॥ कारंजेवाडा सदर नाना भाऊची ॥ (चाल)॥ काय बैठक रावसाहेबाची । पानविडे मजा खायाची ॥ लोक येतात मुजऱ्याशी ॥ कारंज लाविलीं वाड्यांत पाण्याचीं ॥ जुना वाडा बांधला बुरूज लढायाशी ॥ (चाल) ॥ नळाला काम लाविलें, हुकूम झाला । पुढें कोट बांधणार होते

बादशहाच्या कुटुंबांतील मंडळीकरितां असतो व एखाद्याचा अत्यंत गौरव करणें झालें तरच बादशहा हा नालखीचा मान देत असे. केवळ ध्वनिसौष्ठवा-करितां शाहीरानें नालखीपालखी असा शब्दप्रयोग केला आहे. नालखी-बद्दल माहिती खर्ड्याच्या लढाईच्या पोवाड्यांतील टीपेंत पहा. **मसलत पंचाइतीची**–मसनद (?) पंचाइतीची–कोर्टकचेरीची जागा. **कारंजे वाडा सदर नानाभाऊची**–"प्रतिनिधी यांणीं श्री० कै० रघुनाथराव दादासाहेब यांस सांगितले की कांहीं आपल्यासी बोलावयाचें आहे. येकीकडे चलावें असें सांगून श्री० कै० सदाशिवराव भाऊसाहेब यांचा दिवाणखाना हजारी कारंजा-जवळ हौदाकडे आहे तिकडे उभयता गेले." [म. द. रु. २ पा. १०१] **सदर**–कचेरी, बैठक. **रावसाहेबाची**–थोरल्या माधवरावांची. **पानविडे मजा खायाची**–थोरल्या माधवरावास पान खाण्याचा षोक होता. थोरले माधवराव एकदां स्वारींत असतां मागें नाना फडणविसांनीं रमाबाईसाहेबांची विड्याचीं पानें बंद केल्याची आख्या आहे. [म. रि. म. वि. ४ पा. २६५]. **नळाला काम लाविले**–वास्तविक पुण्यास नळ नानासाहेब पेशव्यानें बांधून आणला. येथें वाड्यांतील नळाला काम लाविलें असा अर्थ असावा. कारण नागपूरकर भोसल्यांच्या बखरींत असा एक उल्लेख आहे. नारायणरावावर गारद्यांनीं गर्दी केली ते वेळीं त्यांचेजवळ पारोजी नाईक होता. "तो बोलला कीं नहराची वाट मजला ठाऊक आहे. तिकडून तुम्हास घेऊन जातों." अर्थात् हा तर्क आहे. अस्सल आधार सांपडला नाहीं. **कोट बांधणार होते इ०**–"शहरास चिरेबंदी कुसूं घालण्याचा कारखाना जिवाजीपंत खाजगीवाल्यांचे मार्फत चालविला" असा उल्लेख नानासाहेब पेशव्यासंबंधीं आहे. थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत सन १७६३ च्या वैशाखांत निजामानें पुणें जाळलें.

शहर पुण्याला ॥ पण करुणा नाहीं आली भगवाना तुला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्ख० ॥ २

माधवराव मोक्षपदाशीं गेला। चिंता पडली नाना फडनविसाला ॥ नारायण महाराज नेले सातान्याशीं। शाहूरायाच्या तक्तापाशीं ॥ शिक्के कट्यार वस्त्रें दिलीं नारायणाशी। पुण्याची गादी मिळाली नारायणाशी ॥ आला वाजवीत चौघडा शहर पुण्याशी। कूच करुनि लौकर नेलें नाशकाशी ॥ दुसऱ्याची बुद्ध ऐकत निमित्याशी। मग येऊन जप्ती केली नारायणाशीं ॥ (चाल)॥ फार झाली बंदोबस्ती। घोड्याची गस्त हिंडती ॥ चौक्याची बंदोबस्ती। नारायण धरायासाठीं ॥ आनंदीबाईनें मांडली हिकमती ॥ माझ्या राज्यपदाची माळ गंगाबाईला दिली कशी ॥ (चाल)॥ पुढलें होणार जाणार ठाऊक कोणाला। होयाचें होऊन जाईल शब्द देवाला ॥ नारायणराव मुकले बाई प्राणाला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्ख० ॥ ३

त्यानंतर "माधवरावानें सालोसाल मोठी मेहनत घेऊन शहराची सर्व नवीन रचना केली. सर्व लोकांस परत आणून दुरस्ता हवेल्या सिद्ध केल्या." उध्वस्त झालेला कोट कदाचित् नारायणरावानें पुनः बांधण्याचा विचार केला असेल. २

नेले सातान्याशीं–१३ डिसेंबर १७७२ रोजीं सातान्यास नारायणरावास वस्त्रें देण्यांत आलीं. बरोबर दादासाहेब, आनंदीबाई, गंगाबाई वगैरे मंडळी होती. [म. रि. म. वि. ४ पा. ३१२]. नेलें नाशकाशी–१८ मार्च १७७३ ते १० एप्रिल १७७३ पर्यंत गोपिकाबाईपाशी नाशकास नारायणराव होता. तिला भेटावयास गेला होता. [म. रि. म. वि. ४ पा. ३१५.] दुसऱ्याची बुद्ध ऐकत निमित्याशी इ०–"परंतु कोणा अप्रबुद्ध माणसाचे चिथावणीवरून त्यानें हें केलें." [खरे.पा.१९५१]. जप्ती केली नारायणासी–वास्तविक नारायणरावानें जप्ती केली. नारायणासी नाहीं. दुसरा पोवाडा व त्यावरील टीपा पहा. शब्द देवाला–आपल्या दैवालाच बोल लावा. येथें देवाला या शब्दाऐवजीं दैवाला असा शब्द असावा. बाई–हें संबोधन. ३

भाद्रपद तेरशी दिवस सोमवार त्या दिवशीं, दिवस चढला दोन प्रहर। सुमेरशिंग गारदी, होऊन तयार ॥ त्या आनंदीबाईनें बोलाविला कचेरीवर। आनंदीबाई बोले सुमेरसिंगाला। "तुला भाऊ म्हणोन माझा मीं मानिला॥ जर खरें सांगशील मला आनंदीबाईला। हे पुणें शहर अर्धे देईन तुला॥ बेल भंडार तुळशीपत्र इमान तुला न मला"॥ दोघांची क्रिया झाली बेल-बागाला॥ "राजपद कोणाला दिलें सांग आम्हांला"। मग सुमेरशिंग गारदी बोले बाईला॥ "राजपद दिले आई दादानीं नारायणाला"॥ (चाल)॥ आंग टाकि ती धरणीला॥ तोडी कुरळ्या केसाला॥ राज्याचा नाश माझ्या केला॥ शिव्या देती राघोबादादाला॥ (चाल)॥ "माझा हुकूम जाउनि सांग माझ्या नवऱ्याला। नारायण धरुनि आण माझ्या कचेरीला॥ नाहीं तर कुंकू पुशिते मी आपल्या सदरेला"॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला॥ दक्ख०॥ ४

सुमेरशिंग गारदी होऊनि तयार। "मला हजरी दे" आनंदीबाई म्हणुनि लावी कट्यार॥ मग शिरला आरसेमहालांत उपसुनि तलवार। हजार गारदी शिपायी बरोबर॥ हातीं नागव्या तलवारी हातांमधीं भाले। त्यानीं आरसेमहाल वेढीला चौफेर॥ केसरीभात जेवले होते नारायण। ह्या राज-

**तेरशी**–त्रयोदशी. **क्रिया**–आण, शपथ. **देती**–देते. **सदरेला**–भर कचेरींत. ४

**मला हजरी दे......म्हणुन लावी कट्यार**–नारायणरावाचा खून करून त्याची हजेरी किंवा वर्दी देण्याला मजकडे ये असें म्हणून आनंदीबाईनें त्याच्या कमरपट्यांत कट्यार खोवली.२"त्या दिवशीं बारावर दोन वाजण्याच्या सुमारास सुमेरसिंग, खरगसिंग व महमद इसब यांनीं हजेरीच्या निमित्तानें सात आठशें गारदी शनवार वाड्याजवळ गोळा केले." [खरे, पान १९६३]. **आरसे महाल**–[खरे, पा. ३५७७]. **केसरीभात जेवले होते**–"खुनाचे दिवशीं सकाळीं नारायणराव भोजनासाठीं पर्वतावर गेला. तेथें गणपती उत्सवा-निमित्तानें चिंचवडचे देव व तिमय्या बावाचे लेक हरिभक्त बावा यांच्या

वाड्यामधिं झालें निद्राशयन ॥ (चाल) ॥ झाली गर्दी एकच हल्ला । पर्वती आई गेली स्वप्नाला ॥ उठ नारायण आतां तुझा घात आला । राव स्वप्नीं जागा झाला ॥ उठोनि उभा राहिला । राजपुत्र थरथरां कांपला ॥ पाणी आले त्याच्या नेत्रांला । "राजपद भोवलें मला ॥ नऊ महिने नाहीं भोगले पुरते राज्याला । डोळाभर नाहीं पाहिलें अस्तुरीला ॥ आनंदीबाईनें आतांच घात मांडिला । आईबाप नाहीं जवळ सोडवायला ॥ नाना फडनवीस नाहीं पुण्याचे सदरेला" ॥ नारायण पळों लागला, आसरा नाहीं लपायला ॥ गाय होती देवपूजेला । गाईच्या आड लपला मिठी गाईच्या गळ्याला ॥ "गाईबाई प्राण वांचवा आपुला"। गाय हंबरती खाशाला ॥ पाणी गाईच्या डोळ्याला । सुमेरशिंग उभा राहिला तोडायाला ॥ गाईला वार लागला, आसरा गायीचा सोडिवला । नारायण पळों लागला ॥ हिंडोन सारा वाडा भयाभीत झाला । थरथरांच कांपत राघोबादादापाशीं गेला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दख्ख० ॥ ५

जिथून पळाले राव सुमेरशिंग माग । बरोबर घेऊन गारदी केला लाग ॥ शोध करित पुढें चालले लावला थांग । म्हणे इथून पळाले राव, आनंदीबाई सुमेरशिंगाला सांगे ॥ मग गेले दादापाशीं सोडा राग । मला द्यावें जीवदान टाकावें मागे ॥ ( चाल ) ॥ डोकी घातली पोटांत ॥ मिठी मारितो गळ्यांत ॥ राजपद नको मला इथें माझ्या प्राणाचा होईल घात ॥ आनंदीबाईचें चुलतीचे ऐकूं नको ॥ भट ब्राह्मण मला म्हणतात ॥ मी कोरण भिक्षा

---

पर्वतीस दोन प्रहरी केशरीभाताचें भोजन करून लगेच तो परत वाड्यांत आला. [म.रि.म वि.४, ३३५]. **पर्वतीआई गेली स्वप्नाला०**–पर्वतीची देवी स्वप्नांत आली. **स्वप्नीं जागा झाला**–स्वप्नांतून जागा झाला. **कांपला**–कांपूं लागला. **अस्तुरीला**–बायकोला **नाना फडणीस नाहीं पुण्याचे सदरेला०**–खुनाच्या दिवशीं नाना फडणीस पुण्यास नव्हता असा एकच उल्लेख सांपडतो. [म.रि म.वि. ४ पा. ३३९]. **खाशाला**–खाशा स्वारीला. तिनें धनी ओळखला. ५

**लाग**–पाठलाग. **टाकावें मागें**–पाठीशीं घालावें. **भट ब्राह्मण इ०**–

मागत जातों काशी तीर्थांत ।। माझी गंगातिरीं अस्तुरी या माझ्या संगत । दादासाहेब पुरवा माझा मनोरथ ।। आली माया हृदयांत ।। दादासाहेब बोले सुमेरशिंगास नको करुं मुलाचा घात ।। (चाल) ।। माझ्या वडील भावाचा लेक ।। राज्याला एकुलता एक ।। शिर ठेविलें रायाचे हातीं वांचवा याला ।। पुढें सुमेरशिंग गारदी दादासाहेबास बोलता झाला ।। अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ।। दक्ख० ।। ६

अन्न पाणी लागेना गोड चैन पडेना आनंदीबाईला ।। बारावर एक बाजला बाई घंटा झाला ।। कां अजून सुमेरशिंग येईना सांगावयाला ।। मग सुमेर-शिंग गारदी जवळ बोलविला ।। काय हुकूम दिला दादांनीं सांग मेल्या मला ।। मग सुमेरशिंग गारदी बोले बाईला ।। दादासाहेब हुकूम देईनात माला नारायण धरायाला ।। किती शिकवूं ह्या मेल्याला बाई शिपुडर्याला ।। (चाल) ।। तीरुपयाच्या चाकराला । काय पुढलें होणार ठाऊक नाहीं ह्याला ।। राजपद दिलें दादांनीं नारायणाला ।। सर्पाच्या पाठीवर मेल्या तूं पाय दिला ।। पुढे घात तुझ्या जीवाला ।। तुझीं लेकरेंबाळें पुढे विकील ढाणकाला ।। (चाल) ।। होयाचें होऊं दे जीवें मार दोघांला ।। अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ।। दक्ख० ।। ७

सुमेरशिंग गारदी बोले दादाशीं ।। यामुळे आपला प्राण तुम्ही त्यजितां ।। पुढे आमचीं मनुष्यें कशीं घाण्यामधे गाळवितां ।। दादांनीं हात काढिला मग झाला परता ।। तुळाराम परदेशी नारायणाला झाला ओढिता ।। वेंऱ्यानें हात टाकिला त्यांच्यावरता ।। (चाल) ।। झाली मुक्त एकच घाई ।। रक्त

कांहीं हरकत नाहीं, मला राज्य नको. मी ब्राह्मणच आहें, कोठेंहि भिक्षा मागून पोट भरीन. कोरण भिक्षा–कोरान्न, कोरडी भिक्षा. ६

ढाणक–महार. ढाणकास वांटणें किंवा विकणें–तुकडे करून वेशीला टांगणें. [हरि.बख. टीप]. ७

परता–पाठमोरा, दूर, विन्मुख. झाली मुक्त एकच घाई–एक क्षणभर मोकळेपणानें किंवा अनिर्बंधपणें मारामारीची घाई झाली. रक्तवर्षें–रक्तें

वस्त्रें भिजली बाही। रक्ताचे पुर वाही ॥ एक शकल झालं दुठायीं। मधें जानव्याचे हाल झाले कांहीं ॥ कढी भात पडला ठायीं। चकचकती सगळी शाही हाणून घेती उरावरी ॥ नारोबा नाईक पुरा झाला। जखमा लागल्या विश्वराम ढेऱ्याला ॥ पर करुणा नाहीं आली भगवाना तुला। अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्ख०॥ ८

नारायणमहाराज मोक्षपदाशीं गेला। काय अंधार पडला पुणेशहराला ॥ वाणीणी ब्राम्हणी शिंपिणी सोनारणी एकच कहर झाला। काय राजपुत्र बाई गेला आईबाप नव्हते त्याला ॥ विधवापण आलं गंगाबाईला। ब्राह्मण करिती हाय हाय, मोकली धाय, काय पंढरीराया विष्णुभक्त नेला ॥ मग आनंद आनंदीबाईला झाला। सखा पुतण्या तिने मारिला ॥ नाना फडनवीस नव्हते त्या वक्तीं पुण्याचे सदरेला। ते गेले मेणवलीला आपुले गांवाला ॥ आबासाहेब पुरंदरकिल्लेवाला। नित्य मेजवानी करी नानासाहेबाला ॥ तुम्हीं यावें सास्वडाला राव भोजनाला ॥ पटवर्धनमहाराज सांगलीवाल

---

( रक्तानें ) वस्त्रें व अंगांतले कपडे भिजले. **बाही**–अस्तनी. भावार्थ कपडे. **शकल**–देह, आकृति [ मोल्स ]. **चकचकती सगळी शाही**–शाही–सैन्य, जमाव. गारद्यांच्या तलवारी तळपत होत्या. **हाणून घेती उरावरी**–उरावर घाव मारून घेतले, मारले. **नारोबा नाईक पुरा झाला**–" प्रत्यक्ष खुनाची गर्दी आटपून गेल्यानंतर मग नारायणरावाच्या मर्जीतला ( गवई ) नारोबा फाटक यास दादासाहेबानें आकसानें गारद्याकरवीं मारविलें." [खरे, पा.१९६४]. **विश्वराम ढेऱ्याला**–इच्छाराम ढेऱ्याला असें पाहिजे. मोडीवरून नकलतांना इच्छारामचें विश्वराम झालेलें दिसतें. हा खासगीकडील श्रीमंतांचा कारकून [म. रि. म वि. ४ पान ३३६]. ८

**आईबाप नव्हते त्याला**–आई होती **आबासाहेब पुरंदर किल्लेवाला** ३०–या पोवाड्याची प्रस्तावना पहा. **पटवर्धनमहाराज सांगलीवाला**–नारायणरावाच्या वधानंतर पुष्कळच दिवसांनीं १८०४च्या सुमारास सांगली संस्थान निराळें झालें. सांगली चितामणराव आप्पांनीं वसविली. अर्थात

श्रीमंताचा सोयरा भला, काय बाजू श्रीमंताला। मानकरी लोक जमले सास्वडीं भोजनाला ॥ सोन्याचीं केळीपत्रें आणिलीं भोजनाला। वहु नाजुक स्वैपाक ब्राह्मणी विचार झाला ॥ रांगोळ्या टाका आतां बसा भोजनाला। सोन्याचीं पात्रें मांडलीं भोजनाला ॥ पांच शाखा वाढल्या आतां तुपपोळीचा वखत आला। जसा पिंगळा गिजबिजला नाना शब्द बोले लोकांला ॥ "तुम्हीं मेजवानी केली आम्हाला। पर करमत नाहीं आमच्या दिलाला ॥ हुरहुर वारा सुटला नानाफडनविसाला। कांहीं तरी दंगा असेल पुण्यांत श्रीमंतांला" ॥ तीन शब्द बोलला नाना उगीच बसला। पुण्याचे पत्र आले सास्वडाला ॥ सोंवळे ब्राह्मण. "उठा नाना भोजनाला"। नानाफडनवीस बोले सर्व ब्राह्मणाला ॥ "श्रीमंतांचे पत्र आलें आपुल्याला। लाखोटा वाचू मग बसूं भोजनाला" ॥ लाखोटा फुटला पाणी आले डोळ्यांला। "हिरा कंकण माणिक मोतीं नारायण गेला ॥ आनंदीबाईनें मोठा घात केला। विनाशबुद्धी आली मला नानाला ॥ मी गेलों मेणवलीला आपुले गांवाला। म्हणूनि नारायण मोक्षपदाला गेला" ॥ जिथलीं पात्रें तिथल्या ठिकाणाला। सोंवळे ब्राह्मण ओंवळे मिळाले त्याला ॥ दोरोजांचा उपवास नाना-फडनवीसाला। नाहीं मिळालं फराळाला शूर मर्दाला ॥ अबलक पंचकल्याणी घोडा नानाला बसायला। घोडचवडीखालीं नाना पुण्याला आला ॥ "तुम्ही उघडा दरवाजे पाहूंद्या राजश्रीला"। दोन शकले दोन बाजुला विश्वराम ढेरे पडले उजव्या बाजूला ॥ "येथें उपाय चालेना आपला"। राजा मोक्ष-पदाला गेला ॥ आनंदीबाईनें बरा घात केला। अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दरख०॥ ९

---

नारायणरावाचे वधाचे वेळीं सांगली संस्थान असें निराळें अस्तित्वांतच नव्हतें. पोवाड्यांत मागाहून पुष्कळसा भाग घुसडला गेला याचें हें आणखी एक उदाहरण. **जसा पिंगळा गिजबिजला**–पिंगळ्याचें ओरडणें ऐकणें अशुभ आहे. **जसा**–जेव्हां. **घोडचवडीखालीं**–घोडदवडीखालीं. चौफेर घोडा उडवीत. ९

**पटवर्धन महाराज बोले नानाफडनवीसाला । "होयाचें होऊन गेलें शब्द** देवाला ॥ याची नाशवंत काया येईना कामाला । धनी जाऊंद्या **मोक्षपदाला** ओंकारेश्वराला" ॥ नानाफडनवीस बोले पटवर्धनराजाला । "**कसें** जाळूं **मी** एकल्या नारायणाला ॥ वाघाचे संगतीनें कसें मारावें परदेशाला" । **पटवर्धन**-महाराज बोले नानाफडनवीसाला ॥ "ठक कोल्हा परदेशी येईना आपुल्या हाताला । वाघनख ह्याच्या बोटाला पांच हत्यारें डाभाला ॥ **हजार** माणूस दिमतीला । सात माणसें मारली खून चढला परदेशाला ॥ तो अधिक जखमी करील कईकांला । अफीणीचा खाणेवाला ॥ जरा ब्राह्मणी कावा हिकमत करतों मी ह्याला" । नानाफडनवीस जाऊन बसले तिसऱ्या मजल्या-ला ॥ मग कचेरी शोभे पटवर्धन राजाला । त्यानें सुमेरशिंग परदेशी जवळ बोलाविला ॥ त्याचे शिरीं हात ठेविला । "भलें मारलें नारायणाला ॥ राज-

**याची नाशवंत काया येईना कामाला०**–याच्या कायेचा नाश झाला आहे ती पुन्हा जिवंत करणें शक्य नाहीं. **वाघाचे संगतीनें कसें मारावें परदेशाला०**–सुमेरसिंग परदेशाला पुढें ठक कोल्हा म्हटलें आहे तेव्हा नारायणरावासारखा वाघ मारला गेला, तरी आतां त्याच्याबरोबरच सुमेर-सिंगाला मारण्याला काय युक्ति करावी, असा अर्थ घेतां येईल. शिकारी लोक नेहमीं सांगतात कीं, वाघाच्या पाळतीवर कोल्हा असतो. वाघानें मारून टाकले-ल्या शिकारीवर तो मागाहून ताव मारतो. ही काल्पनिक गोष्ट नाहीं. "Man-eaters of Africa" या नांवाच्या पुस्तकाचा कर्ता प्रसिद्ध शिकारी आहे. त्यानें ही गोष्ट स्वानुभवाची म्हणून त्या पुस्तकांत लिहून ठेविली आहे. येथें भावार्थ असा दिसतो कीं, वाघाचीच शिकार झाली तेव्हां आतां त्या वाघाच्या पाळतीवर असणाऱ्या भालुकालाहि मारून टाकावें. वाघ गेला त्यास उपाय नाहीं, पण आतां या कोल्ह्याचा कपाळमोक्ष करण्यास मरी चुकूं नये. **डाभाला–डाभ–**कमरपट्टा (कानडी) सध्यांहि कानडींत रूढ आहे. **सात माणसें मारलीं०**–" एकंदर ब्राह्मण असामी सात, एक हुजऱ्या, एक नाईक, दोन कुणबिणी, व एक गाय ठार झाली." [म.रि.म.वि.४ पान ३३७]. **मग. कचेरी शोभे पटवर्धन राजाला०**–मग कचेरीस उभे (उभा) पटवर्धन

पद मिळतें तुला ॥ दोघे मिळून चल जाऊं आनंदीचे भेटीला। वाघनख ठेव धरणीला ॥ हत्यारें लाव जा आपुल्या ढेलजाला। माझा अबलक घोडा तुला बसायाला " ॥ दोघे मिळून चालले आनंदीचे भेटीला। पटवर्धन महाराज उजव्या बाजूला ॥ नानाफडनवीस होते तिसऱ्या मजल्याला। त्यांनीं शेल्याचा पदर हलविला ॥ त्यानें हुकूम केला सरदार लोकांला। "काय पहातां दादाहो तुमचा बाप चालला" ॥ एक म्हणतां हजार गर्दी त्याला। नानाफडनवीस बोले सरदार लोकांला ॥ एके घायें मारूं नका परदेशाला। हातापाया पलिते लावा जरा जाळा त्याला ॥ एक म्हणतां हजार गर्दी त्याला। बोटीं बोटीं पाडले तुकडे परदेशी नाहीं आला वांट्याला ॥ आपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्ख०॥ १०

पटवर्धनमहाराज बोले नानाफडणवीसाला। "तीन रोज मुर्दा राहिला अझुनि कांहीं हेतू नाहीं पुरला" ॥ नानाफडनवीस बोले राघोबा दादाला।

राह्यला (?) ढेलजाला—ढेलज—कमानी दरवाजा, देवडी. एके घायें मारूं नका परदेशाला इ०—एकदम मारूं नका म्हणजे हाल हाल करून मारा खुनानंतर जवळ जवळ दोन वर्षांनंतर कटांतल्या लोकांचीं पारिपत्यें झालीं या उल्लेखावरूनहि पोवाड्यांत किती भाग मागाहून घुसडला आहे तें कळेल. "महंमद इसफ यास १७७५ त, खरकसिंग व तुळ्या पवार यांस १७७९ त, देहांत शिक्षा देण्यांत आल्या. सुमेरसिंग हातीं येण्यापूर्वींच जुलै १७७४ त इंदुरास मरण पावला. गारदी जहाजांतून पळून मुंबईस इंग्रजांचे आश्रयास गेले होते. त्यास पुढें इंग्रजांनीं धरून पुण्यास पाठविलें. तेव्हां त्यांचे फार हाल करण्यांत आले. पायास सुया टोंचून, हत्तीचे पायीं बांधून, तापलेल्या सळया कानांत घालून सहा सहा महिने हाल केल्यावर त्यांस मारिलें. सांडसानें शरीर तोडून चुन्याचें व मिठाचें पाणी शिपून जेरबंद मारीत होते. त्यांच्या बायकापोरांचे गळे त्यांचे देखत कापून निर्वंश करून मग मारीत." असे बखरकार लिहितो [म.रि.म.वि. ४.पान ४४३]. या प्रसंगानंतरच हा पोवाड्यांतला भाग जोडला असला पाहिजे. १०

तीन रोज मुर्दा राहिला इ०—चूक. त्याच दिवशीं अग्नि दिला. किल्ल्या-

"आनंदीबाईनें राज्याचा नाश केला ।। सख्या पुतण्याचा वध केला । किल्ल्या-वर चढवा आनंदीबाईला ।। तिन वर्षांची जुन्या नाचणीची: भाकर द्दिला खायाला । पावशेर मीठ पीठ दळायाला ।। पावशेर पाणी द्यावें तोलून प्यायाला । अनवाणी पायीं धाडावी गडकिल्ल्याला " ।। सुकुमार बाईची काया फोड पायाला । त्या अर्ध्या किल्ल्याच्या वाटेनें बाईचा प्राण गेला ।। घारी गिधाडाला सुकाळ झाला । नाहीं मोक्षपद मिळालें आनंदीबाईला ।। अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ।। दक्ख०।। ११

नानासाहेब बोले सर्वत्र लोकांला । " हुकूम मागा गंगाबाईला ।। धनी येऊंद्या मोक्षपदाला आंघोळीला " । गंगाबाई करी रोदन " हरपलें रत्न ।। गाईनें वत्स गिळलं देवा धन्य । टाकोनि हत्ती घोडे गोधन ।। नाहीं हौस पुरली गेले नारायण ।। ( चाल ) ।। मनीं हौस होती फार । पुणें शहर करीन गुलजार ।। वाणी उदमी दुकानदार । नारायणपेठ तयार ।। कोठें ऐकत होता ईश्वर । काय राजवाडयामधिं पडला अंधार " ।। आंग धरणीला टाकीती कुरळे केंसाला तोडिती " तुमचे संग निघते सती ।। दोघे मिळोन चला जाऊं ओंकारेश्वरापाशीं " । आया मावल्या समजावती गंगुबाईशीं ।। " नको रडूं बाई दुःख आहे सर्वत्रांशीं " । नानाफडनवीस बोले गंगाबाईशीं ।। " सती निघायाचा हुकूम मिळेना बाई तुशीं । तुझ्या देहाची झडती दे मला नानाशीं " ।। गंगाबाई बोले आयाबायांशीं । " कशी मी निघों बाई सती पांचा महिन्यांची मी गर्भवती " ।। नानाफडनवीस समजावितो गंगूबाईशीं । नको रडूं बाई

---

**वर चढवा०**-डोंगरी किल्ल्यावर कैदेंत ठेवा. **किल्ल्यावर चढविणें**-डोंगरी किल्ल्यावर कैदेंत ठेवणें. ११

**मोक्षपदाला आंघोळीला**-प्रेत घराबाहेर काढतांना • घालावयाच्या आंघोळीला. **नारायणपेठ तयार०**- नारायण पेठ अगोदरच नाना-साहेबांनीं वसविली होती " सदाशिव पेठेशेजारीं दुसरी पेठ वसवून तिला मुलाचे नांवावरून नारायण पेठ नांव ठेवलें." [म. रि. म. वि. ३ पान २५९]. **पांचा महिन्याची गर्भवती**-" दगा झाला त्या दिवशीं गंगाबाईस अस्पर्श

धोका बसेल तुझ्या गर्भाशीं ॥ कन्या का पुत्र होईल बाई तुशीं ॥ मी गुप्तराज्य चालवीन अक्कल आहे मज नानाशीं ॥ अशी समजाविली बहुत नानापरी । पन्नास बायका दिल्या संग गर्व्हारीणी ॥ कांहीं वाणिणी ब्राह्मणी शिंपिणी सोनारणी ॥ ( चाल )॥ तुम्हीं राहावें पुरंदराला ॥ बाईचा गर्भ वाढवायाला सगळ्यामधिं एकच दाई त्यांना । गंगाबाई म्हणे नानाला ॥ धनी जाऊंद्या मोक्षपदाला । मग जाईन मी पुरंदराला वनवासाला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दख्ख०॥ १२

नानाफडनवीसानें हुकूम केला धनी मार्डीतला काढिला । माणीकचौकांत

होऊन महिना झाला होता." [म. रि. म. वि. ४ पान ३४० ]. **गुप्त राज्य चालवीन मसलतीनें**—या उल्लेखावरूनहि बारभाईचें कारस्थान रंगांत आल्यानंतर पोवाडा वाढविला असावा असें दिसतें. **पन्नास बायका दिल्या संग गर्व्हारणी** इ०—गंगाबाईस मुलगा नच झाला तर इतक्या बायकांपैकीं कोणास होईल त्यांतला मुलगा गंगाबाईस झाला असें उठविण्याकरितां. पण हें सर्व निखालस खोटें. "ही सर्व गप्प प्रथम इंग्रजांचा वकील मॉस्टिन पुण्यास होता त्यानें बाहेर लिहून कळविली आणि दादानें पुढें आपल्या हक्काच्या समर्थनार्थ तिचा फायदा घेतला." [म.रि.म.वि.४ पान ३६०]. "मेस्टर मास्टीन गंगाबाई प्रसूतसमयीं पुण्यांत होते. त्यास पुत्राचा संषय पुसिला. त्याणीं सांगितलें कीं प्रसूत जाली तें अर्भक निवर्तलें. उपरांत दुसरें घेतलें असेल निवर्तल्याची खबर आम्ही ऐकिली, पांचजणी बायका गरोदर जवळ होत्या याप्रमाणें सांगितलें." [साधनें खं. १२ पान ५६]. मुळांत कांहींच नसतां माष्टिनानें एकाचे नव्हे तर शून्याचे पांच केले आणि शाहीरानें पांचाचे पन्नास केले. **मग जाईन मी पुरंदरला वनवासाला**—या ओळीवरून असला पुष्कळसा खोटा भाग वधानंतर बरेच दिवसांनीं पोवाड्यांत घुसडलेला दिसतो. वधानंतर गंगाबाईस कोठें सुरक्षित ठेवावी याबद्दल किती भानगडी, किती घोंटाळे व किती काळ लागला तें म. रि. म. वि. ४ पा. ३५१ वर भरपूर दिलें आहे. एरवीं पुरंदरचेंच नांव बाईच्या तोंडीं नेमकें कसें आलें ? १२

**माणीक चौक**—The enclosed area in front of the houses of great men; where their retinue draw up, games are performed etc.

आंघोळीला आटोकाट ब्राह्मण तिथें जमा झाला ॥ ते आले होते पर्वतीच्या दक्षणेला । मग मिळाले ब्राह्मण गणीत नाहीं त्याला ॥ नानाफडनवीस बोले उपाध्ये भटाला । दोन शकलें दोन बाजूला ॥ तुम्हीं काढा सोवळं बांधा राजश्रीला । पाणी ठेवलें आंघोळीला ॥ सगळा अलंकार चढविला । मोत्याचा तुरा लाविला ॥ दोन हुजरे दोन बाजूला । खासा मिरवायाला लागला ॥ मग गंगाबाई हांक मारी राजश्रीला । काय द्वारका सोडुनी कृष्ण निघाला ॥ नळानें टाकिलं दमयंतीला । भोळा शंकर होता पार्वतीला ॥ हरिश्चंद्र होता तारामतीला । रामचंद्रानें मोकलीलें सीताबाईला ॥ असा वनवास श्रीभगवंतानें आमच्या शिरीं दिला । मग पुकार कळली पुणेंशहराला । गर्भार बाया चालल्या पाहायाला ॥ लेंकुरवाळ्या बाळें घेतलीं कडेला । जागा मिळेना उभे राहायाला ॥ महाराज ओंकारेश्वरावर नेला ॥ (चाल) ॥ राव काढले मध्यान्हरात्रीं दिघला अग्न । खंडीभर लांकडे आठ मण चंदन ॥ सरण दिलं चेतवून । चार वेढे हिंडली गाय पांचव्या वेढ्यानें गाईनें प्राण दिला सरणावर ॥ आले तुळाजी खितमतगार । चापाजी टिळेकर ॥ त्यांचे हुजरे मंडळी चाकर । चालूनि आले सरणावर ॥ आम्ही सरकारचे चाकर । यांचे निमक खाल्लें फार । पुढे वांचूं नये (हाच) विचार । उड्या टाकिती सरणावर ॥ जळून गेले चौघेजण । गाय गेली जळून खाशावर ॥ हीं ऋणानुबंधाचीं कामे । चौघे गेलीं वैकुंठीं चालून ॥ तेथून त्याचा न्याय केला कोणीं ?। येथूनि वर्तमान सर्व झाले ॥ लहिरी मुकुंदा कवी बोले । झाला दादाचा बोलबाला नारायण मोक्षपदाला गेला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला । दक्ख० ॥ १३

---

श्रीमंत लोकांचे वाड्यापुढील मोठें बंदिस्त पटांगण. **दोन शकलं दोन बाजूला तुम्ही काढा**—त्यांच्या देहाचे दोहीकडे दोन तुकडे पडले आहेत ते काढा, जुळवा. **पुकार**—वार्ता; हकाटी; बातमी. **बोल मला—बोलबाला.** असे पाहिजे. १३

# त्याच विषयावरचा मूळ अस्सल पोवाडा

## १५

### [ शाहीर—लहरी मुकुंदा ]

[ हा पोवाडा मूळ असून ऐतिहासिक माहितीशीं तंतोतंत जुळता आहे. कालांतराने एकाचे अकरा कसे होतात हें या व मागच्या पोवाड्यांच्या तुलनेनें आपोआपच सिद्ध होईल. हा पोवाडा खुनानंतर लवकरच झालेला दिसतो.]

दक्षिणचा दिवा मालSSSवला ! हिरा हारSSपला ॥ कसा गुपित घाला केला रावसाहेबाला ॥ ध्रु०॥ एकछात्रि करुनि गेले राज्य माधवराव। थरथरांचि कांपत होते त्यासि उमराव ॥ बसविले हस्तनापूरिं तखत बाच्छाव। दादासि मोकळे केले राज्य करावं ॥ तुटलि आयुष्याचि दोरी, नाहीं उपाव। मरत्या समयास बोलिवले नारायणराव ॥ (चाल) ' दादासि मिळुनि असावं ॥

---

कसा गुपित घाला केला रावसाहेबाला—हें रघुनाथरावानें माधवरावावर सुरू केलेल्या वाममार्गी अनुष्ठानाला उद्देशून आहे. " पुढें त्याची ( माधवरावाची ) प्रकृति बिघडली. त्याचें मुख्य कारण चुलत्याचें अनुष्ठान होय; तो प्रतिबंधांत आहे तोंपावेतों हें अनुष्ठान बंद पडणार नाहीं आणि तें बंद झाल्याशिवाय पेशव्याची प्रकृति सुधारणार नाहीं असा सार्वत्रिक समज मोठमोठ्यांचा होता." [म.रि म.वि. ४ पान २४०]. २ " राजश्री दादासाहेबांचे गुरु नर्मदेस आहेत, गौड, त्यांचा (हा) प्रयोग." [खरे, पत्र १२२२]. ३ " कोणी म्हणूं लागले कीं दादासाहेबांचा गुरु गौड जातीचा कोणी मांत्रिक आहे तो नर्मदेच्या तीरीं गुप्तस्थळीं राहात आहे, त्यानें श्रीमंतास मूठ मारिली आहे." [खरे, पान १८९३]. नारायणरावाचा जो दुसरा वाढविलेला पोवाडा आहे त्यांत " अपघात करुन मारिलें सख्या पुतण्याला " असा नारायणरावासंबंधीं स्पष्ट उल्लेख आहे. शिवाय रावसाहेब ही पदवी फक्त थोरल्या माधवरावालाच आहे. पहिला सबंध चौक थोरल्या माधवरावांसंबंधींचा आहे. हिरा किंवा दक्षणचा

द्वैत मनीं नसावं। अशा वेळानं कंठाव। ओटींत नारायणराव तुमच्या हो घातला "॥ अशा बहु प्रकारें निरवले हो दादाला॥ दक्षिणचा०॥ १

मग गेले हो साताऱ्यासी, राजापाशीं। शिक्के रोखे वस्त्रें दिलीं हो नारायणरायाशीं॥ आले वाजवित चौघडे शहर पुण्याशीं॥ कुच करून लौकर गेले हो नाशकाशीं। दुसऱ्याची बुद्धि ऐकिली निमित्याशीं॥ मग येऊन जप्ती फार केली दादासी॥ (चाल) देती गस्तीवर गस्ती। थोर केली

दिवा हीं विशेषणें अर्थातच थोरल्या माधवरावाचीं आहेत. "असो. श्रीमंत रावसाहेब गेले याजमुळें सर्वच फसल्यासारखें झालें आहे. वाघ गेला सारीं कोल्हीं राहिलीं आहेत. ईश्वरसत्ता प्रमाण." [खरे, पान १२४३]. **अशा वेळानें कंठावे** (?). **निरविले-निरवणें-स्वाधीन करणें, अर्पण करणें. रोखा-आज्ञापत्र.** १

**दुसऱ्याची बुद्धि ऐकिली निमित्त्याशीं**-"नाशकाला मातोश्रीच्या दर्शनास गेला असतां, तिच्या शिकवणीनें नारायणरावानें पुण्यास येतांच दादासाहेबास अटक केली असा त्या वेळीं समज होता. त्याचीच छाया मराठे साम्राज्याच्या छोट्या बखरींत उतरली आहे" "गंगापुराहून परत येतांच दादास अटक झाली पण ती मातोश्रीचे शिकवणीनें झाली नसून नारायणरावाचे पश्चात् दादानें फितूर केला म्हणून झाली. परत येतांच अटक झालेली पाहून लोकांस वाटलें कीं, ही मातोश्रीची शिकवण" [म.रि.म.वि. ४ पान ४२६]. दादासाहेबांचा फितूर-[खरे, १९५५,१९५६. खरे, पत्र १२८९]. **निमित्त्याशीं**-नांवाला, निमित्तमात्र होण्याला. **देती गस्तीवर गस्ती**-"दादांच्या सर्व हालचाली बंद पाडून त्यास बाहेर कोणतेंहि सूत्र हलवितां येऊं नये असा बंदोबस्त नारायणरावांनीं चालविला. पूजा, भोजन, स्नान, निजणें, वसणें इ० सर्व सोई दादास यावयाच्या म्हणजे कारकून, शागीर्द, पाणके, आचारी वगैरे लोकांचा संचार दादाकडे ठेवणें जरूर होतें. हे बंद केले कीं दादांच्या सुखास व्यत्यय आला." [म.रि.म.वि. ४ पान ३२४]. "अर्घ्यप्रदान देवपूजा वगैरेसाठीं दालनाचे बाहेर उघड्यावर येण्याचीसुद्धां बंदी झाली." [म.रि.म.वि. ४ पान ३२४]. **गस्त-पहारा. देती गस्तीवर गस्ती**-कडेकोट पहारे ठेविले. **पुल बांधून**

बंदोबस्ती ॥ पुल बांधुनि करूं मग वस्ती । नळाशि काम लाविलें. हुकूम झाला ॥ पुढें कोट बांधणार होते । शहर पुण्याला ॥ दक्षिणचा०॥ २

शुद्ध भाद्रपद तेरस, दिवस सोमवार। त्या दिवशीं दिवस चढला दोन प्रहर ॥ मग सुमरशिंग गारदी होऊन तैय्यार। संगें महमद साहेब इमानी सरदार॥ हजिरी देतों म्हणोनि लाविली कटार॥ मग शिरले वाड्यामंदी उपसुन तलवार। (चाल) झाली गर्दी एकच हल्ला। राव निजला जागा झाला। उठुनिया उभा ठेला॥ राव फिरुनि अवघा वाडा भयाभित झाला। थरथरांच कापत राव दादापैं गेला। दक्षिणचा०॥ ३

आतां हिकून पळाले राव, सुमरशिंग माग। बरोबर गारदी घेऊनि केला लाग। शोध करित पुढें चालले, लावला थांग। म्हणे इकुनि पळाला; सुमरशिंगाप्रत सांग.। राव हात जोडी दादाला, 'सोडा राग'। म्हणे आतां वांचवा. जीवदान माग॥ (चाल) डोइ घातली पोटांत। आलि माया हृदयांत॥ "नका करूं बालकाचा घात।" दादा ठेविं वर हात "वांचवा याला"॥ दक्षिणचा०॥ ४

बोले सुमरशिंग गारदी, तुम्ही वांचवितां। पुढें आमुचिं मनुष्यें घाण्यांत पिळीतां॥ तुम्ही मुळीं आपुल्या प्राणासि कां दवडतां। तुळाजि खिसमतदार

**करूं मग वस्ती**-येथपासून तीन ओळी मधेंच दडपल्यासारख्या दिसतात. ओघांत आल्यासारख्या दिसत नाहींत. २

**संगें महमदसाहेब इमानी सरदार**-महमद यूसफ हा गारद्यांचा सरदार. सन १७७० त शिऱ्याचे हल्ल्यांत महमद इसफाचा मोठा उपयोग पेशव्यास झाला होता. **उभा ठेला**-उभा राहिला. **दादापैं**-दादापाशीं. ३

**सांग**-सांगे. कोण सांगे याचा मात्र पत्ता नाहीं. ४

**तुम्ही वांचवितां, पुढें आमुची इ०**-तुम्ही आतां याला वांचविण्यास सांगतां पण हा आतां वांचला तर डूग धरून आमचीं कुटुंबें घाण्यांत घालील; आमची छळणा करील. **मुळीं**-व्यर्थ; फुकट. **तुळाजी खिजमतगार**-हा

झाला बोलता। दादानिं काढला हात झाला सरता॥ निःशंक हात मारिला किं खांद्यावरता॥ (चाल) झाला पुरा एकच घायीं। दादाची फिरली द्वाही॥ चौघडा वाजे ठायीं ठायीं। तेथ उपाय नाहीं कांहीं॥ दोधन्ये एकच ठायीं,— माराव कोणाला। होयाचें होऊन गेले शब्द दैवाला॥ दक्षिणचा०५

गंगाबाई करी रोदन, 'हारपलें रत्न! गाईने वत्स गिळिला! देवा धन्य! टाकून घोडे पालख्या द्रव्य धन। नाहीं हौस पुरली गेले नारायणा!' राव

---

तुळ्या पवार दादांचा खिजमतगार होता. हा महा खटपटी व हिंमतवान् होता म्हणून नारायणरावाचा त्याजवर डोळा होता. त्यास नारायणरावानें एकदां चाबकानें फोडून काढल्याची आख्यायिका आहे. [म. रि.म. वि.४ पान ३२९]. **झाला पुरा एकच घायीं**–एका घावांतच पुरा झाला; ठार झाला. **दादाची फिरली द्वाही**–" नारायणरावाचा खून झाल्याबरोबर गारद्यांनीं दादांस खालीं चौसोपींत किंवा चाफेखणांत आणून बसविलें आणि त्यास धनीपणाचा मान देऊन जयजयकार केला. वाड्यांत त्यांची द्वाही फिरविली. सुमेरसिंगानें दादाचे डोईस पागोटें घातलें आणि बोलला दुष्मन मारला खुषी असावी. आम्ही सर्व आपले आहोंत." [म.रि. म. वि. ४ पान ३३८]. **दो धन्ये**–दो धनी, दोन धनी, दोन खासे. नारायणराव व दादासाहेब. ५

**गाईनें वत्स गिळिला**–खुद्द चुलत्यानें पुतण्यास मारिलें. **नारायणा**–वास्तविक प्रासाच्या दृष्टीनें नारायण पाहिजे पण आपल्या पतीचें नांव म्हणून ती नुसती 'गेले' असें म्हणते. नारायणा हें ईश्वराचें संबोधन आहे. गोपिकाबाई ही नाना फडणवीस याचा उल्लेख नेहमीं फडणीसपंत असा करी. कारण नवऱ्याचें नांव नानासाहेब होतें. "विज्ञापना, मातोश्रींचें दर्शन झाल्यावर फडणीसपंत काय करतात अशी गोष्ट प्रथम निघाली तेव्हां मनांत आले कीं, नाना कां म्हणत नाहींत फडणीसपंत कां म्हणतात, तेव्हां येथील माहीतगारीनें मनास आणितां नाना म्हणत नाहीं व मजला एकवेळ स्वामीनींहि गोष्ट सांगितली होती कीं, फडणीसपंत म्हणत असतात. नाना म्हणजे नानासाहेबाचें नांव. तें घेत नाहीं असें सांगितलें. त्यावरून संशय गेला.

नेले अर्धे राति लावलें अग्न। खंडिभर लांकडें आठ मण चंदन ॥ (चाल) कामा आला खिसमतदार। चापाजी टिळेकर ॥ शुद्ध इमानी चाकर। घड पडले अंगावर ॥ नारुजी नाईक ठार–पुरा झाला। जखमा लागल्या ईशराम पंताला ॥ दक्षिणचा०॥ ६

आतां भोळे राज्य दादाचें! केवळ काशी। बोले तुकुम देही आउख चिंता दादासी ॥ वस्त्रें आणावया पाठविले अमृतरायासी। बोले सुदामा

---

नाहींतर 'फडणीसपंत' कुऱ्ह्यानें म्हणतात असें वाटत होतें. मौजेची गोष्ट मनांत आली ती लिहिली असत र॥ छ सावान हे विज्ञापना " [हरिपंत फडके यांचें पत्र. पारसनीस इ. सं. ऐ. टि. २० टीप १]. **अर्धे राति लाविलें अग्न**– "दोन प्रहर रात्रीपर्यंत आंतील वर्तमान बाहेर कळलें नाहीं. दहनास नेल्यावर ठीक कळलें." [म. रि. म. वि. ४ पान ३४०]. ६

**आतां भोळे राज्य दादाचें केवळ काशी**–हें कुत्सितपणानें म्हटलें आहे. दादासाहेब अगदीं भोळे! फक्त पुतण्यास मारावयाचें तेवढें कळतें इतका सच्छील ब्राह्मण, असा टोमणा. **बोले तुकुम देही औख चिंता दादासी**– बोले हुकूम द्रोही (?). **अमृतरायासी**–" प्रथम कांहीं दिवस लोकांचीं मनें शांत होईपर्यंत त्यानें (दादासाहेबांनीं) वस्त्रें आणविण्याची घाई केली नाहीं. रामराजा अपेशी त्याजकडून वस्त्रें घेणारास धार्जिणें लागत नाहीं. अशी त्यांची समजूत असून वस्त्रें स्वतः न घेतां दत्तक मुलगा अमृतराव याजला तीं द्यावीं असा त्याचा बेत झाला. आक्टोबरांत त्यानें बजाबा पुरंदरे व भवानराव प्रतिनिधि याजबरोबर अमृतरावास त्यानें साताऱ्यास पाठविलें इत्यादि०" [म. रि. म. वि. ४ पान ३६५]. पण पुढें तो बेत बदलून वस्त्रें त्यानेंच घेतलीं. **सुदामा ब्राह्मण**–दादासाहेबांच्या प्रीतिपात्र असलेल्या अनेक शिष्यांपैकीं एकादा असावा. या शागीर्दांची किंवा शिष्यांची दादासाहेबाच्यावर केवढी पकड असे यांचें एक मनोरंजक उदाहरण अस्सल पत्रांतून नमूद करतों. " सरदार खट्टे झाले. कारभारी यांशी यजमानानी बहुत गालिप्रदानें केली. कांहीं यजमानापुढें उपाय न चाले तेव्हां शेवटी कारभारी यांनीं ( सखाराम बापूनीं ) शागीर्दांचे आर्जव करून " मनसबा यासमयीं करूं नये " असें यज-

ब्राह्मण प्रसन्न शिव दादासी ॥ (चाल) दादाचीं तपें तीं भारी। शिवसांभ विघ्न नीवारी। बाहेर निघाली स्वारी। दरारा पडला भारी-सर्व दुनियेला ॥ बोले लहिरी मुकुंदा दादाचा बोलबाला। दक्षिणचा०॥ ७



---

मानास सांगून हा मनसबा फिरविणें याप्रमाणें त्याचे आर्जव केले. तेव्हां त्यानें मागती यजमानास ताळ्यावर आणिले. [ खरे, ४८२ ]. ७

# सवाई माधवरावाचा जन्म, मुंज व लग्न

सदर पोवाडा लहानसाच आहे तरी त्यांतील माहिती ऐतिहासिक कसोटी-ला पूर्ण उतरणारी आहे हें खालीं दिलेल्या मराठी दप्तर-रुमाल २ मधील अस्सल उताऱ्यांवरून दिसून येईलच. पेशवे यांचे बखरींत सदर समारंभाचें फार विस्तृत व सुरस असें वर्णन आलें आहे. तें वाचकांनीं निराळें वाचावें. अस्सल आधारांनीं पोवाडे पडताळून पहावयाचे असल्यामुळें मराठी दप्तर रुमाल दोनमधीलच उतारा फक्त उद्धृत केला आहे.

## ऐतिहासिक माहिती

श्रीमंत कैलासवासी पंतप्रधान सवाई माधवरावसाहेब यांचें लग्न करावयाचा निश्चय सन सलास समानीनात ठरला. कैलासवासी केशव बहिरव नाईक थते केतकी बिबली ता। आंजनवेल नजीक श्री परशराम येथील जोसी, उपाध्ये-पणाची वृत्ति आलिकडे औरंगाबादेस राहात होते, त्याची कन्या वधू नेमिली. लग्नपत्रें श्री देवास व श्री शंकराच्यार्य व चिंचवडकर देव व जयरामस्वामी वडगांवकर वगैरा व साधूची संस्थाने व सिष्टास व श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति राजारामसाहेब संस्थान सातारा यास दत दिल्हे ते श्रीमंत कैलासवासी माहाराज छत्रपति शाहूराजे हे तक्तनिर्षीन होते, त्यांचे शेवेसी विनंतीपत्र लिहून संभावित गृहस्थ आमंत्रणास पाठविले. श्रीमंत कैलासवासी महाराज छत्रपति संस्थान पन्हाळा यांचे शेवेसी विनंतीपत्र व दोन्हीकडील पदाधिकारी पंतप्रतिनिधी वगैरा यास व जिंनत मकान ( प. वा. ) नबाब निज्याम आलीखान यांस वगैरा व राजेरजवाडे व संस्थानिक दक्षण व हिंदुस्थानचे व पदरचे सरदार सिंदे भोसले होलकर व आलीबाहादर व पटवर्धन व रास्ते व विंचूरकर व ओढेकर वगैरा मानकरी व पानशे तोफखानेवाले पागे पथके आंगरे व धुलप वगैरापैकीं पुण्यात होते त्या खेरीज त्यास पत्रे सिरस्त्याआन्वये लिहिली. लग्नाचे समारंभाची तरतूद नानाफडणीस याणी सरकारचे वाडयांत जागोजाग मंडप केले होते त्यांत कारंजी व आरशे व बिलोरी झाडे वगैरे लाविली होती त्यांत बैठका सदरहु आन्वयेच थत्ते याजकडील मंडपाचीहि तयारी जागोजाग बैठका व मेजवाणीची व ब्राह्मण भोजनाचे मंडप व भोजनाची तरतूद व रस्तोरस्ती

विराखदान श्रीमंताचे अंबारीपुढें तक्तरावा त्याजवर कलावंतीणीचा नाच व बागशाई कागदी दोहो बाजूने, स्वारी बरोबर चालावयाची व नक्षत्रमाळा व्यालछत्रे व तोरणे व हत्तीचे वगैरा रथ व हत्तीवरील अंबाऱ्या ऐन्याच्या वगैरा व हवदे असें मिळोन अजमासे चालीस पन्नास व अंबारीबरोबर दुशाब व हत्तीवर महताफा व जिलीबीत चालावयाचे जुंबरे व रंगाची तरतूद गुलाल गोटे व रंगाची कारंजी व अतषबाजी वगैरा असी बहुत बहुतच तारीफ लायक केली होती व कामाचे नेमणुकीची याद केली त्यात कामगार यांनीं आपापले कामाची तरतूद राखण्याचा तपशील लिहिला आहे त्या यादीची नक्कल आमचे जवळ आहे ती बार करावी तर विस्तार फार होतो सबब आलाहिदा नेमणूक कोणाकडे काय ते व त्यांनीं आप आपले कामाची तयारी कसकसी ठेवावी ते नजरेस यावयाकरितां आलाहिदा सदरहूचे पुरवणीस लाविली आहे यादीबरहुकूम ज्याची त्याणे कामे दुरस्त राखिली होती लग्नाचें समारंभास श्रीमंत कैलासवासी महाराज छत्रपति राजारामसो यांस दत दिले ते श्रीमंत कैलासवासी शाहूराजे धाकटे त्याची स्वारी साताऱ्याहून आली होती व नबाब निजाम आलीखान यांनी आपलें चिरंजीव जिनत मकान पोलादजंग व त्याजबरोबर कारभारी तहवरजंग देऊन पाठविले ते आलें होते व रास्ते व पुरंधरे वगैरा व राजश्री चिंतामण राव आप्पासाहेब त्यांचें बंधु कैलासवासी विठ्ठलराव बापुसह परशरामपंत भाऊ व रघुनाथरावदादा व राजश्री चिंतामणराव अप्पा यांचे चुलते ती ॥ गंगाधरराव काका वगैरा पटवर्धन मंडळी असे यच्चावत आले होते. माघ शु० ९ इंदुवारी सन मार सन सलाम समानीनात झालें साड्याचा समारंभ झाला श्रीमंत कैलासवासी सौ० मातुश्री बाईसाहेब यांस श्रीमंत कैलासवासी पंत प्रधान माधवरावसाहेब थोरले यांची पत्नी श्रीमंत कैलासवासी सौभाग्यवती मातुश्री रमाबाईसाहेब यांचे नांव ठेविले नंतर साखरा वाटल्या शिष्टाचार गोपा वगैरे समारंभ झाला व खुषीबद्दल तोफाची सरबती बहुत जाहली जसा ज्याचा दरजा तदारूक त्यांची सन्मान ब्राह्मणास देकारहि मोठाच जाहला रंगाचा व परवतीनजीक मोठा अतसबाजीचा समारंभ जाहला.”

—मराठी दप्तर, रुमाल २

भट पेशवे वंशाची हकीगत, पान ११२–११३.

# सवाई माधवरावाच्या जन्माचा पोवाडा

## १६

### [ शाहीर—खंडू संतू ]

[ चाल— भरजरी पैठणचें पातळ लफा घे टाचांची खबर । ]

सवाई माधवराव पेशवे सवाई चढती राज्याला । परशुराम अवतार पुरंदरीं ज्यांचा जन्म झाला ॥ ध्रुपद ॥

**चढती** ( स्त्री )–उत्कर्ष. **सवाई चढती राज्याला**–सवाई माधवरावांच्या बरोबर राज्याचा सवाई–विशेष किंवा अधिक उत्कर्ष झाला **परशुराम अवतार**–खरोखरच ऐतिहासिक कागदपत्रांतून अनेक ठिकाणीं सवाई माधवरावाला प्रत्यक्ष परशुरामाचाच अवतार लोक समजत होते अशाविषयीं अनेक उल्लेख आहेत. (१) " माधवरावसाहेब यांचा जन्म पुरंधरी शके १६९६ जयनाम संवत्छरी सन मजकुरी सन आर्वा सबैन मया व आलफात अधिक वैशाख शुद्ध सप्तमी इंदुवारी माध्यांनीं जाहल्याचे वर्तमान सरकारचे फौजेंत हरीपंत तात्या वगैरा सरदार होते त्यास समजले लस्करांत गुड्या उभ्या केल्या, तोफाची सरबती केली, हतीवरून साखरा वाटल्या. दुष्टाचे शासन व साधुचे पाळण करावें, याकरितां पूर्वी देवानी अवतार घेतले, त्यासमई जसा प्रजेस संतोष जाहला. तद्वत प्रजेस संतोष जाहला." [मराठी दप्तर रुमाल २–भट पेशवे घराण्याची हकीकत, पान १०४]. (२) " देवानें कुलदीपक लाविला· देव त्यांस आयुष्य यथेष्ट कराल सर्वांचें जीवन श्राहे, हा नि·संदेह जाला. पुढें सर्वांचे मनोरथ सिद्धीस जातील. हे उमेद कुलवाद जाहली आपण चित्तावर घेतल्यासारखे आजपावेतो उत्तमच. सूर्योदय जाहला. पुत्र झाला हा मोठा लाभ. श्रीपंढरीनाथानें राज्यास धणी केला. साक्षात् विष्णूनें राज्यरक्षणार्थ अवतार घेतला. याएवढा हर्ष कोणता आहे ! देव सत्याकडे आहे, असें पुरतें समजले. जे द्वामुष्यायाणी होते त्यांचीसुद्धां खातरजमा झाली. सर्व लहानथोरांस, तमाम सरदारांस व राजेरजवाड्यांस वर्तमान कळविलें. इंदुवार सुदिन. आम्ही आपला नौबतखाना इंदुवारीं सुरू करितों, विद्यानगरीं एक वेळ सुवर्णसृष्टि झाली, तीच हल्लीं आम्हांवर वारंवार देव करितो हाच उल्हास आहे. जगदात्मा

सप्तद्वीप नवखंड पृथ्वी दहावा खंड ऐका काशी। भरतखंडामधिं एक जंबुद्वीप आहे दक्षिणदेशीं ॥ साडेसहा सुभे राज्य दक्षणचें आहे शाहु-महाराजाशीं । देशोदेशिंच्या खंडण्या धाडुन देती पुंडमवासी ॥ केवढा दर्प थरथर कांपे धासत वैऱ्याला । देशोदेशिंचे वकिल हमेशा पडले शहरपुण्याला ॥ सवाई० ॥ १

मध्यान्हीं इंदुवार सप्तमी सोळाच घटका समयाला ॥ देशोदेशीं साखरा वांटिल्या आनंद झाला सृष्टीला ॥ सुटती तोफा एक कडाका गणीत नाहीं वाद्यांला । सडे घालती उत्तम आंगाणिं सर्व मिळुनि त्या समयाला ॥ सवाई० ॥ २

मौंजीबंधन लग्न रायाचे खूप रायाचे झालें घणघोर । आरशाचे मंडप रेखिले चित्रशाळा अपार ॥ जरी बादले खांब चांदवे सोगा झाला चौफेर । तक्त रायाचे पुढें चालतें रथ हत्तीचा बिनीवर ॥ दोही रस्त्याने चिराकदानी

---

कृपावंत होऊन कुलदीपउदय केला त्यास आयुष्यवृद्धि करो. जगन्निवास पुढें उत्तमोत्तम करील. जगन्निवासें प्रजेचें पालन करणार उभे केले." अशा प्रकारचे विजयानंदोद्गार निरनिराळया व्यक्तींचे नमूद असून त्यांत महाराष्ट्रांतील समुचितानंदोर्मि सांठलेली आहे."[म.रि.४पान ३७८–३७९]. ३ सवाई माधव-रावाचें जन्मनाम हरदेव होतें. [भा. इ. सं. अ. शके १८३२ पान ७०]. जंबुद्वीप—महाराष्ट्र साडेसहा सुभे-अर्थ अन्यत्र दिला आहे पुंडमवासी—पुंड आणि मवाशी; पुंड पाळेगार भुमे वगैरे लोक. धासत-धास्ती भीति. १

एक कडाका—एका कडाक्यानें. २

मौंजीबंधन लग्न रायाचें खूप रायाचें झालें घणघोर—मौंजीबंधन खूप घनघोर झालें आणि लग्नहि घनघोर झालें. घणघोर—घनघोर. भावार्थ अत्यंत गजराचें आणि थाटामाटाचें. जरीबादले खांब चांदवे सोगा झाला चौफेर—मंडपाचे खांब जरीच्या कापडानें मढवून चौफेर किनार लावली. तक्त रायाचें—तक्तरावा ते किंवा तक्तरावे ते असें पाहिजे. ३.४ रंगाच्या पोवाड्यांत पहा. रथ हत्तीचा—गजरथ. "बसावया नच जागा राग पागा गजरथ बागा कुठे राहती." [दुष्काळाचा पोवाडा]. चिराकदानी—चिराकदानें.

इंद्रसभेचा दाखला । चतुराई नानाची कुठवर उपमा द्यावी तयाला ॥ सवाई०॥ ३

आणले भोंसले, मोगल, महाराज छत्रपती । शाण्णव कुळीचे भूप मिळाले सांगाया झाल्या कृती ॥ महादेव बोलला सवाई शास्त्र चढले वेदाला । संड्डू संतू म्हणे पुण्यामधिं पोवाडा हा त्यानें केला ॥ सवाई०॥ ४



इंद्रसभेचा दाखला–इंद्रसभेप्रमाणें. चतुराई नानाची कुठवर उपमा द्यावी त्याला–याचा पडताळा पाहण्याकरितां वाचकांनीं काव्येतिहाससंग्रह. लेखांक ३३१ पहावा. सदर लेखांत नाना फडणिसांनीं श्रीमंतांच्या लग्न-समारंभाची तरतूद किती बारकाईनें ठेविली होती तें उत्तम रीतीनें दिसून येतें " भोजनोत्तर आंचवावयासी उष्ण पाणी व हातास लावावयासी साखर व दांत कोरावयासी लवंगा याप्रमाणें देत जावें " " गंध अक्षता लावणार यांणीं नखें काढून बोटें चांगलीं करून लावावें " " मीठ धुवून पांढरें बारीक करावें " अशा शेंकडोशें बारकाईच्या व तरतुदीच्या गोष्टी त्यांत आहेत. ३

कृती–ख्याति. पराक्रम. महादेव बोलला सवाई शास्त्र चढले वेदाला–शास्त्राला ज्याप्रमाणें वेदाचें प्रामाण्य प्राप्त झालें त्याप्रमाणें सदर पोवाड्याला प्रामाण्य प्राप्त झालें. ४

# बदामीचा पोवाडा

सदर पोवाड्याचा कर्ता राघू नांवाचा कोणी आहे, तो आपली माहिती अशी देतो: "आमचें राहाणें मुंगवड्याला। आम्ही म्हेमान पेठचे राहणार ॥ आमची मिरास वाईची" पोवाड्यांतील ऐतिहासिक माहिती बहुतेक बरोबर आहे. पण वाक्यावाक्यांत संदर्भ नाहीं. त्यामुळें कांहीं ओळीचा अर्थ लावणें कठिण पडतें.

## ऐतिहासिक माहिती

१७८५ त पेशव्यांच्या आश्रयाखालील नरगुंद व कित्तूर हीं संस्थानें टिपूनें काबीज केलीं. पुणें दरबारनें मोहिमेची तयारी केली. त्या सुमारास नागपुरकर मुधोजी भोंसला पुण्यास आला. स्वारीची जुळवाजुळव कार्तिक अखेर झाली नाहीं. या मोहिमेंत स्वतः नाना जातीनें हजर होते. पेशव्याचे बाजूनें निजाम, परशुरामभाऊ होते. पेशव्यांची हुजरात फौज वगैरे हरिपंत तात्या व बाजीपंत अण्णा यांचे देखरेखीखालीं होती. पटवर्धन, भोंसले, होळकर, गणेशपंत बेहरे, रास्ते व अक्कलकोटकर हे सरदार होते. बदामी काबीज करण्याची मसलत पक्की ठरवून त्या उद्देशानें दोन्ही लष्करें बदामी-जवळ गेलीं, तों निजामअली भागानगरास परत गेला. मात्र जातांना त्यानें तहवारजंग सरदाराबरोबर २५००० फौज मदतीस ठेवली. त्या प्रांतीं बळकटीविषयीं बदामीच्या किल्ल्याची प्रसिद्धि होती. त्यांतून अलीकडे टिपूनें त्याची उत्तम प्रकारें मजबुती केली होती. नरगुंदकरांची मध्यस्थी करून त्यांस ज्यानें दगा दिला तो हैदरगुलाम टिपूनें मुख्य अधिकारी नेमिला होता, व त्याच्या हाताखालीं पायदळ व तोफा वगैरे मुबलक सामान ठेविलें होतें. किल्ल्यास मराठ्यांनीं १ मे–अक्षय्यतृतीये–च्या मुहूर्तानें मोर्चेबंदी केली. आंतील लोकांनीं शर्थ केली. तरी मोर्चे रोज पुढें चालत होते. सर्वांपुढें परशुरामभाऊचा मोर्चा होता. शेवटीं मोर्चेबंदीनें किल्ला साध्य होण्यास फार वेळ लागेल, टिपू तर प्रचंड सैन्यासह श्रीरंगपट्टणाहून निघाला आहे, तो आपल्या रोखें खचित येणार, याकरितां हल्ल्यानें किल्ला काबीज करण्याचें

ठरलें. २० मे रोजीं पेशवे, मोंगल व भोंसले यांनीं किल्ला काबीज केला. " किल्ल्याचे पश्चिमेस एक बातेरी होती. त्यासुमारें व शहर पन्ह्याचे दरवाजामध्यें व रेवणीजवळ दारवेचे बुधले पुरले होते. ( किल्लेकरांनीं ) हल्ला येतांच बत्ती दिली. फार लोक ठार झाले." परशुरामभाऊचे लोकांनीं शहरपन्ह्याचा दरवाजा आधीं घेतला. " एकंदर त्रिवर्गांनीं मिळून ८०० माणूस ठार. पेठेस खंदक, भालाभर खोल रेवणी, बांधीव चुन्याची दरजगी रुंद २०–२५ हात भिंताड मजबूत जागा फार अवघड."

# बदामीचा पोवाडा

## १७

[ शाहीर--राघू ]

[ चाल---अहा सख्या जिवलगा काय अंतर पडलें सांगा ।
मी दासी तुमची मजला मागा ॥]

शिपाई थाट रोहिले जाट गांठ न पडलि हैदऱ्याची । खबर ऐका बदामीची ॥ ध्रुपद ॥

नाना फडनवीस म्हणती भाऊला तुम्ही मोर्चाला खबरदार । गोळे सुटती

थाट–जमाव. थट, थाटा–जमाव. हैदऱ्याची–बदामीचा किल्लेदार हैदर गुलाम याची. शिपाइ थाट रोहिले जाट गांठ न पडली हैदऱ्याची–रोहिले जाट आदिकरून मराठ्यांच्या सैन्यांतील शिपाई किल्ल्याभोंवतीं महसरा म्ह० वेढा घालून बसले आहेत परंतु अजून आंतील किल्लेदाराशीं गांठ पडली नाहीं भाऊला–परशरामभाऊला. मोर्चा–"तोफांसाठीं प्रथम मोर्चे बांधावे लागतात व मग त्यावर तोफा रचून भडिमार करण्यांत येतो. मोर्चाची रचना सामान्यतः पुढीलप्रमाणें असेः–रुंद खोल खंदक खणून त्याच्या मागील बाजूस रुंदीकडे लांबीपर्यंत कणगी अथवा पोर्ती उभी करून त्यांत खोदलेली माती अथवा वाळू भरतात. दोन कणग्यांच्या मधील जागेंत दगड-माती ठोकून सपाट करून सडक करितात. त्या सडकेमार्गे उतरावयास ३–४ पायऱ्या असतात व सडकेच्यापुढें खंदक असतो. सडक छातीइतकी उंच राहील इतक्या उंचीच्या पायऱ्यांवर चढून शिपाई शत्रूंवर बंदूक झाडतो. सडकेच्या एकंदर लांबीवर मधूनमधून बुरुज बांधून त्यावर तोफा ठेवून शत्रूवर मारा करितात. या एकंदर कामास मोर्चा अथवा मोर्चेबंदी म्हणतात." मोर्चाचें काम विशेषतः गारद्यांच्या द्वारा तयार करितात. "मोर्चे कायम राखावयाचे झाल्यास गारदी तोफखान्याजवळ पाहिजेत." मोर्चावर पायदळांचा (विशेषतः गारद्यांचा) सतत पाहरा ठेवावा लागतो. "मोर्चा पुढें वाढवून बांधला आहे. त्यास पायदळ नेहमीं असतें. तोफा मात्र दिवसां ठेवतात व रात्रीं काढून आणतात." [खरे ४६८०]. "एकाद्या किल्ल्याच्या भोंवतीं मोर्चेबंदी केल्यास,

तुटती तार ॥ रणमंडळ तोफेचें बळ कडक बिजली करिती मार । घावरें होतें लष्कर ॥ किल्ल्यांत फिरंगी रोहिला जंगी, मारितो रंग रेकल्याचा । तळ्याकडे मोर्चा भोसल्याचा ॥ आंत कानडा लोक फाकडा, शिपाई सडे तलवार । नेमिले चार हजार ॥ तळ्याच्या तिरीं भोंसला, शिरी श्रीमंत बिनीवर । मोंगलाचें लष्कर ॥ बसूनियां हंबीर करिती विचार 'हल्ला करा एकदाची' । खबर ऐका बदामीची ॥ १

---

किल्ल्यांतील शिबंदीच्या निदान तिप्पट शिबंदी तरी मोर्चाच्या रक्षणासाठीं सतत एकसारखी मोर्चांत ठेवावी लागते." [विंचूरकर घराण्याचा इतिहास-शब्द-कोश व विद्यासेवक, वर्ष ३, अं.८ पा.१४ चांदोरकर]. **मोर्चाला खबरदार**- सर्वांपुढें भाऊंचा मोर्चा होता. [खरे, ४०९१ प. नं. २९७९]. **गोळे सुटती तुटती तार**-तारे तुटावेत त्याप्रमाणें तोफांचे दीप्त गोळे दिसत होते. **रण-मंडळ**-बदामीच्या किल्ल्याचा एक बुरूज. यावरून शत्रु दारूच्या आगीचा अतोनात मारा करीत होता. [खरे, ४११४]. (रणमंडळ हें तोफेचें नांवही आहे. रणमंडळ ही तोफ त्यावर होती. त्या बुरुजाला रणमंडळाचा बुरुज म्हणत असाही अर्थ आहे). **तोफेचें बळ कडक**-रणमंडळ बुरुजाला तोफेचें बळ विशेष अनुकूल. (किंवा कडक हा शब्द बिजलीच्या आधीं देखील घेतां येईल). **बिजली**-कडक बिजली; तोफेचें नांव. **जंगी**-लढाऊ; लढवय्या. **मारितो रंग रेकल्याचा**-रेकला, ऱ्हेकला-एक बंदुकीसारखे हत्यार. [पा. ब २४]- रेकल्यांनीं मारगिरी करतो. **तळ्याकडे मोर्चा भोसल्याचा**-तळ्याकडे, हें तळें कोणचें? **आंत**-मोर्चांत कां किल्ल्यांत? **सडा तलवार-सडा**-ताठ व सरळ बांध्याचा मनुष्य. भावार्थ जंगी दांडगा मनुष्य. **सडे तलवार**-निवडक चांगले धारकरी. **शिरी श्रीमंत बिनीवर**-(?) **मोंगलांचे लष्कर बसुनिया हंबीर इ०**-याचा संबंध कोणाकडे घ्यावयाचा तें कळत नाहीं. मोगलांच्या लष्करांत सरदार लोक बसून हल्ल्यानें किल्ला घेण्याची मसलत करूं लागले- असा अर्थ घेतला तर जुळणार नाहीं. कारण मोगल किल्ल्यांतच होते. हल्ला पेशव्यांच्या सैन्यास करावयाचा होता तेव्हां मोगलांचा संबंध निजामअल्लीच्या लष्कराकडे घ्यावा. १

किल्ल्याचें आंग भिउनि फिरंग भार हा पळतो कानड्याचा। मुजरा पाहती किल्ल्याचा ॥ पाटणकर दंग, वाजे मृदंग, मांडला रंग, गोळा सुटला तोफेचा। ठाय उडाविला नायकिणीचा॥ किल्ल्यांत फिरंगी रोहिला जंगी मारितो रंग रेकल्याचा। तळ्याकडे मोर्चा भोंसल्याचा, किल्ला भेसूर शिंदे होळकर लष्कर दूर फौज त्यांची। तीन हजार सुटतो जंबूर, आग ना बरस, किल्ल्याची ॥ खबर० ॥ २

---

**किल्ल्याचें आंग भिउनि फिरंग भार हा पळतो कानड्याचा-आंग**-अंगानें, बाजूला. **भिउनी फिरंग**-तरवारीच्या माराला भिऊन. **भार**-संभार किंवा जमाव. **कानड्याचा**-कानडी शिपायांचा. **मुजरा**-नेम. **मुजरा करणें किंवा धरणें**-नेम धरणें. येथें **मुजरा पाहती**-माऱ्याची जागा पाहती. **पाटणकर दंग वाजे मृदंग....नायकिणीचा**-या ओळींना ऐतिहासिक आधार कोठेंच सांपडत नाहीं. फक्त बॉंबे गॅझेटिअर भाग २४ मध्यें १७९० मधील धारवाडच्या वेढ्यासंबंधीं खालील माहिती दिली आहे. " There was a retinue of women, including every sort of dancing girls who numbered as many as the fighting men, and there were ten times followers as many followers and fifteen times as many animals. The Maratha Camp was full of traders and craftsmen as busily employed as they were at Poona and at peace " वरील उताऱ्यांतील कलावंतिणींची संख्या अर्थातच अतिशयोक्त असली पाहिजे. सदर उतारा अस्सल कागदपत्रांवरून घेतला आहे कीं काय हें कळावयास मार्ग नाहीं. बहुधा नाहींच. या उताऱ्यांत कांहीं थोडा अर्थ आहे असें धरून चाललें तर मात्र म्हणावयास हरकत नाहीं कीं धारवाडच्या मोहिमेच्या वेळची माहिती शाहीरानें चार वर्षे आधीं झालेल्या बदामीच्या मोहिमेच्या पोवाड्यांत दडपून दिली. **भेसूर**-भयंकर. या दुसऱ्या चौकाचा बरोबर अर्थ लागत नाहीं पाटणकर कोण ? 'किंल्ल्यांत फिरंगी'पासून' तळ्याकडे मोर्चा भोसल्याचा' इत्यादि वाक्यांची पुनरावृत्ति झाली आहे **आग ना वरस**-अग्न वरस (वर्षे). २

पहांटेच्या प्रहरीं दीन शनिवारीं करुनि तयारी नानानें हल्ला नेमिली । खबर परशुरामभाऊला पाठविली ॥ भाऊचे घोडे सड बेधड गारदी पुढें बिनी धरली । हरिपंताची फौज उठली ॥ धोशा मोगल, मुधोजी भोंसले, चिमणरायाची शाही हलली । घाडग्यानें कोर धरली ॥ तीन हजार सुटतो जंबूर आगना वरस किलधाची । जाट रोहिले नीट तोफेची गांठ गांठ न पडली हैदऱ्याची ॥ खबर० ॥ ३

सडक सरदार भडकती, वीर भूमि भूमिकार गर्जिले । हस्ती तोंडावर दीधले ॥ भाऊसहित, दरवाज्यांत दारूचे बुधले घेतले । सातशें शिपाई उडाले ॥ लोक भाऊचे परशुरामाचे मोठे नेमाचे झेंडे हालले । झोर जरीपटका चाले ॥

---

दीन शनवारीं–दिन शनवारीं. नानानें हल्ला नेमिली–नाना फडणिसानें हल्ला करण्याची वेळ ठरविली. सड बेधड गारदी–भाऊचे घोडे. सड–भाऊची सडी फौज (?). बेदड–एक लढाऊ लुटारू जात. बिनी धरली–आघाडी धरली. धौंशा मोंगल–इब्राहिमखान धौंशाः निजामाचा सरदार. 'धौंशा' शब्दाचा दुसरा अर्थ नौबत किंवा साहेबनौबत असाहि आहे. 'निजामअल्लीनें' इब्राहिमखान नांवाच्या सरदाराला बहुमानार्थ ही नौबत दिली होती. सबब त्या सरदाराचेंहि धोशा अगर धौंशा असें आडनांव पडलें होतें' [खरे, चालू भाषेतील ऐ. शब्द. भा. इ. सं. मं. शके१८४० षष्ठ सं वृत्त]. चिमणरायाची शाही हलली–चिमणाबापू भोसल्याचें सैन्य उठलें. किल्ल्याची येथपासून बदामीची येथपर्यंत अक्कडकडवे किंवा धृपद धरल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ३

वीर भूमि भूमिकार गर्जिले–वीर भुभुकार गर्जिले (?). वीरांनीं भुभुक्कार केला(?) हस्ती तोंडावर दीधले–हस्ती–हत्ती–लक्षणेनें भाऊसारखे मोहरे. दारूचे बुधले घेतले सातशें शिपाई उडाले–"छ०२१रजबी ( ता. २० मे १७८६) मंदवारीं अरुणोदयास हल्ला जाहली. किल्ल्याचे पश्चिमेस एक बातेरी होती त्या सुमारें व शहर पन्ह्याचे दरवाजामध्यें व रेवणीजवळ दारवेचे बुदले किल्लेदारांनीं पुरले होते हल्ला येतांच बत्ती दिली. त्यांत लोक फार ठार जाले." [खरे, पान ४००४]. मोठे नेमाचे–निश्चयाचे, कराराचे. झेंडे हालले–

भोंसला भारी करुनि तयारी निशाण आलें अवचित । . जरीपटक्यानें केली मात ।। रण तुंबळ, घुमतें घायाळ, गणती नाहीं मुडद्यांची ।। खबर० ।। ४

शिपाई धडाधड झाले ठार, लढले दोन प्रहर हल्ला शिरला वाड्यांत । भाऊसहित हरीपंत ।। करा तलवार कापावें शहर मुलांमाणसांसहित । सातशें मुडदा गणित ।। धरलें शहर, रोहिले नेऊनि घातले बंदांत । बातमी कळली किल्ल्यांत ।। किल्ल्याचा धनी प्याला हिरकणी. आली बातमी, गोष्ट ही तिसरे प्रहराची ।। खबर० ।। ५

सवाईमाधवराव धन्याचें नांव बाबीस उमराव तीन लाख लष्कर । घेतलें बदामी शहर ।। गणित प्रहराचें सवा प्रहराचें रंजक झडली ती प्रहराची । लूट पैक्याची आणिक दिंडाची ।। सरस बासन, वजनदार पाहुणे मेले बहुत फार । रणतुंबळ घुमतें घायाळ, तुडवणी झाली परगण्याची ।। खबर० ।। ६

गेले किल्ल्यांत झाले यशवंत वर जरीपटका लाविला । कागद पुण्याला गेला ।। धनी श्रीमंत बसुनी एकांत धन्यानीं कागद वाचिला । जखमा चौहजाराला ।। नऊशें स्वार झाले ठार, ठाणें द्यावें रास्त्याला । आवाज

---

झेंडे धावून आले. **निशाण आलें अवचित**–" खंडोजी भोसले....याणी जहामर्दी बहुतशी केली निशाण किल्ल्यावर चढविलें " [ना. भो. ब. १३२]. **केली मात**–शर्थ केली. **रणतुंबळ घुमतें घायाळ**–तुंबळ रणकंदन झालें व घायाळ घुमूं लागले. ४

**हल्ला शिरला वाड्यांत**–" गावांत किल्ल्याचे खडप्यालगत आणखी एक वाडा होता त्यासहि हल्ला याच हिरिरींत चढला." [ खरे, पान ४००९ ] **बंदांत**–कैदेत, अडचणींत. **किल्ल्याचा धणी प्याला हिरकणी**–खोटें ! ५

**रंजक**–गोळागोळी. **दिंडाची**–दिंड–कापडचोपड; कापडाचे गठ्ठे. **सरस बासन वजनदार पाहुणे मेले बहुत फार**–" एकंदर भोसल्याकडील व हुजरातीकडील व नबाबाकडील मिळून आठशेंपर्यंत माणूस ठार झालें." [ खरे, ४०९४]. **बासन**–किल्ला. **वजनदार पाहुणे**–मातबर लढाऊ लोक [ खरे, पान ४११५ टीप १ ]. **तुडवणी झाली परगण्याची**–तुडवणी–दुर्दशा; नाश.

**ठाणें द्यावें रास्त्याला**–" बेहेऱ्यांच्या फौजेंत रास्ते होते त्यांसहि नानांनीं

तोफेचा केला ॥ राघुकवि दया असूं द्यावी, पोवाडा थोडासा केला। आमचें राहणें मुंगवड्याला ॥ आम्ही क्षेमान पेठचे राहणार। आमची मिराम वाईची ॥ खबर १॥ ७



बदामीस बोलावून आणिलें होतें." [खरे, ४००३]. येवढाच ऐतिहासिक आधार आहे. काबीज केलेल्या या किल्ल्यावर रक्षणाकरितां रास्ते ठेवले असतील; पण त्याला आधार सांपडला नाहीं. ७

# परशुरामभाऊची कर्नाटकावरील स्वारी

श्रीरंगपट्टणच्या मोहिमेच्या पूर्वार्धांत परशुरामभाऊंनीं धारवाड काबीज केलें.

नाना फडणवीस यांजकडून जरूरीचें बोलावणें येतांच भाऊ ता. १८ मार्च १७९० रोजीं तासगांवाहून निघाले व पुण्यास दुसरे दिवशीं पोंचले. तेथें खलबतें होऊन भाऊ नको नको म्हणत असतां वरील मोहिमेवर त्यांची योजना झाली. त्यांचे बरोबर रास्ते, प्रतिनिधि, कृष्णराव ( गणपतराव ) मेहेंदळे, इत्यादिकांची मिळून २५००० फौज देण्याचें ठरलें. इंग्रजांचीं दोन फलटणें कॅप्टन् लिटलच्या हुकमतीखालीं असलेलीं येऊन मिळावयाचीं होतीं.

श्रावणांत कृष्णा उतरून भाऊंनीं टिपूच्या मुलुखांत हंगामा सुरू केला. त्यांनीं धारवाडच्या किल्ल्याला वेढा घातला. त्या किल्ल्यांत टिपूचा बद्रीज-मालखान नांवाचा शूर सरदार होता. त्याच्याजवळ दहा हजार पायदळ, दोन हजार स्वार व पुष्कळ तोफा असा सरंजाम होता. शिवाय किल्ल्याची शिबंदी म्हणून निवडक ३००० माणूस होतें ते वेगळेच. धारवाडचा किल्ला मूळचाच बळकट असून टिपूनें अलीकडे सात लक्ष रुपये खर्चून त्याची चांगलीच मजबुती केली होती. धारवाडचा किल्ला साधारणपणें गोलाकृति असून त्या सभोंवतीं दोन कोट व दोन खंदक होते. खंदकाची रुंदी व खोली २५।३० फूट असून कोटाच्या भिंती चांगल्या मजबूत होत्या व ठिकठिकाणीं बुरूज बांधून आणि माऱ्याच्या जागा तयार करून त्यावर तोफा ठेवल्या असल्यामुळें किल्ल्यांत प्रवेश करणें मुष्कील होतें. आंतल्या कोटांत आग्नेय कोपऱ्यास फत्ते बुरूज असून त्यावर टिपूचें निशाण फडकत होतें.

भाऊंनीं लवकरच आपली फौज किल्ल्याच्या सभोंवतीं दहा कोसपर्यंत फैलावून शत्रूस दाणावैरणीची टंचाई पाडली.

भाऊंनीं नरेंद्राचा मुक्काम सोडून धारवाडपासून एक कोसावर नवलूर येथें मुक्काम पाडला व किल्ल्यास मोर्चेबंदी खरी सुरू झाली. किल्ल्याजवळ-च्या मैराळ टेकडीवरून शत्रु नेमके तेथेंच नेम धरून गोळे टाकीत असतांही भाऊ मोर्च्यांची पाहणी करीत.

मोर्च्यांचे कामास सुरुवात झाल्यानंतर तिसऱ्याच दिवशीं शत्रूशीं एक मोठी लढाई झाली. शत्रूनें किल्ल्यावरून, पेठेंतून व बातेऱ्यांतून तोफांचा मारा फारच केला. त्यानें मैराळ टेकडीजवळच तीन तोफा आणून तोफांचा भडिमार केला. ते समयीं भाऊंचा नारायणराव बाबर हा मातबर पथक्या गोळा लागून पडला. भाऊ कष्टी झाले व हट्टास पेटून कॅप्टन लिटल यास ते म्हणाले, 'नारायणजी बाबरासारखा मनुष्य जाया होऊन काम कांहींच न झालें तर तें ठीक नव्हे. खामखा आम्हांपुढें तोफा आल्या आहेत त्या पाडाव कराव्या. तुम्ही करीत असल्यास बरें. नाहींतर आम्ही गाडदी उठवितों आणि फौजाही उठवितों'. त्यानेंही तोफांचा पाड काय असें म्हणून फक्त सहाशें लोकांची लेन उठवून विलक्षण जवामर्दीनें त्या काबीज केल्या. भाऊंच्या फौजेनें घोडीं घालून शत्रूचे लोक पेठेच्या दरवाज्यापावेतों मारीत नेले.

१३ डिसेंबर रोजीं भाऊंनीं महाशौर्यानें पेठेवर हल्ला केला व ती घेतली. नंतर तिचीं भिंताडें पाडून व बातेऱ्या जमीनदोस्त करून खुद्द किल्ल्यास आतां मोर्चेबंदी केली. त्यामुळें शत्रूचा प्रसार बाहेर मुळींच राहिला नाहीं.

भाऊचे मोर्चे चालतां चालतां रेवणीपर्यंत भिडले. तेव्हां शत्रूनें त्यावर आंतून अत्यंत तारफेची तोफेची मारागिरी केली. "मोर्चा जसजसा पुढें जातो तशा तशा तोफा उतरून मोर्च्यावर मार देतात. कदाचित् खंदकांत लोक शिरले तरी तोफेची मारागिरी करावी असा बेत आहे." ता. ८ मार्च रोजीं एक जोराची झटापट झाली. ता. २५ मार्च रोजीं मोर्च्यातील लोकांनीं रेवणी व खंदक काबीज केला. पण आंतील लोकांनीं खंदकांतून मोर्च्यापर्यंत सुरुंग खणीत आणून त्यास बत्ती दिली. तो वायफळ उडला, हें सुदैव. पण अशी कांहीं किल्लेकऱ्यांनीं शिकस्त केली. शेवटीं बद्रीजामालखान किल्लेदार टेकीस आला. त्याचें धान्य सरलें. दारूगोळा संपला, पाणी मिळेना, कुमक येईना, तेव्हां शेवटीं सात महिन्यांच्या कडोविकडीच्या सामन्यानंतर त्यानें किल्ला खालीं करून दिला.

# परशुरामभाऊची कर्नाटकावरील स्वारी

## १८

[ शाहीर—नारो त्रिंबक ]

[ चाल—दो दिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुनि मजा । ]

पटवर्धनकुळीं फत्ते तलवार परशुरामभाऊची । म्हणवून दिलीं वस्त्रें स्वारी नेमिली कर्नाटकची ॥ ध्रुपद ॥

तक्त दक्षिणेमधिं एक शहर पुणें अजब नमुना । बादशाही तक्तांत राव-श्रीमंत आहे नाना ॥ नित्य हमेषा झडे चवघडा बाजे नौबत खनखना । बुद्धिवंत ते राव भले रणशूर रणीं हाटना ॥ श्रीमंतानें हुजुर जासुदा जोडी केली रवाना । तासगांवीं पोंचले भाऊसाहेब मुजरे घेना ॥ (चाल) । लाखोटे टाकिले वाचूं लागले भले उमराव ॥ भाऊचें चौखंडामधिं नांव । ज्यानें निशाणीं घातला घाव ॥ मिळाली स्वारी सोडला गांव । (चाल) ॥ तोफेचा भडिमार, मिळाले लहान थोर । झाला त्या दिवशीं गजर ॥ झाला जयजयकार ।

---

फत्ते तलवार—विजयी तलवार; विजय मिळविणारी. दिलीं वस्त्रें—निरोप समयीं ........मजला वस्त्रें व कंठी दिली'. [ परशु.भा.चें पत्र, खरे, पान ४३२७ प. नं. ३१९१ ]. तक्त दक्षिणेमधिं०—दक्षिणेंत एकच बादशाही आहे आणि ती म्हणजे पेशव्यांची होय. नाना—जाणा (?) नानाच घेतले तर नाना फडणीस. बाजे—वाजे (?) नित्य हमेषा चौघडा वाजे. हुजुर—स्वतःची. जासुदाजोडी—जासूदजोडी. मुजरे घेना—त्यांनीं मुजरेदेखील घेतले नाहींत. तर आधीं श्रीमंतांचे लाखोटे घेऊन वाचले. लाखोटे पुढें टाकिले—पत्रें दिलीं "कर्नाटकांतील सरकारी व जहागिरींतील वगैरे ठाणीं बिघत मकाण टिपू सुलतान यानें घातलीं. त्याजवर मसलत करण्याचे विचाराकरितां सन मजकूर सन तिसैन मय्या व अल्लफांत ती ॥ परशुरामपंत भाऊसाहेब यांस सरकारचें बोलावणें आल्यावरून पुण्यास गेले." [ खरे, पान ७३५० ] उमराव—सरदार ( भाऊसाहेब ). ज्यानें निशाणीं घातला घाव—निशाण, निसाणू—नगारा. ज्यानें कुचाचा नगारा केला. मिळाली स्वारी—फौज

श्रीमंतांशीं भेटले सांगूं लागले गोष्ट जिवींची ॥ हुकूम रावसाहेबाला खोड मोडावी टिपूची । पटवर्धन० ॥ १

दिला भरजरी पोषाग निशाण चौघडा बक्षीस हत्ती । बावन पागा त्याचेबरोबर कशी मुजरा झडती ॥ राऊत गाडा शिपाई घोडा लढाई घेऊं म्हणती । छत्रपतीचा भगवा झेंडा वैरी दूर पळती ॥ जरीपटक्याशीं घेऊनि निघाले सेना गुण घेति । परशुराम अवतार भाऊला प्रसन्न गणपती ॥ (चाल) मुक्काम कृष्णातिरीं धारवाडावरी करा हल्ला ॥ भाऊसाहेबानें चढ दिल्ला । अवघड गड बाका किल्ला ॥ किल्ल्याचे भवतालीं अमराई गर्द बसली । झाडें किरमिची ठसली, त्याला दुरून फौज दिसली ॥ फत्तेबुरजावरून गोळा मारितो लढाई दोघांची । टक्कर खाऊन पेठ रगडली शर्यत भाऊची ॥ पटवर्धन० ॥ २

धुमधडाका हमेष होतो किल्ल्या भवतालीं । तोफेच्या दणक्यानें राव कैकांचा धर सुटला । मेघश्यामबापूचा पुत्र भाऊ निशाणीं चढला । उडी

जमली; सरंजाम जमला. (२) स्वारी करण्याची चाकरी मिळाली; अधिकार मिळाला, हुकूम झाला. १

**मुजरा झडती**—हजारों लोक मुजरे करितात. **राऊत**—घोडेस्वार **गाडा**—गाढा (?). धीट, शूर; पक्का. **सेना गुण घेती**—ज्याचे गुण सैनिक घेतात, वानतात, कौतुक करतात (?). **चढ दिल्ला**—चढ देणें—सल्ला देणें, मसलत देणें; उत्तेजन देणें. **गडबाका**—गड वाका. **बाका**—बळकट, असाध्य. तो किल्ला एकाद्या गडासारखा म्ह० पहाडी किल्ल्यासारखा बळकट किंवा असाध्य होता. **झाडें किरमिची ठसली**—किरमिची झाडें लागून गेलीं होतीं. **पेठ रगडली**—पेठ मारून काढली; हल्ला करून घेतली. **शर्यत**—शर्थ; पराक्रम. **धर सुटला**—शिस्त सुटली. २

**भाऊ**—जनार्दन मेघश्याम पटवर्धन. परशुरामपंतभाऊंच्या चुलत भावाचा मुलगा. "चि० जनार्दनभाऊ यास मानेंत गोळी लागली. तो ठारच झाला. ईश्वरें बहुत अनुचित केलें." [परश.भा.पत्र खरे, पान ४४०५]. **निशाणी चढला**-निशाणीं चढणें असा वाक्प्रचार व त्याचा अर्थ कोशांत सांपडत नाहीं. पण निशाणीं घाव घालणें असाच त्याचा अर्थ असावा. **निशाणीं घाव घालणें**—

घातली रणांत रणशूर हाटून तटून पडला। धायगुडे, थोरात पांढरे लगड होते बिनीला। सहा महिने झुलविले किल्लेदारानें मार बसविला ॥ (चाल) ॥ पुढें ऐका समस्त लोटली सेना दलभार। देवडीजंबुऱ्याचा मार॥ किल्ला त्यांनीं केला जर्जर। सुटती बाणावर बाण॥ कैकांचे घेतले प्राण। मुडद्यावर मुडदे चार, झाडी तोडून केलें मैदान॥ त्यासमयीं झाली गर्दी दुसरी हल्ला किल्याची। गोळे मारून केले घाबरे जोत जरिपटक्याची॥ पटवर्धन०॥ ३

चवतर्फी केली हल्ला किल्लेदाराची शुद्ध हरली। फिरंग्यानें तोफ डागिली फत्तेबुरजावरूनी॥ तिळतिळ तुकडे उडूं लागले मग घासत पडली। रणामधिं रणशूर ते कशी रंजक झडली॥ (चाल)॥ लाखों सेनेमधिं कधिं सुरमर्द झाकेना। कृष्णराव बुद्धिवंत शहाणा॥ मारी तलवार हटकून प्राणा। वाजल्या तोफा दणदणा॥ करुणा ईश्वराला॥ (चाल)॥ अवचित गोळा आला मस्तक छेदूनि गेला। धड पडले धरणिला पुत्रशोक करूनि गोष्ट ऐकिली सरदारांची॥ रणांत रणशूर थोर हिम्मत है राव दादाची॥ पटवर्धन०॥ ४

To make a rush upon the colors (of the enemy) [ Mols ]. धायगुडे–हरबाजी नरसिंगराव धायगुडे[खरे,पान४४६३] पांढरे–[खरे,४३५८]. लगड–आडनांव. २ ससाणा. ससाण्यासारखे शूर. बिनीला–आघाडीला. सहा महिने झुलविले–या पोवाड्याची प्रस्तावना पहा. देवडी जंबुऱ्याचा मार–जंबुऱ्याचा देवडी मार. देवडमार व जंबुरा या दोनहि शब्दांचे अर्थ मागें इतरत्र आले आहेत. मुडद्यावर मुडदे चार०–मैदान करण्याकरितां झाडी तोडावी त्याप्रमाणें अनेक लोक मारले गेले. एकेकावर चार चार मुडद्यांचा खच पडला. दुसरी हल्ला–पोवाडावाङ्मयांत हल्ला हा शब्द नेहमीं स्त्रीलिंगी वापरतात. जोत जरी पटक्याची–ज्योत–तेज, प्रकाश. गोळे मारून जरिपटक्याच्या फौजेची होळी केली (?). ३

रंजक झडली–गोळागोळी, तोफा बंदुकांची मारगिरी. कृष्णराव(?). ४

किल्ल्याहून तोफा होतो भडिमार। ह्या तोफखान्याची आहे इभ्रत फार॥ एक गोळा नेऊन केला थंडगार। जोखून पाहिला पक्का बारा शेर॥ (चाल)॥ किल्लेदार सांपडला कैद केला भाऊनें। बसविलें पेशव्याचें ठाणें॥ हजार पांचशांचा बंद धरून। कापून काढिले पार॥ रक्ताचे वाहिले पुर। गेले तुंगभद्राचे पार॥ पुढें भारी युद्ध होणार। नारो त्रिंबकाकडे रंगेल जोडी मौजेची॥ खिनांत ज्यानें खोड मोडली सिद्याभवान्याची॥ पटवर्धन॥ ५



---

बंद–जमाव. पुढें भारी युद्ध होणार–धारवाडचा हल्ला ही नुसती मोहिमेची सुरुवात होती. ५

# रंगाचे पोवाडे

रंगाचे हे दोन पोवाडे महाराष्ट्रांतील अत्यंत प्रसिद्ध अशा दोन शाहिरांनीं रचलेले आहेत. हे दोनही पोवाडे रंगानंतर थोडेच दिवसांत भर दरबारांतून गाऊन घेतलेले आहेत असें त्या त्या पोवाड्यांतील शेवटच्या चरणांवरून दिसतें. प्रभाकर म्हणतोः "महादेव गुणिराज फेकिती तान तनन दरबारांत। प्रभाकराचें कवन पसरलें सहज शतावधि नगरांत" होनाजी म्हणतोः "होनाजी बाळा पदरचा आहे किंकर। विज्ञप्ति श्रुत करितो जोडुन कर॥ अक्षइ असावी कृपा सेवकावर। धनी बक्षीस देणार॥"

विश्वसनीयतेसंबंधीं पाहतां दोन्ही पोवाडे ऐतिहासिक माहितीशीं फारच मिळते आहेत. पण त्यांतल्यात्यांत पहावयाचें तर प्रभाकरांत तपशील अधिक असून रंगाची स्वारी निघाल्यापासून परत वाड्यांत येईपर्यंतची हकीकत फारच सुंदर व सुसंगत दिली आहे. तशी होनाजी देत नाहीं. त्याचें वर्णन संक्षिप्त आहे.

काव्य या दृष्टीनें पाहिल्यासहि प्रभाकराच्या पोवाड्यापुढें होनाजीचा हिण-कसच ठरतो. सहज साधलेलें पदलालित्य, अर्थानुकारी शब्दाची वेंचक व उचित योजना, हुबेहुब चित्र डोळ्यांपुढें उभें करण्याची हतोटी, आणि हें सर्व साधूनहि प्रसादाची प्रसन्नता कायम ठेवण्यांत दाखविलेलें चातुर्य यांचा प्रभाकराचा पोवाडा एक उत्कृष्ट नमुना आहे. "हौद हंडे पुढें पायदळांतरिं पाउस पडे पिचकाऱ्यांचा। धुमाधार अनिवार मार भर बंबांच्या फटकाऱ्यांचा" या दोनच चरणांत कसा जोरावर रंग झाला याचें हुबेहुब चित्र सांठविलें आहे. त्याचप्रमाणें "सलाम मुजरे सर्व राहिले राव रंगाच्या छंदांत। हास्यवदन मन सदय शोभलें शूर शिपाईवृंदांत॥ दोहों दोहों हातिं भर मुठीं, दिल्हें छत लाल दिसे खुब बुंदांत॥" .."हरिपंत तात्यांनीं उडविला रंग केशरी अनिवार हास्यवदन राजेंद्र मुखावरि शेला लाविती वारंवार" हें महाराष्ट्राच्या बाळराजाचें वर्णन किती समर्पक व स्वाभाविक आहे!

## पाठभेद

### पटवर्धन-प्रत

श्रीमंतास करभार देउन आले शरण रिपू पृथिवीवरले।

आणुनि मरातब बाच्छाई वजिरातीचे। केले महोच्छाव खुब मोठ्या गजरातीचे ॥

बहुत होती दळभारांत।
मधें मुख्य अंबारि झळाळित।
हौद हंडे पुढें पायदळांतरिं।
गुलाल गर्दा पेल दुतर्फा।
तक्तराव जिलेवंत नाचती—
सभांगना आनंदांत।
धादांत
रस्त्यांत
किति भरले गुलालें चौक ओटे बंगले
सुगरांत
कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करित
इटे
डिमदारींत
भले भले एकांडे मधें घोडे घालती
आवंतर
समस्त यादव परिवार
हर्ष होउन राजेन्द्र झाकिती शरिरानन वारवार
सहज शतावधि नगरांत

### शाळिग्राम-प्रत

देति मग कारभार श्रीमंताशीं शरण आले नृप पृथिवीवरले।

करुनि मराठी पोषाक खुप जरतारीचे। नित्य नवे महोत्साह होती खुप गजरातीचे ॥

नित्य होती दरबारांत।
पुढें मुख्य अंबारि झळाळे।
हौदापुढें आणि पायदळांतरीं।
गुलाल जरदा पल्ले दुतर्फा।
तक्त रावें झिल पेच नाचती-
सगुणनार आनंदांत।
धारांत
रस्त्यांनि
कितिएक भराविले गुलालानें चौक बंगले
हुजऱ्यांत
कोतरा नद कोतवाल वाटला मग ते मस्तकीं लकारींत
हटे
डमदारींत
भले भले घोडे खंदामधें घालिती
अवतार
यादव मिळाले दळभार
हास्यवदन राजेन्द्र मुखावरि मेला लाविती वारंवार
सहज सभोंवतीं शहरांत

प्रभाकराचा हा रंगाचा पोवाडा कै० इ. सं. पांडोबा पटवर्धन यांनीं संशोधित केलेल्या " अस्सल बाडावरून " घेतलेला आहे. शाळिग्रामांचे पाठ एकदोन ठिकाणीं सरस वाटले तेच स्वीकारले आहेत.

## ऐतिहासिक माहिती

१

महादजी शिंदे याणी रंगाचा समारंभ करण्याची तरतूद केली, शहरातही रस्तोरस्ती रंगाचे बंबाची वगैरा तयारी जाहाली. सिंदे यांची स्वारी बरोबर आजमासे दाहा पधरा हवदे रुप्याचे व रंगाचे बंबाचे गाडे व गुलालाचे छकडे असे बरोबर घेऊन आली. सिंदे सरकारचे वाड्यात गेले. श्रीमंताची स्वारी नाना फडणीस व हरीपंत तात्या वगैरा मुछदी व सरदार मानकरी सुद्धा निघाली. यच्यावत पोषाख सफेत. श्रीमंत आंबारीत बसले. नाना फडणीस हे दुसरे आंबारीत बसले. वरकड हवद्यांतून. खासा स्वारी दिली दरवाज्याचे बाहेर आल्यानंतर फौज वगैरा होती त्याजवर बंबास नेऱ्या लाविलेल्या महादजी सिंदे याणी हातात घेऊन रग उडविला. श्रीमंताचे आंबारीपुढे नख्तरावा, त्याजवर कळावंतीणीचा नाच. श्रीमंताची स्वारी सरकार वाडा डावा घेऊन मेहुणपुऱ्यांतून ती ॥ परशरामपंत भाऊसाहेब यांचे वाड्याचे पुर्वेच्या रस्त्याने आपा बळवंत याचे घराकडून बुधवारच्या रस्त्यास मिळून कैलासवासी गोविंद सिवराम खासगीवाले यांचे वाड्यापुढे चावडी आहे त्या वाटेने शुक्रवारातून वेताल पेठेकडून आदितवारातून कुंभारखाणीकडून नदीचे पलीकडे भांबवडे यांचे अंगास सिंदे यांचे डेऱ्यास गेली. श्रीमंतास वस्त्रे दिल्ही. शहरातून स्वारी गेली त्या समई रस्तोरस्ती स्वारीवर बंबाने रंग उडविला व गुलाल या प्रे ॥ रंगाचा समारंभ जाहाला पुर्वी श्री कृष्णावतारी रास जाहाला ते वर्णन भागवती केले आहे तद्वत समारंभ जाहाला.

—मराठी दसर रुमाल २ रा
—भट पेशवे घराण्याची हकीकत, पान ११९

— २ —

हा रंगाचा समारंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेस झाला. " तेव्हां समस्त कारभारी, मुत्सद्दी, सरदार, मानकरी व पागे बसले होते तितक्यांचा रुकार रंगाविषयीं पडला. पाटीलबोवांस आज्ञा झाली कीं रंगाची तयारी करावी. वाड्यांत रंग करावयाची आज्ञा खासगीवाले यांस झाली. खेरीज ज्या रस्त्यानें स्वारी जावयाची त्या रस्त्यानें कारभारी व मुत्सद्दी व सरदार व पागे होते तितक्यांस सरकारची आज्ञा झाली कीं इतक्या मंडळींनीं तुम्ही रंगाची तयारी आपापल्या ठिकाणीं करावी. त्यांत हरिपंत तात्या फडके, माधवराव रास्ते यास आज्ञा कीं, " तुम्ही दोहो ठिकाणीं रंग मोठा करावा." अशी आज्ञा सर्वांस होऊन दरबार बरखास्त झाला. पाटीलबोवा आज्ञा घेऊन वानवडीस गेले. मग शिंदे यांणीं तयारी रंगाची आपले लष्करांत केली. तसेंच ज्या ज्या रस्त्याचे लोकांस आज्ञा झाली त्यांणींही आपले ठिकाणीं रंगाची तयारी दुरुस्ता केली. तसेच शिंदे यांचे लष्करांत रंगाची तयारी केली. खेरीज जागोजागीं वाटेनें सरकारचे व शिंदे यांजकडील हौद भरून ठेवले. गुलालाची तयारी झाली. सरदार आणि मानकरी व पागे, पथके, शिलेदार, एकांडे मुत्सद्दी आणि मानकरी व कारकून मंडळी असे तमाम तयार होऊन वाड्यापाशीं आले. तशीच सर्व फौज व हत्ती आणि सांडणीस्वार असे तयार होऊन उभे राहिले. सरकारचीही निघण्याची तयारी झाली. निघावयाचे वेळेस वाड्यांत थोरल्या चौकांत बिछायत करून सरकारची स्वारी येऊन तेथें बसली. त्या वेळेस नाना तात्या व आपा बळवंत असे सर्व लहान थोर येऊन दाखल झाले. वानवडीहून महादजी शिंदे तयार होऊन सरकारची स्वारी न्यावयास आले. असे समाज वाड्यांत मिळाले.

" तेथें रंग खेळावयास प्रारंभ झाला. त्या रंगाची वर्णना किती करावी ? हजारों गुलालगोटे उडूं लागले. रंगाचे बंब चालूं लागले. तसाच गुलाल खंड्याचे खंड्या वाड्यांत उडाला. असा रंग खेळून सरकारची स्वारी सायंकाळचे दहा घटका दिवसास वानवडीस जाण्यास अंबारींत बसून खवासखान्यांत महादजी शिंदे व आपा बळवंत पाठीमागें बसले. वाडा डावा घालून, सरकारची स्वारी बुधवारांतून, कापड आळीनें आदितवारांत हरिपंत तात्यांचे वाड्यापाशीं येईतोंपर्यंत वाटेनें सरकारचे लोकांनीं रंग करून

ठेविला होता, त्यांनीं एकच गर्दी रंगाची केली. तसेंच हरिपंत तात्यांचे वाड्यापाशीं स्वारी आल्यानंतर तेथें दोन घटिकापर्यंत रंगाचा मार झाला. त्या रंगाच्या योगानें रस्त्यानें चिखल पडला. व शेंकडो पल्ले गुलाल उधळला. असा दोन घटिका येथें रंग खेळून सरकारची स्वारी पुढें रंग खेळत चालली. शेंकडों पल्ले गुलाल हत्तीवर ठेविला होता तो रस्त्यांत उधळीत चालले. असे नाकझरी उतरून रास्ते यांचे पेठेंतून चालले असतां, तसे खेळत रास्ते यांच्या वाड्यापाशीं आले. तेथें रास्ते यांनीं रंगाचा समारंभ केला. गच्चां-वरून रंगाचे बंब उडूं लागले. तेव्हां स्वारीमध्यें जसा पर्जन्य पडतो असा रंग पडूं लागला. दोन घटिका तेथें रंग खेळून वानवडीस स्वारी दाखल झाली.

"मग जेथें श्रीमंत बसावयाची जागा केली होती येथें ते जाऊन बसले. तेव्हां झाडून सरदार व मानकरी व पागे व मुत्सद्दी व कारकून त्या कचेरीस येऊन बसले. बसल्यानंतर दोन घटिकापर्यंत नाच व गाणें झालें. नंतर रंग खेळावयास प्रारंभ झाला. रंग खेळतां खेळतां रंगाचे पाट नदीस मिळाले असा रंग द्वापारयुगीं श्रीकृष्ण भगवान् खेळले. तसा कलियुगीं श्रीमंत सवाई माधवराव खेळले. असा कोणी पुढं खेळावयाचा नाहीं, व मागेंही कोणी खेळला नाहीं. रस्त्यांमध्यें गुलालाचा पेर व रंगाचा चिखल झाला तो किती गणतीस धरावा !

"मग अवघ्यांचीं स्नानें झाल्यानंतर ज्या कचेरीस रंग खेळले त्याच मख-माली डेऱ्यांत फरास यानें येऊन, ती बिछायत काढून, नवी बिछायत घालून तयारी केली. सर्व मंडळी लहानथोर स्नानें करून, नवीन वस्त्रें घेऊन येऊन कचेरीस बसली. मग नाचास प्रारंभ झाला. मग महादजी शिंदे यांनीं श्रीमंतास सर्व पोषाग जवाहीर शिरपेंच व तुरा वगैरे गळ्यांत मोत्यांच्या माळा असा दिला. तसेच सर्व कारभारी, मुत्सद्दी व कारकून मंडळी व शिलेदार लोक व मानकरी व हुजरातेचे लोक व पागे, पथके असे सर्वांस शिंदे ह्यांनीं पोषाग वांटून नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब, हार तुरे गजरे दिले. इतका समारंभ होईतों तीन घटिका रात्र झाली. मग सरकारची स्वारी पुण्यास या-वयास निघाली. तेव्हां हजार पांचशें दुशाका हत्तीवर लावून मोठ्या थाटानें स्वारी मोठ्या डौलानें चालली. ज्या समयीं स्वारी माघारी आली त्या समयीं शहरांत दुरस्ता चिराकदानें करून, लोक आपापल्या माड्यांवरून दिवे लावून तमाशा पहावयास उभे राहिले. [ पे. द. ]

# सवाई माधवराव—रंगाचा पोवाडा

## १९

### [ शाहीर—प्रभाकर ]

[ **चाल—जय शिवलिंगा मस्तकीं गंगा पार्वतीला चोरून ठेविलें ।**
**ज्या गंगेनें जग उद्धरलें त्रैलोक्यामधिं नाणवलें ॥**
**चाल दुसरी—भरजरी पैठणचें पातळ लफा घे त्याचांची खबर ॥** ]

जसा रंग श्रीरंग खेळले वृंदावनिं द्वापारांत । तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगांत अति आदरांत ॥ ध्रु० ॥

धन्य धन्य धनि सवाई माधवराव प्रतापी अवतरले । कीर्त दिगंतरीं करून कुळांतिल सर्व पुरुष पहा उद्धरले ॥ एकापरिस एक मंत्रि धुरंधर बुद्धिबळें शहाणे ठरले । दौलतिचा उत्कर्ष दिसंदिस नाहिं दरिद्री कुणी उरले ॥ शालिवाहन शक नर्मदेपावत जाउन जाळिं घोडे विरले । श्रीमंतांस करभार देउन आले शरण रिपू पृथ्वीवरले ॥ (चाल) ॥ महावीर महादजीबावा हुजरातीचे ॥ आणुनि मरातब वाच्छाई वजिरातीचे ॥ केले महोच्छाव खुब मोठ्या गजरातीचे ॥ (चाल) ॥ तऱ्हे तऱ्हेचे ख्याल तमाशे बहुत होती दळभारांत । श्रीमंतांचा संकल्प हाच कीं रंग करावा शहरांत ॥ १

कल पाहुन मर्जिचा बरोबर रुकार पडला साऱ्यांचा । सिद्ध झाले संपूर्ण पुण्यामधें बेत अधिक कारभाऱ्यांचा ॥ मधें मुख्य अंबारि झळाळित मागें थाट अंबाऱ्यांचा । चंद्रबिंब श्रीमंत सभोंवता प्रकाश पडला ताऱ्यांचा ॥ हौद हांडे पुढें पायदळांतरीं पाउस पडे पिचकाऱ्यांचा । धुमाधार अनिवार मार

---

अति आदरांत—अतिशय हौसेनें. दिसंदिस—दिवसेंदिवस; उत्तरोत्तर. विरले—न्हाले. करभार—खंडणी. मरातब—मरातीब—बहुमान किंवा पदवी. खुब—खूप. गजरातीचे—कडाक्याचे. दळभारांत—शिपायांच्या सैन्यांत. ख्यालतमाशा—नाचरंग; चैन, विलास. १

धुमाधार—धो धो. अधिक—श्रीमंतांची मर्जी आणि सर्व लोकांची सिद्धता

भर बंबांच्या फटकाऱ्यांचा ॥ (चाल) ॥ नरवीर श्रेष्ठ कुणी केवळ कृष्णार्जुन ॥ वर्णिती भाट यश कीर्ति सकल गर्जुन ॥ चालली स्वारि शनवार पेठ वर्जुन ॥ ॥ (चाल) ॥ घरोघरीं नारी झुरुझरुक्यांतुन सजुन उभ्या शृंगारांत । गुलाल गर्दा पेल दुतर्फा रंग रिचविती बहरांत ॥ २

सलाम मुजरे सर्व राहिले राव रंगाच्या छंदांत । हास्यवदन मन सदय शोभलें शूर शिपाईवृंदांत ॥ दोहों दोहों हातीं भरमुठीं दिल्हें छत लाल दिसे खुब बुंदांत । रक्तराव जिलेवंत नाचती सभांगना आनंदांत ॥ सुदिन दिवस तो प्रथम दिसाहुन शके सत्राशे चवदांत । परिधावी संवत्सरांत फाल्गुन वद्य चतुर्दशी धारांत ॥ (चाल) ॥ बाळाजि जनार्दन रंगामधे रंगले ॥ रंगाचे पाट रस्त्यांत वाहुं लागले । किती भरले गुलालें चौक ओटे बंगले ॥ (चाल) ॥ कुलदीपक जन्मले सगुणी गुणी महादजीबाबा सुगरांत । पराक्रमी तलवारबहाद्दर मुगुटमणी सरदारांत ॥ ३

भोतगाडे रणगाडे गुलालें भरुन चालती स्वारींत । गुलाल गोटे शिवाय

---

आणि त्यांत नाना फडणीसांची तरतूद इतका अर्थ अधिक या शब्दांत आहे. बंब–वेळूची मोठी पिचकारी. वर्जुन-ओलांडून. झुरुझुरुका–खिडकी किंवा झरोका. गुलाल गर्दा–कुसुंब्याचा गरदा; लाल कुसुंबी रंग. पेल–फैल; फेल, मारा. रंग रिचविती–रंग फेकती; रंग खेळती. २

छंदांत-नादांत. भरमुठी–भरी मुठी असें असावें. दिल्हें छत लाल दिसे खुब बुंदांत–बुंद–(वि०) सुरेख, अतिशय. [आपटे]. तक्तराव–गाड्यावरील फिरत्या चाकावर घातलेला नाचणाऱ्या कलावंतिणींचा ताफा. जिलेवंत–शोभिवंत [पट०] शाळि० पाठ–तक्तरावे झिलपेच नाचती सुगुण नार आनंदांत. सभांगना–कलावंतिणी. सुगरांत–सुगर–चतुर, कुशल. ३

भोत–थैला, पिशवी, पोतें. गुलालगोटा–कागदाचा किंवा अभ्रकाचा किंवा अतिशय पातळ कांचेचा चेंडू ज्यांत गुलाल भरलेला असतो. तो अंगावर

ठिवले निरनिराळे अंबारींत ॥ आपापळवंतराव खवाशित चौरि मिजाजित वारीत। लाल कुसुंबी रुमाल उडती घडोघडी मेरफगारींत ॥ कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करित। बल्लम बाण बोथाड्या इटे लगी वाद्यघोष डिमदारींत ॥ ( चाल ) ॥ भले भले एकांडे मधें घोडे चालतीं। बारगीर बिनीवर ध्वज रक्षित चालती ॥ संपूर्ण भिजिवले जन रंगाखालतीं ॥ ( चाल ) ॥ वेत्रपाणि वारिती तरी झालि गर्दी मोठि बुधवारांत। झुकत झुकत समुदाय सहित निट स्वारि आली रविवारांत ॥ ४

आधिंच पुणें गुलजार तशामधें अपूर्व वसला आदितवार। त्यांत कृष्ण श्रीमंत आवंतर समस्त यादव परिवार ॥ हरिपंत तात्यांनीं उडविला रंग केशरी अनिवार। हास्यवदन राजेंद्रमुखावरि शेला लाविती वारंवार ॥ पाटिल बावानीं नेउन शिबीरा रंग केला जोरावार। वस्त्रें देउन किनखाब वांटिले ठाण कुणाला गजवार ॥ ( चाल ) ॥ उलटली स्वारी मग महिताबा लाउनी ॥

---

फेकला असतां फुटून अंगावर गुलाल उडतो. खवाशी–खवासखाना. हत्तीवर अंबारीच्या मागें खिजमतगाराची बसण्याची जागा. मिजाजित–मिजासींत, ऐटींत, दिमाखांत, डौलांत. मेहेरपगारी–मेहेरप–कमान अंबारीची. कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करित–कोतल–A led horse A horse kept for show only. ( हिं. कोश ).—कोतवाल घोडा. नर–घोडा. [आपटे]. वारण–हत्ती, मगनमस्त–मस्त. किल करित–वास्तविक किलकरीत किंवा किलकारीत असें पाहिजे. किलकारी किंवा किल्कारी–(हिंदी) Snarling, sound expressing joy, shout. भावार्थ. कोतवाल घोडे व मस्त हत्ती आनंदानें हिंसू व चीत्कारूं लागले. शालिग्राम पाठः—कोतरा नद कोतवाल वाटला मग ते मस्तकिं लकारीत. बल्लम–बल्लमवाले. डिमदारींत–डिंभदारीत. डिंभ (हिं.) गर्व किंवा ऐट. भावार्थ ऐटींत, डौलांत. ४

आवंतर–अवांतर; निराळें; त्याशिवाय. पाटिलबोवांनीं नेऊन शिबिरा रंग केला जोरावर–वांटिले ठाण कुणाला गजवार–कुणाला ठाणभर, कुणाला गजभर, कुणाला वाटेल तसें अशीं सणगें दिलीं. महिताबा–महताबा; चंद्र-

कुरनिसा करति जन बाळ्यामधें जाउनी ॥ दाखवी पवाडा गंगु हैबती गाउनी ॥ ( चाल ) ॥ महादेव गुणिराज फेंकिती तान तनन दरबारांत ।
प्रभाकराचें कवन पसरलें सहज शतावधि नगरांत ॥ ५



---

ज्योती दारूकाम. कुर्निसा–मुजरा. शतावधि–शालिग्राम पाठ समोंवती शाहरांत असा आहे त्यापेक्षां अर्थातच हा पाठ सरस आहे. ५

## २०

### [ शाहीर–होनाजी बाळ ]

**[ चाल–ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई।
जबरदस्ती कैकांनीं पाहिली शत्रु ठेविले नाहीं ॥ ]**

द्वापारीं श्रीमाधवविलास भागवतीं प्रत्यय पहावा। तसे कलीमध्यें रंग खेळले श्रीमंत आणि पाटीलबावा ॥ ध्रु०॥

पुण्यासारखें दुजें शहर या दक्षिणेंत कोठें नाहीं। धर्मराज श्रीमंत धन्याची त्रैलोक्यामध्यें अवाई ॥ धन्य रणवीर पाटीलबावा पराक्रमी जाणती शाई। नवखंडामध्यें कीर्ति गाजती धनी रावसाहेब सवाई ॥ यशवंत अति श्रेष्ठ तपोबळी साजती ब्रह्म बादशाई। दिल्लीपतीनें माहिमरात दिली नालकी लवन्याही ॥ (चाल) ॥ स्वामीप्रताप अद्भुत वर्णु कुठवरी। सारें हिंदुस्थान पाटीलबावाचे करीं ॥ घेविलें असून स्वस्थानीं परात्परी। मी वर्णू कुठवरी हा प्रादुर्भाव स्नेहाचा ऐकावा ॥ द्वापारीं०॥ १

शके सतराशें पंधरा चैत्र नाम प्रमादी संवत्सरीं। अत्यादरें हा रंग खेळले उभयपक्षीं हर्ष अंतरीं ॥ बंब भरून रंगाचे ठेविले ठाई ठाई शहराभीतरीं।

---

**अवाई**–प्रख्याति. **शाही**–सेना; राज्य; लक्षणेनें सर्व प्रजा. **साजती**–साजते, शोभते. **ब्रह्म बादशाई**–ब्राह्मण पादशाही. **सारे हिंदुस्थान ........परात्परी**–परात्परी या ऐवजीं मुळांत परस्परी असा शब्द असावा. परस्परी=परस्पर, (१) सारें हिंदुस्थान पाटिलबोवाचे करीं घेविलें, असून स्वस्थानी, परस्परी. म्ह. स्वस्थानापासून यत्किंचितहि न हलतां आपल्या एका सरदारांकडून सारें हिंदुस्थान जिंकून टाकलें. केवढा हा स्वामींचा प्रताप? (२) असून स्वस्थानीं परात्परी म्ह. वरिष्ठांतील वरिष्ठ अशा ब्रह्मबादशहाच्या सिंहासनावर अधिष्ठित असूनहि श्रीमंतांनीं पाटिलबावाशीं जें स्नेहसौजन्याचें वर्तन केलें त्याचा परिपाक किंवा दाखला पहा. १

**शहराभीतरीं**–शहरांत जागोजाग. **कसले**–बांधले **पात्रा**–कलावंतीणी. २

गुलालाचे हौदे भरुनियां खुप कसले हस्तीवरी ॥ तक्तराव्यावर पात्रा नाचती परोपरी। रंग भरून पिचकाऱ्या घेतल्या सर्वांनीं आपले करीं ॥ (चाल) ॥ एक एकावरी चालले रग टाकीत। नानांनीं बंब रंगाचे ठेविले जिथं ॥ त्या ठाई येतां श्रीमंत स्वारी अवाचित। सर्व भिजविले तेथें हा कुठवर घोष किर्तीचा वर्णावा ॥ द्वापारीं०॥ २

सर्व मुत्सदी मानकरी यांच्या हौद्यांचे जमावानिशीं। हस्ती सेवकांसुद्धां सकळही लाल रंग रसी ॥ रविवार पेठेमध्यें पाहा तात्यांचे दरवाज्याशीं। दोन बंब रंगाचे भरून ठेविले होते अति सायाशीं ॥ निट बुधवार पेठेंतून श्रीमंत स्वारी गेली त्या ठायाशीं। खुप गर्दी रंगाची केली तात्यांनीं अति उल्हासिं ॥ (चाल) ॥ ते दिवशीं सफेत असा कोण नाहीं राहिला। रंगाविरहित नाहीं दृष्टीनें पाहिला ॥ लौकिक रंग हा पृथ्वीवर पसरला। पुत्रपौत्राशीं सांगायाशीं जाहला ॥ हा रंग सुवदावा। द्वापारीं०॥ ३

नानापरी गोकुळीं क्रिडले श्रीमाधवजी कुंजवनीं। तें साक्षात् दृष्टी पाहिलें पुणें नगर पुण्यस्थानीं ॥ नाना परीचे हरिचे विलास शास्त्रीं ऐकिल्या श्रवणीं। पुणे ग्राम गोकुळ क्रिडले त्यांत कृष्ण श्रीमंत धनी ॥ आधीक देह आमचे आम्हाला भासतसे आपले ध्यानीं। स्वामीपद अवलोकून दैवी उल्हासी होत नित्यानी ॥ (चाल) ॥ होनाजी बाळा पदरचा आहे किंकर। विज्ञप्ती श्रुत करितो जोडून कर ॥ अक्षई असावी कृपा सेवकावर। धनी बक्षीस देणार ॥ रामा अंदु वांछी स्वामी सेवा। द्वापारीं०॥ ४

---

**रंगरस**–(हिंदी) आनंद, हर्ष. **रंगरसीं**–हर्षांत, उल्हासांत, हर्षानें. **हस्तीसेवकासुद्धां**–हत्तीसेवकासुद्धां सर्व समुदाय हर्षानें रंगांत सामील होऊन लाल झाले. **अति सायाशीं**–अतिशय तरतुदीनें. **लौकिक रंग**–कीर्ति (२) किंवा रंगाचा लौकिक असाहि अर्थ शाहिरास अभिप्रेत असेल. **सुवदावा**–(सुवाड वा!) सुवाड–सुरेख. ३

**नानापरी**–नानाप्रकारांनीं. **ऐकिल्या श्रवणीं**–कानांनीं ऐकल्यानंतर. ऐकिल्या श्रवणीं याचा खुलासा 'भासतसे आपले ध्यानीं' या शब्दांनीं होतो. **उल्हासी होत नित्यानी**–नेहमीं आनंदित होतो. ४

# खर्ड्यांच्या लढाईचा–पोवाडा

प्रभाकराच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें हा पोवाडा विस्तृत, तपशीलवार, शुद्ध व सुसंगत असा आहे. पोवाड्याचा विषय जरी मुख्यतः खर्ड्यांची लढाई असा आहे, तरी प्रभाकरानें त्यांत सवाई माधवरावाच्या सर्व कारकीर्दीचा आढावाच घेतला आहे. पहिल्या दोन लांबलचक चौकांत बारभाईंचीं कारस्थानें, दादासाहेब व इंग्रज यांचा पराभव, माधवरावाचा जन्म, मुंज, लग्न, टिपूवरच्या मोहिमा, शिंद्यांचें आगमन, माहीमरातबीचा समारंभ, रंग, महादजी शिंदे व हरिपंततात्या यांचा मृत्यु वगैरे विषय कालानुक्रमानें आले आहेत. तिसरा, चौथा व निम्मा पांचवा चौक पेशव्यांच्या सैन्यांतील सरदारांच्या शिलेदारांच्या नांवनिशीनें भरले आहेत. ही नांवनिशी, शिंद्याकडील, होळकराकडील, पटवर्धनाकडील अशी निरनिराळी वर्गवारीनें दिली असून, ऐतिहासिक कागदपत्रांच्या प्रत्यंतर पुराव्यानें ती अगदीं बरोबर ठरते हें विशेष आहे. खर्ड्यांच्या स्वारींत पेशव्यांचा सेनासमुद्र इतका भरला होता आणि पेशव्यांचे इतके मानकरी, सरदार, पागे, पथकें वगैरे सेनाधिकारी हजर होते कीं, तत्कालीन समाजाला तो एक मोठा कौतुकाचा आणि प्रौढीचा विषय होऊन बसला होता. 'द्वादश कोस तळाची गणती। महा महा मागिल युद्धांतीं ॥ सैन्य न कळे तें पैवस्ती। वडिल वृद्ध आश्चर्य सांगाति', 'बारा कोस लांबी रुंदी ज्या फौजेचे तळ पडती', 'निघाले बाहेर रे, निघाले बाहेर (असे) कधिंना फिरून' अशी अभिमानानें शाहिरांनीं वर्णनें केलीं आहेत. डफसाहेबानें या लढाईचें विकृत वर्णन केलें आहे व खोट्या अपुऱ्या माहितीच्या आधारावर या लढाईतील मराठ्यांच्या 'मशोनगाची राई' करून दाखविण्याचा अश्लाघ्य प्रयत्न करून 'Bui to this day it is one of the great boasts of the old sillidars in the mahratta villages that they were present in the glorious field of Kurdla" अशी मराठे योद्धयांची हेटाळणी केली आहे. जेतृत्वाच्या मदानें धुंद झाल्यानंतर जित मराठ्यांचा इतिहास लिहावयास बसलेल्या डफनें मराठ्यांच्या निंदेचें डफडें जोरानें वाजवावें यांत आश्चर्य

नाहीं. खर्ड्यांच्या लढाईत समरांगणांत जातीनें हजर असलेल्या व तेथल्या जयवाद्यांनीं कान भरून गेलेल्या मराठ्यांना हें डफडें ऐकूं सुद्धां गेलें नसेल. खर्ड्यावर एकेकाळीं हजर असलेल्या वृद्ध शिलेदारांना या निंदकाच्या वाग्बाणांची मातबरी वाटली नसती. त्याचप्रमाणें आज आम्हांला त्यांच्या वंशजांनाही ती वाटत नाहीं. कारण तत्कालीन अस्सल कागदपत्रांच्या साहाय्यानें डफची माहिती एकांगी व असत्य आहे हे सहज सिद्ध करून दाखवितां येतें. शेंकडा नव्याण्णव गोष्टींत इंग्रजांनीं मराठ्यांना दिलेलीं दूषणें वास्तविक भूषणेंच असतात. 'मी त्या खर्ड्याच्या स्वारींत होतों असें छातीला हात लावून अभिमानानें मराठे शिलेदार सांगतो', या डफच्या उद्गारांनींच मराठ्यांना या स्वारीचें महत्त्व किती वाटत होतें तें उघड दिसतें. अर्थात् प्रभाकराला नांवनिशा देण्याचा मोह आवरला नाहीं तो सार्थ व युक्तच होता यांत शंका नाहीं.

एकंदर विस्ताराच्या मानानें खुद्द लढाईचें वर्णन प्रभाकरानें फारच संक्षिप्त व तांत्रिक केलें आहे व या लढाईवरील इतर पोवाड्यांतून रणमैदानाचा व हालचालीचा चित्रपट जसा डोळ्यांपुढें उभा राहतो तसा याच्या वर्णनानें राहत नाहीं.

सहाव्या चौकांत जयवाद्यें वाजवीत पुण्यांत प्रवेश करणाऱ्या श्रीमंतांच्या शाईचें म्हणजे सभेचें भरघोस वर्णन केलें आहे.

सदर पोवाड्यांतील माहिती ऐतिहासिक कागदपत्रांशीं तंतोतंत जुळते. बाकी प्रभाकराबद्दल या बाबतींत विशेष उल्लेख करण्याचें कारणच नाहीं. कारण त्याचा एकूण एक पोवाडा असाच शुद्ध असतो.

## ऐतिहासिक माहिती

पेशव्यांचे वकील गोविंदराव काळे यांनीं निजामअलीस भर दरबारांत कळविलें कीं, "तुम्हाकडे पेशवे सरकारचें देणें दोन कोटि साठ लक्ष रुपये निघतें." यावर दिवाण मशीर उल्मुल्क यादी पाहून बोलला कीं, "या हिशेबाच्या भानगडी आम्हास समजत नाहींत व तुम्हासहि समजावून देतां येत नाहींत; खुद्द नाना फडणविसांनीं येथें यावें व आमची कशी ती समजूत घालावी." यावर काळे म्हणाले कीं, "नानांस फार कामें आहेत. ते कसे येथें

येणार ?" मशीर म्हणाला, "ते कसे येणार ! आतां दाखवितों कसे येणार ते." हैद्राबादच्या मुत्सद्द्यांनीं पेशवे व नाना यांचीं सोंगें भर दरबारांत आणलीं. मोगल सरदार वल्गाना करूं लागले कीं, आतां आपण पुण्यावर स्वारी करून तें जाळून टाकूं व पेशव्यांस लंगोटी नेसवून त्यांच्या हातांत भोपळा देऊन त्यांची रवानगी काशीस करूं. कलावंतिणींनीं मोगलांच्या सैन्याची आणि भावी विजयाची आगाऊच गाणीं गाण्यास सुरुवात केली.

इकडे पेशव्यांनींहि लढाईची तरतूद करण्याचें काम झपाट्यानें सुरू केलें. दौलतराव शिंदे पुण्यांत होते. त्यांची बहुतेक फौज व पलटणांचे कंपू हिंदुस्थानांत होते. ते आणविण्याविषयीं पेशव्यांनीं त्यास हुकूम केला; आणि नागपुरकर भोंसले, होळकर, रास्ते, पटवर्धन, विंचूरकर, मालेगांवकर राजेबहादुर, घोरपडे, पाटणकर, निंबाळकर, गोविंदराव गायकवाड, प्रतिनिधि, पंतसचीव, घाडगे, चव्हाण, डफळे, पवार, थोरात, वगैरे सरदारांस व मानकऱ्यांस आपापल्या फौजांनिशीं येण्याविषयीं पत्रें धाडलीं.

नोव्हेंबर महिन्यांत परशुरामभाऊ पुण्यांत दाखल झाले. त्याबरोबर त्यांची बहुतेक भाऊबंद मंडळी, स्वारींत हजर झाली. नोव्हेंबर आठ तारखेस निजाम मोहिमेच्या इराद्यानें डेरे दाखल झाला. तेव्हां पेशव्याकडील हुजुरातीचे मुख्य सरदार बाबा फडके हेही शहराबाहेर डेरेदाखल झाले. दौलतराव शिंदे यांचाही गोट शहराबाहेर उतरला. "डिसेंबरच्या आठव्या तारखेस नाना फडणवीस डेरेदाखल झाले. नानांचे गोटास जमाव तर खास पथक राजेश्री रंगराव राजेबहाद्दर व राघोपंत गोडबोले यांजकडील कवायती लोक वगैरे नेमणुकी पथकें व पागे मिळून दोन हजार पावेतों जमाव झाला."

गारपीर, वडगांव व थेऊर या ठिकाणीं मिळून श्रीमंतांचा मुक्काम पुण्याच्या आसपास दीड महिना होता. नंतर सर्व लष्कर कधीं कूच कधीं मुक्काम याप्रमाणें करीत नगरच्या रोखें वळलें. तों निजामअली बेदराहून धारुरास येऊन तेथून परांड्याच्या बाजूनें कूच करून येऊं लागला. त्याच्या लष्करापैकीं एका टोळीनें जोगाईचें आंबें ह्या क्षेत्राचा विध्वंस केला. दुसऱ्या टोळीनें बारशी, वैराग, पानगांव वगैरे गांवें लुटलीं. इकडे मराठी लष्करांतील पेंढारी टोळ्यांनींहि कांहीं मोगलाईमुलूख लुटला. शत्रूचा रोख कोणीकडे आहे हें पहातांच श्रीमंतांनीं नगराहून आग्नेयेच्या बाजूनें सीना नदीपर्यंत कूच केलें.

वाटेंत खडकतच्या मुक्कामीं हिंदुस्थानांतून शिंद्याची फौज आली ती मिळाली. तींत कवाइती पलटणांचा कपू होता. त्यावर मुख्य अधिकारी जिवबा दादा बक्षी होते. व त्यांच्या हाताखालीं मुसापिरू ( Perron ) हा फ्रेंच अंमलदार होता. शिंद्याचें घोडदळ पंधरा हजार होतें व तें देवजी गवळी याच्या हाताखालीं होतें. एकंदर मराठी सैन्याची संख्या एक लक्ष तीस हजार झाली. शिवाय शिंदे-होळकरांचें पेंढार निराळेंच. विंचरणा नदीवर फकिराबाद धानोरे येथें लष्कर येईपर्यंत शिमगी पौर्णिमा जवळ आली. त्यापूर्वींच निजामअल्ली वीस पंचवीस कोसांवर येऊन ठेपला. सबब हुजरात, शिंदे, होळकर, भोंसले, पटवर्धन वगैरे सरदारांची मिळून साठसत्तर हजार फौज एक मजल आघाडी जाऊन राहिली व दररोज याचप्रमाणें श्रीमंतांच्या मुक्कामापासून ही फौज एक दोन मजली आघाडीस असे.

सल्याचें शेवटचें बोलणें संपल्यावर मोहरीचा घाट उतरून निजाम खर्ड्याच्या किल्ल्यानजीक खैरा नदीवर उतरला. तेव्हां शिंदे व भोंसले यांचा श्रीमंतास निरोप आला कीं, नबाब खैरा नदीवरून उठून परांड्याच्या रोखानें निघून जाणार. तो तिकडे गेला असतां मसलत लांबणीवर पडते सबब त्यास आडवण्याकरितां आम्ही सडे होऊन म्हणजे नुसत्या घोडदळानिशीं त्याजवर चालून जातों. नानांना ही मसलत पटून त्यांनीं परशुरामभाऊस मुख्य सेनापतीचा अधिकार देऊन आघाडीस पाठविलें.

फाल्गुन वद्य २ शनिवारीं पहांटे सहा घटका रात्रीस भाऊ पंचवीस हजार सडी फौज तयार करून घोडगांव, परगणे जामखेड येथें आले. नबाब तेथून तीन कोसांवर होता. म्हणून भाऊ आणखी दीड कोस पुढे जाऊन उभे राहिले. तों निजामअल्लीनें मुकाबल्याची तयारी केली. त्याच स्थळीं शिंदे, भोंसले परशुरामभाऊस मिळावयाचे होते; पण ते संध्याकाळपर्यंतहि आले नाहींत म्हणून भाऊ परत फिरले. मोगल मागें लागले. तों अस्तमान झाला. इतक्यांत दुसऱ्या बाजूनें शिंदे येऊन त्यांनीं गोळा लागू केला. मोगल फौज फिरून गोटास गेली. भाऊ घोड्यावर जिनें तशींच ठेवून मोगलांच्या टेहळणीवर होते. वद्य चतुर्थीच्या दिवशीं नबाब कूच करून आणिक एक कोस पुढें आला. फाल्गुन वद्य पंचमीला खर्ड्याची मोठी लढाई झाली. ते दिवशीं मोगल कूच करून चालला असतां भाऊंनीं त्याशीं गांठ घातली. भाऊं-

बरोबर फडके, शिंदे, भोंसले, होळकर यांच्या फौजा व कबायती कंपू होते. टेहेळणीकरितां भाऊ पुढें एका टेकडीवर गेले. इतक्यांत तिकडून मारामल व असदअलीखान यांनीं त्याजवर जोराचा हल्ला केला. तेथें मातबर लढाई झाली; व त्या गर्दीत भाऊस लालखान नामक पठाणाशीं लढतां उजवे बाहुट्या-वर व कपाळावर तलवारीच्या जखमा लागल्या. पुष्कळ लोक ठार व जखमी झाले. जनोबा सुभेदार यास डाव्या हातावर जखम लागली व विठ्ठल धोंडदेव गोळी लागून ठार झाले. सदर हल्ल्यानें मराठी फौज अर्धा कोस मागें सरली व त्याच टेकडीवर मोगलांनीं ठाणें दिलें. मुसारेमू याच्या पलटणांनीं भाऊंच्या डाव्या बाजूस शिंदे होते त्यांजवर चाल केली. त्या वेळीं शिंद्यांनीं तोफांचा व भोसल्यांनीं बाणांचा भयंकर वर्षाव केला. मोगल त्याखालीं कचकरूं लागला. हें पाहातांच भाऊसमोर लढत असलेल्या असदअली-खान वगैरे सरदारांनीं मदतीकरितां तोंड फिरविलें. भाऊंनीं ताबडतोब समय साधून सरकारची चाळीस हजार तलवार उठविली व भयंकर एलगार केला.

त्या सुमारास अंधार होऊं लागला होता. 'करोली बहुत अपूर्व जाहली' 'शिंद्यांनीं कांहीं शर्थ केली' सकाळच्या चार सहा घटका दिवसापासून शिंद्या-कडील कंपूची मारगिरी होत होती ती बारा घटका रात्रीपर्यंत एकसारख्या तोफा उडत होत्या इतक्यांत पेंढारानें नबाबाचें लष्कर चोहोंकडून घेरून लुटून फस्त केलें. नबाबाचीं ओझीं लादलीं होतीं तीं उतरूं पावलीं नाहींत तसेंच नबाब मागें सरोन खर्ड्याच्या किल्ल्यांत रात्रीस आश्रयास जाऊन राहिले. तळावर तोफा राहिल्या. दारूगोळ्याचे छकडे दोन चारशें राहिले. बाजार लुटला गेला. लमाण लुटलें गेलें. दोन चार हजार उंट लुटला. बैल वगैरे तर यांस संख्याच नाहीं. नबाबाच भोंवतें फौजेचें वलय पडले. मोंगलांचें लष्कर लुटलें गेल्यावर मराठी फौजा खर्ड्याचे किल्ल्यास घेरा देऊन बसल्या. आंत मोगलांची हैराणगत झाली. रुपयास दोन शेर व बारा रुपयांस एक पखाल पाणी असें झालें. लढाईच्या दुसऱ्या दिवशीं पुनः मराठ्यांच्या तोफा सुरू व्हावयाच्या तों निजामानें तहाचें बोलणें लाविलें.

[ही बहुतेक हकीकत खरे भाग ९ वरून मुख्यतः घेतली आहे.]

# खर्ड्यांच्या लढाईचा–पोवाडा

## २१

[ शाहीर–प्रभाकर ]

दैन्य दिवस आज सरले। सवाई माधवराव प्रतापि कलियुगांत अवतरले ॥ ध्रुपद ॥

भूभार सर्व हराया। युगायुगीं अवतार धरी हरी दानव संहाराया ॥ कलियुगीं धर्म ताराया। ब्राह्मणवंशीं जन्म घेतला रिपु निर्मूळ कराया ॥ सुकिर्ती मागें उराया। सौख्य दिलें सर्वांस अहारे सवाई माधवराया ॥ (चाल) ॥ धन्य धन्य नानाचें शहाणपण। बृहस्पति ते बनले आपण। गर्भीं प्रभुचें पाहुनि रोपण तेव्हांच केला दुर्घट हा पण। आरंभिलें मग रक्षण शिंपण। सरदारांचें घालुन कुंपण। आपल्या अंगीं ठेवून निरूपण। हरिपंतांना करुनि रवाना ॥ (चाल) ॥ दादासाहेब मागे वळविले। लगट करुनि फौजांनीं मिळविले ॥ अपुल्या राज्यापार पळविले। कांहीं दिवस दुःखांत आळविले ॥ इतर कारणीं भले लोळविले। लोहोलंगर पायांत खिळविले ॥ ठेवून गडावर चणे दळविले। बंदिवान तेथेंच खपविले ॥ (चाल) ॥ बंड

---

**बृहस्पति ते बनले आपण**–प्रत्यक्ष बृहस्पतीसारखें बुद्धिवैभव दाखविलें. अतिशय धूर्तपणा आणि मुत्सद्दीपणा दाखविला, इतका की, प्रत्यक्ष बृहस्पतीचाच ते अवतार असावेत असा भास व्हावा. **रोपण**–आरोपण, बीजसंभव. **निरूपण**–निरू पण असें पाहिजे. निरू–(क्रि.वि) शुद्ध, दृढ. **पण**–निश्चय, प्रतिज्ञा. **हरिपंतांना करुनि रवाना दादासाहेब मागें वळविले**–"पाठीवर फडके, भोसले व मोगल आलेसें पाहून दादासाहेब नर्मदा उतरून शिंदे होळकरांच्या आश्रयास गेले." [खरे २०२७]. **मिळविले**–गांठले. **आळविले**–घोळविले. **कारणी अथवा कारणीक**–मुत्सद्दी. २ सप्तमी घेतल्यास **कारणीं**–इतर राजकारणामध्यें **लोहलंगर......बंदीवान तेथेंच खपविले**–राघोबादादाचे सखाराम हरीसारखे किंवा सखाराम भगवंतासारखे साथीदार. हे दोघेही गृहस्थ बंदिवासांतच वारले. **बंड**–बंड करणारा. **तोतया**–

तोतया सहज मोडिला । एक एक त्याचा मंत्री फोडिला ॥ जमाव ठायिचे ठायीं तोडिला । अडचण जागीं मुख्य कोंडिला ॥ शहराबाहेर नेऊन झोडिला । जो नानांनीं पैसा जोडिला । तोच प्रसंगीं हुजुर ओढिला ॥ लागेल तितकें द्रव्य पुरविलें ॥ (चाल) ॥ तळेगांवावर इंग्रज हरला । इष्टुर साहेब रणींच विरला ॥ उरला इंग्रज घांट उतरला । सरमजाम गलबतांत भरला ॥ रातोरात मुंबईंत शिरला । सवेंच गाढर पुढेंच सरला ॥ शिकस्त खाऊन तोही फिरला । फिरुन पुण्याकडे कधीं पाहीना ॥ (चाल) ॥ अशी रिपूंची मस्ती जिरविली । शुद्ध बुद्ध पहा त्याची हरली ॥ कारभाऱ्यांनीं पाठ पुरविली । पुण्यामध्यें अमदानी करविली ॥ पुरंदराहुन स्वारी फिरविली । पर्वतीस मग मुंज ठरविली । गजराची भिक्षावळ मिरविली । कालूकर्णे वाजंत्री वाजती ॥ (चाल) ॥

---

भाऊसाहेब पेशवे यांचा तोतया. **अडचण जागीं मुख्य कोंडिला**–मुख्य–खासा. बोरघाटांत तोतयाचा कोंडून पराभव केला. **शहराबाहेर नेऊन झोडिला**–तोतया सांपडल्यावर त्याला गाढवावर उलटा बसवून सबंध शहर-भर फिरवून मग शहराबाहेर मेकसू घालून मारला हुजूर–पुढें. **इष्टुर**–कॅप्टन स्टुअर्ट. **विरला**–मेला. **सवेंच**–ताबडतोब, टाकोटाक. **सवेंच गाडर पुढेंच सरला शिकस्त खाउन तोहि फिरला**–“ गाडर वसईहून मगरुरीनें १०–१२ पलटणें कवाइती, हजार गोरा, वीस पस्तीस तोफा या सरंजामानिसी घाट चढून वर आला.......शेवटी गाडर ज्यान बच्याऊन पळाला थोडका आसबाब पनवेली दऱ्यानें आसऱ्यास जाऊन पोहोंचला....... इंग्रजाची सिकस्त श्रीमंताचे प्रतापेंकरून मोठी जाली. व त्याचा नाशहि फारच जाला ” [साधनें,१२ पा.१३]. **शिकस्त खाणें**–हार खाणें. **आमदानी**–(फा. स्त्री.) भरभराट, सुबत्ता **स्वारी फिरविली**–पेशव्यांची स्वारी पुरंदरा-हून पुण्यास आणली. **पर्वतीस मग मुंज ठरविली**–“ तथापि अवश्य कर्तव्य तरी एकादशीपेक्षां पंचमीचा मुहूर्त उत्तम पर्वतीचे घरांत प्रवेश करावयाचा मुहूर्त वद्य एकादशी सोमवारीं सतरा घटका रात्रीनंतर देवदर्शन करून अठरावें घटकेंत घरांत प्रवेश करावा ” [रामशास्त्र्याचें नाना फडणीसास पत्र. इ. सं.ऐ. टि. नं.३९ पा. ५७]. **गजराची भिक्षावळ**–थाटामाटाची, वाद्यघोषाची,

लग्नीचव्या देशावर लिहिल्या । ब्राह्मणांस पालख्याश्व वहिल्या ।। पाठविल्या बोलाऊं पहिल्या । पठाण मोंगलसहित सहिल्या ।। छत्रपति रोहिले रोहिल्या । भोसल्यांच्या मौजा पाहिल्या ।। आणिक किती नांवनिशा राहिल्या । कवीश्वराची नजर पुरेना ।। (चाल) ।। आरशाचे मंडप सजविले । चित्रें काढून चौक उजविले ।। थयथयात जन सर्व रिझविले । गुलाब आणि अत्तरें भिजविले ।। शिष्ट शिष्ट शेवटीं पुजविले । रुपये होन मोहोरांनीं बुजविले ।। श्रीमंत कार्यार्थ देह झिजविले ।। यशस्वी झाली सकल मंडळी ।। (चाल) ।। सत्राशे सातांत बदामी । हल्लयाखालीं केली रिकामी । एक एक मोहोरे नामी नामी । फार उडाले रणसंग्रामीं ।। बाजीपंत अण्णा ते कामीं हरीपंत तात्याचे लगामी । परशुरामपंत त्या मुक्कामीं ।। स्वामी सेवक बहुत जपले ।। (चाल) ।। गलीमास कांहीं नव्हते भेऊन । पराक्रमाने किल्ला घेऊन ।। अलिबक्षावर निशाण ठेवून ।

---

वाजत गाजत मिरविलेली. **ब्राह्मणास पालख्याश्व वहिल्या**–वाहिली (फार. स्त्री.) रथ. अनेक व. वहिल्या. ब्राह्मणांना पालख्या, घोडे, रथ पाठविले. उदा० "वे. शा. सं. लक्ष्मीनारायण दीक्षित स्वामींचे सेवेसीः—...श्रीचा उत्साह भाद्रपद चतुर्थीचा सरकारांत आहे. याजकरतां आपणांस पालखी पाठविली आहे तरी सत्वर निघोन यावे" [साधनें, १०, ३९३]. व २ [साधनें १०,३३०]. **पहिल्या**–प्रथम. **सहेल्या–सहेली**–(स्त्री.) सखी. पठाण आणि मोगल यांचा जनानखानाहि पाचारण केला. **पठाण मोंगल सहित-सहिल्या**–पठाण मोंगल आपापल्या सहेल्यासहित म्हणजे सहकुटुंब. **छत्रपती**–सातारकर छत्रपती. [खरे, ३६५८; पे.ब]. **मोंगल**–हैदराबादच्या निजामानें आपला पुत्र पोलादजंग सरंजामसहित पाठविला. [खरे, ३६५८ व पेशवे-बखर १०५] **भोसल्याच्या मौजा पाहिल्या**–मुधोजी भोसले लग्नसमारंभास आले नव्हते [खरे, ३६५८]. अक्कलकोटकर भोसले लग्नास आले होते. [पे.ब.] त्यांच्या मौजा पाहिल्या (?). **चौक उजविले**–चौक सजविले. **चौक**–अंगण. **थैथया (पु.)**–गाणें बजावणें, ख्यालीखुशाली, नाचरंग. **एकेक मोहरे......रणसंग्रामीं**–बदामीचा पोवाडा पहा. शेवटच्या ओळी. "सरस वासन वजनदार पाहुणे मेले बहुत फार" **बाजीपंत आण्णा**-[खरे, ४०३०].

पुण्यास नानासहित येऊन ॥ श्रीमंतांनीं वाड्यामध्यें नेऊन । पंचामृती आनंदें जेऊन ॥ बहुमानांचीं वस्त्रें देऊन । बोळाविलें तयाला ॥ (चाल) ॥ सत्राशें तेरावें वरीस । अवघड गेलें पहिल्या परीस ॥ करनाटकच्या पहा स्वारीस । टोपीकर मोंगल पडले भरीस ॥ तरी तो टिपू येइना हारीस । त्यावर तात्या गेले परीस ॥ आणुन टिपू खूब जेरीस । साधुनी मतलब हरिपंतांनीं ॥ (चाल पहिली) ॥ नंतर मागें फिरले । दरकुच येऊन पुण्यास प्रभुचे चरण मस्तकीं धरिले ॥ दैन्य दिवस आज सरले० ॥ १

केवढें भाग्य रायाचें । चहुंकडे सेवक यशस्वी होती हें पुण्य त्या पायांचें ॥ करितां स्मरण जयाचें । कांहीं तरी व्हावा लाभ असें बलवत्तर नाम जयाचें ॥ प्रधानपद मूळ याचें । सत्राशें चवदांत मिळालें वजीरपद बाच्छायाचें ॥ ( चाल ) मुगुटमणी ते पाटिलबावा । कोठवर त्यांचा प्रताप गावा ॥ दर्शनमात्रें तापच जावा । नवस नवसितां फळास यावा ॥ हरहमेशा शत्रुशि दावा । माहित सगळा मराठी कावा ॥ हुशार फौजा लढाई लावा । जिकुन

---

**गलीमास कांहीं नव्हते भेऊन...... ...बोळाविले तयाला**–ऐतिहासिक आधार दिसत नाहीं. परशरामपंत व नाना बदामीहून निघाल्यावर कुडची, ऐनापूर, कुरुंदवाड, मिरज, तासगांव या मार्गे आले. भाऊंच्या आग्रहावरून मिरज, कुरुंदवाड, तासगांव येथें नानांनीं त्यांच्या मेजवान्या घेतल्या. भाऊ तासगांवासच राहिले. नाना मेणवलीहून पुण्यास आले. [खरे, ४००८]. ऐतिहासिक माहितीवरून भाऊ पुण्यास आलेच नव्हते. **परीस**–विजयी, कर्तृत्ववान्, शूर मनुष्य. १

**प्रधानपद मूळ याचे......वजीरपद बाच्छायाचे**–पेशवे साताराच्या छत्रपतींचे पंतप्रधान होते ते दिल्लीच्या बादशहाचे वजीर झाले. भावार्थ एक तऱ्हेनें बढतीच झाली. **लढाई लावा**–याचा बरोबर अर्थ लागत नाहीं. लाव अगर लावा या शब्दाचा अर्थ निशाण असा आहे. लाव–लष्कर असाहि शब्दप्रयोग जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांत येतो. हिंदी भाषेंत लावलाव (पु. नाम) असा एक शब्द आहे. त्याचा अर्थ आधाशी, लोभी, खाजाळू

हिंदुस्थान धरतले ॥ ( चाल ) ॥ चवदा वर्षे बहुत भागले। म्हणून शिरस्ते पाहून मागले ॥ तरतुदीस कारभारी लागले। उंच उंच पोषाग चांगले ॥ देऊन फार मर्जीनें वागले। भेटीसमयीं जंबूर डागले ॥ मग तोफांचे बार शिलगले। सूर्यबिंब अगदींच झांकलें ॥ ( चाल ) ॥ राव जेव्हां नालकींत बसले। कृष्ण तेव्हां ते जनास दिसले ॥ अर्जुन पाटिलबावा भासले। पाय-पोस पदरानें पुसले ॥ चरणीं मिठी माराया घुसले। कर प्रभुनीं बगलेंत खुपसले ॥ इमानी चाकर नाहींत असले। धन्य धनी आणि धन्य दास ते ॥ ( चाल ) ॥ दोन्ही दळें या सुखांत दंग। त्यावर झाला अमोल रंग ॥ गुलाल आणि अनिवार पतंग। पळस फुलाचा नाहीं प्रसंग ॥ मस्त चालती पुढें मातंग। कोतवाल घोडे करिती ढंग ॥ राज्य प्रभुचें असो अभंग। अहर्निशीं कल्याण चिंतिती ॥ ( चाल ) ॥ गुलाम सोदे बुडवुनि पाजी। पंत प्रधान राखुन राजी ॥ लष्कर दुनया करून ताजी। शके सत्राशें पंधरा-

---

असा आहे. "लढाई लावा" याचा अर्थ रणकंडू असलेल्या फौजा असा घेतां येण्यासारखा आहे. (२) लढाई लावा याचा अर्थ लढवाई सरंजाम असलेल्या असाहि होईल. **शिरस्ता**–वहिवाट. **जंबूर**–एक तऱ्हेची तोफ. **जंबूर डागले**–तोफा सोडल्या. **तोफांचे बार शिलगले**–तोफांच्या फेरी झडल्या. **शिलक किंवा सलक**–फेर. तोफांच्या बारांच्या सलका झाल्या. **सूर्यबिंब अगदींच झांकलें**–धुरामुळें. **नालकी**–" नालकी ही साधारणपणें हत्तीवरील अंबारीसारखी असून तिची रचनाहि तशीच असते हा मान मराठे सरदारांत महादजीशिवाय दुसऱ्या कोणासहि मिळाला नव्हता." [ पारसनीस इ. संग्रह ऐ. सं. सा.वस्तू अंक१]. दिल्लीची फर्मानें देण्याचा समारंभ. [खरे,४५६४।८५]. **कर प्रभूंनीं बगलेंत खुपसले**–वर उठविण्याकरितां आणि पायांस हात न लावूं देण्याकरितां. **पतंग**–एक तऱ्हेचा रंग, पतंगी रंग. **पळस फुलांचा नाहीं प्रसंग**–पळसाचीं फुलें लालभडक असतात व त्याचा रंगहि करतात. पण त्या-वेळीं गुलाल आणि पतंगी रंग इतका उधळला गेला, कीं पळसाच्या फुलांच्या रंगाचा प्रसंग म्हणजे जरुरी भासली नाहीं. **मातंग**–हत्ती. **कोतवाल घोडा**–मिरवणुकीपुढें ठुमकत नाचणारा घोडा. **लष्कर दुनया**–सर्व लष्कर.

मार्जी ॥ माघ मासीं भली मारून बाजी। पाटिलबावा सुरमर्द गाजी ॥ अगोदर गेले विष्णुपदाजी। शरीर बानवडीस ठेवुनी ॥ ( चाल ) ॥ सवा-चार महिन्यांचें अन्तर। हरीपंत तात्या गेले नंतर ॥ तेथें न चाले तंतर मंतर वर्तमान हें एक अधिकोत्तर ॥ कांहीं न करिती नाना उत्तर। दिलगीर मर्जी सुकलें अंतर ॥ हिरे हरपले राहिले फत्तर। तरी तो पुरुष बहुत धिराचा ॥ ( चाल ) ॥ दौलतीचे आज खांबच खचले। लाल होते ते कोठेंच पचले ॥ शिपायांचे काय चुडेच पिचले। परंतु नाना नाहीं कचले ॥ कडोविकडीचे विचार सुचले। कलमज्यारीचे घटाव मचले ॥ मोगलावर मोर्चे रचले। जिकडे तिकडे झाली तयारी ॥ ( चाल ) ॥ पुकार पडला पृथ्वीवरती। सैन्यसमुद्रा आली भरती ॥ आगाऊ खर्ची मोहरा सुर्ती। रात्रंदिवस श्रम नाना करती ॥ कशी ही मोहिम होईल पुरती। राव निघाले

---

माघमासीं भली मारुनी बाजी–कोणची? गुलाम सोदे–गुलाम-कादरा-सारखे सोदे किंवा लुच्चे. अधिकोत्तर–एकाहून एक, वरचढ, एकाहून एक भयंकर. सुरमर्द–शूर मर्द. विष्णुपदाजी–विष्णुपदाला, परलोकवासाला. शिपायांचे काय चुडेच पिचले–जणूं काय सर्व सैन्याचें सौभाग्यच हरपलें. कडोविकड–(स्त्री.) भाषणामध्यें अनेक प्रकारचे वांकडे तिकडे पाचपेंच इत्यादि जो प्रकार असतो ती (शास्त्रीकोश) कडोविकडीचा–मुत्सद्देगिरीचा, कुशलतेचा, पाताळयंत्रीपणाचा. कलमजारी–(मू. अर) विज्ञप्ति पत्रलेखन. रूढ अर्थ सैन्याची जमवाजमव. जसें त्यांनीं कलमजारी सुरू केली म्हणजे त्यांनीं सैन्य जमवावयास सुरुवात केली. घटाव–सैन्याचा जमाव. मचणें किंवा माजणें–फुगणें, वाढणें. मचले–जमविले. मोगलावर मोर्चे रचले–मोगलाविरुद्ध कारस्थान केलें. पुकार पडला–आवई पडली, जाहीर झालें, विदित झालें. "मग पुकार कळली पुणें शहराला" नारायणरावाच्या वधाचा पोवाडा. खर्ची–रक्कम. आगाऊ खर्ची मोहरा सुर्ती–रोख सुर्ती रुपये अगोदर दिले. कामा आधीं पैसे दिले. राव निघाले सुदिन मुहूर्तीं–मुहूर्तानें प्रस्थान ठेवण्याचें बंड जुन्या ऐ.का.प.फार दृष्टीस पडते. "श्रीमंताची स्वारी वद्य अष्टमी रविवारी चवदा घटका दिवसास वाड्यांतून निघून डेरे.

सुदिनमुहूर्ती ॥ लिंबलोण उतरितात गरती। इडापिड्रा काढून टाकिती ॥ ( चाल ) ॥ गारपिराच्या मग रोखांना। तमाम रिघला फरासखाना ॥ उजव्या बाजूस जामदारखाना। डावेकडे तो जवेरखाना ॥ देवढीबराबर सराफखाना। चकचकीत खुब सिलेखाना। मध्यें रायाचा तालिमखाना ॥ खळ खळ खळ खळ लेजिमा वाजती ॥ (चाल)॥ वाड्याबाहेर जिन्नसखाना। पदार्थ भरपुर मोदीखाना ॥ मागे उतरला उष्टरखाना। डेऱ्यासन्निध नगारखाना ॥ तऱ्हतऱ्हेचा शिकारखाना। बाजाराच्या पुढं पिलखाना ॥ दिला बिनीवर

---

दाखल झाली. आम्ही त्याच मुहूर्तावर स्वारीसमागमें बाहेर आलों." [खरे, ४७१९]. गरती—कुलीन स्त्री. गारपिराच्या मग रोखाना इत्यादि—खरे, पत्र नं. ३५९५मध्ये "जवाहीरखाना, जामदारखाना, फरासखाना आदि-करून झाडून सिंहगड, पुरंदर येथें रवाना होत आहे" असा स्पष्ट उल्लेख आहे. अर्थात् या माहितीचा व पोवाड्यांतील हकीकतीचा मेळ कसा बसवा-वयाचा ? राजधानींतले नेहमींचे मुख्य मुख्य कारखाने, पेशवेसुद्धां पुण्याहून दूर स्वारीस जाणार म्हणून बंदोबस्ताकरितां सिंहगड पुरंदरास पाठविले सैन्याबरोबर जे अठरा कारखाने अवश्य लागतात त्यासंबंधीं प्रभाकर पोवाड्यांत माहिती देत आहे. पण तरीदेखील ही माहिती काल्पनिक दिसते. लढाईवर निघालेल्या पेशव्याबरोबर शिकारखाना आणि तालीमखाना कशाला ? फरासखाना—राहुट्या, डेरे वगैरे ठेवण्याचें स्थळ. जामदारखाना—पोषाख ठेवण्याची जागा. जवेरखाना—रत्नशाळा. देवडी—चौकी, बंदोबस्त, पहारा. सराफखाना—सराफबाजार, सराफकट्टा. सिलेखाना—शस्त्रशाळा. तालिम-खाना—स्वारींत कशाला (?). जिन्नसखाना—कोठार (दारूगोळ्याचें ?). मोदीखाना—लष्कराच्या धान्याची कोठी. उष्टरखाना—उंटशाळा. शिकार-खाना—मोहिमेवर कशाला गेला ? पिलखांना—हत्तीखाना. बाजाराच्या इ०—'हा लष्करी हालता बाजार म्हणजे मराठ्यांच्या योजकतेचें एक चिन्ह होतें. या लष्करी बाजारांत सर्व तऱ्हेचा माल मिळे.' 'खुद्द खाशांच्या तंबूजवळ सावकार व सराफ यांची आळी असे. त्यांत हुंड्या देण्याघेण्याचा व्यवहार चालत असून लाखो रुपयांची घडामोड रोज चाले. एकंदरींत एक युरोपियन

तोफखाना। मोठमोठ्या पल्ल्याच्या जरबा ॥ ( चाल पहिली ) ॥ चोहोंकडे लोक पसरले। नित्य नवे गणतीस लागती एकांडे देशावरले ॥ दैन्य दिवस आज सरले० ॥ २

बहुत शिंदे जमले। शिलेपोस पलटणें लाविती पठाण जरिचे समले ॥ रणपंडित ते गमले। भले भले पंजाबी ज्वान दक्षिणेत येउन रमले। ज्यांपुढें शत्रु दमले। त्याणीं शतावधि कोस स्वामिकार्यास्तव लवकर क्रमिले ॥ (चाल) ॥ आधींच दौलतराव निघाले। काय दैवाचे शिकंदर ताले ॥ फौज सभोंवतीं जमून चाले। खांद्यावरती घेऊन भाले ॥ सर्व लढाया तयार झाले। जिवबादादा गर्जत आले ॥ हासनभाई उज्जनीवाले। महाराजांचे केवळ

---

म्हणतो 'या बाजारांत मिळणाऱ्या जिनसांची कितीहि लांब यादी करणें सोपें आहे पण येथें न मिळणाऱ्या जिनसांची यादी मात्र करणें कठीण आहे." [श्री. प. मो. पा. १५२]. जरब-तोफ गणतीस लागणें-नोंद होणें, येऊन मिळणें. एकांडा-" Cavalier म्हणजे एकटा स्वार. हे निधड्या छातीचे मर्द शिलेदार, ब्राह्मण, मराठे, रजपूत, मुसलमान वगैरे सर्व जातींचे असत. सामान्यतः स्वाराचें वेतन जरी सालीना अडीचशें, तीनशें रुपयेपर्यंत घोडें माणूस पाहून असे तरी सात आठशेंपासून दोन हजारांपर्यंत तैनाता देऊन व पालख्या, अबदागिऱ्या, वगैरे बहुमान देऊन हे एकांडे प्रत्येक पागेंत व पथकांत दहा. वीस, पन्नास, शंभर असे एकंदर स्वारांच्या संख्येचें मान पाहून बाळगिलेले असत. आणीबाणीच्या वेळीं हे मोहरे आघाडीस असावयाचे-हेच पुढें बढती मिळून पागे व पथके होत असत" [टीप हरिवंश बखर, पा. ३१]. २

शिलेपोस-चिलखत. समला-शेमला. रणपंडित-रणकुशल, रणपटु. त्यांणी शतावधि कोस स्वामीकार्यास्तव लवकर क्रमले-शिंद्यांचीं पलटणें उत्तर हिंदुस्थानांत होतीं तीं पेशव्यांचा हुकूम गेल्यावर कूच दरकूच येऊन मिळालीं. जिवबा दादा-जिवबा दादा बक्षी हा शिंद्यांचा कवायती पलटणांच्या कंपूवरचा मुख्य अधिकारी. हासनभाई उज्जनीवाले-हसनखान बाबा शाणेखानभाई (?). [भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ३ अंक १ पान २५].

कलिजे ॥ (चाल) ॥ बाळोबास तर काळिज नाहीं । धीट रणामध्यें उभाच राही ॥ धोंडिबास जगदंबा साही । जय करण्याची चिंता वाही । सदाशिव मल्हार कांहीं ॥ मागें पुढें तिळमात्र न पाही । देवजी गवळी रिपूस बाही ॥ रणांगणाचा समय साधिती ॥ (चाल) ॥ निसंग नारायणराव बक्षी । हटकुन मारी उडता पक्षी ॥ बंदुकिला कटपट्यास नक्षी । फत्ते होई तों गोड न भक्षी ॥ रायाजी पाटिल महत्त्व रक्षी । नित्य कल्याण धन्याचें लक्षी । पिढी-जाद शिंद्याचे पक्षीं । केवळ अंतरंग जिवाचें ॥ (चाल) ॥ मेरूसाहेब कठिण फिरंगी । कलाकुशलता ज्याचे अंगी ॥ सामायन किळकाटा जंगी । मुकीर-

---

**बाळोबास तर काळिज नाहीं**–बाळोबा पागनीसाना कसलीच भीति नाहीं. अर्थात् रणशूर. **साही**–साहाय्यकर्ता. **धोंडिबा**–दौलतराव शिंद्यांचे एक कारभारी. धोंडो रामचंद्र ऊर्फ धोंडिबा. [ खरे,४८९३ ]. **सदाशिव मल्हार**–सदाशिव मल्हार दिवाण, दौलतराव शिंद्याचे एक कारभारी [ खरे, पा. ४८९३]. **देवजी गवळी**–शिंद्यांच्या घोडदळावरील मुख्य अधिकारी. **रणांगणाचा समय साधिती**–शत्रूला आव्हान देऊन कोणच्या ना कोणच्या रीतीनें त्याशीं गांठ घेतात. अर्थात् रणकंडू फार. **निसंग**–निःसंग, बेमुर्वतखोर, बेदरकार. **नारायणराव बक्षी**–जिवबादादा बक्षीचा मुलगा. **हटकून मारी उडता पक्षी**–असा नेमबाज. **कटपट्टा**–कट–m a ring round a matchlock securing the barrel in its socket [मोल्स.]. " बरें म्यान, रुप्याचे कट बंदुकीला सार । बंदुकींत भरले बार झाले तय्यार ॥ " [ शितूत २११ ]. **कट**–बंदुकीची पोलादी नळी व ती जीत बसविलेली असते ती लांकडी बैठक यांस जागोजाग बंद घेतात ते कट. [सप्त प्र. चरित्र, आवृत्ति १९२४,पान२०२]. **रायाजी–पाटील**–महादजी शिंद्याच्या विश्वासांतला त्याच्या सैन्यापैकीं एक अधिकारी. **महत्त्व**–लौकिक, प्रतिष्ठा. **मेरूसाहेब**–पेरन्. पिरू किंवा पेरू. **किळकांटा**–सामानसुमान. ( मू. हिं. श. कीलकांटा पु. ना. )–हत्यारें. Apparatus, Tools. उ० " खासगत सरकारांत बंदुका, चकमकी, फिरंगी विलायतीची दरकार आहे. यास्तव तुमचे येथें विलायतेहून आल्या

साहेब भले बहुरंगी ।। हपिसर पदरीं चंगीभंगी । जीनसाहेबाची समशेर नंगी ।। दुर्जन साहेब झटे प्रसंगीं । झर झर झर झर बुरुज बांधुनी ।। (चाल) ।। शाहामतखा सरदार किराणी । बाच्छायजादे थेट इराणी ।। किती काबूल खदार दुराणी । मुजफरखाची टोळी खोराणी ।। कडकडीत सिंगरूपची राणी । तारीफ करती गोष्ट पुराणी ।। इतरांची ठेविना शिराणी । पंचविशी-मध्यें ज्वान पलटणी ।। (चाल) ।। येथून सरली शिंदेशाई । होळकराची आली अवाई ।। तुकोजी बावांना गुरमाई । आधींच बळ स्वार शिपाई । वारगळ बरोबर फणशे जावाई ।। लांबहाते बुळे बाघ सवाई । वाघमारे कुळ धनगरभाई ।। खेरीज ब्राह्मण नागो जिवाजी ।। (चाल) ।। शिवाय होळकर खासे खासे । काशीबाजी तर हुंगुन फांसे ।। लढाईचे आणून नकाशे । स्वस्थ-पणें करतात तमाशे ।। बापुसाहेबांना येती उमासे । मल्हारजींनीं देउन दिलासे ।। जा जा म्हणती लोक बगासे । जंहामर्द तरवारकरांचे ।। (चाल) ।।

---

असतील त्या पाठविणें. हजार बंदुका, चांगली कीळकांटा-तोखतान-सुद्धां पाठवून द्यावा " [साधनें, खंड १०, पान २४९]. जंगी-लढाऊ (मू.श. जंग-लढाई). मुकीरसाहेब-पेशव्यांचे बखरींत याचा मुकील असाहि उल्लेख आहे. [पे ब.पा.१७०]. मूळ नांव मायकेल फिलोज. चंगीभंगी-व्यसनी, आफीणबाज. अर्थात् निःसंग, बेदरकार, बेफिकीर. जीन-जीन बॅप्टिस्ट फिलोज दुर्जन-ड्रुजियन, ड्रुजियन. पुण्यांत 'दुर्जनसिंगाची पागा' म्हणून प्रसिद्ध असलेल्या ठिकाणीं याची पागा असे. बुरुज बांधणें-सैन्य विशिष्ट पद्धतीनें उभें करणें. शहामतखां-शहामीरखां रोहिले? [पे.ब.पा.१४३]. किराणी-(?). बाच्छायजादे थेट इराणी-(?). खोराणी-(?). सिंगरूपची-शिंगरूखांची [पे. ब ]. राणी-उत्तम पलटण या अर्थी. शिराणी-महत्त्व, किंमत, मातबरी. कुळ-कुल् म्हणजे सर्व, झाडून, सगळे. नकाशे-नक्ष असा फारशी शब्द आहे त्याचा अर्थ कच्ची हकीकत. [खरे, पा. ३५६६]. त्यावरून येथें नकाशा म्ह० कच्ची हकीकत किंवा वार्ता, बातमी, डांक असा असावा. बापूसाहेब-बापू होळकर (?). [हो.कै.पा.६९]. मल्हारजी-मल्हारराव होळकर. तुकोजीचा दुसरा मुलगा. जा जा म्हणती लोक

हरजी विठूजी आनंदराव। स्वतां धनी यशवंतराव ॥ संताजीचें प्रसिद्ध नांव ॥ आबाजीचा तिखट स्वभाव। दूर नेला साधितात डाव ॥ विचारी मतकर माधवराव। भागवतांनीं सोडुन गांव ॥ तावडतोब निघाले ॥ (चाल) ॥ महाशूर पटवर्धन सारे। ठाइं ठाइं त्यांचे फार पसारे ॥ चिंतामणराव शूर कसारे। केवळ एकांगी वीर जसारे ॥ परशुराम रामचंद्र असारे। चहुंकडे ज्याचा पूर्ण ठसारे ॥ अप्पासाहेब तोही तसारे। थरथर ज्याला शूर कांपती ॥ (चाल) ॥ रास्ते आनंदराव दादा। पानशांची बहु मर्यादा ॥ विंचुरकरामधिं गांडु एखादा। राजाबहाद्दर पुरुष जवादा। चौपट खर्च दुप्पट आदा ॥ पुरंधऱ्यांची कदीम इरादा। तत्पर पेठे मोगलवादा ॥ ओढेकरही येऊन भेटले ॥ (चाल पहिली) ॥ वामोरकर सांवरले आंबेकर आणि बारामतीकर प्रसंगास अनुसरले ॥ दैन्य दिवस आज सरले ॥ ३

खास पतक नानाचें। निवडक माणुस त्यांत पुरातन सूचक संधानाचें ॥ पद देऊनि मानाचें। खुष करुनि शाबास काम मग सांगुन सुलतानाचें ॥ बळ विशेष यवनांचे। हे ऐकुनी लोकांनीं सोडिलें पाणी शीरसदनाचे ॥

---

बगासे (?) जहांमर्द तलवारकराचे-(?) दूर नेला साधितात डाव- बिघडलेली लढाई अगर मसलत सुधारतात. ठाईं ठाईं त्यांचे पसारे- पटवर्धनांच्या निरनिराळ्या जहागिरी दक्षिणेंत पसरल्या आहेतच. चिंतामणराव-चिंतामणराव पांडुरंग पटवर्धन. एकांगी वीर-अद्वितीय वीर, साहसी, धाडशी वीर. आप्पासाहेब-परशरामरावाचा थोरला मुलगा. आनंदराव दादा रास्ते-बखरींत माधवराव रास्ते आहे. पानशे-" ......व नबाब निजामअलीखां यासी लढाई खर्ड्यानजीक जाहली त्या लढाईंत सखारामपंत यांनीं बहुत सेवाचाकरी केली. सबब सरकारांतून........" [द. स. कै. या. व. पा. १२४]. कदीम इरादा-ज्यांची योग्यता जुनीच आहे. पूर्वीपासून माहीत आहे. पेठे-त्रिंबकराव अमृतेश्वर पेठे "वडिलांचे इराद्याप्रमाणें आम्ही श्रीमंताचे स्वारीबरोबर खर्ड्यास नबाब याजवर गेलों होतो." [द. स. कै. या. वं. पा.१४०]. मोगलवादा-मोगलांशीं लढण्याकरतां. ३

सूचक संधानाचें-समयज्ञ, दूरदर्शी, धूर्त. हे ऐकूनि लोकांनीं सोडिलें

(चाल) ॥ आपा बळवंतराव सुबुद्ध । बिनिवाले पुरुषार्थी प्रबुद्ध ॥ पवारांत मर्दाने शुद्ध । वाढविती भापकर विरुद्ध ॥ केवळ्यांना शुष्कवत युद्ध । काढिती हांडे रणीं अशुद्ध ॥ धायगुडे निर्बाणी कुबुद्ध । शेखमिरा फौजेंत मिसळले ॥ (चाल) ॥ पराक्रमी हिमतीचे दरेकर । तसेच जाधव बुरुजवाडीकर ॥ अमीरसिंग जाधव माळेगांवकर । सुजाण गोपाळराव तळेगांवकर ॥ जानराव नाईक नठ निंबाळकर । शेकर सोयरे बाळो वडाळकर ॥ करारी डफळे अनंतपुरकर । आढोळ्याचे लोक इमानी ॥ (चाल) ॥ कामरगांवकर मग बोलवले । प्रतिनिधीला किती गौरविले । हर्ष वाहले पुढे सरसावले ॥ रणनवरे दरकुच धांवले । समाधान राऊत पावले ॥ बन्या बापु जसे नवरे मिरविले । शहर पुणें रक्षणार्थ ठेविले ॥ माधवराव रामचंद्र कानडे ॥ (चाल) सरमजामी सरदार संपले । शिलेदार मागें नाहीं लपले ॥ धाराशिवकर लेले खपले । जमेत सुद्धां ते आपापले ॥ गोट गणतिला तमाम जपले ।

---

पाणी शीरसदनाचें–(?) बिनीवाले–माधव रामचंद्र बिनीवाले. 'आम्ही बदामीचे व खर्ड्याचे स्वारीबरोबर गेलों होतों." [द. स. कै. या. व. पा. १५६]. वाढविती भापकर विरुद्ध–(?). भापकर–पर्वतराव भापकर. [पारसनीस, जु. ऐ. गो. ८]. माधवराव भापकर. [म. इ. सां. खं. ७ पा. १२]. यांचें नांव भाणकर भापकर आणि भालपकर असें हस्तदोषानें निरनिराळें लिहिलेलें आढळतें. अशुद्ध–रक्त. काढिती हांडे रणीं अशुद्ध–अनेक हांडे भरतील इतकें शत्रूंचें रक्त सांडणारे, म्हणजे अतिशय पराक्रम करणारे. निर्बाणी–धीट, धाडसी, किंवा संकटकाळीं छातीनें पुढें घुसणारा. कुबुद्ध–क्षुब्ध (?). हर्ष वाहले पुढे सरसावले–हर्षे आणि वाहले हीं बहुधा आडनांवें असावींत. रणनवरे–आडनांव. शिलेदार मागे नाहीं लपले–निरनिराळे शिलेदारहि सैन्यांत चमकत होते. जमेतसुद्धां–आपापल्या पथकासुद्धां. जमात–सैन्य, परिवार. गोट गणतिला तमाम जपले–धाराशिवकर, लेले, खपले वगैरे तमाम शिलेदार आपापले जमेतसुद्धां गोटगणतीला आले. गोट गणती–तळाचे तळावर मोजवा,

सानपदोर्गे निगडे टपले ॥ खुळे बाघ आणि बाबर सुपले । भगत बडे डोबाले दिपले ॥ जाधव काळे माळशिकारे ॥ (चाल)॥ बाजीराव गोविंद बर्वे । लाड शिरोळे धायबर सुर्वे ॥ दाभाड्याचा हात न धरवे ! भगवंतसिंग बैसे बेपर्वे । वझरकराचा लौकिक मिरवे। खंडाळ्याचे पोषाग हिरवे ॥ नलगे भोयेत सुंदर सर्व । सखाराम हरी बाबुराव ते ॥ (चाल) कडकडीत हुजुरात हुजुरची। वीस सहस्र जूट पदरची ॥ राउत घोडा बंदुक बरची । केवळ आगच उतरे वरची ॥ एक एक पागा अमोल घरची । दाद न देती देशांतरची ॥ काय कथा त्या भागानगरची । रणांगणीं काळास जिंकिती ॥ (चाल) ॥ दिघे फडतरे बाद्रर-काठे । तळाधीर मानसिंग खलाटे ॥ मारिती पुढें समोर सपाटे । निलाम कवडे झाले खपाटे ॥ देवकांत्याचे फार हाकाटे । मुळे गांवढे करिती गल्हाटे ॥ जगतापाचे महतर भोयटे । भले मुर्तुजा महात थड्याचे ॥ ( चाल ) ॥ गणेश गंगाधर थोरात । निळकंठ रामचंद्र भरात ॥ आयतुळे मान्य सकळ शूरांत । बेहरे मांजरे योग्य वीरांत ॥ राधो बापुजी रणधोरांत । येसोजी हरी सैन्य पुरांत ॥ दारकोजीबाबा निंबाळकरांत । वीरश्रींत तो धुंद सग्याबा ॥ ( चाल )॥ कृष्णसिंग हैबतासिंग तारे । तसेच लक्ष्मणसिंग बारे ॥ दावलबावा महात सारे । मिळाले भापकर ते परभारे ॥ मैराळजी पायगुडे विचारे । इदापुरकर नव्हत विचारे । गणेश विठ्ठल वाघमारे ॥ बिडकर खुर्देकर आटीचे ॥(चाल)॥

---

हजेरी, गणती [का.इ. सं. प. या ४४८]. **दाद न देती देशांतरची०-**एकेक पागा अशी शूर कीं, ती प्रत्यक्ष काळासहि जिंकील, दाद देणार नाहीं. मग देशान्तरची, भागानगरची कथा काय ? म्हणजे परमुलुखांतल्या भागानगरची मातबरी काय ? **भागानगर-**हैदराबाद. **दैवकांत्याचे फार हकाटे-**देव-कांत्याचा तर फार बोलबाला किंवा लौकिक आहे. देवकांते हे एक सुप्रसिद्ध एकांडे होते. या देवकांत्यांपैकीं एका देवकांत्याच्या तारफेच्या शिपाईगिरी-संबंधीं एक गोष्ट हरि. बखरींत आली आहे. **दारकोजी बाबा निंबाळ-करात-**जु. ऐ. गो ८ यांत पेशव्यांच्या बावन पाग्यांत सखोजी माळ्ये रुजू द्वारकोजी असें आहे. तोच हा द्वारकोजी बाबा निंबाळकर कीं काय ? **तारे-**

(चाल) ॥ आपा बळवंतराव सुबुद्ध । बिनिवाले पुरुषार्थी प्रबुद्ध ॥ पवारांत मर्दाने शुद्ध । वाढविती भापकर विरुद्ध ॥ केवढ्यांना शुष्कवत युद्ध । काढिती हांडे रणीं अशुद्ध ॥ धायगुडे निर्वाणी कुबुद्ध । शेखमिरा फौजेंत मिसळले ॥ (चाल) ॥ पराक्रमी हिमतीचे दरेकर । तसेच जाधव बुरुजवाडीकर ॥ अमीरसिंग जाधव माळेगांवकर । सुजाण गोपाळराव तळेगांवकर ॥ जानराव नाईक नठ निंबाळकर । शेकर सोयरे बाळो वडाळकर ॥ करारी डफळे अनंतपुरकर । आढोळ्याचे लोक इमानी ॥ (चाल) ॥ कामरगांवकर मग बोलवले । प्रतिनिधीला किती गौरविले । हर्ष वाहले पुढे सरसावले ॥ रणनवरे दरकुच धांवले । समाधान राऊत पावले ॥ बन्या बापु जसे नवरे मिरविले । शहर पुणें रक्षणार्थ ठेविले ॥ माधवराव रामचंद्र कानडे ॥ (चाल) सरमजामी सरदार संपले । शिलेदार मागे नाहीं लपले ॥ धाराशिवकर लेले खपले । जमेत सुद्धां ते आपापले ॥ गोट गणतिला तमाम जपले।

---

पाणी शीरसदनाचें–(?) बिनीवाले–माधव रामचंद्र बिनीवाले. 'आम्ही बदामीचे व खर्ड्याचे स्वारीबरोबर गेलों होतों." [द. स. कै. या. व. पा. १५६]. वाढविती भापकर विरुद्ध–(?). भापकर–पर्वतराव भापकर. [पारसनीस, जु. ऐ. गो. ८]. माधवराव भापकर. [म. इ. सां. खं. ७ पा. १२]. यांचें नांव भाणकर भापकर आणि भालपकर असें हस्तदोषानें निरनिराळें लिहिलेलें आढळतें. अशुद्ध–रक्त. काढिती हांडे रणीं अशुद्ध–अनेक हांडे भरतील इतकें शत्रूंचें रक्त सांडणारे, म्हणजे अतिशय पराक्रम करणारे. निर्वाणी–धीट, धाडसी, किवा संकटकाळीं छातीनें पुढें घुसणारा. कुबुद्ध–क्षुब्ध (?). हर्ष वाहले पुढें सरसावले–हर्षे आणि वाहले हीं बहुधा आडनांवें असावींत. रणनवरे–आडनांव. शिलेदार मागे नाहीं लपले–निरनिराळे शिलेदारहि सैन्यांत चमकत होते. जमेतसुद्धां–आपापल्या पथकासुद्धां. जमात–सैन्य, परिवार. गोट गणतिला तमाम जपले–धाराशिवकर, लेले, खपले वगैरे तमाम शिलेदार आपापले जमेतसुद्धां गोटगणतीला आले. गोट गणती–तळाचे तळावर मोजवा,

सानपदोर्गे निगडे टपले ॥ खुळे वाघ आणि बाबर सुपले । भगत बडे डोबाले दिपले ॥ जाधव काळे माळशिकारे ॥ (चाल)॥ बाजीराव गोविंद बर्वे । लाड शिरोळे धायबर सुर्वे ॥ दाभाड्याचा हात न धरवे ! भगवंतसिंग बैसे बेपर्वे । वझरकराचा लौकिक मिरवे । खंडाळ्याचे पोषाग हिरवे ॥ नलगे भोयेत सुंदर सर्व । सखाराम हरी बाबुराव ते ॥ (चाल) कडकडीत हुजुरात हुजुरची । वीस सहस्र जूट पदरची ॥ राउत घोडा बंदुक बरची । केवळ आगच उतरे वरची ॥ एक एक पागा अमोल घरची । दाद न देती देशांतरची ॥ काय कथा त्या भागानगरची । रणांगणीं काळास जिंकिती ॥ (चाल) ॥ दिघे फडतरे बाब्दर-काठे । तळापीर मानसिंग खलाटे ॥ मारिती पुढें समोर सपाटे । निलाम कवडे झाले खपाटे ॥ देवकांत्याचे फार हाकाटे । मुळे गांवढे करिती गल्हाटे ॥ जगतापाचे महतर भोयटे । भले मुर्तुजा महात थव्याचे ॥ ( चाल ) ॥ गणेश गंगाधर थोरात । निळकंठ रामचंद्र भरात ॥ आयतुळे मान्य सकळ शूरांत । बेहरे मांजरे योग्य वीरांत ॥ राधो बापुजी रणघोरांत । येसोजी हरी सैन्य पुरांत ॥ दारकोजीबाबा निंबाळकरांत । वीरश्रींत तो धुंद सग्याबा ॥ ( चाल )॥ कृष्णसिंग हैबतासिंग तारे । तसेच लक्ष्मणासिग बारे ॥ दावलबावा महात सारे । मिळाले भापकर ते परभारे ॥ मैराळजी पायगुडे विचारे । इंदापुरकर नव्हत बिचारे । गणेश विठ्ठल वाघमारे ॥ बिडकर खुर्देकर आटीचे ॥(चाल)॥

---

हुजेरी, गणती [का.इ. सं. प. या ४४८]. **दाद न देती देशांतरची०**–एकेक पागा अशी शूर कीं, ती प्रत्यक्ष काळासहि जिंकील, दाद देणार नाहीं. मग देशान्तरची, भागानगरची कथा काय ? म्हणजे परमुलुखांतल्या भागानगरची मातबरी काय ? **भागानगर–हैदराबाद. दैवकांत्याचे फार हकाटे–**देव-कांत्याचा तर फार बोलबाला किंवा लौकिक आहे. देवकांते हे एक सुप्रसिद्ध एकांडे होते. या देवकांत्यांपैकीं एका देवकांत्याच्या तारफेच्या शिपाईगिरी-संबंधीं एक गोष्ट हरि. बखरींत आली आहे. **दारकोजी बावा निंबाळ-करात–**जु. ऐ. गो ८ यांत पेशव्यांच्या बावन पाग्यांत सखोजी माळ्ये रुजू द्वारकोजी असें आहे. तोच हा द्वारकोजी बाबा निंबाळकर कीं काय ? **तारे–**

गिरजोजी बर्गे फार दमाचे। बहादर बारगिर ते कदमाचे ॥ आठवले तर बहु कामाचे। दुर्जनसिंग राठोड श्रमाचे ॥ टिळे कपाळीं रामनामाचे। बिनी-बरोबर ते नेमाचे ॥ श्रीमंतस्मरणें काळ क्रमाचे। जसे दूत सांबाचे प्रतापी ॥ (चाल पहिली) ॥ प्रपंच वैद्य विसरले। चिलखत बख्तर शिलेटोप मल्हारराव पांघरले ॥ दैन्य दिवस आज ते सरले० ॥ ४

लष्कर सगळें गुर्के। जरीपटक्याभोंताले घालिती गरर मानकरी गर्के ॥ सुंदर गोरे भुर्के। घोरपडे पाटणकर महाडिक खानवीलकर शिर्के ॥ मुंगी मध्यें ना फिर्के। चव्हाण मोहिते गुजर घाडगे निंबाळकर दे चर्के ॥ (चाल)॥ पुढें पसरले रिसालदार। मुसा मुत्रीम नामदार ॥ सय्यद अहमद जमादार। अमीर आबास नव्हे नादार ॥ शहामिरखां ते डौलदार। इतक्यांवर ते हुकूमदार ॥ राघोपंत ते दौलतदार। तसे काशिबा बल्लाळ रानडे ॥(चाल)॥ गोरा मुसाबास अमोल। मुसानारद तो समतोल ॥ विनायकपंताचा गलोल। आबा काळे गुणीच डोल ॥ टोपकराचे बोलती बोल। पायदळांचा बांधुनि गोल ॥ तंबुर ताशे वाजती ढोल। उठावल्या बैरखा निशाणें ॥ (चाल) ॥

---

ताऱ्यासारखे, तेजस्वी. **नव्हत बिचारे**–बावळट नव्हेत. **बिचारा**–दीन, नादान. **आटीचे**–तटीचे, प्रतिज्ञेचे इरेस पडणारे. **बख्तर**–लोखंडाचें चिलखत. **शिलेटोप**–चिलखत. ( अरबी हिंदी पु०). ४

**सुंदर गोरे भुर्के**–सर्व आडनांवें. **घोरपडे**- यशवंतराव व खंडेराव. "खर्ड्याची मोहीम फत्ते करून श्रीमंतांचे स्वारीसमागमें उभयता आजे यशवंतराव खंडेराव पुण्यास आले." [द.स कै.या.व.पा.४४]. **पाटणकर**–'जानराव पाटणकर खर्ड्याचे लढाईत होते' [ म. कु. इ. भा. २ पा. ७८]. **नामदार**–(फा. वि.) सुप्रसिद्ध. **मुसा नारद**–मुसा नारज. फिरंगी गोलंदाज पेशव्यांच्या सैन्यांत होता. हा बोरघाटाच्या लढाईंत होता. [पारस.ऐ.टि.पान ७७]. **गलोल**–गोफण, धनुष्य फेंकण्याचें धनुष्य [शालि०]. **गुणीच डोल**–गुणी चंडोल, किंवा गुणी चढेल? **चंडोल**–हौशी, खुशालचंद, मौजा. **तंबुर**–लढाईंतले ढोलासारखे चर्मवाद्य, ड्रम टॅंबूरिन. **बैरख**–( बैरक आरबी स्त्री०) निशाण, झेंडा. एका निशाणाखालीं

संस्थानी याविरहित राजे। सेनासाहेब किताब साजे ॥ राघोजीबावा नांव विराजे। बाणांचा भडीमार माजे ॥ सरखेलांचा लौकिक गाजे। समशेर बहादर गरीब नवाजे ॥ अकलकोटी लोक ताजे। दुर्जनसिंग रजपूत हडोदी ॥ [चाल] ॥ दक्षण उत्तर पश्चिम भागी। पसरुन तोफा जागोजागीं। तमाम गारदी त्याचे मागी। स्वार सैन्य त्यामागे झगागी ॥ जरीपटका तो दुरुन धगागी। कोणीच नव्हता त्यांत अभागी ॥ त्वरित बक्षिस पावे बिदागी। जासूद सांडणीस्वार धांवती ॥ (चाल) ॥ काय पलटणच्या फैरा झडती। पर्जन्यापरि गोळ्या पडती ॥ शिरकमळे कुंदुकवत् उडती। छिन्न भिन्न किती होऊन रडती ॥ कितीक पाण्याविण तडफडती। कितीक प्रेतामधींच दडती ॥ वीर विरांशीं निसंग भिडती। सर्तासारखे विडे उचलिती ॥ [चाल] ॥ पाउल पाउल पुढें सरकली। घाव चुकाउन शूर थडकती–॥ सपुत, वाघापरी गुरकती। हत्यार लाऊन मागे मुरकती ॥ खुणेने शत्रुवर्म तरकती। मोगल बच्चे मागें सरकती ॥ जिवबादादा मनीं चरकती। अररररर शाबास बापांनो ॥ (चाल) ॥ सुटती तोफा धुंद दणादण। गुंगत गोळे येती छणाछण ॥ सो सो करिती बाण सणासण। खालेल घोडे उडती टणाटण ॥ टापा हाणती

---

गोळा केलेलें सैन्य. उदा० "समागमें आपलेकडील खिजमतगार, ब्राह्मण, कारकून आरबांच्या बैरखा नेहमीं दोन दिल्या आहेत. [साधनें १७, पा. ९७३]. **समशेर बहाद्दर**–तलवारबहाद्दर. **गरीबनवाजे**–गरीबांचे कैवारी, उदार. **अक्कलकोटी**–अक्कलकोटचे भोसले त्यांचे [पं. प्र. या. दु. श. पा. ८४]. **हडोती**–हें एक मुलखाचें नांव आहे. भावार्थ हडोती प्रांतांतले. **तमाम गारदी त्याचे मागी**–गारद्यांची फौज त्याचे मागें होती. **धगागी**–झळके. जरीपटका असल्यामुळें धगागणारच. **निसंग भिडती**–बेभान होऊन भिडले. **सपुत**–सपूत (हिंदी)–सुपुत्र, शूर, **वाघापरी गुरगुरती**–ते वीर-पुत्र, वीरांचे बच्चे शत्रूचा वार चुकवून हल्ला करीत व गर्जना करीत. **तरकती**–जाणतात, ओळखतात. **गुंगत**–गुं गुं आवाज करीत. **खालेल**–अंगाखालचा-खलेल (?) **खलेल घोडा**–तापट उमदा घोडा. **टापा हाणिती**–टपा. टप्पा–

दुरुन ठणाठण। वाजति पट्टे खांडे खणाखण ॥ नौबती झांझा झडती झणाझण। एकच गर्दी झाली धुराची ॥ [चाल] ॥ थोर मांडली रणधुमाळी। अगदींच बसली मग कांठाळी ॥ फौज पसरली रानोमाळीं। लाखों लाख तरवार झळाली ॥ होळकराची फिरती पाळी। जिवबांची मर्दुमकी निराळी ॥ मोंगलाची केली टवाळी। सबळ पुण्य श्रीमंत प्रभूचें ॥ [चाल] ॥ अठरा घटका लाही फुटली। तोफ हजारों हजार सुटली ॥ मिरजकरांची मंडळी झटली। भाउबरोबर निसंग तुटली ॥ मोंगल सेना मागे हटली। त्यासमयीं कैकांची उपटली ॥ पेंढाऱ्यांनीं दौलत लुटली। गबर झाले एका दिसांत ॥ [चाल] ॥ शके सत्राशें सोळा भरतां। आनंद संवत्सरही सरतां। दहा दिवस शिमग्याचे उरतां। वद्य पंचमी सुवेळ ठरतां ॥ तीन प्रहरांचा अंमल फिरतां। मोगलांशीं प्रसंग करिता ॥ पळाले मोंगल धीर न धरतां। चंद्र-उदयीं खर्ड्यांत कोंडिले ॥ [चाल पहिली] ॥ गर्दीत खासे शिरले। मराठे मोंगल पठाण पुर्भे इतर घरोघर भरले ॥ दैन्य दिवस हे आज सरले ॥५॥

---

बंदुकीचा नेम. "सहा घटका दिवसापासून शिंद्याकडील कंपूची मारागिरी होत होती, ती बारा घटका रात्रीपर्यंत एकसारख्या तोफा उडत होत्या." [खरे, ४७१०]. **निसंग तुटली**–रणमदानें बेहोष होऊन तुटून पडली. या युद्धांत खुद्द परशुरामभाऊस कपाळावर व बाहुट्यावर जखमा लागल्या. त्यांचा पुतण्या विठ्ठल धोंडदेव ठार झाला. जनार्दनपंत सुभेदार यादवाडकर यांस हातास जखम लागली. विसाजीपंत वाडदेकर यांस दोन भारी जखमा लागल्या. शिवाय या खाशाखेरीज गोपाळपंत सोवनी, अंताजी फडके, सदाशिवपंत जोशी उत्तूरकर यांना जखमा लागल्या. चिंतामणभट खाडिलकर ठार व पथकांपैकी व्यंकटराव जाधव शिपूरकर ठार. **खांडा**–रुंद पात्याची दुधारी सरळ तरवार. **कांठाळी**–कांठळी. तोफांच्या दणक्यांनीं कांठाळ्या बसल्या. पाळी समूह [आपटे]. अर्थात होळकरांचा समूह. Encircling body or line of troops. [मोल्स]. **अठरा घटका लाही फुटली**–अठरा घटका आगीचा मार झाला. "सकाळच्या चार सहा घटका दिवसापासून शिंद्यांकडील कंपूंची मारगिरी होत होती ती बारा घटका रात्रीपर्यंत एकसारख्या तोफा उडत होत्या. [खरे, ४७१०]. **चंद्रउदयीं खर्ड्यांत कोंडले**–'At last moon rose and Nijam alli in perfeet consternation sought refuge within the walls of Kharda. (*Grant Duff.*) **पुर्भे**–पुरभय्ये.

बहुत खराबी जहाली। मोहोऱ्यावरची फौज सैनिकांसहित रस्ते नाहली ॥ त्यांत उन्हाची काहाली। रुपयाचें दिड शेर पाणी अशी कठीण वेळा वाहली ॥ ती सर्व जनांनीं पाहिली। जिवबादादा परशुरामपंतांची दिसंदिस बहाली ॥ (चाल) ॥ निजाम अल्लीखान नव्हे सामान्य। बाच्छाई सुलतानांत मान्य ॥ जुनाट पुरुषांत राजमान्य। अपार पदरीं मण धनधान्य ॥ कोण बरोबरी करील अन्य। दैव धन्याचें मुळीं प्राधान्य ॥ तशांत झाले अनुकूल दैन्य। नाहीं तर घेते खबर पुण्याची ॥ (चाल) ॥ जेव्हां मारिती यवन मुसंडी। तेव्हांच होई ती फौज दुखंडी ॥ साठ सहस्र पठाण बुंडी। तिनशें तोफा थोर अखंडी ॥ पंचरशी आणि बिडी लोखंडी। तयार दारु तिनशें खंडी ॥ असे असुनियां दबली लंडी। धरून मश्रुल्मुल्ख आणिला ॥ (चाल) ॥ संकटीं मोंगल अति पडियेला। देश होता तो तोडीस नेला ॥ तो तेहतीस लक्षांचा गेला। तीन कोटींचा करार केला ॥ पण नानांनीं सिद्धीस नेला। फिरला मोंगलाचा ढपेला ॥ नक्षत्रापरी

---

**नाहळी**—न्याहाळी. आघाडीवरची फौज घेरा घालून रस्ते न्याहाळीत बसली, रोखून बसली; किंवा मोहोऱ्यावरच्या फौजेनें आंत शत्रूचे सैनिक व बाहेर रसद रोखून धरली. **वाहली**—प्राप्त झाली. **बहाली**—उत्कर्ष. **दैव धन्याचें०**—आधींच पेशवे यांचें दैवबळ मोठें आणि त्यांत शत्रूचें दैन्य म्हणजे दुर्दशा याची अनुकूलता मिळाली इ० भावार्थ. **जेव्हां मारिति यवन मुसंडी इ०**—भारामल व असद अल्लीखान यांनीं अकस्मात् हल्ला करून प्रथम कोस दीड कोस परशुरामभाऊस मागें हटविलें होतें व तेव्हां फौजेंत फार गोंधळ झाला होता, त्या प्रसंगास अनुलक्षून **बुंडी**—(वि०) दुष्ट [ आपटे ] **अखंडी**—अखंड, न फुटलेल्या. **पंचरसी, बिडी, लोखंडी**—या धातूंच्या तोफा. हे तोफांचे प्रकार आहेत. **लंडी**—दांडगा, **तोडीस नेणें** किंवा **येणें**—वादांतील मुद्द्यांचा निकाल लावणें. **तीन कोटींचा करार केला**—"चौथ सरदेशमुखीच्या बाकीबद्दल निजामअल्लीनें पेशव्यास तीन कोट रुपये द्यावे" [ खरे, ४७१२]. **ढपेला**—मराठी कोशांतून शब्द नाहीं. हिंदी शब्द ढप—ड्रम, नगारा, नौबत. **फिरला मोंगलांचा ढपेला**—मोंगल सेनेची नौबत परत फिरली अर्थात्

आला तजेला। त्यामध्यें माधव चंद्र उदेला ॥ (चाल) ॥ स्वारी नव्हे हें स्वयंवर झालें। श्रीमंतांस ऐश्वर्य मिळालें ॥ अपेश अटकेपार पळालें। यादव सैन्य हरीभोंतालें ॥ तसेंच लष्कर पुण्यास आलें। पहावया जन सर्व निघाले॥ दर्शन होतां शरीर निवालें। घरोघरीं आनंद माइना ॥ (चाल) ॥ पाहुन पूर्वापार शिरस्ते। भवानी पेठेपासुनी रस्ते॥ दीपोत्सव शोभती दुरस्ते। श्रृंगारुन गज तुरंग बस्ते ॥ शहरामाजी पदार्थ सस्ते। पहिलवान आणि जेठी मस्ते। खुराक त्यांना बदाम पिस्ते ॥ सदा धुंद जिलीबींत चालती ॥ [चाल] ॥ भांड भाट भालदार भवय्ये। सुस्वर गाती धाडी गवय्ये ॥ शिरापुरीचे सदा खवय्ये। मिठाई देती नित्य हलवय्ये ॥ लोक सभोंवती लढवय्ये। नाना-सारिखे वीर संगवय्ये ॥ बलाढ्य शत्रु पराभवय्ये। धनी रावराजेंद्र कन्हय्ये ॥ [चाल] ॥ लगी बाण बोथाट्या दाट। बिनाइट्याचा खळखळाट ॥ अंबाऱ्यांचा मागें थाट। त्यामागें हुजुरात अचाट ॥ सत्तर हत्ती पुढे जुनाट। मधून फुटेना मुंगीस वाट ॥ झुगारिल्या जरी दुरुनी ताट। तरी ते खालीं कधी पडेना ॥ [चाल] ॥ सत्राशें सत्रामधिं स्वारी। राक्षस संवत्सरीं स्वनगरीं ॥ उलटुनि आली घरिं माघारी। संवत् वैशाखाची बहारी ॥ शुद्ध त्रयोदशी शुक्रवारीं। दहा घटका रात्रिच्या सुमारीं। गुढ्या उभारून

मोंगल सैन्य माघारी गेलें. **दुरस्ते**–दोहों बाजूंस. **बस्त**–एडका, बकरा. **जेठी**–वज्रमुठी लढणारे पैलवान. **जिलीब**-परिवार. **भांड**–नट, तमाशा वगैरे करणारा. **भालदार**–'नजर रखो महाराज' इ० भालदार ललकारीत असतो. **भवय्या**–गुजराथी नटनर्तक. **धाडी**–हिं.पु. मुसलमानांच्या फौजेबरोबर मिरवणुकीबरोबर गात जाणारे गवई. **खवय्या**–मूळ अर्थ चवीनें खाणारा–खादाड. **संगवय्या**–संगवई (पु.) वाटाड्या, सहकारी. भावार्थ मुत्सद्दी. **पराभवय्या**–पराभूत करणारा. **बिनाइटी**–बनेट. हें एक मर्दानी खेळांतलें लेजमीसारखें परंतु थोडें निराळें हत्यार आहे. त्याचें चित्र व माहिती मागें विविधज्ञानविस्तारांत इतर हत्यांराबरोबर प्रो० माणिकराव यांनीं दिली आहे. **उलटुनि आली**–परतुनि आली. **दिला**

राजद्वारीं । गृहप्रवेश केला प्रभुनीं ॥ [चाल] ॥ न्याहाल केलें सरदारांना । दिला चौघडा मिरजकरांना ॥ खेरीज जहागिर विंचुरकरांना । कडीं कंठ्या देऊन शूरांना ॥ गौरवुनी नानांनीं वीरांना । निरोप दिले मग अमीरांना ॥ गेले कृष्णा भीमातिरांना । कुटुंबसुद्धां स्वस्थ नांदती ॥ [चाल] ॥ गंगु हैबती शाईर मोठे । कवनीं ज्यांच्या बंद बनोटे ॥ महादेवाचे सवाई सोटे । गुणी राजाचे शब्द शिधोटे । जसे गोडिला घिवर चिरोटे ॥ इतर कवीश्वर केवळ गोटे । अर्थप्रास लावितात खोटे ॥ पगड्या फिरवुन डौल मिरविती ॥ [ चाल पहिली ] ॥ कैक प्रसंगीं हरले । बिनडाकिल दागिने अमोलिक प्रभाकराचे ठरले ॥ दैन्य दिवस आज सरले ॥ ६

---

**चौघडा मिरजकराना**–"ती परशरामपंत भाऊसाहेब यास जखम लागली सबब बहुमानाबद्दल वस्त्रें व तुरा व कंठी व शिरपेंच व नगारखाना श्रावण वद्य त्रयोदशीस दिला " [खरे, ७३६०]. **खेरीज जहागीर विंचुरकरांना**–विंचूरकर घराण्याचा इतिहास या पुस्तकांत खर्ड्यांनंतर विंचूरकरांना जहागीर मिळाल्यासंबंधीं कांहीं हकीकत नाही. जहागीर याचा अर्थ जहागिरीच्या वहिवाटदारीचीं वस्त्रें म्ह० सरदारीचीं वस्त्रें असा असला तरी तीं वस्त्रें खंडेराव विठ्ठल यांना शके १७१५ च्या श्रावण महिन्यानंतर लगेच मिळालीं. १७१५ च्या श्रावण शु० २ ला शिवाजी विठ्ठल वारले. त्यांच्या उत्तरक्रियेनंतर खंडेराव "श्रीमंत माधवराव पेशवे यांचे भेटीस्तव पुण्यास गेल्यावर श्रीमंतांनीं त्यांस लागलीच सरदारीचीं वस्त्रें देऊन तत्संबंधीं मुलुकाच्या सनदाहि करून दिल्या " [विं. घ. इ. पा. १२०]. **न्यहाल करणें**–(फा. निहाल वि. उच्च पदवीला चढविलेला, कृपेंतला )–कृपाकरणें, गौरव करणें. **बंद बनोटे**–बंद–नियम. **बनोट**–(हिं. स्त्री. अलंकारिक रचना) अलंकारिक रचनेचा विलास. **शिधोटे**–**शिधोट**–सरळ व लांब. सडक, जोरदार. मूळ हिंदी शब्द सिद्दत–जोर **घिवर**–एक गोड पक्वान्न, चिरोट्यासारखें साखरेच्या पाकांत तळलेलें. **बिनडाकिल**–बिनजोडाचे. दागिना मोडल्यास डाक बसवितात तो प्रसिद्धच आहे. अर्थात् येथला भावार्थ एकसंध, अखंड शुद्ध. ६



# खर्ड्यांची लढाई दुसरा पोवाडा

सदर पोवाड्याच्या भाषेचा आणि वर्णनाचा थाट थेट सगनभाऊच्या पानपतच्या पोवाड्यासारखा आहे, हें पोवाडा वरवर चाळणारासही दिसून येईल. सगनभाऊची भाषा व वर्णनशैली जोरदार आहे परंतु ती त्याची करामत असत्य व भरमसाट गोष्टी वर्णन करण्यांत खर्च झाल्यामुळें रसिक परंतु चिकित्सक मनाला तें प्रेतावर शालजोडी घातल्याप्रमाणें उद्वेगकारकच वाटतें. याच्या उलट या पोवाड्यांत खऱ्या वस्तुस्थितीचेंच शाहिरानें जोरकस वर्णन केलें असल्यामुळें आनंद द्विगुणित होतो. शाहिराच्या खेडवळ परंतु शिधोट शब्दांत किती जोर आहे तें पाहावयाचें असल्यास 'डंक्यावर टिपरी पडतां हुषार झाले' किंवा 'तलवार विश्वासाची। त्या परशुराम भाऊची' किंवा 'भोसला शर्थ बाणांची, केली गर्दी लावुन बती। टाकिली फौज भाजून मोंगल येतो काकूळती' असलीं वर्णनें पहावीं. सबंद सातवा चौक म्हणजे वीररस फेसाळून टाकीत, झपाटून जाणाऱ्या वावधणाचा झोतच आहे कीं काय असा भास होतो.

रा० शाळिग्राम यांच्या अगदीं अलीकडील आवृत्तींतले कांहीं पाठ अशुद्ध व दुर्बोध वाटले. सबब त्यांच्याच मूळ १८७९ सालीं छापलेल्या पहिल्या आवृत्तीशीं हा पोवाडा ताडून पाहून शुद्ध वा सरस वाटले ते पाठ स्वीकारले आहेत. कोणचे पाठ कोणच्याबद्दल स्वीकारले त्यांचा तपशील.

| स्वीकारलेले पाठ<br>शाळिग्राम १८७९ | वगळलेले पाठ<br>शाळिग्राम १९११ |
|---|---|
| १ वर्तमान दिलें अवघ्याला | १ हें वर्तमान अवघ्याला |
| २ जागा पाहून मैदान इ० | २ दिली जागा पाहून इ० |
| ३ बासडे बाणकरी | ३ वर झेंडे बनगरी |
| ४ चाले पठाणांची तलवार | ४ संगे पठाणांची तलवार |
| ५ घासत पडली देशावरून | ५ दहशत पडली भासतो दुरून |
| ६ शिंद्याच्या सातशें तोफा | ६ शिंद्याची सातशें तोफ |

| | |
|---|---|
| ७ भगवा झेंडा घेऊन | ७ चढले भगव्या ढाला देऊन |
| ८ गर्दी पाहून घाबरा झाला | ८ गर्दी पाहून घाबरला |
| ९ घेती लुटून | ९ घेतील लुटून |
| १० बुडवितात मुसलमानी | १० बुडवितील मुसलमानी |
| ११ जरब नानाचा डंखा झडे | ११ जरब नामाचा डंखा झडे |

# खड्यांच्या लढाईचा दुसरा पोवाडा

## २२

### [ शाहीर—आप्पा यशवंत ]

[ चाल—भाऊनाना तलवार धरून । गेले गिलच्यावर चढाई करून ॥ ]

तलवार पुण्यावर धरून, मोंगल आला चढाई करून ॥ ध्रु० ॥

होणारासारिखें निजामअल्लीला पुढें आठवलें। एकांतीं अष्टउमराव मसूर बैसूनी खलबत मिटविलें ॥ ठायीं ठायीं सुभ्यांशीं पत्रें लिहुन सांडणीस्वार पिटविले। औंदांची पुण्यावर मोहीम, निजामअल्लीनें जहान उठविले ॥ (चाल) ठायिंठायीं जमाव बंदीचे। चाललें कलम फौजेचें ॥ राऊत पायदळाचे। शेरे झटाति लोक लोकांचे ॥ [चाल] ॥ धरिला पुण्याचा सुमार रे। बेदर सोडुनियां मोहरे ॥ मुहूर्तानें ठोकिले डेरे। तोफा ओढिल्या बाहेर ॥ [चाल] ॥ मुख्य शहर दक्षिणेवरती मोहीम झाली। बांधोनियां पुण्यावर कंनर चढती

---

**चढाई करून येणें**—स्वारी करून येणें. **होणारासारिखें**—नशिबाप्रमाणें; अदृष्टांत होतें त्याप्रमाणें. **मसूर**—मशीर, मशीर उल्मुल्क. हा निजामाचा दिवाण. **खलबत मिटविलें-मिटणें**-जुळविणें (आपटे)-खलबत केलें; कारस्थान रचलें. २ खलबत पूर्ण केलें. **पिटाविले**—पळविले; पाठविले; धाडले. **सुभ्याशीं**—सुभा—प्रांतावरील मुख्य अधिकारी. **औंदाची**—यंदाची. **जहान**—जमाव; फौज. **जमाव बंदीचे**—जमाबंदीचे, जमाबंदी (स्त्री. फा.) संचणी, जमावाजमव. **कलम**—पत्र. **कलमजारी**—फौजेची जमवाजमव. ठायीं ठायीं जमाबंदीचें कलम चाललें; फौज राऊत पायदळ जमविण्यासंबंधीं पत्रें (कलम) चाललीं. **कलमी करणें**—पत्र लिहिणें. **कलम**—ज्यारीचीं पत्रें जाऊं लागलीं. **शेरे झटती लोक लोकांचे**—शेरा—शिफारस. सैन्यांत दाखल करून घेण्याबद्दल शिपायांच्या शिफारसा येऊन भिडूं लागल्या **तोफा ओढिल्या बाहेर**—तोफखाना सज्ज केला; बाहेर काढला. **मुख्य शहर दक्षिणेवरती मोहीम झाली**—दक्षिणेंतलें मुख्य शहर म्हणजे भागानगर ( हैद्राबाद ) होय. म्हणजे पेशव्यांनीं भागानगरावर चाल केली. तेव्हां दाली बांधून (ईर्षेनें) निजामअल्ली मोहरीचा घाट

दाली ॥ हिंदुपद घेईन म्हणतो निजाम अल्ली ॥ [चाल] ॥ कुचावर कुच रे कुचावर कूच पाहिना फिरून । तलवार०॥ १

येणार पुण्यावर मोंगल ही बातमी अगोदर होती । डांकिनें डांक पत्रें नानाशीं येऊन पोहोंचती ॥ ब्राह्मणी राज्य कैदवार एकापेक्षां एक मसलती । वाड्यांत सुभ्यांची खलबत, श्रीमंतांची चढती रती ॥ (चाल) ॥ रात्रीचा मनसुबा केला । वर्तमान दिलें अवघ्याला ॥ कारखाने ज्याचे त्याला । जरि-

---

उतरून मुकाबला देण्याकरितां आला. **बांधोनिया पुण्यावर कंनर चढती दाली**–पुण्यावर दाली बांधोनियां कंदर चढती (?) **दाली बांधणें**–दुसऱ्यास जिंकण्याविषयीं साभिमान सज्ज होणें. **कंदर**–डोंगर, घाट. शालि. १८७९ प्रत पाठ "बांधोनिया पुण्यावर कमर (कंबर) चढती झाली." असा आहे. **चढती**–हल्ला करून येती. कमरेला दाली बांधणें किंवा दाली बांधणें–दुसऱ्यास जिंकण्याविषयीं साभिमान सज्ज होणें; आव्हान देणें. "आम्ही उपजतांच कमरेला दाली बांधून आलों नाहीं" असें वाक्य खरे यांच्या भागांत वाचल्याचें नक्की स्मरतें. **हिंदुपद घेइन म्ह०** Even the Prime minister decalred in a public assembly that they should now be freed from the maratha encroach-ments. "त्यांनीं अगदींच वाट सोडून श्रीमंताची दौलत घ्यावी, पुण्यांत झेंडे नबाबाचे लावावे, याखेरीज राजकारणें सरकार नाशाची व दगे मारेकरीही पाठविले अशीं बहुतच केलीं." [भारतवर्ष ऐ. प. या. पा. २५ खुद्द नानाफडणीसांच्या हातचें पत्र.] "परंतु त्या दोन मुख्य गोष्टी निजामअल्लीनें साफ नाकारल्या व तो मोहरीचा घाट उतरून खर्ड्यांच्या किल्ल्यानजीक खैरा नदीवर येऊन उतरला." [ऐ. ले. सं ९ पा. ४७०५.] **पाहिना फिरून**–मागें न पाहतां कुचावर कुच करीत टाकोटाक आला. १

**डाकिनें डांक पत्रें**–डाकेमागून डाक येऊं लागली. पत्रामागून पत्रें येऊं लागलीं. **कैदवार**–शिस्तवार. **खलबत**–शब्द स्त्रीलिंगी वापरला आहे. **चढती रती**–भाग्य, दैव. **रती**–दैवदशा. **वर्तमान दिलें इ०**–हा पाठ शालि. १८७९ प्रतीवरून घेतला आहे. **कारखाने**–श्रीमंताचे अठरा कारखाने.

पटका हरिपंताला ॥ नेमणूक हुजरातीची । मराठी नेकनोकेची ॥ तलवार विश्वासाची । त्या परशुरामभाऊची ॥ (चाल) ॥ पानसे, पुरंदरे, रास्ते आणिक ढमढेरे । जागा पाहून मैदान पुण्याबाहेर ॥ दिले गारापिरावर दल-बादल डेरे । (चाल पहिली) ॥ निघाले बाहेर रे, निघाले बाहेर कधिंना फिरून । तलवार० ॥ २

राव रंभा, कायेत, पांढरे, डफळे मानकरी । जाधव, चवाण, घोरपडे, घाटगे, लग्या भडकती जरी ॥ रणनवरे, गायकवाड, बासडे, बाणकरी । हे सुभे मोंगलाकडचे उभे आपुलाल्या बाजूंबरी ॥ (चाल) ॥ इतमाम ज्याचा त्याला । मराठे मुसलमानांला ॥ चालती कोरबंदीला । दाटती मांड मांडीला ॥ मारती तीस हजार ॥ चाले पठाणांची तलवार । लष्कर सोडुनियां मोहोरे ॥ चालिले लुटित पेंढार ॥ (चाल) ॥ गारदी, आरब, सिद्दि, शिक पायदळ ।

---

ह्या कारखान्यांवर निरनिराळे अधिकारी नेमलेले असत. जरिपटका हरिपंताला–चूक. हरिपंत फडके या वेळीं वारले होते. या वेळीं जरिपटक्याचा अधिकार बाबा फडक्याला म्हणजे हरिपंताच्या मुलाकडे होता. हुजरातीची–हुजरात–खुद्द पेशव्यांची फौज. नेकनोकेची–कुशळतेची, ऐटीची. भावार्थ. हुजरातीच्या फौजेंतले माणूस निवडक होतें. जागा पाहून इ०–हा पाठ १८७९ प्रतीवरून घेतला. निघाले बाहेर कधिं ना फिरून–खर्ड्याच्या लढाईनंतर पुन्हा कधींहि इतके सरदार एकवटून स्वारी झाली नाहीं हें प्रसिद्धच आहे. २

लग्या–लगी–निशाण, झेंडा. बासडे–भाले, भालाईत. (२) आडनांव तर नसेल ? बाणकरी–अगदीं अलीकडील आवृत्तींत शालि. बनगरी असा पाठ देतात. बनगरी–बंडगरांचे (?) बंडगर आडनांव आहे. हे सुभे उभे०–सुभा यांचा अर्थ येथें सरदार. "हे सुभे भाऊचे उभे इ." [पानपत पोवाडा]. इतमाम–सरंजाम, लवाजमा. कोरबंदीला–एक ओळ करून. लाईनींत. दाटती–भिडती. मांड–घोडेस्वारांची टोळी. मारती–मार (हिं. न. स्त्री.) लढाई. मारती–लढाऊ फौज. चाले–शालि. पा. 'संगे'. चालले लुटीत पेंढार–"निजामअल्ली बेदराहून धारुरास येऊन तेथून

बाणाच्या उंटावर कैच्या दारूगोळे ॥ दर तोफेसंगें हत्ती, छकड्यांची माळ। धासत पडली रे, धासत पडली देशावरून ॥ तलवार०॥ ३

बावन पागा हुजरात छबीना डेऱ्याभोंवता उभा। शिंद्यांच्या सातशे तोफा, बरोबर कंपू सवता सुभा ॥ आल्या नागपुराहून फौजा भोंसल्याच्या बाणांची तबां। पेंढार बासडेवाला होळकर शत्रूला दबदबा ॥ (चाल) ॥ उमराव बलावुनी अवघे। हुद्दे ज्याच्या त्याच्या मागें ॥ पायदळ तोफांसंगें। टाकिलें पिछाडिस बुणगे ॥ बिनि दौलतराव शिंद्याला रे। कुच करोनि मोहोर गेला ॥ सिनेवरता तळ दिला। मग तिथें जिवबादादा आला ॥ (चाल) ॥ तिन लाख मिळाली जहान पेशवेशाई। प्रतिनिधीबरोबर माधवराव

---

परांड्याच्या बाजूनें कूच करून येऊं लागला. त्याच्या लष्करापैकीं एका टोळीनें येऊन जोगाईचें अंबें, या क्षेत्राचा विध्वंस केला. दुसऱ्या टोळीनें बारशी, वैराग, पानगांव वगैरे गांवें लुटलीं." [ खरे, ४७०५ ]. शिक-शीख. **कैच्या-कैची**-दारूच्या चोवीस बाणांची एक कैची. **दर तोफेसंगे हत्ती**-तोफा ओढावयास (?) मागें अफजलखानाच्या पोवाड्यांत हत्तीचा आराबा आला आहे. पण तेथें सुतरनाळ म्ह॰ उंटावरील लहान तोफाप्रमाणें तो हत्तींवरचा तोफखाना होता **छकड्यांची माळ**-दारूगोळ्यांच्या छकड्यांची रांग. ३

**छबीना**-घोडेस्वारांचा ( रात्रीचा ) पहारा. **बरोबर कंपू सवता सुभा**-शिंद्याचीं नवीन तऱ्हेनें शिकविलेलीं स्वतंत्र पलटणें होतीं. **तबां**-(फा. स्त्री.) प्रभा, तेज, प्रकाश. आगीच्या बाणांनीं लढण्याबद्दल भोंसल्यांची मोठी ख्याति असे. **पेंढार बासडेवाला होळकर**-बासडा-भाला (पु.) होळकराच्या भाले घेतलेल्या पेंढाऱ्यांची शत्रूला नेहमीं दहशत असे. **दबदबा**-भीति, दहशत. **हुद्दे**-(१)हुद्दा-अधिकार, ताशा. (२)आपट्यांच्या कोशांत हुद्देकरी असा शब्द आहे त्याचा अर्थ ते " शस्त्रवाहक कामगार असा देतात " येथल्या संदर्भावरून पाहतां हुद्दे याचा अर्थ तोच असावासें वाटतें. **बिनी**-आघाडी. **बुणगे**-सैन्याच्या सामग्रीचा तळ, सैन्याबरोबरचा बाजार, उदमी लोक, वगैरे कचरा. **कचरा**-बिन लढाऊ लोक. **जहान पेशवेशाई**-पेशव्यांचें सैन्य. **प्रतिनिधीबरोबर माधवराव सवाई**-श्रीमंताची स्वारी डेरेदाखल होण्याकरितां

सवाई । ही कृपा शाहुराजाची ब्रह्मबाच्छाई ॥ (चाल पहिली) ॥ लढाई मारूं रे लढाई मारूं एकदां ठरून । तलवार०॥ ४

होते वकिल मोंगलाकडिल पत्र पाठविलें तपशिल लिहून । नानाचा अवघा खेळ बरोबर श्रीमंताला घेऊन ॥ तिन लाख सैन्य हिंदूंचें उतरलें सीनेवर तळ देऊन । हे शाण्णव कुळिंचे भूपाळ, भगवा झेंडा घेऊन ॥ ( चाल ) ॥ नानानें हुकूम केला । तोफांचा बांधा किल्ला ॥ म्हणे परशुराम-पंतांला । सांभाळा श्रीमंताला ॥ एकदां झुंज मारावें रे । मोंगल मागें सारावे ॥ गादिचें नांव राखावें । अवघ्यांनीं यश हें घ्यावें ॥ ( चाल ) ॥ श्रीमंतांची पहिली चढती स्वारी । चाकरी हुजुर बक्षिसी करा तलवारी ॥ तारील या समयांतून विठ्ठल हरी । ( चाल पहिली ) ॥ प्रसंग बाईट रे, प्रसंग बाईट जाईल हरून । तलवार० ॥ ५

केलें कुच निजामअल्लीनें पुढें खर्ड्यावर चालून आला । दिल्या ढाला मैदानांत पराड्याच्या बाजुला ॥ झाले मोंगल तयार, तोंड लागलें प्रहर दिवसाला । आपा बळवंत, बाबा फडके, जखमा परशुरामभाऊला ॥ ( चाल ) ॥ पठाणांनीं गर्दी केली । मग चढला निजामअल्ली । सांडणी बातमी आली । लष्करांत गलबल झाली । नानांनीं हुकूम केला । त्या दौलत-

---

बाहेर निघाली तेव्हां त्यांना गारपिरावर नेण्याकरतां समोर आलेल्या सरदारांत प्रतिनिधी होते. [ पे. ब. १४५ ]. **ठरून**—समोरासमोर गाडून उभे राहून. ४

**तीन लाख**—थोडी अतिशयोक्ति. "एकंदर मराठी सैन्याची संख्या १३०००० झाली होती. याशिवाय शिंदे, होळकर वगैरे सरदारांचें पेंढार दहा-वीस हजार होतें तें निराळेंच." [खरे, ४७०५ ]. **चढले**—गर्वारूढ झाले **ढाला**—निशाणें. **किल्ला**—कोट, आराबा. **श्रीमंताची पहिली चढती स्वारी**—श्रीमंतांनीं जातीनिशीं चढविलेली पहिलीच मोहीम. **चाकरी हुजुर बक्षिसी करा तलवारी**—हुजूरच्या चाकरींत इतके दिवस आहांत तर आतां तरवार करा म्हणजे पराक्रम करा आणि बक्षीस मिळवा. **हरून**—संपून, सरून. ५

**ढाला देणें**—मोर्चा फिरविणें. **मग चढला निजामअल्ली**—पहिल्या चकमकींत मराठ्यांना कच खावी लागली त्यास अनुलक्षून. **सांडणी बातमी आली**—

राव शिंद्याला । भोंसला नागपुरवाला । मग होळकर तयार झाला ।। (चाल) बावन पागा हुजरात खासगीवाले । डंक्यावर टिपरी पडतां हुशार झाले ।। पेंढार घांट रोखून उभे भोंवताले ।। ( चाल पहिली ) ।। उठा नानाच्या रे, उठा नानाच्या हुकमावरून । तलवार० ।। ६

झाला हुकूम तोफखान्याला, किल्ली जिवबादादाचे हातीं । कंपुची झडती लईन गोळे जणुं गारा वर्षती ।। भोंसला शर्थ बाणांची केली । गर्दी, लावुन बती । टाकिली फौज भाजून मोंगल येतो काकुळती ।। ( चाल ) ।। नानाचा हुकूम झाला । तोफांवर घोडे घाला । चहूंकडून उठला हल्ला । एकदांच हरहर केला । गर्दी पाहून घाबरा झाला । मग नबाब मागे सरला । खर्ड्याचा सुमार धरला । जाऊन किल्ल्यांत शिरला ।। ( चाल ) ।। बेजार मार मारून मोंगल केले । पेंढार पल्ला देइना उभे भोंवताले । घेती लुटून मारती घपाघप भाले ।। लागले पाठीं रे पाठीं । तोफा भरून तलवार० ।। ७

दौलत केली खराब मोंगल खर्ड्यामधिं घातला । सभोंवताल्या लाविल्या तोफा जिवबादादा आणिक भोंसला ।। कंपूचा पहारा खडा, भवता पेंढाऱ्यानें शह दिला । नानाशीं धाडलीं पत्रें जीवंत धरितो निजामअल्लीला ।। (चाल)।। केली गर्दी मराठ्यांनीं । बुडवितात मुसलमानी । जासूद पिटिले नानांनीं । नका देऊं तिळमात्र कोंडापाणी ।। पत्रामधिं नाना बोले । जें व्हायाचें तें झाले । शत्रूला कैद केलें । हें यश आम्हांशी आले ।। ( चाल ) ।। जय अपजय परस्वाधीन बसला घसरा । हा मोगल आजिंक्य वीर प्रतापी खरा ।

---

बातमीचा सांडणीस्वार आला. डंक्यावर टिपरी पडतां हुशार झाले—तळ हालण्याची सरकारी आज्ञा जाहीर करण्याचा प्रकार म्हणजे उंटावरून किंवा हत्तीवरून घटका दोन घटकांच्या अंतरानें नौबत, नगारा वाजविणें हा असे. [ श्री. प. मो. पा. १४९]. ६

किल्ली—कळ, भावार्थ मुख्य अधिकार. लईन झडती—शिपायांच्या रांगा आगीच्या सलका करीत. सुमार धरला—रोंख धरला. पल्ला देणें—जागा, अवकाश देणें. भवता—भोंवतीं. कोंडापाणी—अन्नपाणी. ७

दक्षिणेंत केवळ असामी नाहीं दुसरा ॥ ( चाल पहिली ) ॥ आब राखावा रे आब राखावा, कीं जाईल मरून ॥ तलवार० ॥ ८

कडबा दाणा बंद कोंडिलें पाणी कहर वर्षला । झाले मोंगल बेजार, मरूं लागले, आले कौलाला ॥ दरम्यान मसूर घेऊन करा भरपाई, सोडा आम्हांला नानाला धाडिलें पत्र घ्यावी खंडणी होऊं दे सल्ला ॥ (चाल) ॥ याप्रमाणें करार झाला । मग दिवाण हवालीं केला ॥ आले घेऊन मुक्कामाला । सोडिला निजामअलीला ॥ (चाल) ॥ फौजेचा उठविला वेढा । सोडून खर्ड्याचा वाडा ॥ आले बाहेर सुटला घोडा । मग पळता हा जीव थोडा ॥ (चाल) ॥

---

**बसला घसरा**–हिसका बैसला. दुर्दैवानें अपयश आलें. **केवळ असामी नाहीं दुसरा**–केवळ–मुळींच. असामी–मातबर माणूस. सबंद दक्षिणेंत याच्या एवढा दुसरा मातबर सरदार नाहीं. दक्षिणेंत याच्या एवढी दौलत दुसऱ्याची नाहीं. **आब राखावा**–अब्रू राखावी. " शेवटीं मैनुद्दोलास जाच न सोसे, तेव्हां इकडे राजकारण लाविलें कीं, ज्या गोष्टी जाहल्या त्या चूक, याउपर शरण मीच आपलेजवळ येतों. चित्तास येईल तें करावें. तेव्हां करार करून घेतला कीं ज्यास आम्हास संदेह तें करूं नये. याप्रमाणें कबूल करून त्याची भेट होऊन त्यास बंदोबस्तांत ठेविलें. इतकें करावयाचें कारण लढाईचे दुसरे दिवशीं अगदीं नबाब बुडवावा असेंच झालें होतें व सर्व सरदारांचेंहि मानस होतें. व आचरणेंहि तशींच त्याकडून झालीं. परंतु नबाब पूर्वी समयास कामावर पडले याकरितां रक्षण केलें." [भा. व. नाना फड. अस्स. पत्र ऐ. प. या.व. पा. २८] " नबाबाची फौज गारत करावी असाच प्रसंग होता. परंतु नबाबाचा स्नेह–घरोबा बहुत दिवस चालत आला हें जाणून तहाचा ठराव करून इ०" माधवराव नारायणराव यांचें सातारकर छत्रपतीस पत्र [भा. व. ऐ.प. या. व. पा. ३०] ८

**कोंडिलें पाणी**–" पाणी पाठीमागें घालून, मोंगल ह्यांचे ( मोंगलांचे ) तोंडावर जाऊन उतरले. [ पे. ब. १४७ ] **कौलाला येणें**–तहाचें बोलणें लावणें. **दरम्यान मसूर**–दरम्यान–जामीन; ओलीस. मसूर–मशीर मशीरास ओलीस घेतला. **करा**–करून घ्या. **वाडा**–गढी. **सुटला घोडा**–पळ सुटला;

हिंदुनीं उतरला चिरा घेतली ढाली। धरली बेदरची वाट, रेवडी झाली॥ दरकुचानें कुच करून पळतो निजामअल्ली॥ (चाल पहिली) ॥ ताब हिंदुनीं रे, ताब हिंदुनीं घेतला हिरून॥ तलवार पुण्यावर०॥ ९

आलें यश रावसाहेबाला लौकिक नानाचा चहूंकडे। दक्षिणेंत झाले महशूर जरब नानाचा डंखा झडे॥ आले जेर करूनी मोंगल निशाण जरिपटका चाले पुढें। काळू कर्णे बाजे होती नौबत हत्तीवर चौघडे॥ (चाल)॥ शत्रूवर बोलबाला। आले करून शहर पुण्याला। यश आलें तलवारीला। चालती भिऊन गादीला॥ ज्यांनीं ज्यांनीं समशेर केली। बक्षिसी तयांला झाली। खुप लुटला निजाम अल्ली। कैकांचीं दरिद्रे हरलीं॥ ( चाल )॥ गेली रंगबाजित नोकित गातो शोकी। कवि आपा यशवंताची धरितो बाकी। कवि हसेन कलगीवाल्यावर लावी नोकी॥ शिरीं शिरताज रे शिरीं शिरताज गातो भरून॥ तलवार०॥ १०



घोडा उडवीत तातडीनें पळूं लागले; पळ काढू लागले. **चिरा उतरणें**–कौमार्याचा भंग करणें (मोल्स) भावार्थ मराठी फौजेनें मोंगलसेनेची अब्रू घेतली. **घेतली ढाली**–ढाल–निशाण. त्यांचीं निशाणें काबिज केलीं. हिसकावून घेतली. **रेवडी झाली**–फजिती झाली; चुथडा झाला; टवाळी झाली. **दरकुचानें कूच करून**–टाकोटाक, कुचावर कूच करीत. **ताब**–(स्त्री.) बळ; शौर्य. **हिरून**–हिरावून; छिनावून. ९

**जरब**–तोफ–"खुषीच्या तोफांची सरबत्ती झाली." [खरे ७३६०.] **कालु**–काळू (पु.) लांकडी सनई (आपटे) चवघड्यांत वाजवावयाच्या ज्या टिमक्या असतात तो (शा. को.) **शत्रूवर बोलबाला**–बोलबाला (हिं. पु. स्त्री.) उत्कर्ष, भरभराट, विजय. **चालती भिउन गादीला**–छत्रपतींच्या (?) **समशेर केली**–तरवार मारली. पराक्रम केला. **नोकी लावणें**–नोकी–पराभव (आपटे) **शिरताज**–एक शिरोलंकार. १०

# खड्यांच्या लढाईचा तिसरा पोवाडा

हा पोवाडा आजपर्यंत झालेल्या कोणत्याही पोवाड्याच्या पुस्तकांत छापलेला दिसत नाहीं. हा आम्हांस पुणें येथील धोंडिबा जाधव गोंधळ्यानें दिला. अशिक्षित गोंधळ्याच्या तोडांत घोळणारा पोवाडा किती विकृत होतो हें स्पष्ट दर्शविण्याकरितां, या गोंधळ्यानें पोवाडा जसा म्हटला तसाच शब्दशः त्याच्या म्हणण्याबरहुकूम, तो उच्चारील तसे शब्दांचे उच्चार टिपून घेऊन, तो शब्द तोडी तसेच तोडून, लिहून काढला आहे. पोवाड्यांस जोडलेल्या टीपां-वरून मूळ पाठ काय असावेत तें वाचकांस कळून येईल.

सदर पोवाडा भाषेच्या दृष्टीनें सुरेख आहे. त्यांतील प्रासांची मौज बहार-दार आहे. गोंधळयाच्या तोंडून पोवाडा ऐकतांना तर ती चांगलीच प्रत्ययास येते.

ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें पाहिल्यास पहिला आणि चौथा हेच चौक महत्त्वाचे आहेत. दुसरा आणि तिसरा चौक कवीला आठवतील तेवढ्या वृक्षांच्या आणि पशुपक्षांच्या नांवानीं गजबजलेले आहेत. ते चौक कदाचित् मागाहून दुसऱ्या कोणी तरी दडपलेले असतील किंवा कदाचित् मूळ शाहीराचेही असणें अशक्य नाहीं. कारण अनेक लावण्यांतून असा प्रकार दिसतो कीं, शाहीर एकदां फुलांचीं, फळांचीं, वृक्षांचीं वा पशुपक्ष्यांची वर्णनें देऊं लागला म्हणजे तो स्थल, काल, प्रसंग, ऋतु, इत्यादिकांकडे यत्किंचितही लक्ष देत नाहीं. शाहीरानें वर्णन केलेल्या नायकाच्या बागांत तीं असावयाचींच. उदाहरणार्थ—होनाजी बाळ लावणी नंबर ७८ मधील तिसरें कडवें पहा. सदर पोवाड्यांत आलेलें वर्णन व या कडव्यांतील वर्णन जवळ जवळ एकसारखेंच आहे. " जंबु आंब्र अवदुंबर कदंब फणस बिल्व आवळी । बटमोगरे मालती रातांजन पार्यातक बकुळी ।। देवदार मांदार खर्जुरी मातुलिंग केळी । वट अशोक ताडमाड सुरु नारंग्या नारळी ।। गिरी-कंदरी पोखरणी झाडी घनदाट दिशा ढवळी । मोठा दुर्धर पंथ दिसेना सूर्य आभ्रमंडळी ।। (चाल) निबिड तरूच्या जाळ्या । त्यांतुन देती व्याघ्र आरोळ्या ।।

अस्वलें दिवाभितें सायेळ्या। देती गुंघाटे किंकाळ्या ॥ बदकें बिडाळकें पाकोळ्या। कस्तुरीमृग भुजंग वेटोळ्या ॥ जांभया देउनीं चाटती जिभाळ्या। नाना जाती श्वापदपाळ्या हिंडती वनीं निःसंग निराळ्या ॥ इत्यादि.

सदर पोवाडा समकालीन किंवा निदान त्या सुमाराचा असावा असें वाटतें. कारण त्यांत आलेली सरदारांची नांवनिशी फारशी चुकीची नाहीं. एके ठिकाणीं मात्र महादजी शिंद्याचा उल्लेख केला आहे तो चुकीचा दिसतो. पण मुळांत महादजी शिंद्याचा बक्षी जिवबा दादा असेच शाहिरास म्हणावयाचें असावें असा तर्क करतां येतो. कारण तसें नसतें तर दौलतराव शिंद्याचा परवरदा या शब्दानें त्यानें उल्लेख केला नसता.

पोवाड्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या चौकांत आलेल्या वृक्षांच्या आणि पशु-पक्ष्यांच्या यादींतील कांहीं नांवें कोशांतून शोध करूनही सांपडलीं नाहींत. जेवढीं सांपडलीं त्यांचे अर्थ टीपांत दिले आहेत. अर्थ न लागलेलीं नांवें किंवा शब्द यांची यादी येथेंच देतों.

पारापात, महेरबहेर, सुरंग, कलपोट, हुडकानडे, कोरेसरे, रोगोल, अंगुळा, झुराप, सारसत, अंगरख, चरख, रात्रजळी, हेकळ, टेकळ, पोकळ, धामोडा, थोकर, तिनुक तुंबर, काळास, शृंगाटक, उपलेट, अरण्या, त्रिकाट, कोराया, खडेशिंग, मेडशिंग, खडचंफा.

# खड्योंच्या लढाईंचा तिसरा पोवाडा

## २३

### [ शाहीर–कुशाबा ]

. झांगड झांगड नौबत झडे, श्रीमंती भगवे झेंडे उडे, कानडे लोक फाकडे, रांगडे मुबलक। दिले अटकेवर जरिपटका करितो लखलख, भाले बोथाट्या, भाले बरच्छया, हौदे अंबारी सरशानिरशा ॥ घोडे अबलख। रणनवरे झुरे बावरे, करि पठाण तल्लख, धावडे धावडे नलवडे, राणोजी मालोजी घोरपडे, लकडे, झगडे बोटे फाकडे, अल्लख अल्लख। फौजेचा कदम धरि अदम झडतो शिल्लक ॥ ( चाल ) ॥ अंगरे इंदुरकर, पुरंदराच्या म्होरे ( चाल ) अशी श्रीमंताची खटली, विर सारे नटले लढु लढु गटले, नाहीं कुणि हटले, उठले सरदार, संगें घेऊन दळभार। निपाणकर, पाटणकर,

---

दिले अटकेवर–दिला अटकेवर. अंबारी–अंबाऱ्या. सरशानिरशा–उत्तममध्यम, श्रेष्ठकनिष्ठ. निरशा–मू. श. निरसी–Imferior condition or state opposed to सरशी. करि पठाण तल्लख(?) राणोजी–मालोजी–१७९५ सालीं जी खर्ड्याची लढाई झाली तींतहि मालोजी पेशव्याकडे होता. याचा जन्म १७१० सालीं झाला आणि तो आपल्या ८५ व्या वर्षी म्हणजे १७९५ सालीं मरण पावला. अर्थात् पहिल्या बाजीरावापासून जवळ जवळ सर्व पेशवाई त्यानें पाहिली. हा अत्यंत शूर होता. त्यास अंगावर एकंदर ९६ जखमा असून त्या सर्व पुढें होत्या. अशी त्याची प्रसिद्धी आहे. [ को. क. प्रा. रा. व. सं. इ. उत्तरार्ध, २ पा. ९ ]. अल्लख अल्लख-अल्ग अल्ग म्ह० अलग अलग. पृथक् पृथक्. (२) अलफ–हजार. अल्लफअल्लफ–हजारो-हजार. फौजेचा कदम धरि अदम झडतो शिल्लक–अदम–अदब (?) अदब धरणें–अदब बजावणें, सलामी देणें. शिंद्याच्या पलटणांनीं वाटेंत श्रीमंतांना बारकवाईत करून दाखविली त्यास अनुलक्षून असावें पुरंदराच्या–पुरंधऱ्यांच्या. वीर सारे नटले–१. वीर सारे नटले. २ विरेसरी नंटली. वीरश्रीनें नटले, लढुलढु गटले–लढण्याकरता तयार झाले

राजे निंबाळकर, मिरजकर, होळकर, आले धारचे पोवार, अघाडीस महादजी शिंदा, जिबबा दादा मोठा खंदा, दटविला हौदा फलटणे सुद्धां, सवाई शिकंदर केले कंपू तय्यार ।। ( चाल ) सैनामधिं सैनापति दाभाडा घालितो पायीं सोन्याचा तोडा आघाडीस मानाजी फाकडा, अक्कलकोटवाला, आले लढायासी पोलाद नाशिर दौला ।। श्रीमंत सवाई माधवराव । पेशवे दिले अटकेवर नांव, हजारो पदरामधें उमराव नशिबवाला, दिल्या गारपिरावरावर मोगलावर ढाला ।। ध्रु०।। १

जंगल तऱ्हेतऱ्हेची झाडी, वृक्ष एकाहुन एकेक चढी, गिरी कदंब ताड माड झाड गेले आकाशीं, औदुंबर देवदार आवळी फणशी। बुलबुल सारस राजहंस चंडोल तास नीळकंठ चातक पारापात कपोत वनकरकोत महेर बहेर शिकरबाजा चक्रवाके भारद्वाज लंका लोटुन गिरेंबाज सुरंग कलपोट

---

निपाणकर–" स्वारहि बरोबर यांचे व निपाणीकर यांचे वगैरे होते तेहि सेवेसी पाठविले आहेत." [ खरे, ५६२८]. सैनामधिं सैनापति दाभाडा घालितो पायीं सोन्याचा तोडा–दाभाड्यांच्या घराण्याचा इतिहास या पुस्तकांत थोडी निराळी माहिती आहे. उमाबाई दाभाडीण हिनें अहमदाबादेवर स्वारी करून मुसलमानांचा पराभव केला. त्यानंतर शाहूमहाराजांनीं " सोन्याचे दोन तोडे करून उमाबाई दाभाडे यांच्या पायांत घातले व तेव्हांपासून त्यांच्या घराण्यांतील स्त्रियांस पायांत सोन्याचे तोडे घालण्याचा अधिकार परंपरेनें करून दिला. हल्लीं कित्येक बडे संस्थानिक आपल्या स्त्रियांच्या पायांत सोन्याचे तोडे करून घालतात, पण ती निवळ दंडेली आहे असें समजावयाचें. कारण हा अधिकार छत्रपति राजाकडूनच मिळाला पाहिजे." सदर इतिहासकाराची माहिती खरी असल्यास पोवाड्यांतील माहिती चुकीची धरावी लागेल. पोलाद–पोलादजंग. निजामाचा मुलगा. नाशिर–मशीर. दौला–मैनुत दौला, मशीरउल्मुल्क. दिले अटकेवर नांव–अटकेपर्यंत कीर्ति केली. पदरामधें–आश्रयास. नशिबवाला–रतिवंत, दैववान्. १

एकेक चढी–एकाहून एक उंच. वनकरकोत–वनकरकोचे. शिकरबाजा–बाज–ससाणा. शिकार करणारे बहिरी ससाणे. शिकरा–

सुगरणी गौळणी चकवाचकवी दाट बगळे बका पानकोंबडे देवचिमण्या सुत अरधन चिडे कुंभारकोकडे हुड कानडे मैना पोपट (चाल)–लगडझगड जळखंडे घाटोघाट(चाल)–वनीं सिंहशार्दूल सांबर हरण चितळ, लांडगे दांडगे,गवे मृगाचे थवे व्याघ्र हवेहवे मारती बिवे गेंडे नवे माकडे नळनीळ आला वान्नरांचा मेळ, तरस रीस कोरेसरे ससे भेकरे जवादी मांजरे काळवीट खुंट खरे वराह

---

ससाणा [मोल्स.]. बाज–ससाणा [पट.]. लंका लोटुन–लंकालूट–Acquiring of extraordinary wealth. [Mols.]. यावरून भावार्थ लंका लोटुन म्हणजे विपुल असा दिसतो. सुगरण–सुग्रण पक्षी. गवळण–पक्षीविशेष. चकवाचकवी–चकवा–Brahmani duck. चकवी– its female [मोल्स.]. दाट–पुष्कळ. बका–बगळ्या. सुत–अरधनचिडे–मुळांत सुतार धनचिडे असें असलें पाहिजे. सुतार पक्षी प्रसिद्धच आहे. धनचिडी–A bird malbar horn bill, bucerosmala baricus. कुंभारकोकडे–कुकड कुंभे. यास कुंभारकुकुड किंवा कुकडा असेंहि म्हणतात. हुडा–वृक्षविशेष आहे. परंतु हुडा असा पक्षीवाचक शब्द कोशांतून सांपडत नाहीं. लगड–(हिं०). बहिरी ससाणा झगड–झकड कीं काय ? झकड–हट्टी, दुराग्रही. घाटोघाट–घाटाघाट असें पाहिजे. घाटाघाट–Hurried or violent stirring about. [Mols.]. लगड-झगड जळखंडे घाटोघाट–शिकारी ससाणे आणि मासे धरणारे खंडे पक्षी फडफडतांना दिसत होते. हवेहवे–( हिं. हावहाव ) Want, avarice, ambition, demand or cry. भावार्थ. भुकेलेले किंवा गर्जना करणारें. २ हवा–(फा.स्त्री.). धुंदी. त्यावरून हवे हवे म्हणजे धुंद, पटाईत, तल्लख असे तर नव्हे ? मारती–?). बिवे–बिबवे वाघ कीं काय ? नळनीळ–वानरांच्या जाती मेळ–समुदाय, कळप. भेकरे–हरणाची एक जात. जवादी मांजरे–ज्या मांजराच्या वृषणाला सुवास येतो अशी कस्तुरी मृगासारखी दुर्मिळ मांजराची जात. जवादी बिडालाचें वृषण। कर्णीं खोविती रसिक जन। परी ते लंब-कर्णाचेंही कर्ण। न सेविती ॥ ( मुक्तेश्वर ). खुंट–शरीरानें खबरदार जी गाय, म्हैस, बायको इत्यादि त्यांस प्रसंगविशेषीं म्हणतात. उ० 'गाय घेणें तर खुंट खबरदार पाहून घ्यावी' [शास्त्री. को.] खुंट खरे–खुंट खबरदार,

सूकरे रोगोल अंगुळा चित्ते घेती छाळ ॥ गज सोंड उचलुन पळे, सर्प वळ-बळे, फोडी गंडस्थळें, झुराप मोकळे भयंकर शहायाळा वनगाया शियाळा ॥ (चाल)—आजळ कापी जळ सारसत अंगरख चरख उलमत कस्तुरी-मृग कस्तुरी नाभिंत, लागला पगला ॥ अशा वनांतून फौजेचा थाट बाइ गेला ॥ श्रीमंत सवाई० ॥ २

शिताफळे, रामफळे, जांबफळे लागल्या वनीं केळि कर्दळे, रात्रजळी, बकुळी आवळी, रायजांबफळे, जायफळी पोफळी, गेल्या उंच नारळी मान्दार, देवदार, आगर, तगर, कृष्णागर, मैलागर, रात्रअंजन, पर्वत सारें गजबजले, गेले हेकळ टेकळ पोकळ पाडळ काळे, हिरडा, बेहुडा, साग-साहुडा, रक्तरोहडा, हुड काढा कुढा धावडा धामोंडा केवडा हरि राधा

---

बळकट, दांडगे, ताकदवान असे काळवीट (?). खरे—गाढवें, रानगाढवें. चित्ते घेती छाळ—(?). झुराप मोकळे—झुलाप तर नव्हे ? फोडी गंडस्थळें—कोण फोडी ? शहायाळा—सायेळ्या. सायाळ—साळू, साळशिंदर. वनगाया शियाळा—वनगायाशी आयाळा. झुराप........शियाळा—ज्यांचे झुलाप म्ह० झुलपें मोकळीं आहेत व ज्यांच्या आयाळा भयंकर म्ह० पुष्कळ आहेत अशा वनगायी किंवा गवे यांच्या अंगावर दाट केंस असतात हें प्रसिद्धच आहे. चरख—चरख असा शब्द सांपडत नाहीं चरसा असा एक शब्द सांपडतो त्याचा अर्थ Hide esp. of a black cattle. [Mols]. याचा पोवाड्यांत आलेल्या कस्तुरीमृगाशीं संबंध असल्यास न कळे. उलमत—मत्त—(?). "साठ कोट उलमत्त डुलतात कुंजर" [शितूत, पा. ३३१]. पगला—पग—पाऊल, त्यावरून येथें पगला म्ह० पावलांची खूण असा अर्थ कीं काय ? २

रात्रजळी—अजविलापांत एका ठिकाणीं रात्रीं जळणाऱ्या व प्रकाश पाडणाऱ्या वनस्पतीचा उल्लेख आला आहे. तशासारखी ही एखादी वनस्पति आहे कीं काय ? आगर—अगर असें पाहिजे. संस्कृत अगरू व मराठी अगर एकच. [वनौ. गुणा. भा. ४, पा. ३ ]. रात्रअंजन—रातांजन—एक वृक्ष-विशेष. [Mols.]. पाडळ—वृक्षविशेष. बेहुडा—बेहडा. हुड—हुडा—एक वृक्षविशेष. कुढा—वृक्षविशेष. धावडा—वृक्षविशेष. लांकडें जाळण्यास चांगलीं. हरि-

गाळे ताडमाडाचे झाड पहाडोपहाड कडके वेळीं ॥ (चाल)–बहुत बोरूचे बेर, उंच सुरूचे सोरा, थोकर बोर सुंदर तिनुक तुंबर वेडा उंबर अंजिर कवठ करि गटगट, हिंगणबेट फणस द्राक्षांचे घोस अननस रानतुळस तिवस काळास अंबर शृंगाटक उपलेट, अरण्याखिरण्या लिंबेऱ्या राहीराही गोंदण्या माळफांगुण्या कडू शेंदण्या लिकाट कोराया मुरड–शेंग आणि तुरया ॥ (मिळवणीची चाल)–लोहदंड वज्रदंड ब्रह्मदंड खंडोखंड खडेशिंग मेडशिंग खडचंपा खुलला पारिजातक, आम्रवृक्ष फळांनीं लवला ॥ श्रीमंत सवाई०॥३

लढती श्रीमंत आणि मोगल खर्ड्यावरी झुज माजलं, आला मोगलाचा दलबालद जर्दा हौदा, हाती तीर–कमान मारि बाण साहेबजादा, हरहर करती हिंदु वीर दिनदीन करी मोगल बहादुर, बक्तर परवर हतीवर दौलत-राव शिंदा, तोफखाना भिडविला लढला जिवबादादा, फोडल्या होळकरांनीं फळ्या रावरंभासि लागल्या गोळ्या मारल्या पठाणाच्या टोळ्या, शिराचा

---

राधा गाळे–(?) कडके वेळीं–कडक किंवा कडका–(अ) तडक. भावार्थ फौजा तडक जात असतां. बोरूचे बेर–बोरूचें बेट, असें मुळांत असावें. सोर–सोट पाहिजे. थोकर–भोकर असें असावें. थ व भ या अक्षरांचा घोटाळा. तुंबर–तुंबा असें असावें. [वनौषधि गुणादर्श, भा.४,पा.७]. वेडा उंबर–wild and degenerate उंबर. कवठ करि गटगट–वाऱ्यानें कवठें हलून एकमेकांवर आपटत होतीं अशीं कवठाचीं झाडें. हिंगणबेट–वृक्षविशेष. तिवस–वृक्षविशेष [शास्त्री. को.] खिरण्या–वृक्षविशेष (?). माळफांगुण्या–माळकांगुण्या असें असावें. [वनौ. गुणा. भा. ४. पा. १३९]. ही वेली आहे. जरदा–पिवळा, सोनेरी. ब्रह्मदंड–ब्रह्मदंडी असें वनस्पतीचें नांव आहे. [वनौ. गुणा. भा. ४, पा. ९६]. वज्रदंड–वज्रदंडी असें नांव सांपडतें. [वनौ. गुणा. भा.४, पा.६]. त्याचेंच वज्रदंड असें शाहीरानें केलेलें असावें. ३

साहेबजादा–राजपुत्र. परवर–(फा. पु.) पोशिंदा किंवा पालनकर्ता [आपटे]. हें दौलतरावाचें विशेषण. २. परवरदा असेंहि मुळांत असूं शकेल आणि पुढील 'दौलतराव शिंदा' याच्याशीं त्याचा प्रास जुळतो. परवरदा–वयांत आलेला. खर्ड्याचे लढाईचे सुमारास दौलतराव शिंद्याला सरदारकीचीं वर्षे

खुर्दी खर्ड्यांत घळाला मोगल फौजेसुद्धां. मोगल कलभांडू, मारिला कोंडु कोंडु, झाले श्रीमंताशी बळ, वेढी स्थळ, मारि उपाशी पायदळ, शेर बांदुळ, कशाचा गुळ, मिळेना जळ, खाया नाहीं पलांडु, म्हणे मोगल देतो दंडु, पासष्ट लक्षाचा मुलुख दिला अफमुख निसरिण मुलुख, द्रव्य मुबलक, घोडे अबलख, हवालि केला प्रचंडू, झाले सलेमामले खंडू ॥ आल शहर पुण्यास माधव संगे यादव भोसले जाधव आणि सर्जेराव मिळुनियां सर्व मोडिला भवभांडू नानांनीं धुंडू धुंडू ॥ ( मिळवणी चाल )—कवि कुशाबाचि अक्षर, सुंदर नवरत्नाचा हार, कविला प्रसन्न शिवशंकर, हृदयीं ठसला, तोचि हरिहर विश्वंभर घटोघटि बसला ॥ श्रीमंत सवाई ॥ ४



---

मिळालीं. बख्तर—बघ तर—पहा तरी. फळया—शत्रूच्या फळ्या. रावरंभा—निंबाळकर, मोगलांचा सरदार. कलभांडू—भांडखोर. कोंडु कोंडु—कोंडून कोंडून. पलांडू—कांदा. दंडू—दंड, खंडणी. आफमूख—आपसूक, मुकाट्यानें, निमूटपणें. निसरिण—मुलुख—मशीरन्‌मुल्क. सले मामले—तह. उ० "लढाई करावी सल्ल्या मामल्याची गोष्ट करावयाची नाहीं" [खरे, ४४१२]. २. "सल्लामामला होत आहे. बोली चाली आहे. पुढें काय मजकूर होईल तो सेवेसीं मागाहून लिहून पाठवून देऊं." [साधनें, खं. १०. पा. ३३]. भवभांडू—गुंता, भानगड, जंजाळ. धुंडू धुंडू—धुंडून धुंडून, शोध शोधून. ४

# खड्र्याच्या लढाईचा चवथा पोवाडा

रा० शाळिग्राम यांनीं आपल्या पोवाड्यांच्या पुस्तकांत छापलेला हा खड्र्यांचा पोवाडा अत्यंत अशुद्ध छापला आहे. याच शाळिग्रामांनीं याच पोवाड्याची एक दुसरी प्रत दहा वर्षांनंतर म्हणजे १९२१ सालीं 'अनंत-फंदीकृत कविता' या नांवाच्या पुस्तकांत छापली आहे. त्या प्रतीवरून पहिल्या प्रतींतील कांहीं दुर्बोध स्थळें शुद्ध करतां येतात. अर्थात् ही दुसरी प्रत सर्वस्वीं शुद्ध आहे अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं'! कारण पहिल्या प्रतींतील काहीं चुका या दुसऱ्या प्रतींत दुरुस्त झाल्या, त्याचा वचपा काढण्याकरितांच कीं काय, पहिल्या प्रतींतील कांहीं शुद्ध पाठ या दुसऱ्या प्रतींत अशुद्ध करून छापले आहेत ! उदाहरणार्थ—

| पहिली प्रत<br>अशुद्ध पाठ | दुसरी प्रत<br>शुद्ध पाठ |
|---|---|
| १ अटक करनाटकांत भवले | १ अटक करनाटकांत भोंवले |
| २ उदवले | २ उगवले |
| ३ सवाइ माधवराव सवाई | ३ सवाइ माधवराव सवारी |
| ४ भिन्न मनोमय | ४ भिन्न मनोदय |
| ५ गरिब्राचे मोडून पसारे | ५ गलिमाचे मोडून पसारे |
| ६ धुडकावुनि | ६ धकाउनि |
| ७ नाना बंदुखानी कर्णाला | ७ नानाला बंदुखानी तोफा गर्नाळा |
| ८ तो तंटा नित्यानीच वाढला | ८ तो तंटा त्यानीच वाढविला |
| ९ याचा त्याचा पाण्यावरुनी तंटा झाला | ९ याचा त्याचा पाण्यत् वरुनी तंटा झाला |

| पहिली प्रत<br>शुद्ध पाठ | दुसरी प्रत<br>सुधारलेले अशुद्ध पाठ |
|---|---|
| १ अतिराथि कूल | १ अति रतिकुल |
| २ जगवायाचे तेच जगविले | २ जगावयाचे तेच जगविले |
| ३ तपसामर्थ्ये अपेश लपविले | ३ तपसामर्थ्ये येश लपविले |
| ४ रामाजी पाटील झुकले | ४ रामाजी पाटील सुकले |

दुसऱ्या प्रतींत अन्वयार्थ सुलभ होण्याकरितां विरामचिन्हें घालण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे, पण तीं भलभलत्या ठिकाणीं छापल्यामुळें अर्थ अधिकच दुर्बोध झालेला आहे !

वर दुसऱ्या प्रतींत शुद्ध केलेले म्हणून जे पाठ सांगितले तेहि सर्वस्वीं शुद्ध नाहींत. त्यांच्यांत एकादें व्यंग आहेच. उदा० - 'नानाला बंदुखानी तोफा गर्नाळा' या पाठांतहि 'नानाला' हा शब्द दुर्बोधच राहिला आहे. तेथें जाजाला (जेजाला) असा शब्द वास्तविक पाहिजे. ही मोडी वाचनाची चूक दिसते. सारांश, ' या दोन्ही प्रतींपैकीं कोणची एकच प्रत ग्राह्य धरण्याची सोय नसल्यामुळें शुद्ध व सरस पाठभेद स्वीकारून पुढील पोवाडा छापला आहे व त्याचा अर्थ उकलण्याचा प्रयत्न केला आहे. दोन्ही प्रतींतील पाठभेद मुद्दाम खालीं दिले आहेत.

| | |
|---|---|
| १ दिव्य तनु जशी चित्र बाहुलें | १ दिव्य तनू जणु चित्र बाहुले |
| २ विचित्र पुण्य जरी समावलें | २ विचित्र पुण्योदरीं समावले |
| ३ नाना ते राज्याचे आवले | ३ नानातें राज्याचे अवलें |
| ४ अतिरथि कूल दोरीत ओविले | ४ अति रतिकुल दोरीत ओविलें |
| ५ जगवायाचे तेच जगविले | ५ जगावयाचे तेच जगविलें |
| ६ तपसामर्थ्ये अपेश लपविले | ६ तपसामर्थ्यें येश लपविलें |
| ७ अटक कर्नाटकांत भवले | ७ अटक कर्नाटकांत भोंवले |
| ८ उदवले | ८ उगवले |
| ९ सवाइ तेजापुढें धाकले | ९ सवाइ तेजापुढें झांकले |
| १० सवाइ माधवराव सवाइ | १० सवाइ माधवराव सवार (री) |
| ११ भिन्न मनोमय | ११ भिन्न मनोदय |
| १२ शत्रुच्या शकले | १२ शत्रूचीं शकलें |
| १३ चिन्ह उदवले | १३ चिन्ह उद्भवले |
| १४ गरिबाचे मोडून पसारे | १४ गलिमाचे मोडून पसारे |
| १५ रामाजी पाटील झुकले | १५ रामाजी पाटील सुकले |
| १६ कुतके | १६ कुतुके |
| १७ होणारी शंकर नाना बंदुखानी तोफा कर्णाला | १७ होणारी शंकर नानाला बंदुखानी तोफा गर्नाळा |

| | |
|---|---|
| १८ धुडकावुनि | १८ धकाउनि |
| १९ याचा त्याचा पाण्यावरुनि तंटा झाला | १९ याचा त्याचा पाण्यत्वरूनी तंटा झाला |
| २० तो तंटा नित्यानीच वाढला | २० तो तंटा त्यानीच वाढविला |
| २१ ... ... ... | २१ प्रतापी सवाइ माधवराय। मोंगल त्राहे त्राहे करितील माय। करूनि सोडविला गनिमाचा वरपाय। |
| २२ कैक जरबाने खाली पाहे | २२ कैक दरपाने खालीं पाहे |
| २३ फिरून | २३ फिरूत |
| २४ माझे करूनि महामाव केले | २४ माझे करूनि महाभाव केले |

# खर्ड्याच्या लढाईचा चवथा पोवाडा

## २४

[ शाहीर—अनंतफंदी ]

[ चाल—'श्रीकृष्णानें सुदामजीला सोन्याची नगरी दिधली'—अमृतराय ]

सवाई माधवराव सवारी भाग्योदय ज्याचे पदरीं। यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणी भरी ॥ ध्रुवपद ॥

श्रीमंत सवाई नांव पावले। दिव्य तनु जणूं चित्रबाहुलें ॥ विचित्रपुण्योदरीं समावलें। नानातें राज्याचे आवले ॥ विधात्यानें नेमून ठेविले। बसल्याजागीं कैक छपविले। उन्मत्त जाले तेच खपविले ॥ अतिरथि कूल दोरींत ओविले। जगवायाचे तेच जगविले ॥ मग तमाम शत्रु नागविले। तपसामर्थ्यें अपेश लपविलें। दिल्ली आग्र्यावर झेंडे रोविले ॥ अटक करनाटकांत भोंवले। जिकडे पहावें तिकडे उगवले ॥ माधवराव पुण्याचीं पाउलें। टिपूसारिखे मुठींत घावले ॥ मेणापरीस मृदु वांकविले। सवाई

---

सवारी—स्वारी. शालिग्राम प्रत आवृत्ति १९११ त्यांत 'सवाई भाग्योदय ज्याचे पदरीं' असा पाठ आहे त्यांत सवाई शब्द निरर्थक दोनदां येतो. अपेश तेथें पाणी भरी—सध्यां रूढ असलेल्या प्रचाराच्या अगदीं विरुद्ध हा वाक्यप्रयोग आहे. 'त्याच्या येथें लक्ष्मी किंवा विद्या पाणी भरते' असें आपण म्हणतों. येथें अपेशाला पाणी भरावयास लाविलें आहे. भावा० अपेश नाहींसें केलें. दिव्य तनुजणूं चित्र बाहुलें—चित्रासारखें सुंदर व बाहुलीप्रमाणें लहान. चिमुकली गोजिरी मूर्ति. सवाई माधवराव फार देखणा होता. गाळलेला पाठ "दिव्य तनु जशी चित्र बाहुलें." नानातें—जुना पाठ "नाना ते." आवलें—वल्हें. छपविलें—छप्पा—अचानक हल्ला [आपटे]. अतिरथि कूल दोरींत ओविले—सर्व अतिरथी एकत्र जमविलें किंवा त्यांची एकजूट केली. कूल—समुदाय. दिल्ली आग्र्यावर झेंडे रोविले—महादजीकडून. भोंवले—भोंवणें—फिरणें [आपटे]. उगवले—उगविणें—वसूल करणें. उगवण—वसूल. भावार्थ, सगळीकडून खंडण्या घेतल्या. जु. पा. उदवले. पुण्याचीं पावलें—पूज्यपाद. भावार्थ पुण्यवान. सवाइ

तेजापुढें धाकले ॥ पुण्य सबळ उत्कृष्ट फांकलें। नानापुढे बुद्धिवान् चकले ॥ कैक त्याची तालीम शिकले। तरी ते अपक्क नाहीं पिकले ॥ ज्यांणीं दहा-वीस वर्षे स्वराज्य हांकिलें। श्रीमंतांचें तक्त राखिलें ॥ अक्कलवंत कोठेंही न थकले। श्रीमंत गर्भी असतां, एकले ॥ नानांनीं राज्य ठोकून हांकिलें। माझे करून महाभाव केले ॥ जहाज बुद्धिबळें जबकलें। यावतकाळपावेतों टिकलें ॥ श्रीमंत पाहून धनवर छकले। छोटेखानी कैक दबकले ॥ जे स्वामीचरणास लुबकले। ते तरले वरकड अंतरले ॥ मीपणांत जे गर्वे भरले। ते नानांनीं हस्तकीं न धरले। ते साहेब सेवेंत घसरले ॥ मग त्यांचे पुण्योदय सरले। न जन्मले माते उदरीं। घाशिराम कोतवाल त्यावर उलथून पडली ब्रह्मपुरी। सवाई माधवराव सवारी भाग्योदय ज्याचे पदरीं ॥ १

---

**तेजापुढें धाकले**–श्रीमंताच्या सवाई तेजस्वितेनें दिपले, घाबरले, दबले. दु. पाठ. 'झाकले'. **तरि ते अपक्क नाहीं पिकलें**–तरी ते पिकले नाहींत अपक्कच राहिले. त्यांच्या तालमींत किती जरी कारस्थानी झाले तरी नानाची सर त्याना आली नाहीं. **राज्य ठोकून हाकले**–दडपून कारभार केला. शत्रूंच्या किंवा फितुऱ्यांच्या प्रयत्नाला न डरतां राज्य चालविलें. **मॉंझी**–(हिंदी). a boatman a sailor. **महाभाव**–कारस्थान. **मॉंझे करून इ०**–कुशलकर्णाधार निर्माण करून राज्याचें जहाज सुरक्षित चालविलें. **ते नानांनीं हस्तकीं न धरले**–जे शिरजोर किंवा उर्मटपणा करूं लागले त्यांची बाजू त्यांनीं (नानांनीं) घेतली नाहीं. घाशिराम नानांच्या मर्जीतील असूनहि त्याच्या पारिपत्यास त्यांनीं आडकाठी आणिली नाहीं यास उद्देशून असें म्हटलेलें आहे. **साहेब सेवा**–सरकार चाकरी. **न जन्मले माते उदरीं**–ते आपल्याआयांच्या पोटचे नव्हत. त्यांच्या आयांनीं त्यांना जन्म दिला नाहीं. भावार्थ. दुर्दैवी. **घाशिराम कोतवाल त्यावर उलथुन पडली ब्रह्मपुरी**–घाशिरामानें बिगर चौकशीनें ३५ ब्राह्मणांस तळघरांत कोंडून घातलें. त्यांतले १८ ब्राह्मण दुसरे दिवशीं मेले. शेवटीं तीन दिवसांनीं चौकशी करून पेशव्यांनीं त्यास देहांत शिक्षा दिली. त्यास उंटावरून फिरवून भवानी पेठेबाहेर सोडलें 'बसला राहिला. हातास काढणी लावून म्हारांनीं धरली होती. तो समागमें ब्राह्मण द्रवीड होते. त्यांनीं दगड उचलून मस्तकावर घालून जिवें मारला'. [खरे, ४५३७]. १

श्रीमंतांचें पुण्य सबळ कीं। न्यून पडेना पदार्थ एकही ।। महान्न झाले भिन्नमनोदय खिन्न करूनियां शत्रुची शकले। मधें मधें एक चिन्ह उद्भवलें।। नबाब झाला सिद्ध, करूं म्हणे राज्य आपण पृथ्वीचें सारें। गलिमाचे मोडून पसारे ।। वकील धाडूनियां परभारें। हळूच लावले सारे दोरे। म्हणे युद्ध करा धरा हत्यारें। त्यामुळें वीरश्रीच्या मारें ।। शहर पुण्याच्या बाहेर डेरे। गारपिरावर दिधले डेरे श्रीमंतांला (नी ?) जैजैकारें। होळकरास धाडिलें बोलावुन ।। छोटे मोठे समग्र येऊन। वडिलपणानें जय संपादा ।। पाटील गेले ते विष्णुपदा। जबर त्यांची सबसे ज्यादा गादीवर दवलतराव शिंदा ।। बहुत शिपायांचा पोशिंदा। त्याच्या नांवें करूनि सनदा ।। लष्करी एकही नाहीं अजुरदा। त्याचे पदरचे जिवबादादासुद्धां ।। आणविले परशुरामभाऊ मिरजवाले। नागपुराकडून आले भोंसले ।। बाबा-फडके आपाबळवंत। बजाबाबापू शिरोळकर माधवराव ते ।। राजेबहादर गोविंदराव पिंगळे। विठ्ठलसिंग आणिक देव रंगराव वढेकर ।। गोडबोले राघोपंत जयवंत पानशे। मालोजीराजे घोरपडे ।। दाजीबा पाटणकर। अष्ट-

---

महान्न झाले भिन्न मनोदय खिन्न करुनिया शत्रुची शकले—महान्न—महाजन असें पाहिजे. मोडीची चूक. महाजन (हि) भिन्न मनोदय आणि खिन्न झाले. शकले—तुकडे २. शकल—युक्ति, कारस्थान, डाव. खिन्न—छिन्न तर नव्हे ? शत्रूंच्या कारस्थानांचा धुवा उडवून ( शत्रूच्या शकले छिन्न करुनियां ) आणि त्यांना भिन्न मनोदय करून नाना महाजन झाले. म्ह० यशस्वी झाले. चिन्ह—दुश्चिन्ह गलिमाचे मोडून पसारे—शत्रूंचे जमाव पराभूत करून. हळुच लाविले सारे दोरे—गुप्तपणानें व कुशलतेनें सूत्र लाविलें किंवा कारस्थान रचलें. धरा हत्यारें—शस्त्र धारण करा. युद्धाला तयार व्हा. वीरश्रीच्या मारे—वीरश्रीच्या तंवरानें जोरानें. बोलावून—बोलावूं पाहिजे. जु.ऐ. कागदपत्रांत अंत्य 'न'बद्दल मागील अक्षरावर अनुस्वार देण्याची पद्धत होती. बोलावूं—बोलावणें. जबर—जरब पाहिजे. दरारा किंवा तोफ. सबसे जादा—सर्वांहून विशेष. अजुरदा—दुःखी कष्टी. अनुल्हासी.

प्रधानांतील प्रतिनिधि ॥ फाकडे मानाजी मागून आले । चक्रदेव नारोपंत भले ॥ दाभाडे निंबाळकर हे उभेच ठेले । रामगव दरेकर चमकले ॥ वकील रामजी पाटील झुकले । मग याशिवाय चुकले मुकले कोण पाह्यला गेले आपले ॥ तमाम पागेपतके बेरोजगारी घेऊनि कुतके । अचाट फौजा मिळून आले ॥ वळून गेले जुळून संगम झाला । तीन लक्षांचा एकच ठेला ॥ त्यामधीं नाना ते कुलकल्ला । होणारी शंकर जाजाला बंदुखानी तोफा गर्नाळा ॥ वाद्यें रणभेरी कर्णाला । गणीत नाहीं श्यामकर्णाला मरणाला ना भीत । घोडे पुढें धकावूनी नाना–। सहवर्तमान पुण्यांत आले राउत ॥ तमाम दुनिया आली पाह्याला । कन्हया माधवराव फुलांचा झेला । पेशव्यांनीं कुच केला । सर्वेचि मोंगलही सावध झाला ॥ याचा त्याचा पाण्यत्वरूनि तंटा झाला । तो तंटा त्यानिच वाढविला ॥ श्रीमंतांनीं करूनि हल्ला । घ्या घ्या म्हणून कैक धुडावून दिले लुढावून मोंगल गोगलगाय ॥ करूनियां पृथ्वी देईना ठाय । मोकलीं धाय करीत हाय हाय ॥ तेव्हां लेंकरा

---

फाकडे मानाजी मागून आले–"मानाजी फाकडे रुसले होते त्यांची समजूत करून त्यासही बरोबर जाण्याची आज्ञा सरकारची झाली" [पे. ब. पा. १४३.] चुकले मुकले–राहिले सवरले, गळले, वगळले गेले, सांगायचे राहिले. पागे पतके–पागावरचे आणि पथकांवरचे अधिकारी. बेरोजगारी–बेकार, पेंढार, लमाण असले लुटारू लुगारू लोक. घेउनी कुतके–जलदीनें येऊन. (खुदकी हिं. स्त्री. घोड्याची एक विशिष्ट चाल) नक्की अर्थ कळत नाहीं. ठेला–समुदाय कुलकल्ला–सर्वाध्यक्ष, कुलाखत्यारी, मुख्य मुत्सद्दी. होणारी शंकरजाजाला बंदुखां नीं तोफा गर्नाळा–होणारी (?) शंकर (?) नीं–आणि. गर्नाळ–लहान तोफ. गणित–गणती. श्यामकर्णाला–सुंदर सजविलेल्या घोड्यांना. घोडे पुढें धकावूनी नानासहवर्तमान पुण्यांत आले राऊत इ०–श्रीमंत डेरेदाखल होण्याचे वेळीं गारपिरावरून सर्व सरदार त्यांना न्यावयास सामोरे आले त्यास अनुलक्षून [पे. ब.] कन्हय्या–कृष्ण. झेला–गुच्छ. याचा त्याचा पाण्यत्वरुनी तंटा झाला–पाण्यत्–पैसा येथें खंडणी. पेशव्याचा व निजामाचा तुंबलेल्या बाकीबद्दल कज्जा झाला. दिले

विसरली माय। कैक जरबानें खालीं पाहे॥ कीं सर्पासन्निध उंदीर जाय। असा मृदु मोंगल केला। शरण आला मग मरण कसें चिंतावें त्याला॥ उभयतां पक्षीं सल्ला झाला। पुढें मग महाल मुलुख कांहीं घेतो देतो श्रीमंताला॥ ते आपल्याला कोण सांगतो आतां, पुढें जे उडेल मातु। तेव्हां कळेल कीं अमके महाल अमके धातु॥ पडली पांतु नबाबाला। रहस्य राखून रंग मारला॥ पुढें ठेविली अस्ता। रस्ता धरून पुण्याचा थाट दुरस्ता॥ नबाबावर कंबरबस्ता। फिरून आले वळून एक एक नानापरीच्या वस्ता॥ सस्ता दाणापाणी बाद्यांसहवर्तमान मश्रुल्मुलुख कैद करूनियां श्रीमंतांनीं कारागृहीं ठेविला। एथुनी पवाडा समाप्त जहाला॥ सवशहरीं संगमनेरीं। फंदी अनंत कटिबंद छंद ललकारी॥ श्रीमंतांचे दरबारीं। सवाई माधवराव सवारी भाग्योदय ज्याचे पदरीं॥ २



लुढावुन-दिले धुडकावून. कैक जरबानें खालीं पाहे-उडेल मातु-जी हकीकत घडेल. मात, मातु-गोष्ट, हकीकत, प्रसंग. महाल-प्रांत, मुलुख. धातु-पैसा, रुपये, द्रव्य. पडली पांतु नबाबाला-पांतु-दक्षणा ( प्रायाश्चित्त घ्यावयास लागून ) वर अमुक रुपये दक्षणा द्यावी लागली. रहस्य राखून रंग मारिला पुढें ठेविली अस्ता-रहस्य-मैत्री. रंग मारिला-बाजी मारून नेली. अस्ता-आस्था, दृष्टि, आशा. दुरंदेशीपणानें पुढील कार्यावर नजर ठेवून, नबाबावर जय मिळविला तरी पूर्वीचा घरोबा कायम ठेविला. (मागच्या पोवाड्याची टीप पहा.) दुरस्ता-दोही बाजूंस, रस्त्याच्या दोन्ही बाजूस. नबाबावर कंबरबस्ता-कंबरबस्त-बद्धपरिकर, सिद्ध, सज्ज, तय्यार. नबाबाच्या पारिपत्याकरितां सिद्ध असे ते. फिरून आले वळून एक एक नाना परीच्या वस्ता-फिरून आले-परतून आले. वळून-वळवून. जसें बैल वळतीचे-वळवून आणलेले, शत्रूकडून हिसकून आणलेले. परीच्या-प्रकारच्या. वस्ता-अनेक वस्तु. भावार्थः पेशव्यांचें सैन्य शत्रूचा पुष्कळसा अजबाब जिंकून परत आलें. 'तोफा, दारूगोळ्याचे चारशें छकडे, सगळा बाजार, लमाण वगैरे लुटले. [खरे, ४७१०]. ललकारी-ललकारतो, गातो. २

# खड्यांच्या लढाईचा पांचवा पोवाडा

हा पोवाडा सरस आहे. अवशिष्ट राहिलेल्या गोंधळ्यांच्या तोंडांतून हा अजूनहि ऐकावयास मिळतो. याचा कर्ता कोणी बाळा लक्ष्मण आहे असें शाळिग्राम सांगतात. पण त्यासंबंधीं निश्चित कांहींच म्हणतां येत नाहीं. शाळिग्रामप्रतींत वास्तविक शाहीरांची नांवनिशी येऊन सदर पोवाडा सातव्या चौकांत पुरा झालेला आहे. पण त्यानंतर दुसरा एक आठवा चौक शाळिग्राम यांनीं छापला आहे तो आठवा चौक व सहावा चौक हे अगदीं एक आहेत. फक्त शाहीराचें नांव मात्र त्यांत निराळें आहे. आम्हांस या सात व आठ चौकांवरून खरा शाहीर कोण याचा उलगडा करतां येत नाहीं म्हणून तूर्त शाळिग्रामांसच प्रमाण मानून शाहीराचें नांव बाळा लक्ष्मण असें आम्हीं दिलें आहे.

# खड्यांच्या लढाईचा पांचवा पोवाडा

## २५

[ शाहीर--बाळा लक्ष्मण ]

[ चाल—घनःशाम सुंदरा० ]

श्रीमंत महाराज पेशवे अमोलिक सुरती मोती। सवाई माधवराव सवारी निघाली नबाबावरती ॥ ध्रुपद ॥

मिळून फौजा ऐकून घ्याव्या नामी नामी सरदार। रघुजि भोसले दौलतराव शिंदे तुकोजी होळकर ॥ प्रथम दिवशी सशे आपाजी बळवंतराव मुजमदार। सखाराम पानशे परशुराम भाऊ भले हैत झुंजणार ॥ रास्ते लक्ष्मण ऐका बाबा फडके बिनीवर। गणपतराव शिवदिन भेरी आबा होते होते शालुकर ॥ मानकरी मराठे लोक ऐका त्यांचा विस्तार। मालोजी घोरपडे आदी नाइक राजे निंबाळकर ॥ सोनवळे सरकले वाघमारे सयाजी भापकर। गोविंदराव चवाण हैबतराव नांदुरकर ॥ भालवणीचे दाजीसाहेब चौराज्यामधिं महशूर। श्रीमंतांच्या बावन पागा त्यामधिं बावन सरदार ॥ शिंद्यांचे सरदार जिवबादादा एक वीर भारती। पन्नास हजार फौज फिरंगी तिन कंपू संगें जाती ॥ श्रीमंत महाराज पेशवे०॥ १

भोंसल्याचे विठ्ठलपंडित आणिक खासा पठाण। मर्द शिपाई जाउनि भिडती व्याघ्र जसे पंचानन ॥ पन्नास हजार फौज सातशें कैची उंटावर

---

**सुरती मोती**—सुरती मोत्याप्रमाणें सुंदर; बहुमोल, तेजस्वी. येथें भावार्थ देखणा तेजस्वी. **सुरती**—सुरतशहरासंबंधीं वस्त्र मोती रुपया शस्त्रादि पदार्थ तो [शास्त्री कोश]. **सवारी**—स्वारी **मिळून**—एकंदर. **हैत**—आहेत. **झुंजणार**—झुंजार; लढवय्ये. **एक वीर भारती**—सबंध भारत वर्षांत एकैक वीर. भारतीय युद्धांतील योद्ध्यासारखा अद्वितीय वीर. १

**भिडती व्याघ्र जसे पंचानन**—जसे व्याघ्र किंवा पंचानन (सिंह) भिडती (तसे शत्रूवर तुटून पडतात.) **सातशे कैची उंटावर बाण**—सातशें कैची इतका बाण उंटावर होता. बाणांच्या सातशें कैच्या उंटावर

बाण । शंभर हत्ती स्वारींत झुलतो आणिक भोंसल्याचा मान ।। गाजविली तलवार रणामधिं भले शिपाई ब्राह्मण । गणपतराव शिवदिन भेरी पंधरा हजार तिघेजण ।। रावसाहेब फडणीस नाना पन्नास हजार सैन्य । याशिवाय मराठे लोक बरोबर फिरंगी दहा पलटण ।। हपशियान आरबी परदेशिक कइक जाती सवाई माधवराव पेशवे बसुनि नित्य मुजरा घेती ।। श्रीमंत महाराज पेशवे०।। २

पहिली श्रीमंतांची स्वारी पाहुन चांगला मुहूर्त । निघाली बाहेर तमाशा

---

घातल्या होत्या. आगीच्या बाणांनीं लढण्यात भोसल्यांची फार ख्याति असे. **आणिक भोसल्याचा मान**–आणिक–अधिक, निराळा; विशेष. 'भोसले हे मराठी राज्यांतले अव्वल दर्जाचे सरदार असल्यामुळें ते पेशव्यांखेरीज इतर कोणा सरदाराच्या हाताखालीं (मोहिमेंत) रहावयाचे नव्हत' [खरे, ४००७]. **हपशियान**–हबशी. २

**श्रीमंताची स्वारी पाहून चांगला मुहूर्त**–'श्रीमंताची स्वारी पंचमीस निघावी' अशी प्रथम मसलत होती. पण " श्रीमंताची स्वारी अष्टमी रविवारीं १४ घटका दिवसास वाड्यांतून निघून डेरे दाखल झाली." [खरे, भा. ९ पत्र ३५८८ व ३५९३.] बहुधा प्रत्येक पोवाड्यांतून सुमुहूर्तांचा उल्लेख आहेच. हें मुहूर्तांचें बंड केवढें विलक्षण होतें याचा पदोपदीं अनुभव जुने कागदपत्र वाचतांना येतो. मासल्याकरितां खर्ड्याच्या लढाईच्या वेळचेच दोन नमुने पहा. (१) " त्या दिवशीं श्रीमंतांचा डेरे दाखल होण्याचा दिवस. आमचे राशीस तो मुहूर्त प्रशस्त नव्हता. सबब अगोदर मुहूर्तें निघोन नदीपलीकडे बांवबड्याचे अंगास मुळामुटा नदीचे संगमाजवळ राहिलो." (श्रीमंता-बरोबर डेरेदाखल होण्याची आज्ञा असतांहि) [चिंता. आप्पा वांका. खर्ड्यांची लढाई. खरे पा. ७३५४]. (२) " फडके यांचे निघण्याच्या मुहूर्तांचा निश्चय कारभारी यांचे वाड्यांत गणकास बोलावून आणून होत आहे " [खरे, ४७१६]. **तमाशा**–मौज. " श्री।। पंतप्रधान सवाई माधवरावसाहेब यांची स्वारी मोठ्या समारंभानें सुमुहूर्तानें निघोन शहराबाहेर आली " [खरे,

पहाती मग जणुं लोक ॥ सफेत पोशाक घालून अंगावर गहिना हा जडित।
दंडिं धाचरत्नांच्या पेट्या सोन्याचीं कडिं हातांत ॥ सोन्याचें पडदळें गळ्या-
मधिं शिपाइबाणा शोभत। सजवुन हत्ती बहु खुश होती राव बसले
अंबारींत ॥ बसूनशानी दाजी फडके वरती चौरी उडवीत। चोपदार छडिदार
पुकारी 'नका बोलूं' ललकारीत ॥ दोहों बाजूंनीं उभे शिपाई रामराम मुजरा
घेत। ऐशी फौज चालली दर्यामधिं सागर हालवीत ॥ बारा कोस लांबी
रुंदी ज्या फौजेचे तळ पडती। दरमजली दरकुच चालून आले नागलवाडी-
वरती ॥ श्रीमंत महाराज पेशवे० ॥ ३

मंगळवारीं नबाबांनीं पुढें धाडिलें सेनेस। कळलें श्रीमताला बोलून
नेले आपल्या सरदारांस ॥ " कशी करावी मसलत नबाब जाईन म्हणतो
पुण्यास "। परशुराम भाऊ म्हणे किं मारूं मरूं जरी या समयास ॥ नाना

---

७३५४] जणुं–जणुं काय. एकादें प्रेक्षणीय दृश्य पाहण्यांत रंगून जावें
त्याप्रमाणें श्रीमंतांची स्वारी डेरेदाखल होत असतां लोक कौतुकानें अवलोकन
करूं लागले. **गहिना**–दागिना. **जडित**–जडावाचे, हिरे माणके वगैरे जडलेले
आहेत असे. **पडदळें**–१. 'कटिचर्म तु पडदळें' [ रा. व्य. को.]. २. तरवार
अडकवण्याचा पट्टा. हा जानव्याच्या उलट उजवीकडून डावीकडे घालतात.
गळ्यांत जानवें म्हटल्यानें तें जसें वास्तविक गळ्यांत असत नाहीं त्याचप्रमाणें
'गळ्यांत पडदळें' म्हटल्यानें तें पडदळ पेंड्यासारखें गळ्यांत असत नाहीं.
**दाजी फडके वरती चौरी उडवीत**–पेशवेबखरीत अमृतराव पेठे व आप्पा
ळवंत यांचीं नांवें दिलीं आहेत. शिवाय दाजी फडके का बाबा फडके ? ही
ेरेदाखल झाल्याची हकीकत पेशव्यांच्या बखरींत बहारदार दिली आहे.
**चालली दर्यामधिं सागर हलवीत**–दर्यामधिं नसून दर्पामधिं असें मूळ असलें
ाहिजे दर्प–डौल, ऐट. सैन्यसमुद्र डौलांत चालू झाला असा भावार्थ. ३
**मंगळवारीं**–" नबाब निजामअल्ली बेदर येथें छावणी करून होते ते नोव्हेंबरचे
६ तारखेस मोहिमेच्या इरादानें डेरेदाखल झाले." [खरे, पा.४७०४]. **म्हणे कीं
मारूं, मरूं जरी या समयास**–जर या समयास मरावयाचें असेल तर मारून
मरूं. मारतां मारतां मरूं. (जरी बद्दल तरी असतें तर, मारूं तरी किंवा मरूं तरी

फडणिस सखारामबापू पुसती जिवबादादास। जिवबा बोले गर्जुन मोंगल काय आणिला जिन्नस ।। उडविन बाविस टोप्या झेंडे नेऊन लाविन आकाशास। केलीं वस्त्रें पांचजणांशीं दिली आज्ञा झुंजावयास ।। पेंढाऱ्याच्या लष्करावरी जाऊन ताकिद करिती। "ज्याची लुट त्याला मुभा कुणी कुणाची ना घेती" ।। श्रीमंत महाराज पेशवे०।। ४

मोंगलाचे उजवे बाजुला जिवबादादाचें लष्कर। भरून तोफा तयार मागें लाऊन दिलें पेंढार ।। आघाडीला परशुरामभाऊ झेक त्याची तलवार। सीतर पहाड पहा जिवबादादा कंबरक्यांत सोडी बार। धडाधडा तोफेचे

---

असा अर्थ झाला असता.) **सखाराम बापू**–सखारामपंत पानशे. हे तोफखान्याचे अधिकारी होते. **मोंगल काय आणिला जिन्नस उडविन बाविस टोप्या झेंडे नेऊन लावीन आकाशास**–सकृद्दर्शनीं याचा अर्थ "मोंगल हा काय जिन्नस? कोणच्या झाडाचा पाला? (मुसारेमूच्या) टोप्या आणि मोगलांचे झेंडे आकाशांत उडवून देईन" असा वाटतो; पण खालील अर्थ जास्त बरोबर दिसतो. **जिनसीवाले**–तोफखान्याचे अधिकारी **जिनसी सामान**–तोफखान्याचें सामान इत्यादि शब्द प्रसिद्ध आहेत. त्यावरून येथें जिन्नस याचा अर्थ तोफखानाच घेणें योग्य. मोंगल काय म्ह० मोंगलांची कथा काय? मीं तोफखाना आणला आहे तो सुरू करतों आणि त्याच्या धोधाट्या-खालीं मोंगलांच्या टोप्या (किंवा मुसारेमूचीं जीं कवाइती पलटणें निजामा-चीं आहेत त्यांच्या) आणि झेंडे पार आकाशांत उधळून देतों. हाच अर्थ योग्य दिसतो. पोवाड्यांतून, कागदपत्रांतून, बखरींतून शिंद्याच्या तोफखान्या-ची करामत या लढाईंत फार झाली असें अनेक वेळां वर्णन आलेलें आहे. एका पोवाड्यांत तर शिंद्याचा 'यंत्री' म्ह० तोफावाले असाच उल्लेख केला आहे. **वस्त्रें केलीं पांच जणाशीं........कुणाची ना घेती**–"पेंढार यांचे सरदारांस सोन्याचीं कडीं व पोषाख दिले आणि त्यांस सांगितलें कीं तुम्हांस लूट माफ आहे इ०" [ख. स्वा. बखर ९.] ४

**झेक**–झाक; उत्तम. **तलवार**–लक्षणेनें जवामर्दी; पराक्रम. शूर परशुराम-भाऊंना आघाडीस घातलें. **कंबरका**–कमरगा. **कमरगा**–पिछाडी. "सैन्या-

बार लागतां पडती स्वार ॥ घ्या घ्या म्हणून घाव घालती रक्ताचे वाहती पूर ॥ पळाया कोठें रीघ दिसेना मध्यें शिरलें पेंढार । भाल्यानें टोंचून पाडिती लुटुन घेतलें लष्कर ॥ मामलसे शेनखान बसुन हौद्यांतून मारीती तीर । भले हाणणार. त्या दोघांवर चालविले वार ॥ त्यावर मग रावरंभानें भली गाजविली तलवार । चारपांचशें लोक पाडले भले शिपाई रणशूर ॥ परशु-रामभाऊचे पुतणे बळवंतराव झाले ठार । चार प्रहर झुंज झाली साहा घटका चढली रात्र ॥ तरी तोफेचे गोळे राहीना नबाब झाला मग जार । नबाब कहे रावरंभाकु "क्या हुवा मुजेपर कहर॥ बचाव जान" "आब तो मेरी चल जलदी तो खरडेपर"। वांचवला नबाब बाजी न आले परतुन खर्ड्यावर ॥ जळती चंद्रजोती । नबाब गेला निघुन देखुन फौजा भोंताल्या पळती ॥ श्रीमंत महाराज पेशवे० ॥ ५

मोडल्या पालख्या पडले उंट हत्ती सरदार किती । कोण करील गणीत त्याची कोण कोणाला ना पुसती ॥ बाराशें तोफेचे गोळे चौदाशे बाण सुटती । तोफांच्या धोधाव्याखालीं गाई बैल घोडे पळती ॥ गांवोगांवचे आले लुटारी तीं धरून घेऊन जाती । पडली गांठ जर पेंढाऱ्यांची धन तेही स्वतां नेती ॥ कैक झाले गबर कैकांच्या तोंडीं पडली माती । लुटला दारू-गोळा खजिना हत्यारांस नाहीं गणती ॥ खर्ड्यावर नबाब।भोंवती श्रीमंताची झाली जप्ती । रसद पाणी बंद केली रुपया शेर दाणे विकती ॥

---

च्या पिछाडीस राहून जिवबादादा शत्रुसैन्यांत गोळे टाकूं लागले." **सीतर पहाड**–तोफेचें नांव. **रीघ**–अवकाश; जागा. **त्यावर**–तेव्हां. **जार**–जेर. **कहे**–बोले; विचारी. **बाजी न आले परतून**–बाजीनं, बाजीनें, बाजी चालीनें आले परतून. बाजीचाल ही एक घोड्याची चाल आहे. तींत घोडा पळतांना पुढचे दोन पाय एकदम उचलतो व ते टेंकावयाचे आंत मागचे उचलतो. बाजीवर धरणें, चालणें, घेणें. म्हणून **बाजीन आले परतून**–घोडे पिटून दौडत घाईघाईनें. **चंद्रज्योति**–रात्रीचा विषय म्हणून पळून जातांना चंद्रज्योति मार्ग दिसण्याकरितां लाविल्या. **फौजा**–पेशव्यांच्या. ५

**गणीत**–गणति. **लुटारी**–लुटारू, लुगारू. **रसद पाणी बंद केली**–

रुपयाचें तांब्याभर् पाणी त्यामध्यें अर्धी माती। सिनेवर झाला येकच कहर फौजा तटातट मरती ॥ दहापांच सरदार मिळुन नबाबास अर्जी करीती। करा सल्ला नाहीं तर पाण्याविना फौजा मरती ॥ उमजला नबाब वकील पाठविले रावसाहेबाप्रती। गेले वकील राव-साहेबापुढें जाऊन मुजरे करीती ॥ टाकिले कागद साग्र वृत्त लिहून पुढें लिहून ठेविती। जें मागाल तें देऊं साहेब सांपडले तुमचे हातीं ॥ नाना भाऊनें चालवलें तुम्ही चालवा तेच रीती। रावसाहेब नानाफडनवीस मग बसून मुनसुबा लिहिती ॥ पासष्ट लाखांची जहागीर मश्रुल्मुलुख दे म्हणती। आले परतुन वकील कागद नबाबास वाचून दाखवती। नबाब म्हणे बरें झालें मश्रुल्मुलुख दे हातीं ॥ श्रीमंत महाराज पेशवे० ॥ ८

सोडला नबाब रावसाहेबांचा झाला लौकिक। पांसष्ट लाखांची जहागीर दिला धाडून मश्रुल्मुलुख ॥ निघाला मोंगल भागानगरचा धरला रोंख। दरकुच दरमजलीनें श्रीमंतांचें चाललें कटक ॥ झाले दाखल पुण्यावर मुजरे करिती पाहुन जन लोक। यशवंत महाराज सवाई माधवराव झाले अधिक॥ केल्या मेजवान्या सरदारां दिले पोषाख। जरी झोक कडीं तोडे कंठी चौकडे दिले हत्ती घोडे मुलुख ॥ शालिवाहन शके १७१६ चा शिमगा ऐक। दोन प्रहरीं बुडला खळ ज्यावर गोगुलस ॥ गुरुदत्तात्रय माहुरगडीं शिष्याशीं दिली भाक। चिमणराव रंगनाथ हरीचरणीं ठेवूनियां मस्तक ॥ गांव पाटुंदे बीड प्रगणे वाजाचा तडाखा। दुस्मानावर कमचा उडतां त्याला पडला

---

रसद, आणि पाणी हीं बंद केलीं. पुढें लिहून ठेविती–लिहून याबद्दल मुळांत निऊर्न म्हणजे नेऊन तर नसेल? साहेब–निजामसाहेब. नाना भाऊनें इ०–उदगीरच्या लढाईच्या वेळीं. दे–दिला. ६

रोंख– रोंखानें. केल्या मेजवान्या...हत्ती घोडे मुलुख–" निरोप झाला. त्या प्रसंगीं नारायण गंगाधर पटवर्धन मिरजकर यांस स्वारींत चांगली कामगिरी

धाक ॥ राणुगुदाजी गदाजी गडगा वनहार दासीबाणा, जरी झोंक । खंडु फकीरा फुलनाथ गोसावी डफ घेऊन हातीं ॥ साहेबखान गातो बाणीवर गावया पळोन जाती ॥ श्रीमंत महाराज पेशवे० ॥ ७



---

केल्याबद्दल श्रीमंतानीं पालखी व बाकीच्या पटवर्धन मंडळीसहि जवाहीर, वस्त्रें वगैरे देऊन त्यांचा बहुमान केला." [खरे, ४७६ ७]. ७

# खर्ड्योच्या लढाईचा सहावा पोवाडा

## २६

[ शाहीर—बाळा लक्ष्मण ]

मोगलाच्या येति खबरा शिपाई रणशूर। भले झुंजणार ॥ हैद्राबादवर साहित केलें दारूगोळा फार पलटण सार। तीन लाख घोडा घेऊन जाईन पुण्यावर ॥ जाळीन शहर कापिन गाइ करिन कंदुरी शेखसल्याम्होर। दख्खनच राज्य करिन सार ॥ मोगलावर दिल्या रे ढाला पुण्याबाहेर ॥ १

सवाइ माधवराव मनसुबा ऐका नानाचा शहाणपणाचा। शाण्णव कुळिचे राजे मिळोनि मोड करिन त्याचा मोगलाचा ॥ दौलतराव महाराज विडा उचलिला फौजेचा। मार देईन तोफेचा ॥ हिंदुस्थानामधि पत्र पाठवा या तुम्ही लौकर धरा बेदरचा सुमार। मोगलावर०॥ २

श्रीमंत महाराज पेशवे बसूनि सकळ पाताड वाची निर्मळ। आश्विन महिना आदितवार दिवशीं होता पर्वकाळ—॥ मुहूर्त. दौलतराव बाळ। नागाच निशाण भरारी फिरंग्याचा लोळ दारुगोळा पुष्कळ ॥ आला आनंदी

---

**साहित**—साहित्य; तयारी, जमवाजमव. **सार**—१ सर्व २ निवडक, उत्कृष्ट. **पलटण**—पलटणें. मुसा रेमू नामक फ्रेंच सरदार चाकरीस ठेवून त्याचेकडून निजामानें तेवीस उत्कृष्ट कवाइती पलटणें तयार केलीं होतीं. [खरे,४७०१]. **कंदुरी**—महंमदाची मुलगी फतिमा इच्या नांवानें मुसलमान उत्सव करतात तो. [ का. सं. प. या. व. पा. ५३]. मराठींत हा शब्द बळी देण्याचा समारंभ या अर्थी वापरतात. १

**पाताड**—मू.श. पातडें. (न.) पंचागास म्हणतात. (शास्त्री कोश). **निर्मळ**—जुन्या शाहिरांनीं या 'निर्मळ' शब्दाचा वाटेल तसा उपयोग केलेला दिसतो. उदा०—" राजा निर्मळ आसवे टाकी धरणीशी " [ आप्पासा. भोसल्याचा पोवाडा, शालि. २८५]. सध्यां निर्मळ या शब्दाचा स्वच्छ इतकाच अर्थ आपणांस माहीत आहे. येथें पाताड निर्मळ वाचणें म्ह० घडाघडा वाचणें असा अर्थ शाहिराला अभिप्रेत आहे. शाहिराचा नायक 'खरखर' लखोटे

नाम संवत्सर होता तोच वेळ। पैशा पायली जोंधळ ॥ लिंबाळकराच्या राज्यामधें झाला मोठा कहार। रावरंभा आले म्होर। मोगलावर०॥ ३

वाजति चौघडे आराब भोजखिड। म्होर आल झुंजायाच तोंड॥ जिवबादादा देवजी गवळी ते झाले म्होर। तोफा सोडिती धडाधड॥ आला भोसला राजा त्यापाशीं तीस हजार घोड। दोहिरी बाणांची परवड॥ झाल्या सिनेवर भेटी। बाबा फडक्यांच्या हातीं॥ मुहूर्त त्यानीं लाविला म्होर। मोगलावर०॥. ४

रावरंभा मोगल आला खड्यांच्या वरता धडाधड तोफा सोडिता। मोडली हुजरात॥ पळूं लागले समस्त। परशुराम आले हातघाइस॥ जिवबा दादा भले शुरमर्द ऐका त्याची मात। आले तोफेचे दणके देत॥ गोळ्या पाठिमागें गोळ लाविला हाती पळ आरडत। शिपायाची तंगडी उडुन जात॥ मोगल कहे "याजमौला कैशि होइ बात। कायकु लष्कर गजबजत" भोसल्या राजाचे बाण चालले कोकत॥ पडला रणांत आकांत। उजव्या बाजुला तुकोजी होळकर ते झाले म्होर। रणी मारितो तलवार॥ मोगलावर०॥ ५

---

लिहितो त्याप्रमाणें तो पत्र किंवा काय जें वाचावयाचें असेल तेंहि घडघड म्ह० निर्मळ वाचतो ! ३

आराब-आरब, आराबा-तोफा, तोफखाने. उदा०-"दोन कंपू, दीडशें आरबा येणेंप्रमाणें सरंजामानिशीं जांबगांवास आले" [खरे, ४८६०]. भोज-खिंड-भोसेखिंड असें पाहिजे. "तेथोन पुर्डे मौजे भोसे गांवापाशीं डोंगराची खिंड आहे, ती खिंड उतरून मौजे मिरजगांवावरून पूर्वेस नागल-वाडी व सिंगवी [यां] मधी नदी सीनावर श्रीमंताचा मुक्काम झाला. [का. सं. प. या. व. पा. ४३]. परवड-सुकाळ, विपुलता, समृद्धि दोहिरी-दुहेरी रांग. ४

याजमौला-अजमुद्दौला ? गजबजत-गजबजणें-To be amazed or confounded. चकित होणें, कावरेबावरे होणें, गांगरणें. 'गजबजले दशरथाचें मन' [मोल्स]. "मंजुळ स्वर ऐकून कोकिळा वृक्षिं बसुनि मनिं गजबजती" [होनाजी ८७]. कोकत-आवाज करीत. कोकणें-आवाज करणें. ५

बुधवारच्या दिवशीं ज्यानें मोगल मोडिला । नेऊन खर्ड्यामधि कोंडिला पांच क्रोड रुपये खंडणी देतो तुम्हाला । रातचा मोगल पळुन गेला । झाली बुनग्याची गाळण झाडुन पेंढाऱ्यानें लुटला । येश आले दौलतरायाला । तोफाची चाकरी होती त्या शिदोजि गवळ्याला । बाराभाई मारी तलवार । मोगलावर०॥ ६

अवघे पेंढारी मिळुनशानि चढले गर्वांन । बेजार केले दखन ॥ माशावाणी नीर काढिला आणले धरुन । रुपये मोहरा खोगरान ॥ भल्या भल्यांच्या इजती घेतल्या लावले पिटून । संगती पागा देऊन ॥ परशुराम भाऊ आले यश घेउन । खंडण्या येत्यात मागुन ॥ बाळा लक्षुमण गातो पोवाडा हमेश बसून । करड गांव त्याच ठिकाण ॥ आइक रे शाहिरा तुझी कलगी आहे थोर । हरदास मनामधि झुरं ॥ मोगलावर०॥ ७



**माशावाणी नीर काढिला**–जाळें टाकून झाडून सारे मासे पकडून आणावें त्याप्रमाणें केलें. **नीर**-पु. मासे पकडावयाचें भलें मोठें जाळें. [मोल्स]. नीर काढणें असा वाक्प्रचार अजूनहि रूढ आहे. उदा०—सगळ्यांचा नीर काढून आणला म्ह० झाडून सारे लोक आणले. **संगती पागा देऊन**–संग ती पागा घेऊन असें पाहिजे. "पिच्छा करीत गोटापर्यंत गेलों. पांचसातशें घोडे पाडाव करून आणिले." [खरे, ४७३२]. ७

# खड्यांच्या लढाईचा सातवा पोवाडा

## २७

[ शाहीर—होनाजी बाळ ]

[ चाल—'वसंतीं बघुनि मेनकेला। गाधिज मुनिनें निज॰'—किर्लोस्कर.]

त्रेतायुगीं शूर पाही। परशुराम विख्यात, कलिंत माधवरावसवाई ॥ध्रु०॥

एकवीस वेळां धरत्री। फरशधरें अति पराक्रमें कुंभिनी केली निःक्षेत्री॥ माघ शुभनक्षत्रीं। पुरंदरीं जन्मतां दक्षिणेमध्यें राज्य एकछत्री॥ नाना प्रधान मंत्री। श्रीमंत गर्भीं असतां राज्य रक्षिलें आराधुन यंत्री॥ (चाल)॥ किर्ती दिगंतरीं मिरवे। जे महा महा दळ दक्षण उरवे॥ करून पुंडाई वर्तती गर्वें। अजिंक शत्रु जिंकुनि सर्वें॥ त्यांच्या मुखें वदविलें बर्वें। श्रीमंतासन्मुख युद्ध न करवे। स्वकरें बुद्धी शस्त्र न धरवे॥ (चाल)॥ नाना ज्ञानगभस्ती आस्ता। करी स्वराज्य न्यून न दिसतां॥ मुलखामध्यें चौथाई शिरस्ता। शहर पुण्याशीं येती रस्ता॥ जयजय धर्मराज इंद्रप्रस्ता। तैसे श्रीमत तक्तीं बैसतां॥ सन्निध नाना दिपिच्या बस्ता। मोंगलावर कंबरबस्ता॥ युद्धीं

---

**फरशधरें**—फरस धारण करणाऱ्यानें. परशुरामानें. **कुंभिनी**—पृथ्वी. **राज्य एक छत्री**—एक छत्री राज्य झालें. **आराधुन यंत्री**—यंत्र—तोफ. **यंत्री**—शिंदे. शिंद्याना वळवून दळ—खळ पाहिजे. (मोडींत द, ख चा घोंटाळा होतो.) **खळ**—दुष्ट. हैदर किंवा टिपूसारखे. **जे महा महा खळ दाक्षिण उरवे**—दक्षिणेंत जे जे मातबर शत्रु शिल्लक उरले. **उरवे**—उरले. **आजिंक**—अजिंक्य. **श्रीमंतासन्मुख युद्ध न करवे स्वकरें, बुद्धिशस्त्र न धरवे**—समोर उभे राहून हातांनीं लढण्याची ताकद नाहीं, आणि बुद्धिशस्त्र (मनसुबीची तलवार) ही पेलतां येत नाहीं. लढायांत, आणि मुत्सद्दीगिरींत दोहोंतही ते हटले. **गभस्ती**—सूर्य. **आस्ता**—असतांना. **करी**—माधवराव करी. **न्यून न दिसतां**—कांहीं एक उणें न पडतां. **मुलुखामध्यें चौथाई शिरस्ता**—सर्व मुलुखांतून चौथाई बसविली. **शिरस्ता**—वहिवाट. **रस्ता**—रसदा, खंडण्या. **नानादिपिच्या बस्ता**—

गवस्ता काय अवस्था । तें कथन बुधश्रवणीं वरषतां ॥ वाटे प्रजेशीं सौख्य समस्तां । ऐकुनि हे व्यवस्था सारी ॥ (चाल) ॥ आहारे आवघे भूप तयारी । पर्वतीस जाते जंव स्वारी ॥ गजपृष्ठीं आदर्शअंबारी । चोपदार ललकारी भारी ॥ हारोहारी रयत व्यापारी । सावकारी मुजरे होता मग मानत या साहेब दरबारीं ॥ (चाल) ॥ नानाची चतुराई धन्य तयाचें करणें दुसरी उपमा नाहीं ॥ त्रेतायुगीं० ॥ १

अमृत वेळ सुमुहूर्तीं । गारपिरावर डेरे दिधले शत्रुशीं बांधून शर्ती ॥ रणीं पण केल्या अर्थीं । नानाचें शौर्यतेज जें अर्जुन जैद्रथवधार्थीं ॥ दळ तीन लक्षांची भरती । व्हावयास नानानीं धाडिलीं पत्रें देशावरती ॥ (चाल) ॥ कोण कोण सरदार ते न कळे । प्रळयकाळ शत्रुशीं तमले ॥ वैकुंठीं यशाचे इमले । बांधुन मग मुरवंशीं जन्मले ॥ तें श्रवण करा कथनीं न कळलें । जरीपटक्याचे सर्व नेमिले ॥ बाबा फडके हुजरातींतले । मानकरी शत्रुशीं

नाना द्विपींच्या वस्ता. वस्त–वस्तु. इंद्रप्रस्थाच्या सिंहासनावर अधिष्ठित झालेल्या युधिष्ठिरास ज्याप्रमाणें द्विपांतराहून निरनिराळे अमोलिक नजरनजराणे येत त्याप्रमाणें माधवरावास येत. **मोंगलावर कंबर बस्ता युद्धिं गवस्ता काय अवस्था**–मोंगलावर कंबरबस्त होऊन (पेशव्यांनीं) त्याला युद्धांत गवसला (गांठला) तेव्हां त्याची काय अवस्था झाली ती हकीकत (तें कथन) ऐकून सर्व प्रजा संतुष्ट झाल्या. **गजपृष्ठीं**–गजस्कंधीं. **आदर्श अंबारी**–आयन्याची अंबारी, आरसे जडलेली अंबारी. **हारोहारी**–ओळीनें किंवा मागोमाग. **सावकारी मुजरे होता, मग मानत या साहेब दरबारी**–सावकारी मुजरे होता मग साहेब या (त्या–त्यांना) दरबारीं मानत. सावकार लोकांचे धनिकांचे, मुजरे घेतल्यावर दरबारांत (पेशवे) साहेब सत्कार करतात. १

**बांधुन शर्ती**–पैज किंवा होड बांधून. **रणीं पण केल्या अर्थीं नानांचे शौर्यतेज जे अर्जुन जैद्रथ वधार्थीं**–रणिं पण केल्या अर्थी जयद्रथ वधार्थी अर्जुन जें तेज शौर्य प्रगट करी तें नानांनीं केलें. **प्रळय काळ शत्रूंशीं तमले–तमणे**–तळपणें [आपटे]. प्रळयकाळाप्रमाणें शत्रूंशीं भिडतांना

तमले ।। शिरिं समले लाउन निकरानें ।। (चाल) ।। घायगुडे पाटणकर माने । जाधव यादव रणाभिमानें ।। घोरपडे केवढे मर्दाने । निंबाळकर पांढरे स्फुराणें ।। ढमढेरे बरे सत्रानें । उभे आपआपल्या बाजुनें ।। हुजरातींतले नामाभिधानें । किंचित कथलीं यथामतीनें ।। मध्यम पतकीं हिंदुस्थानें । विंचुरकर पवार धिरानें । उभे खडे फौजेंत भरानें ।। (चाल) ।। राजे बाहादर रंगराव होळकर स्वतां आदी उमराव । तयाचें जाहीर पृथ्वीवर नांव ।। प्रतापि शिंदे दौलतराव । सैन्य समुदाव संमंधी ।। (चाल) ।। जिवबादादा ते रणफंदी । काबीज हिंदुस्थान सिबंदी ।। करून आले दक्षिण संधी । मिरजवाले भोंसले सुबुद्धी ।। आपा बळवंतराव निशांधी । ते परशुरामपंत प्रतिनिधी ।। बजाबाबापू ते स्थिरबुद्धी । फिरंगाणी हापसाणी सिद्धी ।। फराशीस आरबस्तानी सिंधी । चंदीचंदावर बुंदी ।। कोस्याचे नृपाळ असंख्य सवें शूरांची मांदी । धनी

---

तळपले, शोभले तमणें–तमतमणें–आवेशानें लढणें [आपटे पुरवणी]. यशाचे इमले–यशोमंदिरें. तें श्रवण करा कथनीं न कळले–जर तें तुम्हांस कळलें नसेल तर तें आतां माझ्या कथनीं श्रवण करा. रणाभिमानें–रणाभिमानानें शत्रुशीं तमले असा अन्वय. समले–शेमले. केवढे–आडनांव आहे. मर्दाने–मूळ शब्द मर्दाना–मर्द. स्फुराणे–संचार झालेले. सत्राणे–सत्राण–जोर ( सत्राणे उड्डाणे प्रसिद्धच आहे. ) सत्राणे–जोराचे, जोरदार. हुजरातींतले नामाभिधानें–हुजुरांतीतलीं नामाभिधानें, हुजरातीच्या फौजेंतलीं नामांकित माणसें. मध्यम पतकीं हिंदुस्थानें–पतके (?) हिंदुस्थानें–हिंदुस्थानीं म्हणजे हिंदुस्थानांतील (?) भरानें–उत्साहानें, डौलानें, जोसांत. आदी उमराव–जुन्यांत जुना सरदार. हें होळकरांचें विशेषण. समुदाव–समुदाय. संमंधी–मू. श. समंद किं. समंध–सर्व (आपटे) रणफंदी–रणशूर. सिबंदी करून–सैन्य जमवून. आले दक्षिण संधी–संधी–aim उदाहरणार्थ–"भिक्षुक पैशावर संधी ठेवून यजमानाचे आर्जव करावें." यावरून भावार्थ दक्षिणचा रोख धरून. निशांधी–निशाधुंद. सिद्धी–शिद्दी. चंदी–चंदावर–चंदीचंदावरचे सरदार किंवा चंदीचदावरकर. आनंदराव चंदीचंदावरकर कीं काय ? मांदी–जमाव, समूह, जमेत. परागंदा करणें–

माधवराव त्यामधीं ॥ प्रवर्तले मग मोंगल युद्धीं । राज्य अविंधी बुडउन होतां किंचित अवधि ॥ परागंदा शत्रुशीं करूं म्हणती । द्वादश कोस तळाची गणती ॥ महा महा मागिल युद्धांतीं । सैन्य न कळे तें पैवस्ती ॥ वडील वृद्ध आश्चर्य सांगती । धन्यधन्य नानाच्या युक्ती ॥ (चाल) ॥ असो शत्रुच्या पराजयालागीं वेळ होती । मजलोमजलीं चढाई करून चाललें सैन्य पुढें नेमुन सन्मुख लढाई ॥ त्रेतायुगीं०॥ २

युद्धप्रसंगकाळीं । मोंगल दळरण युक्तीशीं सादर श्रीमंत सैन्य मुऱ्हाळी ॥ होतां रणखंदाळी । यंत्राचे भडिमार न दिसे धुम्रें सूर्य निराळीं ॥ मोकलितां शरजाळीं । भयाभीत गज अश्व शूर शत्रुसैन्य माळोमाळीं ॥ ( चाल ) ॥ येकच रणवाद्याची घाई । वीरश्रीची घुमराई ॥ अचळप्राय मत्तकुंजरशाई । चक्राकार उभे शूर पाई । दळ अशिलता धरुन करा पाई ॥ ( चाल ) ॥ ठाईं ठाईं रथ शोभिवंत मग दाही दिशा चवताळती वारू । असी वादा

---

पळवून लावले, परदेशी करणें. ......–**महामहा मागिल युद्धांती–आश्चर्य सांगती**–वडील वृद्ध लोक "आम्ही आजपर्यंत मागें झालेल्या मोठ्या मोठ्या लढायांच्या हकीकती ऐकल्या परंतु आजपर्यंत बारा बारा कोसपर्यंत सैन्याचा तळ पडलेला असा याच लढाईत पाहिला किंवा ऐकिला" असें आश्चर्यचकित होऊन सांगतात. **वेळ होती**–उशीर होतो. २

**मोंगल दणरण युक्तीशीं सादर श्रीमंत सैन्य मुऱ्हाळी–मुऱ्हाळी–सह** कि. बरोबर, सांगाती. मोंगल दळाच्या रणयुक्तीशीं श्रमिंत सैन्य मुऱ्हाळी सादर झाले. मोगलांच्या रणांगणावरील डावपेचाशीं मुकाबला देण्याकरितां श्रीमंतांचें सैन्य त्याच्या म्हणजे मोंगलाच्या सैन्याच्यासमीप आलें. **रण खंदाळी–**रण खुंदल, रणकंदन, मारामारी, गर्दी. **भडिमार**–भडिमारें. **निराळी–**निराळ–आकाश. **शर जाळी**–शरांची जाळी ( जाल–जाळें ) शरांचे छत होईल इतके बाण सुटले. बाण–आगीचा बाण. **शत्रु सैन्य माळोमाळी**–शत्रु सैन्य रानोमाळ झालें, दशदिशा झालें. **घुमराई**–विपुलता [तुका.] **अचळप्राय–अचळ**–पर्वत–पर्वतप्राय, पर्वतासारखी. **शाई**–सैन्य. **आशिलता–**

असीवार तों ठाई ॥ थाट पुढें शत्रुचा देखोन हाट करुनीयां साठ तुरंगा। जाणउन मग गांठ घालिती ॥ प्राणाशीं दुजायींच्या दाउन ऊर्ध्व वाट माघारे फिरती। दाट पराक्रम तुमचा साहेब अफाट कीर्ति ॥ वडला वडली भार असे जव पडती। चढती कळा धन्याची जाणुन वीर असे भीडती ॥ तेथें चढती मारुन अडती कैक नरमुंडे पडती। झडती घे यासी येक येकाशीं उलटे ॥ किंवा काळच परसैन्यावर उलटे। पापभार शत्रु निवटले फुटल परदळ लुटलें॥ अवघें विटलें। मोंगल मल्ल युद्धासीं उठले ॥ मागें इतक्यांत यशस्वी। श्रीमंत वीर प्रगटले ॥ बळें लगटले। खटलेखोर तो मश्रुल्मुलुख ॥ त्यास विगटले। घाबरलें दळ त्यांचें पळाया ॥ पुढें वीर सरले। गांगरले परिवारासहित हरिले ॥ अवघे पराक्रम भुवनत्रयीं भरले। जें

---

**असिलता**–तरवार **असी–वादा** **असीवार तोंठायीं**–**असीवाद**–तरवारींचें युद्ध; **असीवार**–मू. श. असिवार, (प्रा. पु.) खड्गधारी घोडेस्वार [ आपटे ]. **तोंठायीं**–त्या ठिकाणीं. **थाट पुढे शत्रुचा देखोन हाट करुनिया साठ तुरंगा-जाणउन**–**थाट**–जमाव, **हाट**–जमाव, **तुरंगा जाणउन**–घोड्यांना इशारा करून. पुढें शत्रूचा जमाव पाहून यांनींही आपली जमवाजमव केली. **गाठ घालणें**–भिडणें. **दुजाई**–शत्रू. **उर्ध्ववाट**–स्वर्गलोकची वाट; परलोकाची वाट. **दाट पराक्रम**–फार मोठा पराक्रम. **वडलावडली**–वाडवडिलांपासून. **चढती कळा**–चढती रती; भाग्योदय; उत्कर्ष. **दाट पराक्रम...भिडती**–हें पटवर्धनांच्या पराक्रमास उद्देशून म्हटलें आहे. पूर्वीपासून पटवर्धनांचे अनेक पुरुष पेशव्यांचे कामीं पडले. **चढती मारुन**–हल्ला करून. **अडती**–भिडती. **झडती घे यासी**-घेयासी असें पाहिजे. **घेयासी**–घेण्याकरितां, समाचार घेण्याकरितां **येकयेकाशीं**–एकमेकांशीं; परस्परांशीं. **फुटल**–फुटलें; पांगापांग झाली. **परदळ**–शत्रु सैन्य. **विटलें**–विटणें–रंग झडून जाणें. भावार्थ–शत्रुसैन्याची छबी मावळली. **श्रीमंत वीर**–श्रीमंतांकडील वीर **लगटले**–भिडले. **खटलेखोर**–भांडणें उकरणारा, भांडखोर; कज्जेदलाल. **विगटले**–भिडले. **परिवारासहित हरिले**–आजबावसुद्धां

शत्रुचें मीपण हरलें ।। कारागृहीं ठेवावें ठरलें । सब सैन्य जयवंतराव साहेबांचें फिरलें ।। ( चाल ) ।। विरलें जिकडे तिकडे सारें। बिनहत्यारें येती शरण तृषेचे मारें ।। पाणी पाजुन प्राण वांचवा । म्हणती हे परभारें वार्ता ।। ऐकुन कानीं श्रीमंतांनीं । आज्ञा दिधली नाहीं मनाई ।। कोणाशीं पाणी द्या सर्वांशीं । इकडे आज्ञा वकिलाशीं ।। चवथाई आणखी माहाल मुलुख पूर्वीचा होता तो मागुन घ्या त्याशीं । श्रीमंत आज्ञेनें नबाबाशीं मग वकिल भेटले ।। चवथाई मुलुखाचें निवेदन श्रुत केलें । मग वकिल आदरें गौरविले ।। त्या करें त्वरें मग । ते कबुलायतपत्र दिधलें ।। वाचितांच श्रीमंत हर्षयुक्त मनीं झाले । जय संपादुन शहर पुण्याशीं येउन आदरले ।। (चाल) करून नगाची राई । जयवाद्यें वाजवीत परतली श्रीमंतांची शाई ।। त्रेतायुगीं० ।। ३

शृंगारुन गजातें । आदर्श अंबारींतें ।। करिती शूर मुजरे पिटुन भुजातें । उभवुन यश ध्वजातें ।। पुणें मार्गीं लागलें हें ऐकुण श्रवणीं सौख्य प्रजातें । आनंदरूप द्विजाते ।। ठेवूनियां श्रीराम आले भेटायाला भरतानुजातें । स्नेहसद्गदीत नंदीग्रामीं ।। तैसे श्रीमंत थेऊर मुक्कामीं । स्वामी देखुन स्वसेवका

---

लुटून घेतले. **मीपण**—गर्व, गुरुरी; मगरुरी. **जयवंतराव साहेबांचे**—जयवंत रावसाहेबांचे असें पाहिजे. **विरले जिकडे तिकडे सारे**—पांगापांग झाली; दाणादाण झाली. **बिनहत्यारें**—हत्यारें टाकून. **तृषेचे मारें**—तृषेच्या व्यथेनें **मार**—अत्यंत विपुलता. **हे**—ही. **नगाची राई करणें**—सध्यां मराठी भाषेंत ‘राईचा पर्वत करणें’ असा वाक्प्रचार रूढ आहे. त्याच्या अगदीं उलट हा वाक्प्रचार आहे. **नगाची राइ करणें**—अप्रतिष्ठा करणें; महत्त्व कमी करणें; गर्व हरण करणें.. ३

**आनंदरूप द्विजाते । ठेवूनियां श्रीराम आले भेटायाला भरतानुजातें**—**भरतानुजातें**—भरता—अनुजातें—अनुज अशा भरताला. वनवासाला गेलेल्या रामाच्या पाठीमागें एकनिष्ठ भरत त्याच्या वाटेकडे चिंतायुक्त अंतःकरणानें दृष्टि लावून बसला होता. त्याची व रामाची वनवासानंतर

सुख अंतरयामीं ॥ व्योमींहून सुरपुष्पवृष्टि करितातीं सकळिका। सरंजामी ते सरदार तैनामी ॥ स्वामी सन्निध शोभतातीं। अती सव्यवामीं ॥ कामीं पडले रणसंग्रामीं। मुहूर्त शुभ पाहुन स्वधामीं ॥ यावयास जमावले। ताकीद शहरांतील रस्ते झाडा ऐसें ऐकतां दूत धावले ॥ निर्मळ रस्ते करुन दुतर्फा दीप लावले। नगर लोक पहावया धांवले ॥ पाहुन मन विश्रांती पावलें। ते समयीं कोणाचे कसें जिवीं भासलें ॥ पूर्व तपश्चर्येचें फळ आज उद्भवलें। कीं श्रीमंतरुप या दृष्टीमाजी समावले ॥ सर्वांनीं धन्यार्शी पोहोंचविलें। वाड्यांत आनंदे बैसविलें—॥ गादीवर साहेब. मग मुजरे करून सकळ शूरांनीं। त्वरेनें निरोपावारे घेतले स्वनगरासीं जाया इच्छिलें ॥ येथुन मोगलयुद्ध संपलें। श्रेष्ठ भाग्य रायाचें केवढें ॥ शके सोळाशें शहाण्णवांतील जन्म। धन्य तर्धींपासून या दिवसोंदिवस ॥ राज्याचीं चिन्हें दाखविलीं लिला। अद्भुत हे किर्ती गाजती ॥ सर करुनिया सर्व ही सृष्टी। शके सतराशें सत्तर राक्षसनाम संवत्सरीं ॥ शुक्लपक्ष अश्विनी पौर्णिमा। ते दिवशीं सायंकाळीं मग संपविला अवतार आपला ॥ श्रीशांत सिद्ध कृपावरें। होनाजी बाळ करीं

जशी भेट झाली तशी भेट श्रीमंतांची व श्रीमंतांच्या प्रजेची झाली असें कवीस म्हणायचें आहे. श्रीमंत जातीनें स्वारींत गेले असल्यामुळें ते सुखरूप परत येईपर्यंत प्रजा काळजी करीत होती हा मुख्य भाव. **सकळिकां**—सकळिक. **तैनामी—तैं नामी**—त्यावेळीं स्वामी सांनिध नामी नामी सरदार शोभत होते. (२) पण तैनाती असा मूळ शब्द असावा. **सव्यवामी**—डाव्या उजव्या हाताला. **जमावले**—जमले. **नगरलोक**—नागरिक. **ते समयीं कोणाचें कसें जिवीं भासलें। पूर्व तपश्चर्येचें फळ आज उद्भवलें। कीं श्रीमंतरूप या दृष्टीमाजीं समावलें**—त्यावेळीं लोकांना असें वाटलें कीं आज आपली पूर्वपुण्याईच फळाला आली कारण असें श्रीमंताचें विजयी स्वरूप आपणांस डोळे भरून पहावयास मिळालें. **समावलें**—सामावलें. **दृष्टीमाजीं सामावलें**—दृष्टींत भरलें; डोळ्यांत भरलें. **निरोपावारे**—निरोप. **चिन्हें**—उत्कर्ष. **शके १७७०**-शके १७१७ पाहिजे. **श्रीशांत**—" साताप्पाची

कवन रसिक जें जत्तांसीं प्रिय या ।। श्रीमंत राज्यामधीं प्रजेला सुखअपार, ऋषी महान महान कल्याण वांच्छिती । गादीचा अधिकार ज्याला, लक्ष (त्या) श्रीमंता पार्यी ।। लावुनी रामा अंदु निशिदिनीं रसिक कवनरस गाई ।। त्रेतायुगीं०।। ४



---

समाधि पुणें येथें संगमाजवळ एका घाटावर आहे व समाधीवर पिंडी आहे यास शांतलिंग असें म्हणतात. व येथें श्रावण महिन्यांत सोमवारीं पुष्कळ सांप्रदायी गवळी येऊन हजेरी देतात" हा सातापा होनाजीचा आजा. [ पा. ४७५ टीप महाराष्ट्र सारस्वत ]. रामा अंदू–हें नांव आहे. ४

# खर्ड्यांच्या लढाईचा आठवा पोवाडा

## २८

### [ शाहीर—रामचंद्र ]

[ चाल—छोटेपणसे प्रीत लगाई वचन मेरेकु दिया आतां कां
पातळ केलिस माया ॥ —सीताराम.]

हिंदुस्थान गुजरात सोडून शिंदा दक्खनेंत आला ॥ हुकूम केला बाद-
शहानें त्याला ॥ ध्रुपद ॥

मजल दरमजल नर्मदा उतरून आले पार। धरला दक्खनचा सुमार ॥
बेगुबेग येऊनि त्यांणीं घेतले गंगातीर। फौज होती चाळिस हजार ॥ मनीं
मनसुबा करुनि चढले बालेघाटावर। धरला व्यंकाजी तस्कर ॥ मग कित्येकांस
जरब पोंचली मरुन झाले चूर। पळाले पुंड पाळेकर ॥ तेथून जलदिने कूच
करूनी दाखल तुळजापूर। आले दक्खनांत झालें जाहिर। दक्खनदेशीं

---

**हिंदुस्थान गुजराथ सोडून शिंदा दख्खनेंत आला**—"पावसाळा संपल्या-
वर महादजी शिंदे उज्जनीहून निघाले. ते दोन तीन महिने माळवा व नेमाड
याच प्रांतांत फिरत होते. मार्च महिन्यांत ते बऱ्हाणपुरास आले आणि तेथून
थेट चाल करून गोदावरीतीरीं बीड येथें गेले. तेथें त्यांचा गुरु कोणी अवलिया
फकीर होता त्याच्या सहवासांत त्यांनीं आठ दिवस घालविले. त्यांच्या
वहिणीची मुलगी वाशी येथील जहागीरदार कल्याणराव कवडे यांस दिलेली
होती. कवड्यांचा आग्रह त्यांस वाशीस घेऊन जाण्याचा होता, पण तिकडे न
जातां ता. १३ एप्रिल दिवशीं ते बिडाहून कूच करून तुळजापुराकडे चालते
झाले. वाटेंत पार-नांदूर येथील मुक्कामीं त्यांच्या स्त्रियांपैकीं एकजण आजारी
होती ती मृत्यु पावली, सबब तेथें त्यांचा दहा दिवस मुक्काम झाला....तेथें
कांहीं दिवस मुक्काम झाल्यावर पंढरपुरास जाऊन जोतीबास जावें असें त्यांच्या
मनांत होतें, परंतु आयत्या वेळीं हा बेत फिरवून ते तुळजापुराहून निघाले ते
जामगांवास जाऊन ता. ११ जून रोजीं पुण्यास येऊन पोंचले व संगमावर डेरे
देऊन राहिले" [ खरे, ४५०२ ]. **सुमार**—मार्ग किंवा रोंख. **बेगुबेग**—
तांतडीनें. **मनसुबा**—मसलत. **बालेघांट**—"ही डोंगराची ओळ निजामाचे

अंबा भवानी दैवत अनिवार। देवीस केला नमस्कार ॥ (चाल)॥ दिलें तळजापूर सोडूनी। गेले चंद्रभागा उतरूनी। खबर ऐकिली श्रीमंतांनीं। दोन कोस आले चालुनी। भेटले हाडपसराच्या रानीं। नेमिली पुण्याची छावणी। जवळ पेठ आहे भवानी। मुक्काम वानवडीवर केला ॥ हिंदु०॥ १

सहा चार महिने तिथें गुजरले पुण्यास येऊनी। मनसुबा बहु सबळ करुनी ॥ नबाबांस पत्र लिहिलें फार फार अर्जिनीं। खर्चि द्या आम्हांस पाठवुनी ॥ जासुद जोड्या केल्या रवाना पोंचल्या ज्ञाऊनी। पत्र टाकिलें

---

राज्यांत आहे. तिचे दोन फांटे असून दोहोंसही बीड जिल्ह्यांतील अष्टी तालुक्यांत सुरुवात होते. एक फांटा तेथून पूर्वेस पीलम, नांदेड, बोधन या जिल्ह्यांतून बिलोली तालुक्याकडे जातो. दुसरा दक्षिणेस धाराशीव जिल्ह्यांतून नळदुर्गावरून गुलबुर्ग्याकडे जातो. याचे कांहीं लहानमोठे डोंगर इंग्रजी हद्दींत बारशी तालुक्यांत आले आहेत. वर सांगितलेल्या डोंगराच्या ओळीच्या आस-पास जितका प्रदेश आहे. त्यास 'बालेघांट प्रांत' ही संज्ञा आहे. या प्रदेशांतून मांजरा, सीना व कागना या नद्या वाहतात. हा सर्व प्रदेश एक लांब व विस्तीर्ण असें उंचवट्याचें मैदान आहे." [खरे, २७५ टीप. २]. **गंगातीर**-गोदातीर. **धरला त्र्यंकाजी तस्कर**-(?)**पाळेकर**-पाळेगार. **अनिवार**-मोठे जागृत. १

**गुजरले**-घालविले; क्रमिले; कंठिले, **अर्जी**-विनंति **नबाबास...इत्यादि**-"महादजी शिंद्यानें नानास पेशवाईतून काढण्याकरितां पुण्यास आल्यावर संधान लावलें होतें." "नबाबाकडून कर्जादाखल पंचवीस लाख रुपये आणून येथें खादले असें लोक बोलतात. कांहीं लटकें नव्हे" [खरे, ४७५३] "शिंदे यांची वांकडी नजर. त्यांनीं पूर्वेच्या यवनापासून बत्तीस लक्ष कारभारी यांस समजून रुपये खर्चास आणिले" [खरे, ४७५५]. "शिंदे येथें आहेत, यांची चाल सुधी नाहीं. नबाबाकडे त्यांचें राजकारण आहे. बेदर सरकारच्या (प्रांताच्या) चौथेचा अम्मल स्वराज्याचा आहे. तो शिंद्यांनीं नबाबास द्यावा. नबाबांनीं शिंद्यास बीड परगणा अगदीं द्यावा आणि आमचा बंदोबस्त करावा. आपण श्रीमंताजवळ राहून दौलतीचा कारभार करावा असाहि डौल आहे.

मुजरे करुनी। नबाब, बाहादर मश्रुल्‌मुलुख एक मसलत करुनी। पत्र धाडिलें त्यांनीं॥ वाचून परगण्यावर चिठ्या नेमिल्या समय मग पाहुनी। नगदी ऐवज दिला लावुनी॥ पांसष्ट लाख रुपये पोंचले नाहीं भरलें मनीं। दक्खनचा हिशोब घेऊं भरुनी॥ (चाल)॥ ऐसें करणें भगवंताला। हिंदुस्थान ज्यानें काबिज केला॥ परतुन दक्खनामधिं आला। पुणें शहरीं काळ झाला॥ खबर कळली नबाबाला। नबाब बेदरावरी आला॥ खरें खोटें भासे लोकांला। तर्कीं दवलतराव स्थापिला॥ हुकूम केला बादशहानें त्याला। ॥ हिंदु०॥ २

नबाबानें पत्र लिहिलें श्रीमंत नानाशीं। शिवाय दवलतराव बापूशीं॥ पांसष्ट लाख रुपये आम्हीं कर्ज दिलें शिंद्याशीं। लवकर द्या आमचे आम्हांशी॥ आटोकाट सरदार मिळोनी बसले मनसुब्याशीं। क्रोध आला दवलतरावाशीं। तुम्ही बसून रहा पुणें शहरीं हुकुम करा आम्हाशीं। पाहुन घेतों नबाबाशीं। तमाम फौजा मिळोनि दिले रोजमुरे त्यांशीं॥ बोलाविलें जिवबादादाशीं॥ तिथें जेवत असलां तर इथें या तुम्ही पाणी प्यायाशी। घेऊनि देवजी गवळ्याशीं॥ (चाल)॥ येऊनि लवकर पोंचले। श्रीमंत पुण्याबाहेर निघाले। मुळामुठावर डेरे दिले। बावन उमराव मिळाले॥ एकंदर बसुनि मनसुबे केले। भोंसले तेहि लवकर आले॥ शिंदे अघाडीस घातले। येऊन सिनेवर शह दिला॥ हिंदु०॥ ३

बेदर सोडुन नबाब लवकर बाहेर निघाले। अमीर उमराव संगें घेतले॥

---

[खरे, ४७५८]. या हकीकतीची छाया चौक २ व ३ वर पडली आहे. **खर्ची**—रकम. **परगण्यावर चिठ्या नेमिल्या**—पैसे देण्याकरितां हुकूम दिला. **नगदी**—रोख. **ऐसें करणें भगवंताला!**—परंतु ईश्वराला हें असें करावयाचें होतें. **पुणें शहरीं**—पुण्याजवळ वानवडी येथें. **खरें खोटें भासे लोकांला**—लोकांना खरें आहे कां खोटें आहे याचा उलगडा करतां येईना, विश्वास बसेना. २

**रोजमुरे**—पगार. ३

चला चला म्हणून लवकर घारूरावर आले। पुण्याकडे झेंडे फिरविले॥ तेथुन जलदिनें कूच करूनी वांजरानदीवर आले। फिरंगी अघाडीस घातले॥ शेकसलाची करूं कंदुरी मशीरन बोलले। पेशवे थरथरां कापूं लागले॥ पांसष्ट लाखांचा मुलुख मागतां तोही विसरून गेले। स्वप्नीं नबाब दिसूं लागले॥ सांडणीवरती सांडणी फिरती डांकवाले बसविले। वरचेवर बातमी आणवूं लागले॥ (चाल)॥ घाट उतरले मोहोरीचा। मार्ग धरिला पुण्याचा॥ एकच गट करुनि फौजेचा। माळ चढले नायगांवाचा॥ तकवा आला तिकडुन पेशव्यांचा। निश्चय केला यांनीं झुंजायाचा॥ धडाधड बार सुटे तोफेचा। मुसा रहिमानचा मोर्चा तुडविला॥ हिंदु०॥ ४

नबाबानें मोर्चा तुडविला कळलें श्रीमंताला। अजुरदे जाले बहु मनाला॥ अमीर सारे बोलावूनी आणिले डेऱ्याला। वक्त हा बुडायाचा आला॥ नानाफडनवीस एक मसूदी तर्क त्यानें काढिला। बोलाविलें जिवबादादाला॥ तुम्ही अघाडीस असतां मनसुबा कसा नाहीं कळला। नबाब गफलतीनें आला॥ तीच विरश्री धरून सड्या फौजा अघाडीला। चुरस लागली तेव्हां शिंद्याला॥ भिमराव पानसे तोफखाना त्यांचे हवालीं केला। फिरंगी लोक

---

**फिरंगी आघाडीस घातले**–मुसारेमूचीं पलटणें. **शेकसलाची करूं कंदुरी**–शेखसल्लयापुढें बळी देऊं. **कंदुरी करणें**–देवास बळी देणें. **तकवा**–मू. श. तलावा असा असला पाहिजे. मोडीचा घोंटाळा? तलावा–टेहळणी; टेहळणीची लष्करी टोळी. **मुसा–रहिमानचा मोर्चा तुडविला**–मुसा–मॉनसूर. शाहिराला मुसा रेमू म्हणावयाचें आहे असें दिसतें. रहिमान हें नांव मुसलमानी आहे त्याच्या मागें मुसा असें उपपद लागावयाचें नाहीं. पण तरी देखील घोंटाळा संपत नाहीं, कारण, मुसा रहिमान म्हणजे मुसा रेमू असा अर्थ घेतला तर पांचव्या चौकाच्या सुरवातीच्या "नबाबानें मोर्चा तुडविला कळलें श्रीमंताला" या ओळीशीं तो विसंगत दिसतो. ४

**अजुर्दा**–कष्टी किंवा श्रमी. **मसूदी**–मुत्सद्दी. **एक मसुदी**–अद्वितीय मुत्सद्दी. **गफलतीनें**–गुप्तपणानें. **भीमराव पानशे**–शाहीराला भिवराव

तैनातीला ।। ( चाल ) ।। पेशव्यांनीं विंचरणा रोंखून।। सज्या फौजा पुढें देऊन ।। रास्त्यांनीं एक अलंग धरून । फडक्यांनीं तवाफरा बांधुन ।। राजे बहादर नाम निशाण । फौजा नानाच्या आधीन ।। तेथें मिळाले अष्ट प्रधान हौद्याशीं हौदा भिडुनी गेला ।। हिंदु०।। ५

करून स्वारी तयार नबाब जरद्या अंबारींत । बेगमांपुढें हुजुरात ।। त्यांची उमेदवारी पेशवे सर करूं सहजांत । बांधली राजानीं हिंमत ।। मश्रुल्मुलुख त्याचे मसूदी राजा नेमिवंत । झाडुन फौजा त्याच्या अंकित ।। रोशनखा परबिनीवाले नबाबाच्या हुकुमांत । भरअमल दोन्ही दळांत माहीत ।। इस्मालखा पठाण गारदी त्यांचे संगत । नामी करवळ आहे हुजुरांत ।। फाजलखा रोहिले खांसि बारा हजार जमात । जंबुरे जोडून उंटावरत ।। ( चाल ) ।। नबाबानें हल्ला केली । फौज लोणीचा माळ चढली ।। दोन्ही दळें उभीं ठाकलीं । नामी सरदार आसतअह्ली ।। तोफखान्याला शिलक

---

म्हणावयाचें आहे. पण चूक. कारण भिवराव पानशे इ.सन १७७९त वारला. परशुरामभाऊचें भिवराव पानशे यांच्या मृत्यूसंबंधींचें पत्र. [खरे, पा. ३४४५]. **अलंग धरणें**,अलंग-बाजू-बाजू धरणें. तवाफरा-तवा-फरा-तवा-तेव्हां-फरा-सैन्याची रांग. (२) शाळिग्राम तवाफरा या शब्दाचा अर्थ एक बाजू असा देतात. **नामनिशाण**-नामना शान किंवा छान. **नामना**-कीर्ति; प्रख्याती-प्रख्यात राजेबहाद्दर (?) ऐतिहासिक वाङ्मयांत नाव निशाण हा शब्द खाणखूण पत्ता किंवा कीर्ति या अर्थी येतो. जरद्-सोनेरी. ५

**बेगमापुढें हुजरात**-नबाबाच्या कबिल्यापुढें त्याची हुजरात होती (हुजरात-खास सरकारची फौज) **उमेदवारी**-हिम्मत किंवा उमेद. **हिंमत बांधली**-उमेद बांधली. **नेमिवंत**-नेमाचा. **भरअमल**-भारामल. **दोन्ही दळांत माहीत**-दोन्ही सैन्यांत ठाऊक असलेला; प्रख्यात. **संगत**-संगतींत; सांगाती; बरोबर. **करवळ**-बंदुकस्वार. **नामी करवळ आहे हुजरात**-हुजरातीच्या फौजेंत उत्तम प्रकारचे बंदुकस्वार आहेत. **आसत अह्ली**-असद अलीखान. **शिलक दिली**-बत्ती दिली. **देवढीमार**-

दिली । देवडी मार जेव्हां बसविली ॥ पेशव्यांची फौज मागें हटविली । फिरुन खरनदीवर मुक्काम केला ॥ हिंदु०॥ ६

रातोरात आणून तोफखाना जोडिला जिवबादादांनीं । लोणीगारमाळ पसरुनी ॥ एकापरीस एक शिपाई रांगडा हिंदुस्थानी । दोन कंपू फिरंगाणी॥ मन्याबापू भोंसले परशुरामभाऊ आज्ञा घेऊनी । एक मोर्चा त्यांनीं रोंखुनी ॥ भवानराव प्रतिनिधी आले अनुपान भोगुनी । एक मोर्चा त्यांनीं रोंखुनी ॥ चौकोसांची लांबण पडली कोणांत नाहीं कोणी । बहिऱ्यामधीं फौज गेली मिसळुनी ॥ (चाल) ॥ तोफेचा एकच वर्षला कहर । गगनीं लागुनी गेला धूर ॥ मायेशीं पारखलें लेंकुर । नबाबाशीं कळुन आला फितूर ॥ मजल काय सुटेल तोफेचा बार । पांचजण निवडले रणशूर ॥ मुसा रहिमुनचें बुडविलें लष्कर । रमणा बहुत तिथें मातला ॥ हिंदु०॥ ७

लालखान वजीरखान ह्यांनीं रणांत घोडीं घातलीं । परशुरामभाऊशीं जखम चढविली ॥ दाजीसाहेब येथें शामजंगास स्वारी केली । पठाणी लोक संग हाटेली ॥ कटाव करीत चालले जेव्हां तिराचे मार बसविली ।

---

तोफांच्या किंवा बंदुकीच्या गोळ्यांचा लागोपाठ केलेला मार. ६

**लोणी गार**–परांड तालुक्यांत एक बारलोणी म्हणून गांव आहे बहुधा हेंच तें गांव असावें. शाहीरानें बारलोणीचेच गारलोणी केलें असावें व नंतर त्याचें लोणीगार झालें असावें. [रामजो. लाव. प्रस्ता.]. **एका परीस एक**–एकासारखा एक सरस किंवा एकापेक्षां एक सरस. **भवानराव प्रतिनिधि**–नांव चूक.परशुराम श्रीनिवास प्रतिनिधि पाहिजे. **अनुपान भोगुनी**–अन्नपान किंवा अन्नपाणी भोगुनी; जेवून खाऊन. लढाईच्या दिवशीं हल्ल्याच्या आधीं सरदार लोक लवकर आपलीं जेवणें खाणें उरकून घेत, असे अनेक उल्लेख खरे यांचे भागांत आलेले आहेत. **कोणांत नाहीं कोणी**–कोणाची दाद कोणास नाहीं, चार कोसांची लांबण पडल्यामुळें. **बहिऱ्यामधीं**–गर्दीत; हातघाईत. **गगनीं लागून गेला धूर**–आकाश धुरानें व्याप्त झालें. **रमणा**–गर्दी. **मातला**–माजला. ७

भोंसल्यानें गर्द बाण उडविली ॥ वजिरखानाशीं बाण लागतां हौद्यांत जान सोडिली। लालखांची सुद नाहीं लागली ॥ बाळासाहेब ठार जहाले मस्त सेना पडली। खना खना लव्हागर्द उडाली ॥ भले भले सरदार ह्यांनीं बहिरींत तोंडें घातलीं। अंबारी नबाबानें फिरविली ॥ (चाल) ॥ लोक लोक आले चेंदत। नबाब मश्रुल्मुलुक हौद्यांत ॥ आनंदराव किल्ला ठेवा नजरेंत। हावाई लाविली किल्ल्यांत ॥ नबाब दाखल सुलतान दुर्गांत। बुणगे आले शिवपटणाभोंवत ॥ वेढा काय शिंद्याचा पडला। हुकुम केला बादशहानें त्याला ॥ हिंदु०॥ ८

खरनदीवर दिले मोर्चे किल्ल्याशीं रोंखून। फौज नबाबाची घेरून ॥ जिवबादादा श्रीमंतांशीं बोले अर्ज करून। नबाबास क्षणांत घेईन लुटून ॥ लुटल्यावांचून कारण नाहीं बसा शह देऊन। नाना करील तेंच प्रमाण ॥ बेदड्यासी हुकुम टाका रस्ते बंद करून। रुपया शेर तेव्हां मिळेना अन्न ॥ पाण्यावांचुनी फौज तरसली नबाबानें ऐकुन। सल्ल्यास धाडिले गोविंद किसन ॥ (चाल) ॥ गोविंद किसन आले परतून। नबाबाशीं वर्तमान सुचवून ॥ मश्रुल्मुलुख दिले पाठवून। पेशव्यांनीं टाकिले कैद करून ॥ जसा सांपळ्यांत व्याघ्र कोंडून। नबाबांशीं नानाचें वचन ॥ खातरजमा झाली येथून। अवघा चित्तिचा विकल्प उडाला ॥ हुकुम केला बादशहानें त्याला ॥ हिंदु०॥ ९

---

**हाटेली**–आडदांड; कडवा. **कटाव**–काटाकाटी; कत्तल. **गर्दबाण**–बाणाची गर्दी. **जान**–प्राण. **सुद**–शुद्ध. **नाहीं लागली**–नाहीं उरली. **मस्त**–फार; पुष्कळ; बहुत. **लव्हागर्द**–लव्हा–मोठी तरवार **गर्द**–गर्दी, तरवारींची खणाखणी. **बहिरींत तोंडें घातलीं**–गर्दीत ॰चालून घेतलें. **हवाई**–प्रकाश देणारी चंद्रज्योत. **शिवपटणाभोंवत**–(?) ८

**लुटल्यावांचून–कारण नाहीं**–लुटण्याचें कारण नाहीं. **बेदड**–सैन्याबरोबर असलेली लुटारू जात. **तरसली**–त्रासली. **सल्ल्यास धाडिले गोविंद किसन**–गोविंदराव काळे. ९

शके सत्राशें सोळा आनंदनाम संवत्सर। फाल्गुन वद्य षष्ठी बुधवार ॥ किल्ल्यामधिं येऊनि नबाबासीं आठवला विचार। द्यावी निंबाळकराशीं जाहागीर। नबाब बोलतां हजर विश्वासराव बापू सुपेकर। आणविले आपा-साहेब निंबाळकर। भेट घेऊनिया करा कुचाचा विचार। किल्ल्यामधिं सदरजहा बाहादर। शके सत्राशें सत्रा राक्षसनाम संवत्सर। चैत्र पौर्णिमा शुक्रवार। दळभार घेऊन नबाब वांजरानदीच्या वर। संगे होते निंबाळकर ॥ (चाल) ॥ करुनिया अखेर त्यावेळेस। नबाब गेले भागानगरास। श्रीमंत पोंचले थेट पुण्यास। गैबिचें देणें भुजंग आयास। कादरभाई चाकरू दिले बिनीसं। त्यांनीं जाऊनि गांठिलें हारदास। रामचंद्र गातो मजलशीला ॥ हिंदु० ॥ १०



भुजंग आयास–भुजंग अभ्यास. १०

# खड्र्याच्या लढाईचा नववा पोवाडा

२९

[ शाहीर—बहुरंगी ]

[ चाल— निजामाशीं लढले सवाईमाधवराव। मराठे मुसलमानांत अखेरचा डाव ॥ —कुशाग्रमति.]

श्रीमंत धनी महाराज माधवराव। गोकुळीं उभारल्या गुढ्या जन्मला देव ॥ ध्रुपद ॥

तो पांडवांचा अर्जुन यशेश्वरी। ती पहिली निघाली स्वारी मोंगलावरी॥ त्यांनीं डेरे दिले गारपीरावरी। तो मोंगलाचा वकील विनंत्या करी॥ ते दवलतराव शिंदे अघाडीबिनीवरी। त्या होळकराची फौज धासत भारी॥ त्या बाबा फडक्याची कोरबंदी न्यारी। त्या जरीपटक्याखालीं हुजुरात चाले सारी॥ (चाल)॥ राव माने मानकरी। धाडगे पाटणकर यादव निंबाळकर॥ (चाल)॥ ते अंडगर बंडगर न्यारे आणिक पांढऱ्या पट्टयाची धार। ते धारुरकर भोंसले कीं सुपेकर स्वारी बरोबर। मोहिते न शिरके येऊन मिळाले रणाचे वर। ते गणेशपंत ढमढेरे आले बहादरकि सवते दूर। ते मानाजी फाकडे भले रणशूर मारी तलवार॥ (चाल)॥ चालतांना स्वारी शोभती। कोरबंदी जपुन चालती॥ अशा सरदाराच्या गणती। कालुकर्णे बाजे

---

**गोकुळीं उभारिल्या गुढया**—कृष्णजन्माचे वेळीं गोकुळांत जसा उत्सव झाला तसा पुण्यांत माधवरावाचे जन्माचे वेळीं मोठा उत्सव करण्यांत आला. **यशेश्वरी**—यशेश्वरी यशस्वी. **कोरबंदी**—पलटणें रांगेनें उभ्या करणें [आपटे]. **आणिक**—आणिला (?) **पांढऱ्या**—पांढरे नांवाचा शिलेदार किंवा कोणी पाग्या पथक्या. कदाचित् मुळांत पांढरे असेंहि असावें. कारण 'न्यारे'शीं त्याचा प्रास जुळतो. **पट्टयाची धार**—पट्टयाच्या धारेसारखा तिखट, शूर (?) **भावार्थ**—पट्टयाच्या धारेसारखे तिखट. अंडगर, बंडगर न्यारे आणि पांढरे जमा झाले. **रणाचे वर**—रणनवरे; रणशूर. **आले बहादर कीं सवते दूर**—(?)

होती ॥ आपलाल्या बिनीवर हत्ती। पुढें सांडणीस्वार धांवती ॥ (चाल पहिली ) ॥ घोडदळ पायदळ कुठवर पाहूं गोकुळीं ॥ श्रीमंत धनी०॥ १

तो पहिला शहाणा नांव साज। त्यानें श्रीमंताचें भलें राखिलें राज्य ॥ अशीं पुण्यपवित्र खलबतें होतीं रोज। ते पंतप्रतिनिधी सूर्याचें तेज ॥ ते आपाजी बळवंतराव भुजेशीं भुज। ते वामनराव घाटगे नांव साज ॥ त्या पानशावर रावसाहेबाची रीझ। त्या राज्याचा हमेश डंका वाज ॥ (चाल) ॥ अशी गडबड झाली फार शिलेदारा घोडे मिळेना। दोशांचे घोडे चौशांला अशा खाशाला कोणी देईना ॥ विसाचें तट्टु साठाला अशा दाटीला कुठें मिळेना। भीवरेवर पडला तळ रयत तळमळे नजर थांबेना ॥ दाण्याचें झालें हांतरुण खुशाल पाहून कोणी घेईना। बायकोचें काढलें मोतीं घेतलें हातीं

---

तो पहिला शहाणा नांव साज—नाना फडणीस. म्हणावयाला अर्धा शहाणा· पण वास्तविक साडेतीन शहाण्यांतलाहि पहिल्या नंबरचा शहाणा असा भावार्थ. नांव साज—नांव साजे, शोभे. **अशीं पुण्य पवित्र खलबतें होतीं रोज**—"भाऊ पुण्यास आल्यापासून त्यांचीं श्रीमतांशीं व नानांशीं लढाई-प्रकरणीं नित्य खलबतें चालत होतीं." [खरे,४७०४]. पण पुण्यपवित्र खलबतें म्ह० पुण्यापावतर तर नव्हे? **भुजेशीं भुज**—खांद्यास खांदा भिडवून. **रीझ**—कृपा. **दोशांचे घोडे चौशाला अशा खाशाला कोणी देईना। विसाचे तट्टू साठाला अशा दाटीला कुठे मिळेना**——सैन्यांत नांवें नोंदण्याकरितां शिलेदारांची इतकी गर्दी झाली कीं, मातबर असामानींहि दोनशें रुपयांचें तट्टू पण चारशें रुपयेहि देऊन मिळेना. वीस वीस रुपयांच्या तट्टांनाहि साठ साठ रुपये पडूं लागले व तीं देखील हमखास मिळतीलच अशी खात्री नव्हती, इतकीं घोडीं खपलीं. **भिवरा**—भिमा. **रयत तळमळे**—कारण नजर थांबणार नाहीं म्हणजे पुरणार नाहीं येवढा सैन्याचा तळ पडला, त्यामुळें भोंवतालच्या मुलखां-तली धान्य, दाणावैरण तिकडेच खपूं लागून महागाई झाली. २ खुद्द लढाई सुरू होण्याच्या अगोदर मोगलांच्या व मराठ्यांच्या पेंढाऱ्यांच्या टोळ्या परस्परांचे मुलूख लुटीत होत्या. नजर थांबेना—नजर पुरेना. **तीन लक्ष**

गुजर ठेविना ॥ टक्क्याचें रुकें पायलीला दळणवालीला दळुन देईना ॥ (चाल) ॥ तीन लक्ष मिळालें दळ । आपुलाले धरती बल ॥ लष्करांत पडली भुल । मोठे मोठे कीं लढनेवाले ॥ ते विठ्ठल शिवदेव नारो शंकरभाऊ ॥ गोकुळीं०॥ श्रीमंत धनी०॥ २

गेले कागद नागपुरा कीं भोंसल्याला । दरकुच येऊन सिनेवरती मिळाला ॥ तो जिवबादादा•बक्षी अलबेला । ते वेळे काय बोलला रावसाहेबाला ॥ तो कसला कसा मोंगल आहे पाहुंद्या मजला । तो डीबाय फिरंगी गोळा मारनेवाला ॥ फौजेंत केली ताकीद सडे स्वारीला । त्या गणेशपंत बेहऱ्याला बाबा फडक्याला ॥ त्या परशुराम भाऊला जिवबा दादाला । तुम्हीं मिळुनशेनी जावें झुंजायाला ॥ (चाल) ॥ मोंगलानें गलिम पाहिला घोडा उठविला कीं त्या रंगणांत । भले भले माईचे पूत सुरई हातांत मारिती हात ॥ तो रावरंभा सरदार बसून हौद्यांत तिरंदाजींत । ते मश्रुल्मुलुख हत्तींच्या हौद्यांत बसून हणा हणा म्हणवीत ॥ बहु कोस मागें सारिला मार पडली हुजरातिला ॥ त्या परशुरामभाऊला बाबा फडक्याला । जखमा चढत्या

**मिळाले. दळ आपुलाले धरती बल**–भल–(?)मराठा शिलेदार. तीन लक्ष शिलेदार मिळाले व ते आपापल्या दळांत, पथकांत, सामील झाले. **विठ्ठल शिवदेव**–हा तर १७६७, २० ऑगस्टला वारला. २

**नारोशंकर भाऊ**–नांव चूक दिसतें रंगरावराजे बहाद्दर असें असावें **आलबेला**–सुरेख; छान. **डीबाय**–डिबॉइन. यांच्या देखरेखीखालीं शिंद्यानें आपला कवायती कंपू तयार केला होता. **गोळा मारनेवाला**–गोलंदाज. **सडेस्वारी किंवा सडीस्वारी**–"हलका तोफखाना घोडदळाबरोबर असे. या घोडदळांत कांहीं तुकड्या सडी फौज ( त्या वेळच्या मराठी पत्रव्यवहारांत फौजा याचा अर्थ फक्त घोडेस्वार असाच नेहमीं होई.) म्हणून असे. सांप्रतच्या फ्लाइंग कॉलमसारखी ही असावी. हिच्याबरोबर हलका तोफखानाहि असे." [ विद्यासेवक, वर्ष. ३. अंक ५. पा. २१]. **सुरई**–कट्यारीसारखें, एक शस्त्र [ आपटे ]. **तिरंदाजींत**–तिरंदाजी करीत. **मार**

मरदांला ॥ अशा कैक एकांड्याला । रणखांब रोविला मुक्काम घोडेगांव ॥ गोकुळीं०॥ श्रीमंत धनी०॥ ३

आला मोंगल देशावरी कळल्या खबरी । गांवनगांव ओस पडलीं सारीं ॥ ही पुण्यप्रतापी रावसाहेबाची स्वारी । त्या शाहूराजाचा हात पुरता शिरीं ॥ त्या बुधवारच्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं । त्या जिवबादादानें तोफा लाविल्या दोहिरी ॥ त्या भोंसल्याच्या बाणाच्या भरारी । त्या हनुमंतानें लंका जाळिली सारी ॥ तेंवि सवाई माधवराव यशस्वरी । हणा हणा म्हणून निशाणें उठलीं सारीं ॥ ( चाल ) ॥ मोंगलानें गलीम पाहिला पळ काढिला धीर कोंदला। पाहुण्यांनीं दिल्या मुंढाळ्या ओढिती तट करिती अल्ला अल्ला ॥ मर्दांनीं दिल्या डुया घेतल्या लुटी रात्री समयाला । खड्यांस नेऊन घातला नबाबसाहेबाला ॥ पाण्याचा झाला कहर दाणा शेरभर! आला कवलाला ॥ (चाल)॥ राव देतों मी खंडणी । घ्या मुलुख तुम्ही लिहूनी ॥ मशिरुल्ला देतों धनी। तेव्हां परशुरामभाऊनीं ॥ रावसाहेब नाना फडणीसांनीं । मनसुबी केली बैसुनी ॥ दिलीं निशाणें सोडुनी । आले पुण्याशीं निघुनी ॥ यश घेतलें पांडवांनीं । बहुरंग्याची लावणी ॥ पवाडा केला मर्दांनी । त्या गुरुरायाचें वदन नित्य पाहूं ॥ गोकुळीं०॥ श्रीमंत धनी०॥ ४

---

**पडलीं**–मारा पडला. **रणखांब**–एकमेकांवर हल्ला करून जाणाऱ्या दोन सैन्यांमध्यें पुरलेला खांब. या खांबाच्या खुणेचा सैनिकांस एकत्र जमण्यास उपयोग होत असे. ३

**दोहिरी**–दुहेरी. **निशाणें**–फौजा. **पाहुण्यांनीं दिल्या मुंढाळ्या ओढिती तट करिती अल्ला अल्ला**–पाहून यांनीं दिल्या मुंढ्याला ओढि ती थट करिती अल्ला अल्ला (?) **पाहुन यांनीं**–मराठ्यांनीं पाहून, मुंढ्याला ती ओढि दिली म्हणजे ओढ दिली. मुंढा हे हैद्राबादच्या नबाबाचें नांव आहे. **थट**–जमाव. मराठा फौजेनें मोगल पळतोसें पाहून निजामाला ओढ दिली. त्याच्या सैनिकांचे थटजमाव त्रस्त होऊन अल्ला अल्ला करूं लागले. १. **ओढिती तट**–ओढी तिथच असें तर नसेल? मोगल पळतोसा पाहिल्याबरोबर तेथेंच त्याला ओढ दिली, हल्ला केला असा तर अर्थ नसेल? **दिल्या डुया**–मुंडी देऊन राहिले. **दाणा शेरभर**–रुपयाला शेरभर. **आला कौलाला**–कौलास येणें–तह करण्यास प्रवृत्त होणें; सल्ल्यास तयार होणें. ४

# खड्यांच्या लढाईचा दहावा पोवाडा



हा पोवाडा अपूर्ण आहे. कारण एक तर चौथ्या चौकांतील शेवटच्या 'जरा दम धरा' या शब्दावरून शाहीराला पुढें कांहीं हकीकत सांगण्याची इच्छा आहे असें स्पष्ट दिसतें. शिवाय दुसरें मुख्य कारण असें कीं, पोवाड्या-च्या शेवटीं शाहीरानें आपलें नांवगांव मुळींच घातलेलें दिसत नाहीं. शाहीराच्या नांवाशिवाय एकहि पोवाडा आढळावयाचा नाहीं.

आहे या स्थितींत, त्यांत ऐतिहासिक माहिती सुसंगत असली तरी अगदीं त्रोटक आहे व काव्यदृष्टीनें तर तो अगदींच सामान्य आहे.

## खर्ड्याच्या लढाईचा दहावा पोवाडा

### ३०

### [ शाहीर—अज्ञात ]

[ **चाल—कडे पठारी डोळे झांकून बसला मलुराया । स्वामीचरण०** ]

शिपाई मारी तलवारा वाटावें पान राखावें शुरा। शिपाई मारी तलवारा ॥ ध्रुपद ॥

गोविंदराव बापुंनीं जाऊनि जाबसाल लाविला। बाकीचा पैसा द्यावा म्हणून कज्या केला ॥ मश्रुल्मुलुख म्हणे धाडीन काशीला ॥ (चाल) ॥ वकिलास क्रोध आला। त्यानें पत्र पाठविलें धन्याला ॥ खबर पाठविली पुण्याला ॥ (चाल) ॥ तेव्हां नाना पत्र वाची लवकर । श्रीमंतास राग आला थोर ॥ बोलाविले पाटणकर आगीचे धार। शिंद्याशीं पत्र पाठविलें नर्मदा-पारा ॥ शिपाई०॥ १

पाटीलबोवाची तयारी झाली आले राव दख्खनवर। नर्मदा उतरून पोंचले आले राव घाटावर ॥ श्रीमंतांची भेट घेतली जिलीब चाले मोहरें। धन्याशीं नालकी दिली पत्र धाडलें नबाबावर ॥ राव एकदांची घ्यावी टक्कर।

---

**वाटावे पान राखावे शुरा**—वाचावे प्राण राखावे शुरा (?) **वाचावे**—वांचवावे. **गोविंदराव बापुनी**—गोविंदराव काळयांनीं. पेशव्यांचे वकील. **जाबसाल**—बोलणें. **बाकीचा पैसा**—खंडणीची बाकी उरली ती. **कज्जा**—वाद; तंटा. **मश्रुलमुलुख म्हणे धाडिन काशिला**—" हैद्राबादच्या मुत्सद्द्यांनीं पेशवे व नाना यांचीं सोंगें दरबारांत आणून त्यांचा उघड उघड उपमर्द केला. मोगल सरदार वल्गना करूं लागले कीं आतां आपण पुण्यावर स्वारी करून तें जाळून टाकूं व पेशव्यास लंगोटी नेसवून त्याच्या हातीं भोपळा देऊन त्याची काशीस रवानगी करूं." [ खरे, ४७०२ ]. १

**आगीचे धार—धार—भयंकर.** भीतिदायक मनुष्य. **घाटावर**—बाले घाटावर **जिलीब**—लवाजमा. **पत्र धाडले नबाबावर। राव एकदाची घ्यावी टक्कर आम्ही पाहूं म्हणतों बेदर**—"महादजी शिंद्याच्या मनांत महाराष्ट्रांतला सेनासमुद्र निजामावर उसळून द्यावा एवढें मात्र निश्चित होतें " [ खरे, २. ]

आम्ही पाहूं म्हणतों बेदर ॥ (चाल) ॥ त्या पाटीलबोवाची आस्ता नाहीं पुरली । इतक्यांत भगवंताची आज्ञा झाली ॥ त्या दवलतराव शिंद्यानें वस्त्रें केलीं । सारे सेनेमध्यें द्वाही त्याची फिरली ॥ बिजाचे धर्म असती अंकुरा ॥ शिपाई०॥ २

नबाब साहेब आले कचेरीस बोलाविले हंबीर । अस्तानजी खानाशीं आज्ञा चला अघाडीवर ॥ रुस्तुमखान भले पठाण डावे बाजूवर ॥ (चाल) ॥ मश्रुल आघाडिला । भला अमल पिछाडीला ॥ सेनेचा झोंक चालला ॥ (चाल) ॥ पोलादजंग बहादर घेऊन बरोबर । रावरंभा लिंबाळकर केवळ रणशूर ॥ खर्ड्याशीं जाऊन पोंचले नाहीं उशीर । मिळालें दळ तीन लाख झुरा ॥ शिपाई०॥ ३

श्रीमंत महाराज निघाले पुण्यांतून बाहेर । दाजीबा फडक्याला नेऊन सांगितलें बाजूवर ॥ (चाल) ॥ लष्करची तयारी झाली । हुजरांत फौज चांगली ॥ मानकऱ्यानें कोर धरली ॥ (चाल) ॥ भिरभिर उडति तलवारा

---

" बादशहाच्या नांवानें शिंद्यानें निजामाकडे कांहीं प्रांतांची मागणी केली ती त्यानें नाकारली म्हणून पेशव्यांच्या बाकीच्या निमित्तानें स्वारी करून आपलेहि मुद्दे उगवावे असा त्याचा विचार होता." [खरे] **आस्ता**–इच्छा; कंड्र. **इतक्यांत**–पण इतक्यांत. **भगवंताची आज्ञा झाली**–देवाज्ञा झाली. **बिजाचे धर्म असती अंकुरा**–दौलतराव महादजीसारखाच पराक्रमी होता, असा भावार्थ. किंवा शिंद्याच्या घराण्यांतला शूरपणा दौलतरावाच्याहि वांट्याला आला होता असा भावार्थ. **त्या दवलतराव शिंद्यानें वस्त्रें केलीं**–सरदारीचीं वस्त्रें धारण केलीं. २

**हंबीर**–झुंजार; शूर सरदार ( अंबीर फा. अमीर पु. सरदार ) **भला अमल**–भारामल; बिरामल. **झुरा**–इष्किबाज; डौलदार; रंगेल. ३

**झोंक**–झपाटा [ आपटे ] **दाजीबा फडक्याला नेउन सांगितलें बाजूवर**–(?) **कोर धरली–कोर धरणें**–आकस धरणें; द्वेष धरणें. मानकऱ्यांनीं मोगलाविषयीं आकस धरला. मनांत आकस धरून मानकरी त्वेषानें लढावयास

निसंग होतात। त्यास नाहीं पर्वा ते का भितात ॥ रणशूर शिपाई रणीं उभे राहतात। तीन कोस हटविल्या फौजा उभ्या पळतात ॥ जाहला मोड जरा दम धरा ॥ शिपाई०॥ ४



---

सिद्ध झाले. ३ कोर धरणें–रांग धरणें, कोरबंदीनें उभे राहणें. उभ्या पळतात–×× ला पाय लावून पळतात. उभा–सर्व अंगें यथास्थित अन्वित होऊन प्रवृत्त होण्यास सज्ज झाला जो कोणएक व्यवहार तो. [ शास्त्री.] ४

# खर्ड्याची लढाई–परिशिष्ट

[ खालील तक्त्यांत अशीं कांहीं नांवें आहेत कीं, 'ज्यांना ऐतिहासिक कागदपत्रांत आधार सांपडले नाहींत. परंतु तीं खोटींच आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. किंबहुना ती खरीं असावींत; कारण तींच नांवें या विषयावरील निरनिराळ्या पोवाड्यांतून पुन्हा पुन्हा आलीं आहेत. अर्थात् एकच गोष्ट निरनिराळ्या चार लोकांनीं स्वतंत्रपणें सांगितली असतां ती सत्य मानणें हें गैर नव्हे.]

| आधारग्रंथाचें नांव | संक्षेप |
|---|---|
| चिंतामणरावांचा वांका खरे भाग १ ३ | चिं. वा. खरे |
| मराठी इतिहासाचीं साधनें | म. इ. सा. |
| भारतवर्ष पंतप्रधान यांची दुसरी शकावली | पं. प्र. यां. दु. श. |
| दक्षिणेंतील सरदारांच्या कैफियती यादी वगैरे | द. स. कै. |
| इतिहाससंग्रह–जुन्या ऐतिहासिक गोष्टी | जु. ऐ. गो. |
| पेशवेबखर | पे. ब. |
| महाराष्ट्र मंडळाची बखर | महा. मंडळा. बखर |
| ऐतिहासिक लेखसंग्रह | खरे |
| नागपूरकर भोंसले बखर | ना. भो. ब. |
| मराठी कुळांचा इतिहास | म. कु. इ. |
| इतिहाससंग्रह प्राचीन मराठे सरदार | इ. सं. प्रा. म. स. |
| विंचूरकर घराण्याचा इतिहास | विं. घ. इ. |

| नांव | आधार |
| --- | --- |
| अक्कलकोटकर | अक्कलकोटकर भोसले शहाजीराजे चिं. वा. खरे |
| अनंतपूरकर | |
| आठवले | |
| आढोळे | म. इ. सा. ७ |
| आनंदराव | |
| आपाजी बळवंतराव | पं. प्र. यां. दु. श. पा. ८४ |
| आपा बळवंत | मेहेंदळे. द. स. कै. पा. १७२ |
| आबा शालूकर | |
| आंग्रे | पे. ब. १५३ |
| आंबेकर किंवा आंबीकर | जु. ऐ. गो. ८; राघोपंत आंबीकर. म. इ. सा. ७, पान १० "फरासखाना निसबत राघोपंत आंबीकर याजकडे खर्ड्याचे स्वारीस डेरे व रावट्या वगैरे सरंजाम तयार केला तो." |
| आयतुळे किंवा ऐतुळे | ऐतोळे पे. ब; जु. ऐ. गो. ८. |
| इंदापुरकर | इंदापुरकर बळवंतराव नागनाथ. म. इ. सा. ७ |
| इंदूरकर | |
| ओढेकर किंवा वोढेकर | ओढेकर रंगराव पे. ब.; चिं. वा. खरे |
| अंबाजी किंवा अंबोजी | |
| कदम | |
| कवडे | म. इ. सा. खं. ७ |
| काठे | काठे दौलतराव म. इ. सा. खं. ७ |
| कामरगांवकर | |
| काळे | द. स. कै. पा. १००; काळे भिवजी, म. इ. सा. ७ |

| नांव | आधार |
|---|---|
| आबा काळे | |
| कृष्णासिंग | जु. ऐ. गो. ८ |
| केवढे | |
| कोटेकर | |
| खपले | |
| खपाटे | |
| खलाटे | खलाटे कनकोजी, जु. ऐ. गो. ८ |
| खानवीलकर | |
| खुर्देकर | |
| खुळे | |
| खंडाळे किंवा खंडागळे | |
| गणपतराव | गणपतराव अनंत जु. ऐ. गो. ८ |
| | गणपतराव विश्वनाथ, म. इ. सा. ७ |
| गणेश गंगाधर | गणेश गंगाधर सोमण, जु.ऐ. गो.८ |
| गणेशपंत बेहरे | |
| गणेश विठ्ठल | |
| गावढे | गावडे अमृतराव, जु. ऐ.गो. ८; म. इ. सा. ७ |
| गिरजोजी बरगे | जु. ऐ. गो. ८ |
| गुजर | |
| गोडबोले राघोपंत | |
| गोरे | |
| घाडगे | घाटगे चिं. वा. खरे. |
| घोरपडे | पे. ब.; घोरपडे (मानकरी) चिं.वा.खरे |
| घोरपडे मालोजी | पं. प्र. यां. दु. श. पा. ८४ |
| चव्हाण | पे. ब.; चिं. वा. खरे |
| चव्हाण गोविंदराव | |

| नांव | आधार |
| --- | --- |
| चंदीचंदावरकर | |
| चिंतामणराव | पे. ब. १४३ |
| जगताप | जगताप निळकंठराव म. इ. सा. खं. ७ |
| जाधव | चिं. वा. खरे; जाधव शिंदखेडकर ( रुस्तुमराव ) पे. ब.; पं. प्र. यां. दु. श. पा. ८४; म. इ. सा. खं. ७ |
| जाधव अमरसिंग माळेगांवकर | म. कु. इ. भा. १ पा. १२५ |
| जाधव बुरुजवाडीकर | |
| जानराव नाईक नठ निंबाळकर | |
| जाले | |
| जीनसाहेब | |
| झगडे | |
| टपले | |
| टोपकर | यशवंतराव तापकर [ पे. ब.] |
| डफळे | कान्होजी डफळे [ महा. मंडळा. बखर ] |
| डिबॉय फिरंगी ( डिबॉइन ) | याच्या हाताखालीं शिंद्यांचीं पलटणे तयार झालीं होतीं. खरे; |
| डोबाळे | |
| ढमढेरे गणेशपंत | |
| तळापीर | ताकपीर यशवंतराव (?) म. इ. सा. खं. ७ |
| थोरात | पे. ब.; पं. प्र. या. दु श. पा. ८४ चिं. वा. खरे; बळवंतराव व थोरात पे. ब. |

| नांव | आधार |
|---|---|
| दरेकर | पे. ब.; दरेकर खंडेराव पं. प्र. यां. दु. श. पा. ८४ |
| | दरेकर सरलष्कर चिं. वा. खरे. |
| दाजीसाहेब भालवणीकर | |
| दाभाडे | दाभाडे कृष्णाजी बाबूराव म. इ. सा. खं. ७ |
| दारकोजी बाबा | दारकोजी जु. ऐ. गो. ८ |
| | दारकोजी पवार म. इ. सा. खं. ७ |
| दावलबाबा महात | |
| दिघे | राजजी दिघे जु. ऐ. गो. ८ |
| दिपले | |
| दुर्जनसिंग रजपूत | |
| दुर्जनसिंग राठोड | |
| दुर्जनसाहेब | |
| देव | देव यशवंतराव म. इ. सा. खं. ७ |
| देवकांते | देवकांते यशवंतराव जु.ऐ. गो.८;खरे; |
| देवजी गवळी | |
| धायगुडे | म. इ. सा. खं. ७ |
| धायबर | म. इ. सा. खं. ७; पे. ब. |
| धाराशिवकर | |
| धारूरकर | |
| धावडे | |
| धोंडिबा | धोंडो रामचंद्र [ खरे ४८९३ ] |
| नलगे | |
| नलवडे | |
| नारायणराव बक्षी | |
| नागो जिवाजी | म. इ सा. १० पान ४४९ |
| नारोपंत चक्रदेव | पे. ब. १५२ |

| नांव | आधार |
|---|---|
| नारो शंकर | |
| निगडे | |
| निपाणकर | खरे ४७२८ |
| निलकंठ रामचंद्र | निलकंठराव रामचंद्र जु. ऐ. गो. ८; पे. ब. |
| निलकंठ महादेव ऊर्फ आबा पुरंदरे | |
| निलाम ( निकम ? ) | पे. ब. |
| निंबाळकर | निंबाळकर सग्याबा म. इ. सा. खं. ७ निंबाळकर सावजी जु. ऐ. गो. ८ पे. ब.; निंबाळकर गमाजी जु. ऐ. गो. ८ निंबाळकर जानराव नाईक पं. प्र. यां दु. श. पा. ८४ |
| पटवर्धन बळवंतराव | खरे |
| पवार | मलठणकर पवार पं. प्र. यां. दु. श. ८४; पे. ब. चिं. वा. खरे जु. ऐ. गो. ८; पवार धारकर पं. प्र. यां. दु. श. पा. ८४; पवार मालोजी जु. ऐ. गो. ८ |
| पाटणकर | पाटणकर हिरोजीराव जु. ऐ. गो. ८; पाटणकर जानराव म. कु. इ. भा. २ पा. ७८; पे. ब.; पं. प्र. यां. दु. श. पा. ८४; चिं. वा. खरे. |
| पाटणकर दाजीबा | |
| पानशे | पे. ब. |

| नांव | आधार |
|---|---|
| पानशे जयवंत | |
| पानशे सखाराम | द. स. कै. पा. १२४; खरे भा. ९ खर्डा |
| पिंगळे गोविंदराव | यास पेशवे सरकारांतून सरंजाम मिळाला असून त्याला निजामाकडूनही तीन गांवें मिळालीं होतीं तो १७९८त मेला. |
| पुरंधरे | जु. ऐ. गो. ८; पे. ब. |
| पेठे | त्रिंबकराव अमृतेश्वर द. स. कै. पा. १४२ "वडिलांचे इराद्याप्रमाणें आम्ही श्रीमंतांचे स्वारीबरोबर खर्ड्यास नबाब याजवर गेलों होतों." |
| प्रतिनिधि | जु. ऐ. गो. ८ |
| बाबा फडके | खरे. |
| फडतरे | राजजी फडतरे जु. ऐ. गो. ८ |
| फणशे | फडतरे रावजी म. इ. सा. खंड. ७ |
| बगासे | |
| बजाबा बापू | बजाबा शिरोळकर जु. ऐ. गो. ८ |
| बडे | |
| बन्याबापू | बन्याबापू मेहेंदळे पे. ब. १५३; |
| बर्वे बाजीराव गोविंद | |
| बक्षी नारायणराव | |
| बाबर | बाबर जैतुजी म. इ. सा. खं. ७ |
| | बाबर अनंतराव म. इ. सा. खं. ७ |
| बाबूराव | बाबूराव अनंत पे. ब.; जु. ऐ. गो.८ |
| बारामतीकर | बारामतीकर पांडुरंग बाबूराव म. इ. सा. खं. ७ |

| नांव | आधार |
| --- | --- |
| बावरे | |
| बाळोबा | बाळोबा पागनीस |
| बिडकर | |
| बिनीवाले | बिनीवाले माधवराव रामचंद्र पे. ब; सिद्धेश्वर महिपतराव (द. स. कै. पा. १५६) "आम्ही बदामीचे व खड्यांचे स्वारीबरोबर गेलों होतों." |
| बुंदीकर | |
| बुळे | |
| बेहेरे | बेहेरे अन्नाजी गणेश म. इ. सा. खं. ७ |
| बंडगर ( अंडगर ) | बंडकर मालोजी, भगवंतराव, होनाजी आंडकर म. इ. सा खं. ७ |
| बोटे | |
| भगत | |
| भगवंतसिंग | |
| भवानराव घाडगे | |
| भागवत | |
| भापकर | चिं. वा. खरे, भापकर पर्वतीराव जु. ऐ. गो. ८ |
| भालवणीकर दाजीसाहेब | |
| भुरके | |
| भोयटे–भोयते | पे.ब.; भोइटे भुइंजकर पे.ब; गांडापूरकर भोइटे पे. ब; माणकाजी भोइटे म. इ. सा. खं. ७; चिं. वा. खरे |
| मतकर | |
| मन्याबापू | व्यकाजी भोंसले (ना. भो. ब. १४८) |
| मल्हारराव | |

| नांव | आधार |
|---|---|
| महाडीक | |
| माधवराव | माधवराव कृष्ण म. इ. सा. खं. ७. माधवराव परशुराम म. इ. सा. खं. ७ |
| मानासिंग | |
| मानाजी फाकडे शिंदे | पे. ब. १४३ |
| माळशिकारे | |
| मांजरे | सटवोजी मांजरे म. इ. सा. खं. ७ |
| मुकीरसाहेब | |
| मुजफरखां | |
| मुजुमदार | पे. ब. |
| मुर्तुजा महात | मुर्दुजा महात म. इ. सा. खं. ७ |
| मुसामुत्रीम | मुसा मोत्रो म. इ. सा. खं. ७<br>मुसा मुतक पे. ब. |
| मुसानारद | पे. ब. |
| मुसावास | म. इ. सा. खं. ७ |
| मुळे | मुळे सयाजी म. इ. सा. खं. ७<br>बैदरजी मुळे जु. ऐ. गो. ८<br>बहिरजी मुळे म. इ. सा खं. ७ |
| मेरूसाहेब (पेरूसाहेब) | शिंद्यांच्या फौजेंतील कंपूवरील अंमलदार (खरे) |
| मेहेंदळे | बन्याबापू |
| मैराळजी पायगुडे | |
| मोहिते | पे. ब.; चिं. वा. खरे; रामाजी मोहिते जु. ऐ. गो. ८ |
| यशवंतराव | |
| यादव | |
| येसोजी हरि | |

| नांव | आधार |
| --- | --- |
| रघोजी भोसले | चिं. वा. खरे |
| रणदिवे | चिं. वा. खरे; म. इ. सा. खं. ७ |
| रणनवरे | पे. ब. |
| राघो बापूजी | जु. ऐ. गो. ८ |
| राघोजीबावा | |
| राघोपंत | राघोपंत आंब्रीकर म. इ. सा. खं. ७ |
| राजा बहाद्दर | राजेबहाद्दर रंगराव जु. ऐ. गो. ८ |
| | पे. ब.; पं. प्र. यां. दु. श. पा. ९४; चिं. वा. खरे |
| रानडे काशीबा बल्लाळ | |
| रानडे माधवराव रामचंद्र | |
| रामाजी पाटील | |
| रायाजी पाटील | खरे भा. ९ खर्डा |
| रास्ते आनंदराव | पे. ब.; चिं. वा. खरे; खरे भा.९ खर्डा ल.; अनंत भिकाजी रास्ते म. इ. सा. खं. ७; द. स. कै. या. पान १९२ |
| रास्ते लक्ष्मण | पे. ब.; चिं. वा. खरे |
| लकडे | |
| लक्ष्मणसिंग | जु. ऐ. गो. ८; म. इ. सा. खं. ७ |
| लाड | |
| लांबहाते | |
| लेले | बापू लेले पे. ब. |
| वझरकर | |
| वडाळकर बाळो | |
| वाघ | म. इ. सा. खं. ७ उमाजी वाघ |
| वाघमारे | वाघमारे किंवा वाघमोरे म. इ. सा. खं. ७ |

| नांव | आधार |
| --- | --- |
| बामोरकर | |
| बारगळ किंवा बारगळ | |
| विठूजी | |
| विठ्ठल शिवदेव | |
| विठ्ठलसिंग | |
| विठ्ठल पंडित (भोसल्याचे) | विठ्ठल बल्लाळ सुभेदार ना. भो. ब. १४५ |
| विनायकपंत | विनायकपंत परांजपे पे. ब. |
| विंचूरकर | जु. ऐ. गो. ८; पं. प्र. यां. दु. श. पा. ८४; चिं. वा. खरे |
| विंचूरकर खंडेराव विठ्ठल | विं. घ. इ. |
| वैद्य | वैद्य बाबूराव खरे भा. ९ खर्डा ल. |
| शहामीरखां | शहामीरखां रोहिले पे. ब.; म. इ० सा. खं. ७ |
| शहामतखां | |
| शितोळे | पे. ब. १४२ |
| शिर्के | चिं. वा. खरे; जु. ऐ. गो. ८; पे. ब. पं. प्र. यां दु. श. पा. ८४ शिर्के राजे इ. स. प्रा. म. स. पा. ३५ |
| शिरोळे | |
| शिवादिन भेरी | |
| शेकर | म. इ. सा. खं. ७ |
| शेखमिरा | |
| सखाराम हरि | |
| सग्याबा | |
| सदाशिव मल्हार | खरे ४८९३ |
| सैय्यद अहमद | |

| नांव | आधार |
| --- | --- |
| सयाजी पाटील | |
| सयाजी मापकर | |
| सरकले | |
| सरंजामी | भाऊ सरंजामी म. इ. सा. खं. ७ |
| सशे | |
| संताजी | |
| सानपदोर्गे | |
| सिंगरूप | शिंगरूखां (पे. ब.) |
| सुंदर | |
| सुपले | |
| सुपेकर | पं. प्र. यां दु. श. पा. ८४ सुपेकर पवार पे. व. |
| सुर्वे | |
| सोनावळे | |
| सोयरे | |
| हारजी | |
| हासनभाई उज्जनीवाले | भा. इ. सं. त्रैमा. वर्ष ३ अंक १ पान २५ (?) |
| हैबतराव नांदूरकर | |
| हैबतसिंग | जु. ऐ. गो. ८; हैबतसिंग कृष्णासिंग म. इ. सा. खं. ७ |
| काशिबा होळकर | खरे भा. ९ खर्डा ल. |
| तुकोजीबावा होळकर | |
| होळकर बापू | खरे भा. ९ खर्डा ल. |
| होळकर मल्हारजी | |

# सवाई माधवरावाच्या मृत्यूचा पोवाडा

पोवाडा म्हणजे तत्कालीन समाजाच्या मनःस्थितीचें खरेंखरें चित्र असतें ही गोष्ट या पोवाड्यावरून फार स्पष्ट होतें. ज्वरात वातविकृति उत्पन्न होऊन सवाई माधवराव वारले अशी वास्तविक स्थिति असतां नानाफडणिसांनीं केलेल्या अपमानामुळें आणि जाचामुळें विषण्ण होऊनच त्यांनीं आत्महत्या केली असा तत्कालीन लोकप्रवाद झाला होता. नानाफडणिसाच्या हितशत्रूंनीं त्याची केवढी निंदा चालविली होती व ती सामान्य समाजांत कशी प्रसृत झालेली होती हें ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ९ मधील सवाई रावसाहेबाचा मृत्यु या प्रकरणावरून चांगलें दिसून येतें. सदर पोवाड्यांतही त्या प्रवादाचें प्राबल्य दिसून येतें, ३।४।५ चौक पहा.

काव्य या दृष्टीनें या पोवाड्याची कितीही स्तुति केली तरी ती अपुरीच पडेल. खरोखर हा पोवाडा म्हणजे मराठी भाषेचा एक बहुमोल अलंकार आहे. कलेच्या दृष्टीनें तो अप्रतिम आहे, भाषेच्या दृष्टीनें तो अननुकरणीय आहे.

सवाई माधवरावाच्या विषण्ण मनःस्थितीचें केलेलें वर्णन पाहून वाचक खिन्न होतो आणि यशोदाबाईच्या आंतड्याला पीळ पाडणाऱ्या शोकांनीं त्याच्या हृदयाच्या ठिकऱ्या होऊं लागतात.

## ऐतिहासिक माहिती

सवाई माधवरावांचे कारकीर्दींत पेशवाईचा अतोनात उत्कर्ष झाला आणि खर्ड्यांच्या विजयानें तिच्या भाग्यानें आपला परमोच्च बिंदूच गांठला असें म्हटलें पाहिजे. कारण, त्यानंतर थोड्याच दिवसांत सवाई माधवरावांना अपघातानें मृत्यु आला आणि दुर्भाग्याच्या उतरणीस पेशवाई लागली आणि नंतर अठराच वर्षांत तिचा नाशही झाला !

सन १७९५ या वर्षीं सवाई माधवरावास २१ वर्षें होऊन ते चांगले जाणते झाले होते. त्याचप्रमाणें दुसरा बाजीरावही वयांत आला होता. त्यास फक्त ४।५ महिनेच कमी होते. बाजीराव या वेळीं जुन्नरास नजरकैदेंत होता.

त्याच्या पक्षपात्यांचें म्हणणें असें होतें कीं 'पूर्व वहिवाटीप्रमाणें नानांनीं आतां कारभार सोडून देऊन तो बाजीरावाच्या हवालीं केला पाहिजे. कारण, वहिवाटच तशी होती. 'थोरल्या बाजीरावांचा कारभार चिमाजीआप्पा पहात. नानासाहेबांचे कारभारी भाऊसाहेब होते. त्याचप्रमाणें थोरल्या माधवराव-साहेबांचा कारभार नारायणरावसाहेब पहात असत. नानांच्या या निंद-कांनीं " त्यांची निष्कारण निंदा आणि बाजीरावाची थोरवी या दोन गोष्टींचा फैलावा " सुरू केला. या फैलाव्याचा असा परिणाम झाला कीं, " बाजी-रावाच्या अनेक सद्गुणांविषयींची तारीफ सवाई रावसाहेबांच्या कानावर गेली असतां ती त्यास रुचली, इतकेंच नाहीं तर अशा स्वकुलोत्पन्न सद्गुणसमुच्च-यालंकृत पुरुषपुंगवाचा आपणास नेहमीं सहवास असावा अशी त्या पेशव्यांस इच्छा उत्पन्न झाली ! "

सवाई माधवरावांला आपणाविषयीं आपलेपणा वाटतो येवढें कळतांच बाजीरावानें फितूर खेळविण्यास सुरवात केली. बळवंतराव नागनाथ वामोरी-कर हा बाजीरावाचे बंदोबस्तास होता, त्याच्याद्वारें बाजीरावानें माधवरावांशीं पत्रव्यवहार केला. नानांनीं तो ताबडतोब पकडला. बळवंतरावास पकडून कैदेंत घातला व या मूर्खपणाच्या कृत्याबद्दल पेशव्यांचा फार निषेध केला. तीच गोष्ट पेशव्यांच्या मनास झोंबली व तो उदास झाला असा लोकप्रवाद आहे. वास्तविक तसा प्रकार कांहीं नव्हता. १७९५ च्या नवरात्रांत पेशव्यांस ज्वर येऊं लागला व त्या ज्वरांत कांहीं वातविकृति उत्पन्न झाली. वाताच्या लहरींत त्यांच्या हातून भलतेंच कांहीं न घडावें म्हणून रात्रंदिवस त्यांच्या भोंवतीं पहारा असे. दसऱ्याचे दिवशीं शिलंगणाचे वेळीं तर या वातानें एकदम उचल खाऊन श्रीमंत अंबारीबाहेर उडी टाकणार होते, पण आप्पा-बळवंतांनीं त्यांना आवरलें.

अशाच स्थितींत ता. २५ डिसेंबर रोजीं सकाळीं श्रीमंतांना वाताचा झटका आला व त्या भरांत दिवाणखान्याच्या पूर्वेच्या आंगचें कवाड उघडून त्यांनीं खालीं उडी टाकली. ती कारंजावर पडून मांडीस व इतर ठिकाणीं भयंकर जखमा झाल्या. शक्य तेवढे सर्व औषधोपचार करण्यांत आले. पुढें तबीब आणवून " हरणाचे पायाचे नळी काढून आंत बसवून जखम बांधिली " पण कांहीं उपयोग न होतां श्रीमंत दोन दिवसांनीं सायंकाळीं वारले.

# सवाई माधवरावाच्या मृत्यूचा पोवाडा

## ३१

### [ शाहीर–प्रभाकर ]

कमि नव्हते पृथ्वींत अवंतर प्राणी न्यायाला। औक्ष कसें कमि झालें सवाई माधवरायाला ॥ ध्रुपद ॥

प्रभू नारायणराव धुरंधर दक्षिणचे नृपती। प्रसन्न वदनें करुनि जयाला सकळ प्रजा जपती ॥ पतिव्रता किती धनाढ्य गंगाबाई भोंवत्या खपती। सुशील सति सौभाग्यवतीपुढें रूपवत्या लपती ॥ सवाई माधवराव प्रसवली कुळदीपक दिपती। पुरंदरीं रक्षणार्थ मंत्री रात्रंदिवस जपती ॥ ( चाल ) ॥ शके सोळाशें शहाण्णवाच्या मूळ जय संवत्सरीं। अधिक होता वैशाख शुद्ध सप्तमी चंद्र वासरीं। पुनर्वसू नक्षत्र कडकडित दुपारचे अवसरीं ॥ (चाल) ॥ झाला जन्म हा दैदीप्यमान पूतळा। जणु सूर्य उगवला प्रकाश करी भूतळा ॥ दिलें द्रव्य कंचुक्या नाहीं गणती पातळा ॥ ( चाल पहिली ) ॥ महोत्साह घरोघरीं लागले लोक करायाला। परशुराम प्रत्यक्ष आले काय छत्र धरायाला ॥ कमि नव्हते०॥ १

---

**औक्ष**–आयुष्य. **प्रसन्न वदनें करुनि**–प्रसन्न वदनानें, आनंदानें, संतोषानें. **भोंवत्या खपती**–दिमतीला आहेत, सेवेस तत्पर आहेत. **दिपती**–दिपून जातात. 'ती सवाई माधवराव प्रसवली (ज्याच्यापुढें) कुळदीपकहि दिपती' **पूतळा**–पुतळा. **नाहीं गणति कंचुक्या पातळा**–मासल्याकरितां पेशवे डायऱ्या भाग ४ उपविभाग १ पान ८९ पहा. ' हेल-करणी बायकांस द्यावयास लुगडी खरेदी केली......त्या बरहुकूम खरेदी लुगडी एकूण रुपये ११०००." **छत्र धरायाला**–राज्य करावयाला. सवाई माधवराव म्हणजे प्रत्यक्ष 'देव–अवतार' आहे किंवा परशराम अवतार आहे अशी तत्कालीन मोठमोठ्या सरदारांचीहि समजूत त्यांच्या पत्रांतून अनेक वेळां प्रगट झालेली आहे. १

पुरंदराहुन पुण्यास आणिले राव पंचम वर्षीं। गुढ्या तोरणें उभवुन केली मुंज प्रथम सरशी ॥ विवाह कार्या भूप मिळाविले अति हर्षा हर्षीं। देति धाडून करभार ढिगाचे ढिग कोरे फरशी ॥ स्वाऱ्या करून सरदार बुडविती रिपु चुरसाचुरशी। थरथर किति कांपती वयस्कर उभे टाकुन खुरशी ॥ (चाल) ॥ प्रताप महिमा थोर जळामधिं परि जळचर अडविला। नवी मोहिम दरसाल देउनी शाह टिपू तुडविला। अपार सेना लढवुनि मोंगल खड्यावर बडविला ॥ (चाल) ॥ एकेक पदरचा सेवक साहेब सुभा। समरांगणीं सन्मुख कोणि न राहे उभा। ज्या दिशेस ज्याचा रोंख ती त्याला मुभा ॥ (चाल पहिली) ॥ विजेपासूनि करि प्रभा चंद्र तारांगण ठायाला। प्रौढ होतां सम्पूर्ण लोक आले खरेच उदयाला ॥ कमि नव्हते०॥ २

कांहीं दिवस भयरहित सदोदित स्वराज्य चालविलें। दरिद्र अटकेपार जनांचें ज्यानें घालविलें ॥ तीर्थरुपांहुन सकळ भूमंडळ बसून हालविलें।

---

**प्रथम सरशी**–पहिल्या तडाक्याला. **देती धाडून कारभार इ०**–नाना फडणविसांनीं निरनिराळ्या सरदारांवर लग्नपट्ट्या बसविल्या होत्या त्यास अनुलक्षून [इति. सं. आंग्रे हकीगत २१]. "पुढें सवाई माधवरावसाहेब यांचे लग्न समारंभास दिवाणसाहेब पुण्यास गेले त्यावेळेस नानांनीं झाडून संस्थानी व सरंजामी यांजवर पट्टी केली. तेव्हां दिवाणसाहेब याजवर लाख रु.ची पट्टी घातली." **फरशी**–फरशी रुपये. या रुपयांच्या एका अंगावर परशूचा ठसा उठविलेला असे. फरस–परशू. **चुरसा चुरशी**–स्पर्धेनें. **खुरशी**–खुर्ची; आसन. **प्रतापमहिमा थोर जळामधिं परि जळचर अडविला**–१७८२ त रेजर नामक इंग्रजांच्या लढाऊ जहाजाशीं धुळपांची लढाई व इंग्रजांचा पराभव. धुळपाची दहशत इंग्रजांना फार होती. [भा. इ. सं. मं. अह. १८३३]. **जळचर**–इंग्रज. **शाह टिपू**–टिपू शहा. **साहेबसुभा**–प्रांताधिप सरदार. **ज्या दिशेस ज्याचा रोख ती त्याला मुभा**–जिकडे जिकडे या वीरांच्या ढाला वळत तिकडे तिकडे यांना जयच येई. **संपूर्ण लोक**–सर्व प्रान्त, प्रदेश, सर्व राज्य सर्व प्रजा. २

**बसून हालविले**–सवाई माधवराव लहान असल्यामुळें त्यांना स्वारींत नेलें

रीतभात इनसाफ लवण नाहीं दुधांत कालविलें ॥ क्षीरसागरीं कृष्णास मुदत भरतांक्षणिं बोलविलें । तसें रावसाहेबांस अकल्पित वरून पालविलें ॥(चाल)॥ उदास झालें चित्त परोपरि त्या दिवसापासुनी । विचुक बोलती शब्द घडो-घडिं हृदयांतरीं त्रासुनी । बाजिराव साहेबांस आणा जा गुज सांगा निरसुनी ॥ (चाल) ॥ शिक्के दऊत पट कटार दुसरी करा । आडवलें मनांतुनी विधि-

---

नव्हतें. फक्त शेवटच्या खर्ड्यांच्या तेवढ्या स्वारींत ते हजर होते. **इनसाफ**–निकाल, निर्णय, निवाडा, न्याय. **लवण नाहीं दुधांत कालविलें**–जुन्या रीति-भाती किंवा न्यायनिर्णय यांत त्यांनीं ढवळाढवळ केली नाहीं. पूर्वीसारखें सुसूत्र चालविलें. **क्षीरसागरीं कृष्णास इ०**–"श्रीमंतानीं माडीवरून पडाव-याचेपूर्वी भाषण कोणाकोणाजवळ केलें तें......अलाहिदा कलमवार लिहिलें. गोष्ट चमत्कारिक आहे. कृष्णावतारसमाप्तीसारखें केलें ! परम आश्चर्य आहे !" [खरे, ४७७२]. **पालविलें**–खूण करून बोलाविलें. **वरून**–देवाकडून; देवांनीं. **विचुक**–असंबद्ध, (१) नवरात्रांत श्रीमंतास ज्वर येऊं लागला व त्या ज्वरांत कांहीं वातविकृति उत्पन्न झाली [खरे, ४७७१]. (२) पुढें भाद्र-पद मास गेल्यावर आश्विन मास लागला तों फारच प्रकृति बिघडली. बोलणें चालणें देखील भ्रांतिकर होऊं लागलें. कोणतीहि गोष्ट शुद्धीची नाहीं. [खरे, पे. ब. १५८]. **निरसुनी**–निरास करून; गुजाचा निरास करून–गुप्त गोष्टी उघड करून म्हणजे भावार्थ हा कीं बाजीरावास मसलतींत घ्या. "हल्लींच्या प्रसंगीं कधींहि न घडून येणारी एक गोष्ट घडून आली. ती गोष्ट हीच कीं बाजी-रावसाहेबांच्या अनेक सद्गुणांविषयींची तारीफ सवाई रावसाहेबांच्या कानावर गेली असतां ती त्यास रुचली, इतकेंच नाहीं तर आतां त्या स्वकुलोत्पन्न सद्-गुणसमुच्चयालंकृत पुरुषपुंगवाचा आपणांस नेहमीं सहवास घडावा अशी इच्छा त्या पेशव्यास उत्पन्न झाली !" [खरे, ४७७०]. **शिक्के दऊत पट कटार दुसरी करा**–भावार्थ–माझीं प्रधानकीचीं अधिकारचिन्हें त्यांना द्या. मुक्तेश्वराच्या हरिश्चंद्राख्यानांत 'अंकुश कडपाळ लेखणी' असे शब्द 'सर्व राज्य' अशा अर्थी आलेले आहेत. "श्रीमंत आमरणांत बोलत होते. बोलून चालून राजश्री नानास सांगितलें "आमची वेळ जवळ आली. आम्हांस राज्याची इच्छा नाहीं. तुम्ही आमचे नांवाचा दुसरा करणें." [खरे, ४७७५]. **आडवले**

विष्णू शंकरा। ठेवुं नका निराळें दादांच्या लेंकरा ॥ (चाल पहिली) ॥ तुम्हि सेवक ते धनी होउनि एक आवरा राज्याला। अशानें तरले जाल चिरंजिव रहाल पहायाला ॥ कमि नव्हते० ॥ ३

वर्तमान कळतांच असें आलि गोष्ट ती निकरास। नये नानाचे मनास जाहलें विपरीत इतरांस ॥ झिडकारुनि एकांतीं वदती नित्य सरकारास। स्वस्थ असावें आपण जेऊन पंचामृत सुग्रास ॥ बहुत हट्ट जरि कराल तरि तुम्ही मुकाल प्राणांस। त्यांचि अवस्था तीच तुमची पुढें येईल आकारास ॥ (चाल) ॥ शब्दशरें ताडितां लोचनीं जळबिंदू वाहती। दसऱ्याचे दिशीं अंबारींतुन उडि घालुं पाहती। धरी अप्पा बळवंत झगा दृढ दडपुन आपुले हातीं ॥ (चाल) ॥ फिरविली निशाणें नाहिं सोनें लूटलें। शहरांत सैन्य चहुं रस्त्यांनीं लोटलें। पुढें भेट घ्यावया किति माणुस दाटलें ॥ (चाल पहिली) ॥ झालि न झाली नजर उठले एवढयांतच जायाला। नवल नविन वाटलें तेथें सकळ समुदायाला ॥ कमि नव्हते० ॥ ४

---

आंतुनि–आवडले आंतुनि. विधिविष्णुशंकरादि देवांच्याच मनांत तसें व्हावें असें आहे. ३

जाहलें विपरित इतरास–नाना फडणीस व पेशवे यांच्यांत वितुष्ट, ही अलौकिक गोष्ट पाहून सर्व सरदारांस विचित्र वाटलें. त्यांची–नारायणराव पेशव्याची. आकारास येणें–फळास येणें. बाजीराव फार खेळ्या आहे. त्याच्या बापानें तुमच्या बापास दग्यानें मारलें त्याप्रमाणें हा तुम्हासही मारण्यास चुकणार नाहीं हा भावार्थ. फिरविलीं निशाणें नाहीं सोनें लुटलें–'दसऱ्याचे दिवशीं ते शिलंगणास गेले होते तरी त्यांची प्रकृति बिघडलेलीच होती'. [खरे, पा. ४७७१]. 'असें होत असतां दसऱ्याच्या दिवशीं स्वारी अंबारींत बसून खवासखान्यांत आप्पा बळवंत होते, स्वारी शिलंगणास गेली. सरकारची प्रकृति ताळ्यावर नसल्यामुळें अंबारींतून उडी घालावयास लागले तेव्हां आप्पा बळवंत यांणीं हात धरून बसविलें. आणि सालाबादप्रमाणें मशाली लावून स्वारी वाड्यांत यावयाची ती त्या दसऱ्यास सायंकाळचे चार घटिका दिवसास शहरांत माघारी आली'. [पे. ब. १५६]. ४

प्रवेशतां माहालांत अडखळुन पडले खांबाला। त्वरित उतारे करुन देती लोह उडीद डोंबाला॥ खरी खबर कळतांच एकांतीं माईसाहेबांला। धांव धांव धांवण्यास म्हणती विनवुन सांबाला॥ घरांत राहू ग्रासुं पाहतो चंद्रबिंबाला। गोत्रपुरुष किड कठिण लागली मुळकुळकोंबाला॥ (चाल)॥ करिं घेऊन पंचारति प्रभुला धनभर ओंवाळुनी। समाचार फुंद फुंदून पुसती नीर नेत्रीं ढाळुनी। पहा पहा नीट मग राव बोलती मुख आमचें न्याहाळुनी॥(चाल)॥ तुझि आमुची भेट हीच सगुणसुंदरी। रहा खुशाल आपल्या झुलत राज-मंदिरीं। द्वाहीलेख तुझी जन वंदितील आदरीं॥ ( चाल पहिली )॥ जड पडल्या करि स्मरण सदोदित संकटसमयाला। अशा परी निरवून धरती कंटाळुन हृदयाला॥ कमि नव्हते०॥ ५

प्रतिउत्तर परिसोन विश्वमाउली मनीं गहिंवरली। नेऊन रंगमहालीं

---

**अडखळून पडले खांबाला**–भावार्थ–अपशकून झाला. **उतारे करून**–ओवाळून टाकून. **धाव धाव धावण्यास म्ह०**–सांबाला विनवून म्हणती, हे देवा, माझी धाव धावण्यास धाव म्ह० धावून ये. **धांवणे**–रक्षण, साहाय्य. धावण्या धावणें–रक्षणास धावून येणें. **गोत्र पुरुषाची किड कठिण लागली मुळ–कुळ–कोंबाला**–पेशव्यांचे वंशांतले पूर्वींचे बहुतेक सर्व पुरुष लवकर लवकर वारले त्यास अनुलक्षून. (२) किंवा हें म्हणणें बाजीरावासहि अनुलक्षून असेल. **गोत्रपुरुष**–सगोत्री; एका गोत्रांतला; नातेवाईक, भाऊबंद. येथें बाजीराव. **मुळकुळकोंब**–औरस संतति. पेशवाईच्या या औरससंततिरूप कोंवळ्या कोंबाला बाजीरावाची कीड लागली. बाजीरावानें सवाई माधवरावास मारून मारलें हा बखरींचा प्रवाद प्रसिद्धच आहे. **धनभर**–मनाचें समाधान होईपर्यंत. **द्वाही लेख**–द्वाही आणि लेख. तुझी दवंडी आणि लेखी हुकूम. भावार्थः–आज्ञा. **जड पडल्या करि**–अवघड पडलें तर; संकट पडलें तर. **कंटाळुन**–कंवटाळुन. " रडति किति बालक मुडदे कंटाळुनी " [ रामजोशी ]. **निरवून**–निरवानिरव करून, व्यवस्था करून किंवा समजूत घालून. ५

सख्यांनीं चहुंकडून सांवरली ॥ विरक्त झाले श्रीमंत हिकडिल स्नेहममता सरली । स्नानदान देवपूजा गलबलिंत अगदींच अंतरली ॥ एकादशीची रात्र बऱ्यांमधिं सहज मात्र सरली । उजाडतां द्वादशीस कुणीकुन कुबुद्धि संचरली ॥ ( चाल ) ॥ तिसरे मजल्यावरुनि घातली उडि कारंज्यावरी । एकाकीं, हालचाल न होतां गेलि वार्ता दुरवरी । सेवकजन सर्वांग विकळ कडे खांद्यावर आंवरी ॥ ( चाल ) शके सत्राशें भर सत्राच्या अवसरीं । दक्षिणायनामधिं राक्षस संवत्सरीं ॥ आश्वीन शुद्ध पौर्णिमा भौम वासरीं ॥ ( चाल पहिली ) ॥ रवि मावळतां वरी मरण झडकरी आलें सखयाला । इथुन आतां प्रारंभ दिसंदिस अद्‌भुत प्रळयाला ॥ कमि नव्हते०॥ ६

हाहाकार जाहला प्रगटतां पुकार शहरांत । बंद पडलिं भणभणित दुकानें भर बजारांत ॥ वृद्ध तरुण नरनारि बुडाल्या आकांतकहरांत । कुंकु गंध किति सूज्ञ पुसुनी धुळ बांधिती पदरांत ॥ स्वयंभू दीप विझतांच विवशी व्यापली दरबारांत । ठायीं ठायीं थिजले लोक शोक संचारतां अंधेरांत

---

हिकडिल–मजविषयीं; संसाराविषयीं. एकाकी–एकाएकी; अकस्मात्. सेवकजन इ०–श्रीमंताचें सर्वांग विकळ झालें होतें, मांडी मोडली होती व तोंड वांकडें झालें होतें म्हणून त्यांना तशा स्थितींत सेवकांनीं अंगाखांद्यावरून वाहून वाड्यांत नेलें. आश्विन शुद्ध पौर्णिमा इ०–चूक आहे. चतुर्दशी पाहिजे. [ खरे, ४७७२ ]. गलबल–गडबड; घाई; घोंटाळा; गोंधळ. हालचाल न होतां–श्रीमंत वर महालांत कोठें न दिसल्यामुळें किंवा कारंजावर पडून बेशुद्ध होऊन हालचाल बंद झालेली दिसल्याबरोबर. दिसंदिस–दिवसेंदिवस. ६

पुकार–आवई; वार्ता. भणभणीत–ओकी ओकी शून्य. "गजराचे वेळेस देवाज्ञा जाहले. चौकी पहारे बंदोबस्त पत्रीं काय लिहूं ? शेटी पवार संताजी जासूद यांणीं पाहिला आहे. दुकानें बंद. रस्त्यांतून कार्याकारण मनुष्य फिरतें." [ खरे, ४७८३ ]. धुळ बांधिती पदरांत–शोकानें वेडे झाले. विवशी–खाष्ट देवता. दुर्दैवाचा फेरा, अनवस्था. शोक संचारतां अंधेरांत–रात्रीं एकाएकीं श्रीमंतांच्या मृत्यूची बातमी. पसरतांच लोक जागच्या जागीं

॥ ( चाल ) ॥ बंदोबस्त कडेकोट करूनियां शनवारांतुन अर्धी । अखंड स्वारि रायाची निघाली चौथीच्या अमलामधीं । दुर्लभ दर्शन ज्याचें प्रभु तो नदींत निजायचा कधीं ॥ ( चाल ) ॥ पसरुनी तुळशी कर्पुर बेल चंदन । रचियलें सरण त्या शेवटचा स्यंदन । आरुढले वीरवर नारायणनंदन ॥ (चाल पहिली ) ॥ अनेक रिपूंचें करुनी कंदन दवडुन विलयाला । दर्भासन घातलें विष्णुलोकास बसायाला ॥ कमि नव्हते० ॥ ७

बाईसाहेब कल्पांत जिवाचा तळतळूनी करती । कां ग कुळस्वामिणी कोपलिस आजी मजवरती ॥ पतिपूर्वी सौभाग्यवत्या ज्या पुत्रवत्या मरती । इहलोकीं परलोकीं धन्य त्या कुळास उद्धरती ॥ कसें माझें दुर्दैव उपजलें चांडाळिण पुरती । म्हणुन श्रीमंत प्रभुची मजला अंतरली मूर्ती ॥ (चाल) ॥ निरोगी सात सहस्र उंट न पार स्वामीचे । वीस सहस्र तुरग निवडक भीमथडी ग्रामींचे । सबल दोनशे नव्वद कुंजर विशाल हरकामींचे ॥ ( चाल ) ॥ म्हशी दोन सहस्र कठिदार बाणीच्या । सहा सहस्र गाई फारतरी बाणीच्या ॥ कांहीं सफेत कपिला व्याघ्रांबर खाणीच्या ॥ ( चाल पहिली ) ॥ बैल बारा सहस्र एवढ्या जिवांस खायाला । कोण श्रीमंतांवांचून दुसरा समर्थ द्यायला ॥ कमि नव्हते० ॥ ८

---

थिजून गेले. **अखंड स्वारी**–सर्व लव्याजम्यासहित. **चौथीच्या अमलामधिं**–चौथ्या प्रहरांत. **नदींत निजायचा कधीं?**–( नदीकाठीं ) दहन केव्हां होणार? **स्यंदन**–रथ; आसन; वाहन; चिता. **आरूढले**–वर चढले. **दर्भासन**-ताटीवर पसरण्याचें गवत. **विष्णुलोकास**–विष्णुलोकांत स्थान मिळविण्याकरितां. ७

**न पार**–नफार; नफर–नग उ० उंट नफर सात हजार. (२) नफर–नोकर. **भीमथडी ग्रामींचे**–भिमथडी घोडीं प्रसिद्धच आहेत. **हरकामिचे**–हरकामीं उपयोगी पडणारे. **कंठिदार**–कटिदार. (?) **बाणीच्या**-जातीच्या. **फारतरी**–पुष्कळ (?) **फारतऱ्हीं**–नाना जातीच्या (?). **कांहीं सफेत कपिला व्याघ्रांबर खाणिच्या**–पांढऱ्या, काळ्या, व्याघ्रांबराच्या रंगाच्या अशा निरनिराळ्या गाई. ८

शिकारि चित्ते व्याघ्र पटाइत वृक सांबर हरणें। जंबुक चितळे रोही भेकरें कुरवाळुन धरणें॥ रीस एडके गेंडे सशांना बनात पांघुरणें। आपण खावें तें त्यांस पुत्रवत् किति माया करणें॥ सुंदर रूप रायाचें नाहीं कुणावर

---

चितळे–चितळ–ठिपक्यांचा काळवीट. रोही (स्त्री)–हरणाची एक जात. भेकर–एक लहानशा हरणाची जात. पुत्रवत् किति माया करणें– सवाई माधवरावाला पशुपक्ष्यांचा अतोनात शोक होता. पेशवे बखर पान १११ वर त्याच्या शिकारखान्याचें वर्णन आलें आहे. त्यांतील कांहीं भाग "तऱ्हे-तऱ्हेचीं श्वापदें व पक्षी मिळविले. सात आठ मैना बंगाली बोलणाऱ्या, तसेच बोलणारे पोपट, यांचे पिंजरे चांगले मिळविले. तसेच चंडोल पक्षी यांचे पिंजरे सातआठ आणविले...तशींच बदकें, पाणकोंबडीं, मोरांच्या जोड्या दहापांच... हरणें शेंदोनशें काळवीट सुद्धां, वाड्यांत आणून ठेवलीं. चित्ते दोन चार, पांच सातशें ससे काळे, पिवळे, अबलक असे पर्वतीच्या वाटेवर बागेंत तळ्याचे कांठीं खोली बांधून तींत ठेवले....दहा वीस वाघ पर्वतीस मोठा सोपा बांधून त्यामध्यें साखळदंडानें बांधून ठेवले. त्यांत संभू वाघ म्हणून मोठा पटाईत, नुसता एक जात पिवळा, लहानशा घोड्याएवढा होता. गेंडे हिंदुस्थानांतून महादजी शिंदे यांणीं पाठविले, खबुतरें बहुत पाळिलीं होतीं त्यावर माणसें ठेविलीं. इतक्यांचे खाण्यापिण्याचा बंदोबस्त ठेविला." (2) In the park at the foot of Parvati was the menagrie or zoological garden, a fine collection of animals, birds, reptiles and fish. All together there were more than a hundred animals. This collection of animals was unique of its kind in the Deccan." [William Price a member of Bombay Government who came to Poona on an embassy in 1791.—Diary Poona in B. D. Page 124.] 'पूना इन बायगॉन डेज्' या पुस्तकांत यासंबंधीं स्वत: युरोपियन लोकांनीं पाहून लिहून ठेवलेली माहिती दिली आहे. इतिहाससंग्रहांत 'माधवरावाच्या बाललीला' या टिपणांतहि यासंबंधीं कांहीं माहिती आली आहे. खरे शास्त्र्यांच्या भागांतूनहि असे कांहीं उल्लेख आहेत. उदा०–खरे, पान ४५६७ व ४५६८ पहा. तेथें "सध्या श्रीमंतांची रीज तो हरणावर आहे" असें एक सूचक वाक्य आलें आहे. रीस–अस्वल. कलगी-

रागें भरणें। कलगीतुरा शिरपेंच कंठिचीं पडत होतिं किरणें ॥ (चाल)॥ सदयहृदय साक्षात् पितांबर परिधानाचा प्रभु। कृष्ण कुळीं दैदीप्य जसा काय मकरध्वज आत्मभू॥ तसा करुन दिग्‌विजय शेवटीं अवघड रचिला विभू॥ (चाल)॥ पाहु द्या मला तें एक वेळ श्रीमुख। जन्म तों आतां ह्या जिवास होईल दुःख॥ भोगिलें रमाबाइनें कांहींतरि सुख॥ (चाल पहिली)॥ हरी जाहला विन्मुख विसरलें पूर्वी पुजायाला। प्रयागीं जावें उठुन वाटतें॥ समाधि घ्यायाला॥ कमि नव्हते०॥ ९

अश्व आवडते कुंजर घेनु मृग मैना रडती। मोर खबुतरें तितर सांबरें मूर्च्छागत पडती॥ स्वर मंजुळ कोकीळपक्षि ते पिंजऱ्यामधीं तडफडती। पोपट भारद्वाज चाष परदुःखानें खुडती॥ भूकंपा उलुका भालु रीत घन विजवा कडकडती। असंख्य तुटती तारे नभमंडळीं किरणे पडती॥ (चाल)॥ ग्रामसिंह दिवसास भयंकर सद्दद भुंकारिती। सवत्स नित अपरात्रीं गाई कितीक हंबरती॥ भुतें पिशाचें खवीस डाकिणी काय हांका मारिती॥ (चाल)॥ दोहो द्वारीं बसुनी लक्ष्मी पिंपळावरी। करी दीर्घ रुदन मध्यान्ह होतां शनिवारीं॥ नाहीं राहात आतां होईल आकाशवाणी वरी॥

---

**तुरा**-कलगी-पागोट्यावर बांधावयाचें रत्नखचित भूषण; **पितांबर परिधानाचा प्रभू**-पीतांबर नेसलेला श्रीकृष्ण. **मकरध्वज आत्मभू**-स्वयंभू मदन; मूर्तिमंत मदन. विभू-व्यूह; कारस्थान; कपट. **रमाबाईनें**-सवाई माधवरावाच्या पहिल्या बायकोचें नांव रमाबाई असें होतें. **विसरले पूर्वी पुजायाला**-गौरीहरच मीं नीट पूजला नसेल, विसरले असेन. ९

**तितर**-तितिर-कवडा नांवाचा पक्षी. **परदुःखानें**-पर-मोठें; परम.-अत्यंत शोकाकुल होऊन. **खुडती**-झुरती. खुडकून बसती; भीतीनें किंवा शोकानें आंग आखडून बसती. **भूकंपा**-भूकंप (शालिग्राम यांनीं मोडीवरून उतरतांना भुकंपचे भूलांप लिहून घेतलें.) उलका-उल्का. **भालु रीत घन विजवा कडकडती**-भालू रडती आणि रिक्त घन (रीत घन) व विजवा (विजा) कडकडती. **लक्ष्मी पिंपळावरी**-दुर्दशेची देवता आक्काबाई. **नाहीं राहत आतां होईल आकाशवाणी वरी**-इतके अकल्पित

( चाल पहिली ) ॥ शक्ति घेऊन श्रीहरी निघुन जातां मूळ ठायाला। सव्यसाचि सारखे लागले मागे पाहायाला ॥ कमि नव्हते०॥ १०

प्रमुख नानासहित शहाणपण सगळ्यांचें खुटलें। तबीबांनीं वैद्यांनीं रसायण स्वहिताचें कुटलें ॥ परंतु मंगळसूत्र गळ्यांतिल मुळिं माझें तुटलें। राजहौंस पांखरु हातांतिल दैवदशें सुटलें ॥ जन्मांतरीं सुतर्शन घेऊन असेल कांहीं लुटलें। सौभाग्याचें तारूं म्हणुन वैधव्यजळीं फुटलें ॥ (चाल) मनीं एक एक आठवुन सुशोभित कुरळ केस तोडिती। यातां दृष्टि कधीं पडाल टाहो करुण स्वरें फोडिती ॥ वदनेंदुवर बिंदु पटपटां डोळ्यांतुन सोडिती ॥ (चाल) ॥ सातशें दासी गुणी नाटकशाळा किती। पाहतांच प्रभु कांहीं ओवाळुन टाकिती ॥ त्या आतां अजीत अजास दैन्य भाकिती ॥ (चाल) ॥

---

चमत्कार चालले आहेत, त्याअर्थी आतां आकाशवाणीहि झाल्याशिवाय खास राहत नाहीं. मूळ ठायाला–निजधामाला. सव्यसाचिसारखे लागले मागे पहायाला–कृष्ण निजधामाला गेल्यावर अर्जुनाचीं अस्त्रें व गांडीव धनुष्य सामर्थ्यहीन झालें व तो किंकर्तव्यमूढ झाला हें प्रसिद्ध आहे. येथला भावार्थ इतकाच कीं, श्रीमंतांच्या मृत्यूनंतर मोठे मुत्सद्दी व लढवाई लोकहि गोंधळून, गांगरून गेले. १०

तबीब–शस्त्रवैद्य. स्वहिताचे कुटले–आमच्या हिताकरितां म्हणजे आम्हाला आराम पडण्याकरितां तयार केले. मुळिं–मुळांत. वैद्यांनीं तबीबांनीं आम्हाकरितां अनेक औषधें रसायनें दिलीं; पण मुळांत माझें सौभाग्यच संपावयाचें ठरलें होतें तेव्हां त्यांचा काय उपयोग होणार? सुतर्शन–(?) जन्मांतरिं–पूर्वजन्मीं. तारू–ही तारवाची किंवा जहाजाची उपमा मराठी शाहिरांची अत्यंत आवडती आहे. शेंकडों वेळां तिचा उल्लेख झालेला आढळतो. नाटकशाळा–येवढ्या लहान वयांत माधवरावाच्या रक्षा असतीलसें संभवत नाहीं. पूर्वीच्या पिढीजात चालत आलेल्या नाटकशाळांना अनुलक्षून याचा ओघांत उल्लेख केला असावा इतकेंच. पाहताच प्रभु, कांहीं ओवाळुन टाकिती–त्याला दृष्ट पडूं नये म्हणून. इतका तो सुंदर होता. अजीत अजास दैन्य भाकिती–(१) अजीज अनाथ असा मूक पाठ असावा. अजीज–दीन

चौदाशें घरगुलाम मुकले ह्या निजपायांला। चाकर तर लक्षानुलक्ष लागतिल फिरायाला ॥ कमि नव्हते०॥ ११

परिक्षिताला मरण यावें काय ब्राह्मणशापानें। दंश करावा काय किडीच्या तक्षक सापानें ॥ तसेंच जहालें काय प्रभूंना कोणाचे कोपानें। संकट पडलें काय दिलासेल जिव संतापानें ॥ जांवई पहाले काय श्रीमंत माझ्या बापानें। वाटे आतां वैराग्य होइल काय ह्या अनुतापानें ॥ (चाल)॥ एकवीस वर्षे पूर्णमासवर सवा पांच, अग ॥ दिसं दिवस भाग्याचा उदय हे दयाळु महाराज ग। अंतरले ते मला आतां आण जहर तरी पान ग ॥ (चाल)॥ ईश्वरा कशी मजवर आग पाखडलिस ॥ आयुष्य दोरि तूं मधेंच कातरलिस ॥ कां पेशव्यांची ही वंशवेल खुडलिस ॥ ( चाल ) ॥ अपार दिधलिस संपदा सुख भोगायला। शतायु केलेंस नाहीं तसें हरी प्राणविसाव्याला ॥ कामि नव्हते०॥ १२

हरि घरचा नाहीं नेम टळाचा परंतु हा टळला। पहा पहिल्या प्रहरांत

---

किंवा लीन. [ पट.]. अनाथ–असहाय. (२) आजिजाना [Ad. Humbly; in a low manner] ( हिंदी ) 'त्या आता अजीजाना दैन्य भाकिती' असा तर मूळ पाठ नसेल? घरगुलाम–घरगुलामांची पद्धत तेव्हां रूढ होती. पेशव्यांच्या रोजनिशांतून याविषयीं पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहेत. निज–आपल्या. लागतिल फिरायाला–देशोधडी होऊन. ११

**किडीच्या**–बोरांतल्या किडीमधील. **संकट पड०**–कांहीं संकट आल्यामुळें किंवा संतापातिशयानें तर जीव दिला नसेल? **पहाले**–पाहिले. **वैराग्य होइल काय ?**–पाहतांना इतकें उत्कृष्ट स्थळ पाहून दिलें पण शेवटीं माझी अशी स्थिति झाली हें पाहून बाबा पश्चात्तापानें वैरागी तर बनणार नाहींत? **वंशवनावर इ०**–वंश या शब्दावर श्लेष आहे. आमच्या वंशरूपी वेळूच्या बेटावर चोहोंकडून क्षयरूप रोगाचा दावाग्नि भडकला. "पेशव्यांच्या कुटुंबांत क्षयाचा प्रादुर्भाव होता." नानासाहेब पेशवे क्षयानें वारले. [ म. री. म. वि. ३ पा. २३४–२३५ ] थोरले माधवरावहि त्यानेंच. १२

**हरि घरचा नाहीं नेम इ०**–ईश्वरानें घालून दिलेल्या नियमाप्रमाणें

सूर्य नारायण मावळला ॥ गरिब गाइवर विशाळ पर्वत समूळ कोसळला । वंशवनावर चहुंकडून क्षयदावाग्नी वळला ॥ बाळाजी विश्वनाथ तारक सर्वांना मिळाला । रत्नदीप झळझळीत केवळ कुळांत पाजळला ॥ (चाल) ॥ काशीबाइ ती धन्य सती रावबाजी पुत्र प्रसवली । छत्तीस महिने लढुन वसई पुढें आपानीं वसविली ॥ दक्षण साडे सहा सुभ्यांत सरदेशमुखी बसविली ॥ (चाल) ॥ नानांची कंची वासना नाहिं राहिली । पुरुषार्थ करुन दादांनीं अटक पाहिली ॥ भाऊंनीं कुरुक्षेत्रास कुडी वाहिली ॥ (चाल पहिली) ॥ रणीं जागा विश्वासरायें ती पाहिली निजायाला । जनोबांस मारून मूठ काय मिळालें बायाला ॥ कमि नव्हते० ॥ १३

---

सकाळींच सूर्य मावळावयाचा नव्हे, पण येथें तो नियम मोडला. कारण या माधवरावरूपी सूर्याला तो तारुण्यांत येतो न येतो तोंच प्राणास मुकावें लागलें. काशिबाई इ०—काशीबाई बाजीरावाची बायको, आई नव्हे. बाजीरावाच्या आईचें नांव राधाबाई. छत्तीस महिने लढून इ०—"तीन वर्षांच्या या युद्धांत अनेक लढाया होऊन सगळाच प्रांत मराठ्यांनीं जिंकला. त्या सर्वांत ठाणें, माहीम, तारापूर व वसई येथील संग्राम केवळ घनघोर झाले." [म. रि. म. वि. पा. ३२३–३२५]. साडेसहा सुभे—पारसनीस भारतवर्ष टिपण. "साडेसहा सुभे दक्षिण असें म्हणण्याचा परिपाठ आहे. परंतु सहा सुभ्यांचींच नांवें आहेत. ह्या सहांपैकीं मोठ्या सुभ्यास दीड सुभा म्हणत असतील. सहा सुभ्यांचीं नांवें येणेंप्रमाणेंः—१ सुभा दाऊलजफर ऊर्फ विजापूर. २ महंमदाबाद ऊर्फ बेदर. ३ वऱ्हाड एलिचपूर ऊर्फ गावेलपूर ऊर्फ आळजपूर ४ दौलताबाद ऊर्फ खुजस्ते, बुनियाद ऊर्फ औरंगाबाद. ५ खानदेश ऊर्फ बऱ्हाणपूर. ६ फरखुंदे बुनियाद ऊर्फ हैद्राबाद, भावानगर." [भारतवर्ष, दख्खनचे प्राचीन देशविभाग अथवा दक्षिण देशचा भूगोल.] कंचीं—कोणचीहि. कुडी—देह. जनोबास—जनार्दन बाजीराव. साताऱ्यास वारला. जनोबा वारला त्याला 'बाया'नें मूठ मारली इ.चा उलगडा होत नाहीं. अस्सल पत्रांतून किंवा बखरींतहि कोठें शोध लागला नाहीं. बायाला—बा! याला ? म्ह० या मृत्यूला असा तर अर्थ नसेल? १३

दर रिकिबीस तलवार जरब सर्वांवर दाबाची। हुकूम मोडिल कोण कठिण मेहेनत रावसाहेबांची ॥ निवडक चाळिस सहस्र बरोबर फौज करारा-ची। शौर्यतेज पाहून छाती तडके नबाबाची ॥ कावेरी उत्तर तीर हद्द ठरवून शिवाराची। भोंसल्याची रग जिरवुन धरली आस हेरंबाची ॥ (चाल) ॥ थेवरास ते समाप्त होतां वैरी फिरून पोसती ॥ वीर पदरचे दिलगिर सारे रायांविन असती। करून निर्वानिरव रमाबाईसाहेब गेलि सती ॥ (चाल) ॥ नंतर नारायणराव तें पद पावले। दहा महिने मात्र सौख्याचे दिवस दावले॥ गारद्यांस दुपारीं अडचणींत घावले ॥ ( चाल ) ॥ घाबरून चुलत्यांचीच गेले पाठ रिघायाला। ढकलुन देतांक्षणीं साधली संध शिपायाला ॥ कमि नव्हते० ॥ १४

झाला जन्म त्या कुळांत माझ्या बाई राजेंद्राचा। केवळ माधव मूर्ति म्हसोबा नव्हेच शेंदराचा ॥ अणीक मंत्री मर्द मराठा बंद्रोबंद्रांचा। ऐरावत बांधून आणतिल प्रसंगीं इंद्राचा ॥ येथें न चाले यत्न ब्रह्स्पती भार्गव चंद्राचा। उपाय असता तरी न मरता बाप् रामचंद्राचा ॥ (चाल) ॥ हरहर जगन्निवासा, अतां काय करूं। पोटीं जरी एक झालें असतें राजबीज लेकरूं ॥ राज्य न बुडतें मी मात्र मरत्ये शोक सदां करकरूं ॥ (चाल) ॥

---

**मेहेनत**–कष्ट; प्रयास; लक्षणेनें कर्तबगारी. **रावसाहेबांची**–थोरल्या माधव-रावसाहेबांची. **कराराची**–प्रतिज्ञेची. **शिवाराची**–राज्याच्या सरहद्दीची. **धरली आस हेरंबाची**–गजाननाचा ध्यास घेतला. **रायाविन**–रायावांचून श्रीमंतांवांचून ." वाघ गेला सारीं कोल्हीं राहिलीं आहेत " **चुलत्यांचीच**–कारण चुलतेच कटांत होते. **संध**–संधी. १४

**येथें न चले**–पण या काळापुढें कोणाचा उपाय चालत नाहीं. मग तो बुद्धिवान् बृहस्पति असो, शूर परशुराम असो, किंवा अत्यंत मोहकचंद्र असो. **राज्य न बुडते इ०**–मला मूल झालें असतें तर पेशव्यांचा वंश टिकून राज्य तरी राहिलें असतें. मग मला जन्मभर शोक करून कुढून कुढून मरावें लागलें असतें तरी हरकत नव्हती. पण तेंही समाधान उरलें नाहीं. **शोक सदा कर-**

पुढें काळ सख्यांनीं कसा मी घालवूं। हिरकणी कुटुन जाऊं पाण्यामधें कालवूं ॥ ती पिउन पौढत्यें नका ग मज हालवूं ॥ (चाल) ॥ जा समया मालवून आपल्या घरास न्हायाला। जिवंत मी असल्यास उद्यां या नेत्र पुसायाला ॥ कमि नव्हते०॥ १५

धन्य वंश एकेक पुरुष (जणुं) कल्पवृक्ष पिकले। शत वर्षें द्विज पक्षी आनंदें त्या तरुवर टिकले ॥ जलचर हैदर नबाब सन्मुख रण करितां थकले। ज्यांनीं घुण्याकडे विलोकिलें ते संर्पातला मुकले ॥ असे प्रभु कसे अमर कराया ब्रह्मदेव चुकले। गहन गती कर्माची सर्वजण पूर्वीं फळ विकलें ॥ (चाल) संपविला अवतार धन्यांनीं म्हणे गगुहैब्रती। ध्वज पडले उलथुनी थडकल्या सुरु साहेब नौबती ॥ कोण करिल प्रतिपाळ तुर्त मुलुखास लागली बती ॥ (चाल) ॥ महादेव गुणीराज श्रुती गादिचे। नवे नुतन नव्हती शाईर जदिप वादिचे ॥ पीळ पेच अर्थ अक्षरांत वस्तादिचे ॥ (चाल पहिली) ॥ प्रभाकराचें कवन प्रतिष्ठित सभेंत गायाला। अशा कवींची बुज नाहीं कोणि करायाला ॥ कमि नव्हते०॥ १६



---

करू–सारखा शोक करून करून. पौढत्यें–पहुडतें. न्हायाला–यशोदाबाईचें समाधान करतांना तिच्या सख्या तिला शिवल्या. त्यांना विटाळ झाला त्यास अनुलक्षून. १५

विकले–मुळांत 'पिकले' असें असावें. पण 'सर्वजण' याचा उलगडा कसा ? थडकल्या–थडकणें एकदम थांबणें [ मोल्स ]. थडकल्यासुरू साहेब नौबती–साहेब नौबती–हत्तीवरच्या नौबती. सुरू असलेला नगारा एकदम बंद करण्यांत आला. मुलुखास लागली बती–मुलुखाला आग लागली जदिप–जदीद (?) नवा; नवशिक्या. श्रुति गादीचे–श्रुत गादीचे. गादीचे श्रुत–जुने प्रख्यात शाहीर. १६

# बाजीरावाची स्थापना



सदर पोवाडा दुसऱ्या बाजीरावाला पेशवेपद प्राप्त झाल्यानंतर लगेच लिहिलेला आहे. बाजीराव गादीवर बसून आपले गुण पाघळूं लागण्याला बराच अवकाश होता म्हणून त्या वेळीं त्याच्या खऱ्या गुणांची लोकांना कांहीं कल्पना असणें शक्य नव्हतें. उलट "श्रीमंत पुण्यास येण्यापूर्वींच त्यांच्या सद्गुणांची कीर्ति आबालवृद्धांच्या तोंडीं झाली होती" [खरे, ४८१७] आपल्या मतलबी व गोड भाषणानें साखर पेरून छाप पाडण्याची आणि कर्मठ-पणानें धर्मशीलपणाची दवंडी पिटविण्याची कला त्याला फार उत्तम साध-लेली होती. त्यासंबंधीं खरे ४८११ पानावरील पत्र पहा. "श्रीमंतांचें शरीरसामर्थ्य चांगलें आहे. गोरे फार नाहींत. परंतु नाकडोळे चांगले आहेत. वित्पन्न आहेत. बोलणें फार पाहिजे. माणसाचा कंटाळा नाहीं. स्नानसंध्या फार आहे....धर्माविषयीं वासना बहुत आहे. कृपणपणा अगदीं नाहीं. इ०" सुरवातीला बाजीरावानें पुण्याच्या लोकांना कसें 'भारलें' होतें याचें हा एक पोवाडा उत्तम उदाहरण आहे.

# दुसऱ्या बाजीरावाच्या स्थापनेवर पोवाडा

## ३२

### [ शाहीर—होनाजी बाळ ]

श्रीमंत बाजीराव प्रभुचें पुण्य आगळें दिसे। जीव नील वर्णापरी परस्परें शत्रु विराले तसे ॥ ध्रु० ॥

राव दादा कैलासवाशीचें पुण्य उदयालें। त्रिवर्ग राघववंशीं सुपुत्र ते स्वराज्य पावले ॥ नाना रितीं बहुतांनीं विरोधें आतिउपाय योजिले। न करितांच वध हातीं तयाशीं न भारितां भारिलें। अरुणोदय जालीया नभीं बालार्क तेज पसरले ॥ सवाई बाजिराव धर्मरुप गादीवर बैसले ॥ (चाल) ॥ ऐश्वर कळा साजती। पाहून शत्रु लाजती। जयवाद्य नित्य वाजती ॥ धार्मिक निती गर्जती। किर्ती या मंडळांत, विसले जिवनी ॥ १

---

**आगळे**—अधिक. **जीव नील वर्णापरि**—जीवनीं लवणापरि असें पाहिजे. पाण्यांत ज्याप्रमाणें मीठ विरघळून जातें, त्याप्रमाणें शत्रू आपोआप नाहींसे झाले. **विरालें**—नष्ट झालें. **उदयालें**—उदया आलें. **रावदादा कैलासवाशीचें**—कैलासवासी दादासाहेबांचें. **त्रिवर्ग**—बाजीराव, अमृतराव, व चिमणाजी. **राघववंशीं**—राघोबादादाचे पुत्र. **स्वराज्य पावले**—राज्याचे अधिकारी झाले. **नानारितीं**—नाना तऱ्हेनीं. **विरोधें आति उपाय योजिले**—विरोधें—वैर करुन, नाना प्रकारचे उपाय योजिले. **न करितांच वध हातीं तयाशीं न भारितां भारिलें**—येथें भारितां या ऐवजीं मारितांअसें असावें. सबंध ओळीचा अर्थ, बाजीरावसाहेबांनीं हातीं वध न करितां म्हणजे प्रत्यक्ष खून न करितां, 'तयासी' सवाई माधवरावाला भारिलें, म्हणजे बुद्धिभ्रंश केला, असा दिसतो. बाजीरावानें मंतरलेल्या ताइताच्या योगानें सवाई माधवरावास भारलें आणि त्यास बुद्धिभ्रंश उत्पन्न केला, असा यावेळीं लोकांत समज होता. त्यास अनुलक्षून तर हा उल्लेख नसेल? [ पे. ब. पान १५७ पहा ]. **ऐश्वर**—ऐश्वर्य २ ईश्वरी. **जयवाद्य**—जयवाद्यें. **निती**—कीर्ति. **विसले**—विराले असें पाहिजे. येथपासून ध्रुपद सुरू.१

परमगहन, अति सुशील, सत्य उपाय, सत्य अंतरीं। सूर्यवंशीचा राव जसा हरिश्चंद्र अयोध्यापुरीं ॥ क्षमाशांतीचा सिंधु सत्य निःकपट हृदय मंदिरीं। प्राण भ्रमर भावार्थ कमळिचा आंत गुंजारव करी ॥ या चिन्हें मंडित भुपती विख्यात यश घे श्वरी। ज्याचे तपसामर्थ्ये वितळती शत्रु अभ्रापरी ॥ ( चाल ) ॥ जना चक्रामधीं येकसरे। केशरी एकला शिरे ॥ नेती भाग आपल्या परी। तेवीं स्वार्थ तरी बरी चक्रांत विज पहा कसे ॥ २

आज मर्जी कोणतीं उद्याचा बेत आणिक मसलती। सेवक जन संनिध परंतु ते कोणीच नेणती ॥ कळोन द्यावा खुणा येकातिच्या गुज गुह्य या प्रती। यास्तव ते नृपाळ विचारे गुप्तरूप बैसती ॥ जनांत बोलणे तेंची प्रगटार्थ करून बोलती। मुख्य प्रभुचे लक्षण प्रत्यक्ष ज्यास वचन भारती ॥ (चाल) ॥

---

**परम गहन**–फार थोर. **सत्यउपाय**–सत्य मार्गानें चालणारा; सत्यसंध. उपाय–सामदाम दंड भेदादिक. धर्माला सम्मत असतील तेच उपाय–योजणारा. **निःकपट**–निष्कपट. **प्राण भ्रमर भावार्थ कमळिचा आंत गुंजारव करी**–भावार्थ म्हणजे भक्ति. भक्तिरूप कमळांत प्राणरूपी ( मनरूपी ) भुंगा गुंजारव करीत होता भावार्थ- अंत करण अत्यंत भाविक, भक्तियुक्त, किंवा धर्मशील होतें. **घे श्वरी**–घे ईश्वरी असें पाहिजे. **जना चक्रामधिं येकसरे**–जना चक्रामधिं–लोकांच्या घोळक्यांत. एकसरे–एकदम, अकस्मात्; भावार्थ शेंकडों लोकांच्या घोळक्यांत अकस्मात शिरून सिंह ज्याप्रमाणें बेधडक आपलें भक्ष्य घेऊन जातो त्याप्रमाणें केशरी–केसरी, सिंह. **तेवीं स्वार्थ तरी बरी चक्रांत विज पहा कसे**–? २

**आज मर्जी...ते कोणीच नेणती**–यांत बाजीरावाच्या स्वभावाचें हुबेहुब वर्णन आहे. "श्रीमंतांचा कावा अट्ठल. मनचें मुखचें कोणास समजावयाचें नाहीं. दोन घटकांनीं एकाद्याचा घात अथवा उर्जित करावें असें असतां कोणास कळावयाचें नाहीं" [ खरे, पा. ६७९६ पत्र नं. ५८०० ]. **मुख्य प्रभुचें लक्षण प्रत्यक्ष ज्यास वचन भारती**–महाभारतांत राजाच्या आवश्यक

म्हणउन युक्तीनें आशा । नृप जिंकित दाही दिशा ।। निर्दोष जोडिती यशा ।। प्रथमारंभीं ऐशा कल्पनें कार्यसिद्धि होतसे ।। ३

सांब कृपा परिपुर्ण पुर्व पुजा बहुत चांगली । स्वजन जनाची केवळ बरवी विद्या फळासी आली ।। निर्धारीं शर पंजरीं येकेपरी कैसी जाळी । गत वस्तु सायास न करितां ज्याची त्यास लाधली ।। मोडुन त्रिंबच्याप रामचंद्रें जानकी परणिली । दुरधर पण जानकीचा अद्भुत ख्याती करून दाविली ।। (चाल) ।। भेदुन यंत्र तें आधीं । पांचाळ मंडपामधीं ।। पार्थें जिंकिली द्रौपदी । धनी प्रतापी राजपदीं शोभले सुशोभित तसें ।।

होनाजी बाळा म्हणे प्रजेच्या आनंदहृदयीं असे ।। जिवनी लवणा०।। ४



---

लक्षणांत हें लक्षण प्रामुख्यानें सांगितलें आहे असा भावार्थ. प्रत्यक्ष वचन–प्रत्यक्ष प्रमाण; प्रत्यक्ष पुरावा. आशा–अशा. ३

पुजा–सेवा पूर्वपुजा–पूर्वपुण्याई. बरवी विद्या–सुकृत. निर्धारीं शर पंजरीं येकेपरी कैसी जाळी–(?) त्रिंबच्याप–शिव धनुष्य; त्रिंबकाचें धनुष्य. परिणिली–वरिली. दुरधर–दुर्धर; कठीण. ४

# दुसरे मल्हारराव होळकर

तुकोजी होळकरास काशीराव, मल्हारराव यशवंतराव, व विठूजीराव असे चार पुत्र होते. त्यांतले शेवटचे दोघे दासीपुत्र होते. काशीराव हा अगदीं नादान व वेडसर होता. नानांचें मत सरदारीचीं वस्त्रें काशीराव वडील असला तरी वेडसर असल्यामुळें त्यास न देतां मल्हाररावास द्यावीं असें होतें. पण शिंदे व बाजीरावसाहेब यांच्या मनांतून होळकरांचें घराणें नानांच्या पक्षांतून काढून आपल्या ताब्यांत ठेवावें असे असल्यामुळें श्रीमंतांनीं काशीरावासच सरदारीचीं वस्त्रें दिलीं. मल्हाररावाचे तर्फे नानांनीं पुष्कळ रदबदली केली असतांही बाजीरावानें ती जुमानली नाहीं.

मल्हारराव हा शूर कर्ता असल्यामुळें त्याचें म्हणणें स्वतःस सरदारीचीं वस्त्रें मिळावीं. यामुळें त्या बंधूंत वांकडेपणा आला. नंतर थोडकेच दिवसांनीं मल्हारराव हे आपल्या वडील बंधूच्या म्हणजे काशीरावाच्या लष्करांतून निघून बाहेर पडले. शिवाय यशवंतराव व विठूजीराव हे दोघेही मल्हाररावासच मिळाले. मल्हारराव स्वतःस दौलतीचा मालक म्हणवूं लागला व होळकरांच्या सरंजामी मुलखांतून जबरीनें वसूल घेऊं लागला. यामुळें काशीरावास मल्हाररावास पकडणें जरूर झालें; व त्या वेळीं अतिशय प्रबळ असलेल्या शिंद्यास पांच लाख रुपये देऊं करून त्यानें मल्हाररावास पकडण्याचें ठरविलें.

मल्हाररावास याची बातमी होती. त्यानें छाप्याचे दिवशीं आपला गोट आवळून तयारी केली. शिंद्यांनीं आपला खासा चार घटका रात्रीस शिकारीच्या मिषानें फौज तयार केली व पर्वतीजवळ येऊन उभे राहिले. कांहीं फौज व पलटणी व २५ तोफा असा सरंजाम होळकर यांचे मोहोल्यावर पाठविला. काशीराव होळकर यानें दुसरीकडून चढाई सुरू केली.

चार प्रहर रात्र तशीच गेली. तेव्हां शिंद्याकडील पठाणपलटणें पहाटेच्या प्रहर रात्रीस माघारी फिरून गेलीं हें पाहून मल्हाररावही आपले गोटांत येऊन कंबर सोडून उतरले. लोकांसही सांगितलें कंबरा सोडून झाडाझटका

करावा व फिरून यावें. तेव्हां कोणीं कंबरा सोडल्या, कोणी सोडतो, कोणी सोडून शौचास गेले, कोणी कंबरा न सोडतां हुक्का तमाखू करतात असे लोक स्वस्थपणानें बेसावध झाले. मल्हारराव होळकर यांनीं पहाटेच्या चार घटका रात्रीस स्नानाचा उद्योग केला व देवाची पूजा करीत बसले. इकडे ही गोष्ट शिंदे यांस कळतांच त्यांनीं लष्कर आवळलें आणि स्वतः पर्वतीचे डोंगरावर जाऊन बसून डोंगराभोंवतीं पलटणाचा परीघ उभा केला. कुंभारवेशीचे नदी-पर्यंत स्वारांचा थट उभा केला व मुजफरखानाचें पथक आघाडीस घालून पुन्हा उलटून माघारे नीट मल्हाररावाच्या गोटावर घालून आले. तेव्हां होळकरांचे लोक अगदींच बेसावध होते. हल्ल्याची हूल उठतांच लाख्या बारगीर नांवाचा लाख रुपये देऊन ठेवलेला सरदार होता त्यानें मल्हाररावास हुशार केलें. मल्हारराव होळकर तसेच उघडेबोडके हातांत खांडा घेऊन स्वार झाले व गर्दींत मिसळले. मल्हारराव यांना चारपांच जखमा लागल्या. त्यांनीं शौर्याची शिकस्त केली. पंचवीसतीस स्वार जातीनें मारले. पण शेवटीं ते ठार झाले. त्यांचे बरोबरच लाख्या बारगिर हाही विलक्षण पराक्रम करून खेतास आला. आनंदराव बहाड हाही एक मल्हाररावाचा शूर शिपाई कामास आला. अर्थात् खासा पडल्यावर फौजेची दाणादाण झाली व शिंद्यांनीं गोट लुटून घेतला. यशवंतराव नागपुरास व विठूजीराव कोल्हापुरास पळून गेले. मल्हार-रावाचें प्रेत काशिराव यांनीं पालखींत घालून नेलें आणि अग्नि दिला.

# मल्हारराव होळकर यांचा पोवाडा

३३

[ शाहीर–राणू सुतार ]

[ **चाल**—आला हो वनवास पती गेला नवतीचा गडे चहाणारा।
**चाल दुसरी**—कुंकुं कपाळीं शोभत नाहीं रत्नागिरिच्या जोतिबा ]

वाहवाजी मल्हार नांव केलें खुप राहिलें दुनियेंत। लक्ष जीवांचा पालनवाला चंद्र हरपला गगनांत ॥ ध्रु०॥

कुंजपुरावर करून लढाई मोठें यश या तलवारी। गंगथडीहुन आली पुण्याला कर्डि फौज बांकी स्वारी ॥ (चाल) ॥ संगे बाकीन बाकी फौज। नाहीं तूर्त भोगिलें राज्य॥ दर्यांत बुडालें जहाज। पुढें होणार जाणार कळेना। लिहिलें याच्या दैवांत ॥ आयुष्याची दोरी तुटली कसे कोपले भगवंत ॥ वाहवाजी मल्हार०॥ १

लाख्या बारगीर हिंडुन आला दरबारीं घेऊन सारी सेना। लाख रुपये कुठून द्यावे हिय्या कोणाचा होईना ॥ लाख्या बारगीर म्हणे मल्हारबा आलों मी तुमच्या दर्शना। मल्हारजी होळकर बोलूं लागला नाही लाखाचा परगणा ॥ (चाल) ॥ ज्यानें थोर हिय्या केला। लाख्या बारगीर ठेविला ॥ एक घोडा बसाया दिला। पन्नास माणूस दिमतिला ॥ दहा माणूस सेवेला। किती जेवी त्याच्या पंक्तीला ॥ पांचशें रुपये निवळ मोजून घातले त्याच्या पदरांत। असे रुपये कितीक झाले करा वर्षांचें गणीत ॥ वाहवाजी मल्हार०॥ २

---

**खुप**–खुब–उत्तम. **या तलवारी**–या तलवारीला (?) **कर्डी फौज**–करडी, कडक. **बांकी स्वारी**–बांका जमाव; मर्दाने शिपायांचा जमाव. **संगे बाकी न बाकी फौज**–बाकी–शिल्लक. बाकीन बाकी–झाडून सर्व (?) १

**परगणा**–प्रांत. येथें भावार्थ असा कीं, एक लाख उत्पन्नाचा मुलूख मजजवळ नाहीं मग याला पदरीं कसें ठेवावें? एक लाख रुपये देऊन मल्हाररावानें सदर मनुष्यास पदरीं ठेविलें होतें. म्हणून त्याचें लाख्या बारगीर असें नांव पडलें. **दिमतीला**–तैनातीला. **निव्वळ**–नगद; रोख. २

मल्हारजी होळकर नेटके करित बसले देवपूजा। एकाएकीं झाली गर्दी आग लागली दारूच्या गंजा ॥ लाख्या बारगिर धांवून आला म्हणे मल्हारबा मनीं समजा। काय बसला निश्चिंत घडीभर ठेवा गुंडाळून देवपुजा ॥ (चाल) ॥ राव मल्हार उठले आंगं। हातिं घेऊन ढाल फीरंग। हिमत कर मामा अंगें ॥ तो लाख्या बारगिर संगें। तुम्ही म्होरे या मी मागें ॥ मल्हाररावाची दासी बोलली दिनभर बसा डेऱ्यांत। तिला दिलें लवंडून मल्हारबा गेले रागांत ॥ वाहवाजी मल्हार० ॥ ३

लाख्या बारगिर, मल्हारजी होळकर रणामधिं बघा नवरा। तिसरा खिजमतदार संगतीं इमानाचा होता पुरा ॥ दारूच्या अमलांत झमाझम उडूं लागल्या तलवारा। माणूस पडलें फार शाईमध्यें पाहूं लागलें भिरभिरा ॥ (चाल) ॥ शाईमध्यें माइचा पुत। जोडगोळया भरून बारचेत ॥ पाहुनि मारी छातींत। राव मल्हार केला चित ॥ मागुन मारिला लाख्या बारगिर प्रेतावर

---

नेटकें-नेटका (Adverb declinable) नुकताच;नुकतेंच,थोड्या वेळापूर्वी गंज-रास; संचय; कोठार. मनीं समजा-मनीं उमजा; सावध व्हा. आंगं-जातीनें फिरंग-तलवार. तुम्ही म्होरे या मी मागें-तुमच्या पाठोपाठ पाउलावर पाऊल टाकून मी बेशक चालून घेतों. दासी-रक्षा; नाटकशाळा. ही देखील लढली व मारली गेली-[ इंदूर संस्थानची बखर पा. ६ ]. दिनभर-खिनभर म्ह० क्षणभर ( मोडींत ख द चा घोंटाळा ) लवंडून-लोटून. ३

रणामधिं नवरा-रणनवरा; रणशूर. तिसरा खिजमतदार-रविराव शिंदे (?) [ भा. व. पंतप्रधान यांची दुसरी शकावली. पा. ९१ ]. दारूच्या अमलांत-दारूच्या कैफांत; दारूच्या नशेंत. शाईमध्यें-सैन्यामध्यें. माईचा पुत-वीरपुत्र; सुपुत्र. बारचेत-एकाद्या पिस्तुलाचा किंवा बंदुकीचा प्रकार (?) कां जोडगोळ्या भरून बार चेतवला आणि नेम धरून ( पाहून ) मल्हाररावाच्या छातीवर मारला (?) इंदूर बखरींत 'बारचेता' ऐवजीं 'शेर-बच्याची गोळी लागून मारले गेले' असें आहे. [ इंदूर सं. ब. पा. ६ ]. पाहुनि मारी-नीट नेम धरून. राख मग-राख-रक्षा-तिघांबरोबर नंतर

पडलें प्रेत। तिसरा खिजमतगार, राख मग चौघांची एकच मौत ॥ वाहवाजी मल्हार०॥ ४

मोठे मोठे सरदार करिती विचार मनामधिं चकचुर होती। काय बलावणें झालें मल्हारबा सवती आपली बाजू होती ॥ कांहींच घेणें कांहींच देणें नाहीं आपुलिया हातीं। जें झालें तें बरें झालें ह्या रायाला मुठमाती ॥ (चाल) ॥ तुम्ही होळकर बोलवा। तुम्ही करा मातेची सेवा ॥ थडग्याला काम तुम्ही लावा। होळकर शाईमधें मल्हारबा होता एकच पूत। खूप केलीस तलवार सवाई मल्हारी नांव साजत ॥ वाहवाजी मल्हार०॥ ५

लाख्या बारगिर मल्हारराव रणबहिरी कां मारला ॥ (चाल) ॥ लाख्या बारगिर ज्यानें ठेविला। खुप छाती हिय्या केला ॥ शहाअल्लीबोवा गुरू बोलला। शुर मर्दाचा पोवाडा। थोड्या दिवसांमधिं पंची वाजवून गेला चौघडा ॥ (चाल) ॥ पुढें होणार जाणार। तें ब्रम्ह्याचें अक्षर ॥ हें कदा

---

मल्हाररावाची मघाशीं उल्लेख आलेली दासीहि मारली गेली. मौत–प्रेतयात्रा. ४

चकचूर–चिंतातुर; गर्क; स्तंभित; मूढ. काय बलावणें झालें–बलावणें झालें–मृत्यु आला. काय बलावणें झालें–असा कसा विपरीत मृत्यु आला(?) मल्हारबा सवती आपली बाजु होती–सवती–स्वतंत्र; निराळी. बाजू–पक्ष [पट.]. मल्हारराव आपला एक स्वतंत्र हातच होता तो आज तुटून पडला असा भावार्थ दिसतो. कांहींच घेणें कांहींच देणें इ०–आपल्या मानवांच्या हातीं कांहींच नाहीं. तुम्ही होळकर बोलवा–काशीराव (?) (होळकर म्हणजे अग्नि देणारे असा तर अर्थ नसेल?) तुम्ही करा मातेची सेवा–तुम्ही करा मोतची सेवा (?) मोत–उत्तर–क्रिया; प्रेतयात्रा. तुम्ही प्रेतयात्रेची सेवा–तजवीज करा. थडग्याला काम तुम्ही लावा–समाधि बांधा. होळकर शाईमध्यें–होळकरांच्या राजघराण्यांतील मंडळींत. ५

पंची–प्रिय; लोकप्रिय; प्यारा. वाजवून गेला चौघडा–कीर्ति करून

नाहीं चुकणार। बोले राणू सुतार ॥ रहिवाशी पुणें शहर। राजुताजुद्दा फकीर ॥ ठिकाणा राहतो उंदिर गांवांत। त्याची दस्ती नाहीं कोणाला ॥ कजव्याला जोडून हात ॥ वाहवाजी मल्हार०॥ ६



---

गेला. दस्ती–ऐट, चाल, पद्धत [ आपटे ] त्याची सर दुसऱ्या कोणास येणार नाहीं. ६

# पट्टणकुडीचे व कंपूचे पोवाडे

ऑगस्ट १७९९ अखेर भाऊंनीं भोज, एकसंबें, सोलापूर, गलदगे, खडकलाट व चिकोडी मनोळी हे तालुके करवीरकरांपासून परत हिसकावून घेतले. नंतर फक्त शिरोळ, आकीवाट, भूधरगड किल्ला व करवीरकरांनीं भाऊंचा तासगांवचा वाडा जाळला त्याची भरपाई करून घेणें, येवढ्या गोष्टी राहिल्या.

चिकोडीचें ठाणें भाऊंनीं घेतलें तेव्हां करवीरकरांचा मुक्काम बेडकीहाळ येथें होता. भाऊंच्या लष्करी हालचालीप्रमाणें तेहि आपल्या सैन्याचे मुक्काम बदलीत. ऑगस्टांत वेदगंगेच्या अलीकडे महाराजांचें सैन्य होतें. ऑगस्टअखेर स्वतः महाराज हिय्या करून ता. २ सप्टेंबर रोजीं नदीपार झाले आणि हमदिवाडा येथें डोंगराच्या आसऱ्यानें त्यांनीं आपला तळ दिला. भाऊंच्या सैन्याप्रमाणें त्यांच्याही लष्करांत पळपुटे लोक पुष्कळ होते म्हणून महाराजांनीं नदींतले टोकरे काढून ठेविले व नदीतीरीं जागोजाग चौक्या बसविल्या. करवीरकरांच्या तळापासून पट्टणकुडी येथें भाऊंचा तळ होता. त्यांचें सैन्य फारच थोडें असल्यामुळें त्यास (शत्रूस) "अंगावर घेऊन मोहला पावावा" म्हणजे शत्रु अंगावर आला असतां पळाची हूल दाखवावी, त्यास अडचणींत नेऊन एकदम गर्दी करून बुडवावें असें भाऊंनीं ठरविलें. पण ही मसलत शेवटीं बिघडली. १०।१२ दिवस दोन्ही दळें समोरासमोर होतीं. शेवटीं करवीरकरांनीं निपाणीस तोफा लावून नशिबाची परीक्षा पहावी, शत्रूकडून त्या ठाण्याची कुमक न झाली तर मग त्यांचा दम समजला मग बेलाशक लढाई द्यावी असें ठरवून भाद्रपद वद्य तृतीयायुक्त चतुर्थी मंगळवार ता. १७ सप्टेंबर रोजीं ते गोट सोडून निघाले.

इकडे भाऊ स्वतः आपला गोट संभाळण्याकरितां जाग्यावर राहिले आणि त्यांनीं बाकी सैन्याच्या दोन टोळ्या करून त्या अनुक्रमें आपले मुलगे रामचंद्र आप्पा व महादेवराव दाजी यांच्या ताब्यांत दिल्या. सायंकाळीं करवीरकरांच्या फौजेनें एकवटून रामचंद्र आप्पावर हल्ला केला. पण त्यांनीं तो तुडवून

काढला. नंतर पुन्हा शत्रूनें महादेवराव दाजीवर जोराचा हल्ला केला. तेव्हां ती टोळी कच खाऊन पळूं लागली. शिस्त बिघडली. रामचंद्र आप्पास जखमा लागल्या. पिछेहाट होऊं लागली, तेव्हा सायंकाळीं आप्पांनीं गोट हलवून कूच करण्याविषयीं भाऊस निरोप पाठविला. त्याप्रमाणें लादालाद करून ते तयारी करतात तोंच महाराजांची सर्वच फौज गोटावर येऊन आदळली. तेव्हां पालखींतून उतरून भाऊ घोड्यावर बसले व त्यांनीं तोंड दिलें. अचानक आलेल्या शत्रूच्या पहिल्या धडकीसरसे जवळचे सर्व लोक पळून गेले व भाऊंस तीन जखमा लागून विश्वासराव घाटगे सर्जाराव यांच्या हातीं ते पाडाव सांपडले. भाऊंच्या अन्नावर वाढलेले व त्यांनीं नांव-लौकिकास चढविलेले इतके शिपाई हजर असतां एकानेंही त्यांचा जीव बांचविण्यासाठीं हत्यार चालविलें नाहीं! एवढा मोहरा जेथें पाडाव झाला तेथें त्याच्या बचावासाठीं झगडणाऱ्या हजार-पांचशें राहो, पण शेंपन्नास तरी योध्दयांचे मुडदे नजरेस पडावे! पण मरणाच्या वेळचा सोबती भाऊंस एकही भेटला नाहीं.

परशुरामभाऊस जखमा लागल्यामुळें घोडयावरून पडतांच विश्वासरावां-च्या स्वारांनीं त्यांस आपल्या घोडयावरून उचलून घेऊन महाराजांपुढें नेलें तेव्हां ते आसन्नमरण होते. त्यांस पाहातांच महाराजांनीं त्वेषानें 'मारा' म्हणून सांगितलें. त्याक्षणीं विश्वासरावानें भाऊस घोडयावरून ढकलून दिलें आणि महाराजांजवळ शिलेदार मंडळी होती त्यांनीं तरवारीचे वार करून भाऊंचें शरीर छिन्नविच्छिन्न केलें. याप्रमाणें महाराष्ट्राच्या या प्रसिद्ध सेनापती-चा एका भिकार खेडयावरच्या भिकार लढाईत अशा अधम प्रकारें शेवट झाला! समरांगणांत चतुर्थीच्या दिवशीं पतन पावल्यानें त्या विख्यात गाणपत्याचें वीरव्रत सिद्धीस जाऊन त्याच्या कीर्तीस भूषण झालें. बाकीचा प्रकार मात्र त्याच्या शत्रूच्या कीर्तीस दूषणास्पद झाला.

परशुरामभाऊविषयीं महाराजांचा द्वेष इतका निस्सीम होता कीं, भाऊंचें प्रेत लढाईत पडलें होतें त्याचें दहन व्हावयास पाहिजे या गोष्टीची त्यास पर्वा अथवा इच्छाही नव्हती. परंतु मिरजकरांचा वकील नारो हरी करंदी-कर यानें महाराजांची परवानगी मिळवून हमीदवाडा येथें भाऊंचें प्रेत नेऊन त्यास अग्निसंस्कार केला.

झालेल्या पराजयाबद्दल व विटंबनेबद्दल रामचंद्र आप्पाच्या जिवास सारखी तळमळ लागली होती. व शत्रूचा भरपूर सूड घेण्याचें त्यानें ठरविलें. म्हणून मिरजेस आल्यापासून पेशवे, शिंदे, नाना व बाळोबा यांजकडे त्यानें सूत्र लाविलें. नाना व बाळोबा यांच्या खटपटीनें करवीरच्या स्वारीकरितां फौज पुण्याहून, रवाना झाली. तींत तीन हजार स्वार, शिंद्याचीं पांच पलटणें किंवा कंपू, गणपतराव पानशे यांचे हाताखालील पेशव्यांचा सरकारी तोफखाना हीं होतीं. कर्नाटकांतून धोंडोपंत गोखले पांच हजार स्वार, तीन हजार पायदळ व सात आठ तोफांसह येऊन मिळाले. पुण्याहून फौजा निघाल्यावर रामचंद्र आप्पा, हरिपंत बाबा, चिंतामणराव आप्पा हे आपापल्या सैन्यासह मिळाले. त्यांनीं लवकरच शिराळ्याचें ठाणें घेतलें.

नंतर लष्कर वारणेच्या दक्षिणतीरास आलें. करवीरकरांची फौज तोंडावर होती ती बाजूस सरून पन्हाळ्याच्या माचीस जाऊन बंदोबस्तानें राहिली होती तेथें पटवर्धनांनीं चाल केली व करवीरकरांची फौज त्यांनीं उधळली. करवीरकरांची फौज वरच्या माचीस गेली. तेव्हां पटवर्धनांचा इलाज चालेना.

नंतर २९ व्या तारखेस कूच करून पटवर्धनांनीं टेंबलाईवर येऊन मुक्काम केला. तें पहातांच करवीरकरांची फौज पन्हाळ्यास होती ती करवीरास आली. दुसरे दिवशीं लढाई झाली. त्यांत फिरून करवीरकरांचा मोड झाला. त्यांचे नारायणराव घोरपडे सेनापति कापशीकर, पटवर्धनांकडे पाडाव झाले.

ही लढाई झाल्यावर करवीरकर महाराजांनीं शहराबाहेरच्या पेठा जाळून टाकल्या; व ते सातव्या तारखेस अवशीच्या प्रहर रात्रीस जनानखाना, चीजवस्तसुद्धां बळवंतराव पंडित प्रतिनिधि, नारायणराव पाटणकर सरलष्कर, चतुरसिंग भोसले, हैबतराव गायकवाड विश्वासराव, दौलतराव गायकवाड सरखवास, विश्वासराव गायकवाड, रायाजी जाधव जसन मुलूख वगैरे सरदारांस घेऊन पन्हाळ्यास गेले. करवीराच्या रक्षणाकारितां राजाज्ञा व प्रीतिराव चव्हाण यांस ठेविलें.

दारूगोळा यावयास अवकाश असल्यामुळें करवीरास दहापंधरा दिवस मोर्चे बसले नाहींत. पुढें कदाचित् मोर्चे बसल्यावर करवीरकर गडावरून येऊन गलबल करतील म्हणून त्यांना उधळून लावावें अशा उद्देशानें पट-

बर्धनांनीं पन्हाळा पावनगडच्या मध्यभागीं माचीवर उतरलेल्या करवीरकरांवर छापा घातला. तेथें मोठी घनचक्कर झाली. करवीरकरांचा सबंध गोट लुटला गेला. शेंकडों लोक मारले गेले; व पाडाव झाले व परशुरामभाऊवर हत्यार चालवणारा विश्वासराव गायकवाड सांपडला. त्यास ठार मारून रामचंद्र आप्पानें आपली प्रतिज्ञा पुरी केली. नंतर लवकरच करवीरास मोर्चे बसले. त्यांनीं गांवांत पाणी नेणारे नळ फोडले व पाणी बंद केलें.

याच वेळीं करवीरकरांकडून तहाचें संधान पुन्हा लागलें. "त्यासमयीं "यश घ्यावयाचा समय. परंतु दुराग्रहानें ती॥ रामचंद्र आप्पा यांणीं त्यांचें बोलणें कबूल केलें नाहीं."

इकडे पुण्यास यापूर्वींच थोडे दिवस सखाराम घाडगे याची कैदेंतून मुक्तता झाली होती. त्याच्या सुटकेची वातमी ऐकतांच करवीरकरांनीं साखरा वांटल्या होत्या. त्याच्याकडे त्यांनीं सूत्र लाविलें. मग काय विचारतां ? त्या 'पराक्रमी' पुरुषानें बरोबर कळ फिरविली. कंपूचा मुख्य ब्राउनिंगसाहेब याची बदली केली व दुसरा डिससाहेब म्हणून कोणी होता त्याजला रामचंद्र आपासच धरावें असा हुकूम देऊन मुख्य करून पाठविलें. हा अकल्पित फितूर कळतांच मसलत बिघडली असें समजून वैशाख शुद्ध ३ रोजीं रात्रीं रामचंद्र आपा मोर्चे उठवून पळून गेला.

# पट्टणकुडीचे लढाईचा पोवाडा

## ३४

[ शाहीर–जोतीराम ]

हा पोवाडा विश्वसनीय आहे हें सोबत जोडलेल्या टीपांवरून दिसून येईलच. काव्याचे दृष्टीनेंही पोवाडा उत्कृष्ट आहे. शाहीर कोल्हापूरकरांचा पक्षपाती दिसतो.

धनी छत्रपती शिवराज नेमले झुज लढती फौज मार लाविला। झाली एकच गर्दी भाऊवर हल्ला ॥ ध्रु०॥

धन्यावर दाली धरून क्रिया सोडून, आला चालून केला अभिमान गर्व थोर। म्हणे एकदांच पाहीन कोलापूर क्षेतर ॥ त्या गर्वाचे घर खालीं पाहून शुद्ध गेली फजिती झाली रावण बुडाला दशासूर। त्या रामचंद्राने केला संहार ॥ असे थोर थोर सांगती बहुत शिकविती आल्या परिचिती तरि उमजेना गव्हार। मुक्तीनें वोढिलें काळाचें घर ॥ आला नानाचा वकील सांगे भाऊला करावा सल्ला फिरून जावें तुम्ही माघार। करनाटक स्वारी फिरंग्यावर ॥ फिरंगी चढून आला म्होर। तुम्ही जाऊन उतरा तुंगभद्रेवर ॥ झाला धन्याचा हुकूम आलीं वस्तरें राजावर दावा नका करूं वैर। घ्या

---

धन्यावर–कोल्हापूरकर छत्रपतीवर. दाली धरून–दाली बांधून; पैज होड बांधून; संग्रामास सिद्ध होऊन. क्रिया सोडून–क्रिया–शपथ, प्रतिज्ञा. क्रिया सोडून–प्रतिज्ञा करून कां मोडून? क्षेतर–क्षेत्र. त्या गर्वाचें घर खालीं पाहून शुद्ध गेली–पाहून या ऐवजीं मूळ शब्द पडून असा असावा. दशासूर–दश तोंडांचा असुर असें कवीस म्हणावयाचें आहे. परिचिती–प्रचिती, अनुभव, प्रत्यय. गव्हार–मैंद; नीच. मुक्तीनें वोढिले काळाचें घर–मुक्ति–मृत्यु. वोढिले–ओढिले. जवळ केलें काळाचें घर–यमलोक. आपल्या मरणानें यमलोक जवळ केला; मरून नर्कास गेला. कर्नाटक स्वारी फिरंग्यावर–फिरंग्यावर नव्हे. फिरंग्यासहित टिपूवर. हें श्रीरंगपट्टणच्या शेवटच्या स्वारीसंबंधीं आहे आलीं वस्तरें–वस्त्रें आलीं. "म्हैसूरच्या स्वारीचा कुलअखत्यार त्यांनीं (बाजीरावसाहेब पेशव्यांनीं) भाऊंवर सोंपविला व मुतालिकीची शिक्के-कट्यार व मोरचेल व वस्त्रें

तुमची खंडणी बांधून देतों घर ।। राग आला भाऊला धरवेना धीर । गर्वानें फुगला चढला अहंकार ।। बोले हंतेनें घेईन कोलापूर । मग घेऊन गोकाक मग बागवाडी घेऊन चिकोडी नदीच्या थडी केला मुक्काम खडक लाटेला ।। भुज घेऊन गोळा मारी लष्कराला ।। १

महाराजांनीं मनसोबा केला गंगा उतरला कुनूरास गेला डेरे दिले समगात । आले गलीम चढून लाटेच्या मैदानांत ।। महाराजांनीं कुच करून फौज घेऊन उतरले हमिदवाड्यावरत । भुज नेमिळें राव केली मसलत ।।

---

व जवाहीर वगैरे बहुमान त्यांजकडे पाठविला." [ खरे ५८४५ ]. बांधून देतो घर–मागें तासगांवास करवीरकरांनीं भाऊसाहेबांचा वाडा जाळला. त्यास अनुलक्षून. [ खरे ५८६१ ]. " करवीर महाराज यांची स्वारी तासगांवास येऊन वाड्याचा वगैरे फारच नाश केला. याजमुळेंच बद्धकटाक्ष पडला. " [ काव्ये. पा. ४९६ नारो हरींचें पत्र ]. कोल्हापूरचे पोवाडे या पुस्तकाचे संपादक खालील टीप देतात. " परशुराम भाऊंनीं कोलापूरकरांवर स्वारीस निघतांना तासगांवचे वाड्यापुढील दरवाजा चिणून टाकविला. कारण कोल्हापूरचा समाचार घेऊन आलों म्हणजे हा दरवाजा खुला करूं. तसें झालें नाहीं. आजपर्यंत तसाच चिणलेला आहे. " " नंतर शहरांत शिरून भाऊंच्या वाड्यांत कडबा भरून वाड्यास अग्नि लावून दिला " [ को. क. प्रां. इ० उत्तरार्ध पा. १०१ ]. घेऊन मग गोकाक इ०–[ खरे पा. ५८४३, ५८४६, ५८४७, ६०७२ ]. हंतेनें–अहंतेनें, गर्वानें. भुज–भोज (गांवाचें नांव) [ खरे, ५८६१ ]. १

गंगा उतरला–" ता. २ सप्तेंबर रोजीं वेदगंगा उतरून पलीकडे गेले " [ खरे, ५८६४ ]. " श्री महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्वारी काल भृगुवारी घटका दोन घटका दिवसास सायंकाळच्या नदीपार होऊन कोण्णुरानजीक डेरे झाले. दोही नद्यांच्या दरम्यान उतरले आहेत. " [ खरे, ६०७२ ]. राव केली मसलत–"करवीरकरांनीं छापा घालावा ही मसलत करून दोन वेळां उद्योग केला " [ काव्ये. पत्रें यादी पा. ४९६. नारो हरी करंदीकर, मिरजकरांचा करवीरकरांच्यादरबारांतील कारकून. यानें स्वतः लिहिलेली हकीकत. हा या लढाईचे वेळीं करवीरकरांचे गोटांत जातीनें हजर होता.

चार हजार घोडा स्वार होऊन तयार घेऊन दळभार नगारा केला सैनेंत। आणूं या भाऊला धरून जीत ॥ नीत उठून स्वारी ,गलिमावरी तें लष्कर सोडून नायेत। भाऊनें तोंड लपविलें डेऱ्यांत ॥ कशी चित्याला पाहून हरणी दबकत। नाहीं झुजायाची तकवा धरली हिंमत ॥ आली स्वारी मागें परतून लष्करांत। धनी छत्रपती बोलले यशवंत ॥ आणा मानकरी हटकून समस्त। चोपदार हिंडतो ताकीद करीत ॥ उद्या हल्ला भाऊवर समशेर रणांत। ऐकून शिपाई दचके मनांत ॥ एक एक शिपाय निवडा हजारांत। त्या सर्जेराव बापूची भली मात ॥ भोंसल्याचें दैव थोर, शिवाचा वर, नगी समशेर विडा पैजेचा मांडला। पुण्यप्रतापी महाराजाचा बोलबाला ॥ २

आले थोर थोर मानकरी शिपाय रणशूर, करती जोहार, महाराज बोले वचन। अणा चतुर सैनेला बोलावून ॥ हुता दिवस मंगळवार होऊन तयार। घेऊन दळभार डंका नौबतीस करून हत्तीवर हौदा भडके निशाण ॥ घाटग्याची नगी समशेर हिंमत बहादुर खासे बालदार पांढरे बापू चवाण। पाटणकर माने भपकर पठाण ॥ सिंदे भोंसले यादव जाधव घोरपाडे मिळुन। देसाई देशपांडे मिळाले सैन ॥ चार हजार पायदळ सनद्या मिळून। साहा

---

यानेंच पुढें भाऊंचें दहन केलें]. **समगांत**–संगमांत. **नीत**–नीट? **नायेत**–न येत. **धरली**–हरली (?) मोडींत ह आणि धचा घोंटाळा **हटकून**–बोलावून. आणा मानकरी हटकून समस्त इ०–"नंतर भाद्रपद वद्य १३ शके १७२१ इंदुवारीं अस्तमानीं भोजन करून महाराज कचेरीचे डेऱ्यांत येऊन बसले. तमाम मानकरी व शिलेदार व रत्नाकरपंत वगैरे यांस बोलावून लढाईची मसलत उदईक मंगळवारीं चालून जावे. तिकडील फौज आल्यास लढाई द्यावी. न आल्यास गोटावर चालोन घ्यावें. असें सर्वांचें विचारें ठरून लष्करांत ताकीद झाली." [काव्ये. सं. प. या. पा. ४९६ करंदीकर]. २

**चतुर सैनेला**–चतुरसैन्यास (?) चतुरंगदळास (?) **हुना**–होता. **दिवस मंगळवार**–वार बरोबर आहे. **भडके निशाण**–भडके–फडके, झळके. **खासे बालदार**–खास बार्दार–खाशांची बंदूक घेऊन

हजार घोडा हजिरी लिहून ॥ बारा हजाराची भरती करून । सरखवास मुलुख जप्तन दोघेजण ॥ चला हुजरातीला फौज कडाक्यानं । रत्नाकर आपा उजव्या बाजूनें ॥ तोफखाना जिलिब्री चाले जलदीन । झोर वाजंत्र्याचे बाजे लावून रणशूर शिपाई मिरवे रणांतून ॥ केलें केदारलिंगाचें स्मरण । अवसर-माता चोपडाई करी धांवणें ॥ रत्नासूर दैत्य मारिला नाथानं । केलें अंबा-देवीचें स्मरण । म्हाराज देव अवतार वारूस स्वार नगी समशेर भडका अग्नीचा उठला ॥ त्या निपाणीच्या माळाला जम पडला ॥ २

म्हाराजांनीं पत्रिका लिवली जासुदास दिली खबर पाठविली बोलवा भाऊला झुजायाला । सावध करून मारावा वैऱ्याला ॥ भाऊनें धरला दम नेसला सुम खावुन गुम निश्चित बसला डेऱ्यांत । तंगबाहार तयारी साऱ्या सैनेस ॥ महाराजाला करावा ज्वार फौजेचा फरा बांधला । धराभार निशाणा-चा उठला ॥ ठेवा हन्यावरती डोई हर तुम्ही बोला । नाहीं अवसान उप-सायाचें तलवारीला ॥ जीन घालाय विसरला घोडा सुटून गेला । भाऊ कंठाळीस गुंतला चाकर पळाला ॥ काय सांगूं दादानों गळाठा झाला ।

---

बरोबर चालणारा शिपाई सनद्या–सनदी. दोघेजण सरखवास–(पु.) —मुख्य नोकर [पट.]. जप्तन्मुलुख–प्रदेश जेता. [पट.]. घोरपड्यांचा किताब. रायाजीराव जप्तनमुलुख. अवसर माता चोपडाई–अवसर (प्रा. पु.)–अंगांत येणें [ आपटे ]. अवसरमाता–अंगांत येणारी देवी. जागृत देवता चोपडाई. करी धावणें–धावणें करून आली. ३

सावध करून मारावा वैऱ्याला–खोटी गोष्ट. कविकल्पना. नेसला सुम(?) तंग बाहार–तंग बार करणें–जीनबंदी करणें. ज्वार–जेर. फरा–बाजू, फळी. धराभार निशाणाचा उठला–धरामार पाहिजे. धराभार असा शब्द सांपडत नाहीं. धरामार–धरून दिलेला मार [मोल्स.] निशाणचा–सैन्याचा फौजांचा. ठेवा हन्यावरती डोई–(?) कंठाळीस गुंतला–पशूच्या पाठीवर वाहून नेण्याकरितां आलेला बोजा. भावार्थ, छत्रपतींचा हल्ला आला तेव्हां

फौजेची बगल उडाली पळ सुटला ॥ चोपदार मारून फिरवी लोकांला। चार हजार घोडा खासा तयार झाला ॥ भाउचा लेक आपासाब सुजला। आधीं तोंड लागलें हुजूरपा गेला ॥ बाहिणाजी भोंसले पांडऱ्या पडला। गाईकवाडास जमखा लागल्या ठार झाला ॥ फौजेचा मोहरा मागें फिरला सरला। राजाला राग मोठा क्रोध आला ॥ रत्नाकर आपा हैबतराव उठला। पाटणकर यादव सर्जेराव भिडला ॥ बापु चवाण फिरवी महाराजाला। शेंडूर पायदळ घुसले ओढ्याला ॥ छमछमा उडे समशेर रणभूमीला। झाली एकच गर्दी सर्या अंधकारला ॥ माईला लेकरूं वळखेना असा वकत पडला। येत्रून भाऊला ॥ शिपायांनीं फसविलें एकला पडला। भाऊ घोड्यावर फिरा माघार बक्षिसा देतो शिपायाला ॥ काय पळून तोंड दाखवूं पेशव्याला ॥ ४

आला दिवस दोनपारला लागली टक्कर होती झुंबर लढाई दोही दल्लाला। हटकून मारी हेरून हेराला ॥ लावला तोफेचा भडिमार गोळे अनिवार जखमी फार गणता नाहीं मुरद्याला। भगवंत सारथी दोही दळाला ॥ हजारामधि एक मारी फिरून माघारी समशेरा रणामाधिं खेळे रणशूर भाला। राया जाधव जतन–मुलुख लव्हा केला ॥ झुजाची मात पस्याचा हात मिसळला। आंत जखमा चढल्या आपाला ॥ भाऊचें लष्कर गडबडलें पळ सुटला। लुटलें धन सांपडली पेंढाऱ्याला ॥ डेरेदांडी पालखी

---

गोटाची लादालाद करून तो लावून देण्याच्या कामांत भाऊ गुंतले होते [खरे, ५८६६]. **सुजला आधीं तोंड लागलें हुजुरपा गेला–सुजला–** झुजला असे मुळांत असावे. "शत्रूशीं गांठ पडली तेव्हां....सायंकाळच्या प्रहर दिवसास करवीरकरांची फौज एकवटून रामचंद्रपंताच्या टोळीवर तुटून पडली तेव्हां रामचंद्रपंतांनीं पराकाष्ठेची जवामर्दी करून शत्रूस मागें हटवून हुसकून लाविलें. [खरे, ५८६६]. **मोहरा–हल्ला.** **वकत–**वखत; प्रसंग. ४

**झुंबर लढाई**–तुंबळ लढाई. **हेरून हेराला**–हेरून ईराला, वीराला असें पाहिजे. **दल्लाला**–दळाला; दळाची; दळांत. **जप्तन मुलुख लव्हा केला–**जप्तन-मुलखें (खानें लव्हा केला) तरवार केली. **लव्हा**–मोठी तरवार. (उ०

धरा त्या हुटाला । साहा हत्ती तोफा चौघडा सांपडला ॥ झाली संध्याकाळ दिवस मावळला । • जसन मुलुख दादा पाठीवर चढला ॥ राजाचे लोक मारी हातीं भाला । काळाची मिठी यमानें गांठला ॥ एका पलामधिं धरलें भाऊला । सर्जेरावबापूनें पुढें घेतला ॥ हैबतरावदादा म्हणे भाऊला । हात जोडून शरण ये महाराजाला ॥ काय तरी घडूं नये हा निश्चय ठरला । पुढें बातमी कळविली भाऊ धरून आणला ॥ झाला हुकूम धन्याचा मारा वैऱ्याला । तवा सर्जेराव बापूनें हत्तीवरनें खालीं टाकून दिला ॥ भाऊ पळतांच खाशा भालदारांनीं तोडला । तलवारीचे धारेनें प्राण गेला ॥ धारा तीर्थामधिं जाऊन मिळाला । करा खुशालीच्या तोफा आनंद झाला ॥ भाऊ जोशी अर्जी करी महाराजाला ॥ द्या हुकूम आज्ञा अग्नि भाऊला । भाऊंचीं हाडें पाठविलीं मिरजेला॥ पाणी आणलें बाळासाहेबानें डोळ्याला । दुःखाचे डोंगर उभाळा सुटला ॥ आज भाऊला मारिला सुभा बुडाला । आज बाजू मोडली चिरा ढांसळला ॥ सा सावरून धीर देतो अवघ्याला । महाराज यशवंत धाक मुलुखांत वाजे नौबत यास आलें तरवारीला ॥ आज भाऊ मारिला थोर नक्षा झाला ॥ ५

---

खान लव्हा लव्हा बोलला । खानाचा लव्हा बेगिन आला ॥ ) **हुटाला**– उंटाला. **पाठीवर चढला**–चालून आला, पाठलाग केला. **सर्जेराव बापूनें पुढें घातला**–[ काव्येतिहाससंग्रह पा. ४९८ पत्र नं. ४९१ ] " भाऊसाहेब खाशा घोड्यावर बसले......करवीरकरानी केवळ वेडेपणाच केला." **हत्तीवरनें**–वास्तविक घोड्यावरून. **भाऊ पळताच**–खोटी गोष्ट. भाऊ जखमा लागून जवळ जवळ मेलेलेच होते. मग ते पळतील कसे ? **भाऊ जोशी**– " लढाईनंतर मध्यरात्रीं अतिशय मिनतवारीनें नारो हरीनें भाऊराव जोशी याचे मार्फत वशिला लावून दहनाकरितां भाऊचें प्रेत मिळविलें. करवीरकरांची इच्छा भाऊंना अग्निसंस्कार व्हावा अशी मनापासून नव्हती. [खरे]. **उभाळा**– उमाळा; उभडा. **सुभा बुडाला**–दौलत बुडाली; मुलूख बुडाला. **बाजू**– साहाय्यक. **यास**–यश. **नक्षा**–कीर्ति. ५

भाऊ गर्दीमधिं मिळाला खबर पुण्याला श्रीमंताला। लखोटे पाहिले वाचून ॥ कसें एकाएकीं हरपलें रत्न। नानानें खबर ऐकिली "खुशाली झाली" पत्रिका लिवली अर्जी महाराजास करून ॥ अमृतराव ते गळलें अवसान। पुढें चिंतामणराव भाऊचें सूत्र उतारलें हरिपुरावर चढाई करून ॥ म्होर घाट रोखला शिरोळकरान। केला संग्राम कृष्णातीरीं गोळी अनिवार ॥

---

**गर्दीमधीं मिळाला**–मेला. **गर्द होणें**–धूलीभूत होणें. **नानानें खबर ऐकिली 'खुशाली झाली'**–करवीरकरांनीं जयानंतर खुशाली केली ही खबर नानांनीं ऐकिली. "पत्रें वाचून नानांनीं बहुत खेद केला........बहुत श्रमी जाहले. भाऊसारखे सरदार दौलतीमध्यें कोणी नाहीं. आम्हास हांक मारावयास आतां कोणी नाहीं याप्रमाणें बोलले." [ खरे, प. नं. ५१२७ ]. "राजश्री नानांनीं परम खेद केला.........भाऊ निदानचे सोबती होते. सरकार दौलतीमध्यें मर्दुमीस याप्रमाणें कोणी नव्हते......" [ खरे, पा.५१३० ]. "इतक्यांत सायंकाळची अर्धघटिका दिवस राहिला. मी तेथें जवळच होतों. महाराज प्रेत सोडून पुढें पाव कोस जाऊन बैठक केली तोफांचे बार करवले. साखरा वांटल्या. खुशाली जाहली." [ का. सं. यादी पत्रें वगैरे पा. ४९८ ]. **अमृतराव ते गळले अवसान**–अमृतराव पेशवे त्या वेळीं कारभारांत होते. "श्रीमंत राजश्री अमृतराव कारभारांत आहेत." [ खरे प. नं. ५०३९ ]. **सूत्र उतारले**–शुतर–उंट–सहाव्या चौकांतील हकीकत सर्व बरोबर आहे. खुद्द चिंतामणराव आप्पा साहेब सांगलीकर यांचा वांका पहा. [ खरे, ७३६५ पासून ७३६८ पर्यंत.] "रात्रौ चंद्रोदय जालेवर काल बुधवारीं निघोन ×× कृष्णा, वाडीजवळ उतरून सांगलीस मुक्काम केला. रात्रौ येतांना चिपरीकर व दानोळीकर याणीं बाहेर निघोन गोळ्या व बाण टाकले. रात्रीचा मामला. कांहीं समजेना. चिपरीकरांनीं फारच दाटी करून जामदारखान्याचीं वगैरे उंटें पांच नेलीं. ती॥ मातुश्री रमाबाई मावशी व श्री॥ राजश्री नारायणराव बाबा समागमें इचलकर्जीहून येथें आले. मातुश्री व श्रीमंत समागमें होतीं याजमुळें उंटें सोडावयास गांठ पडली नाहीं. रात्रीचा मामला. अभ्र आलें. याजमुळें कांहीं न समजे, म्हणून उंटें राहिलीं. ती॥ राजश्री आप्पासाहेब यांचें पत्र काल मंगळवारचे तेरखेचें सायंकाळीं तेथें आलें. त्यांणीं

जखमी फार घायाळ झाले जखम्यान। केली दाटी आला वारणा उतरून॥ पुढें कळलें भाऊचें गळलें अवसान। रात्रीचा जात होता पळून॥ चिप्रीवर वाट धरली शिरोळकरान खुब मार दिला गोळ्याचे सोडले बाण। चार हुट खजिना तट सांडवून॥ लष्कर गडबडलें आला चतुर सैन। पाण्यांत नावा ढकलिल्या गलिमान॥ राव कैक बुडून मेले पाण्यांत शिरोळकर आले मागें लुट घेऊन। धनी आडवा उभा माळावर अवघ्यासी देतो बरोबर वांटून॥ फोडलीं सलदें मोडलीं कुलुपें आंत तुरे मोत्याचे रुपये पोशाग सोन। केल्या बक्षिसी खुशालीनें॥ लोकांला, भली मात केली नाईकजी पाटलान॥ पाटी-ला शाबासकी दिली म्हाराजान। राजा करवीराला जाण॥ आपानें केली रवानगी आणा जिते धरून धोंडजी गोखल्याला॥ ६

राजा करविरा निघाला आनंद झाला करा तोफेचा भडिमार। वांटल्या साखरा गुळ्या घरोघर॥ नारी आरती ओंवाळी लोक भेटले बसले तक्तीं

---

इचलकर्जीस राहों नये, कूच करून कृष्णापार होऊन लौकर जावें, लिहिले-वरून काल चंद्रोदयीं निघोन आलों. दानोळीकरांनीं पहाटेचे फारच दाटी करून गोळ्या मारिल्या. बुनगें संभाळून झांजर झांजर आहे तों वारणातीरीं उतारास मागें तोंडावर उभे राहून उतरून आलों. चिपरीस शिराळेचा जमाव कांहीं आला होता त्यांनीं बुनग्यावर दाटी केली हें समजोन तिकडे गेलों तो उंट गांवांत गेले. दिवस असता तर गांव जाळला असता. रात्रीचे गांवांवर कसें जावें? किती जमाव आहे कांहींच समजेना. तेव्हां बाकी राहिलें बुनगें संभाळून आलों. जामदारखाना व माझे पोशाख झाडून गेले. सेवेशीं विदित होय विज्ञापना. [ खुद्द चिंतामणरावाचें पत्र, खरे ६०८७ ] जखम्यान–जखमांनीं (?) **तट सांडवून**–तटाला–काठाला टाकून देऊन पळतां पळतां नदीकांठीं उंट व खजिना सोडून देऊन (?) **गलिमान**–शत्रूनें. **सलदें**–सलिदे मू. श. सलिदा. आपटे याचा अर्थ नुसता उंटावरचें खोगीर असा देतात. सलद–मोठी तिजोरी; मोठी पेटी [ मोल्स.]. ६

**राजा इचलकर्जीला निघाला**–"पट्टणकुडीची लढाई झाल्यावर महाराजांनीं इचलकरंजीस जाऊन वेढा दिला.......इतक्यांत पुण्याहून आपल्या पारिपत्या-

म्हाराज ईश्वर अवतार। सत्तावीस पिढ्या बाच्छायाचेवर॥ राजा इचलकर्जीला निघाला, पाडून करा बरोबर। इचलकर्जीनें केला सल्ला फिरविल्या ढाला खबर शिरोळ नांदणीला॥ किती कमासदार शिरढोन पाडुनी केला चकचुरा। शिरोळचा किल्ला शिव मिरजेवर॥ शिरोळचा बुमट धोशा दुरवर। नाईकजी पाटील धनी सरदार॥ धन्याला मुजरा तक्ताला जोहार। नरहरी पावील उंच दिगांबर॥ लुच्चा त्रगलीचा उतरला नूर। दास मी तुमचा लोळे चरणावर॥ द्या मती मजला उज्ञानाचा सागर। जोतीराम गातो नरहरीचे आगर॥ शिरोळ बाका सवाई सपाटा वाजे डंका धाक पडला मिरजेला। झाला आगम ढोसणी दिली वैऱ्याला॥ ७



करितां फौज रवाना होणार हें नक्की वर्तमान कळल्यावरून: त्यास हें चढावाचें धोरण अजीबात सोडून द्यावें लागलें. आणि इचलकरंजीकरांशीं कसाबसा तह ठरवून त्यांनीं आपली फौज उठवून नेली ” [खरे, ६११३-६११४].

**पाडून करा बरोबर**—जमिनदोस्त. ७

# पट्टणकुडी व कोल्हापुरचे लढाईचा पोवाडा

३५

[ शाहीर—खेमू ओमू ]

**सकी**

आद करवीर तकत थोरजागा, शिवबा राजाचा। दक्षिणेमंदि धनी नांदतो त्रिभुवनीं डंका त्याचा ॥ बोले खेमूबाळ दया हाय करवीर काशीचा ॥

**पोवाडा**

शूरमर्दांची लढाई झाली चढाई गर्दी राजाची तलवार ॥ परशरामभाऊ मोडला पट्टणकुडीवर ॥ ध्रु०॥

आपासाब भाऊचा पुत्र करून मसलत स्वारी करावी दखणेवर। सांपडला आळत्यावर लढाई झाली जोरावर ॥ करविरास घेऊन आले जबरदस्त केले भ्याला आपासाब सरदार। क्रिया घेऊन सोडून दिले धनी महाराज वग्र ॥ सांगलीस गेला सांगे बापाला असे झालें अळत्यावर। आलें इसिम भाऊला बांधला दाली राजावर ॥ श्रीमत बाजीराव लिहून अनभाव धाडला भाऊ-साहेबाला पत्र। घेऊन गेला दलभार उतरला जाऊन पुण्यावर ॥ रास्त्याला

---

चढाई—हल्ला; चाल. गर्दी—नाश; विध्वंस. जबरदस्त—मूळ जेरदस्त किंवा जेरजप्त पाहिजे. अशीच चूक पानपतच्या पहिल्या पोवाड्यांत झाली आहे. क्रिया—वचन. "...त्या समयीं आपली दाली गेली आहे ती द्यावी म्हणून विनंति केल्यावरून (करवीरकर महाराजांनीं) दाली दिली. त्यावेळीं रामचंद्ररावांनीं आजपासून राजमंडळावर तरवार धरणार नाहीं व वडिलांस (परशुरामभाऊस) येऊं देणार नाहीं अशी क्रिया बेलभंडारा देऊन महाराजांच्या पायांवर हात ठेविला" [को. क. प्रा रा. इ० उत्तरार्ध भा. १, ९७]. पण ही खोटी गोष्ट आहे. आळत्याच्या लढाईचा पोवाडा पहा, महाराज—महाराजं; महाराजानें. वग्र—अवग्र. **अवग्र**—सर्व, यथास्थित, इत्थंभूत. अवग्र हा शब्द नागपूरकर भोसल्यांच्या बखरींत अनेक वेळां आला आहे. इसिम—इशीम—योग्य अभिमान [मोल्स]. ईर्षा. **अनभाव**—मूळ शब्द अजमाव असा पाहिजे. **अजमाव**—

जमाने क्रिया केले फार। झाला मोकळा भाऊसाहेब आला भाईर ।। इमान भाक देऊन स्वारी केला गडावर। नाना फडणीस लिहून अंतूसं धाडला करविरास पत्र ।। म्हाराजाचें सैन बडविला दैन सांगलीवर ।। शूर०।। १

आला सातारी महाराज घेऊन फौज, पाठी लागले दुरवर ।। भाऊसाहेब उतरला करनाटकासमोर ।। नाहीं पेशव्यास मानला, गैर बुद्ध केला । उठविला चहूंकडे दलभार ।। महाराजाचा मुलुख बडविला तुंगभद्रेपातूर। कांहीं आला सर करीत, ठाणे घालींत उतरला येवून चिकोडीवर ।। उठले पेंढारी दखणचे वळूं लागले गुर ।। श्रीमंत म्हाराज घेऊन फौज असे फिरे बातमीवर। ठांई ठांई नित लढाई होई आठोपार ।। दोन लाख लष्कर भाऊसाहेबाचे दलभार । बुणुगबाजार लष्कर उतरे तीन कोसावर ।। आरब लोक हबशी ऐका शिपाय सनदी न्यार। जरीपटक्याचा धनी अघाडी आपा कीं लिपाणकर ।। नाहीं

---

अजमास. **जमानें क्रिया केलें फार**–मू. श. जमान (अरबी पु) जबाबदार; हमीदार; जामीन. "रास्त्यांच्या रदबदलीनें व दरम्यानगिरीनें परशराम-भाऊची मांडवगडावरून सुटका झाली." **झाला मोकळा भाऊसाहेब**–मांडवगडाहून परशुरामभाऊंची बाजीराव पेशव्याच्या अटकेंतून सुटका झाली त्यास अनुलक्षून. **अंतूस**–(?) अंतस्थ तर नव्हे? **दैन**–दैत्य (?) १

**गैरबुद्ध केला**–कुविचार, अविचार केला. **वळूं लागले गुर**–"तिकडील पेंढारी यांनीं तमदलगे, शहापूर तारदाळ वगैरे गांवचीं गुरें बहूत नेलीं." [खरे, ६०१७.]. **नित**–नित्य. **आठोपार**–आठ प्रहर. भावार्थ हरघडी. **बुणुग बाजार**–बाजारबुणगे. **सनदी शिपाई**–याचा बरोबर अर्थ लागत नाहीं. हा शब्द मोडककृत कोल्हापूरच्या इतिहासांत आलेला आहे. "ठाण्यांत जे सनदी वगैरे लोक होते त्यांत दोघे भाऊ मोठे शूर शिपाई होते." [पा. ७२] यावरून सनदी शिपाई म्हणजे मातबर किंवा वरिष्ठ प्रतीचे एकांड्यासारखे सैनिक असावेत. कोशांत हा शब्द सांपडत नाहीं. **न्यार**–न्यारे; विशेष. **लिपाणकर**–निपाणकर, आपा देसाई निपाणकर. हा अतिशय शूर परंतु तसाच क्रूर पुरुष होता. हा मूळ कोल्हापूरकराजवळ होता. पण तेथून भांडून परशुरामभाऊस मिळाला.

दरकार भाऊला भ्ररांत केला येऊन, घडलें होणार। मुहुर्त पाहून डेरे दिला पट्टणकुडीवर शूर०॥ २

आले क्रोध महाराजाला तयारी केला स्वारी करावी भाऊवर ॥ मानकन्यासी पत्र धाडला जमले शार्दूळ वीर ॥ आले सत्तावीस गडकरी झाले तयारी पंत विशाळ बावडेकर। यादव जाधव भोंसले खानवटकर ॥ आले नारोजीबा घोरपडे वाजे चौघडे सैनापति कापशीकर। चतुरशिंग राजा रत्नागिरी हिंमत बाहादूर ॥ आला राजबा तात्या खेर लिंबाळकर। सरनोपत दादा सरदार ॥ गोविंदराव कोकऱ्या चिटणीस फडणीस फलटणकर। आले दौलतराव इश्वासराव दिनकरराव चवाण हैबतराव वग्र ॥ शामजी घाटगा मानासिंग बावा पाटणकर। आला आबासाहेब बागल खानवटकर॥ भले रेखोजी बाणाईक हुजर। बाबुराव भोंसले सुभानबा बोडक्या दिलदार॥ भलेभले सरदार खासबारदार शिपाय बाहादूर रणनवरे। धुडगांवकर नलवडे शेंडूरकर मामा वग्र ॥ जनबा काका भला जाहीर सैनेला, रघुनाथ मान्या हंबीर। मानोजी भाऊ जगदाळे बेडकीहाळकर बाबा रणवीर ॥ इट्या पट्याचे झोंक कानडे लोक, बाळासाहेब तोरगलकर। रणबाजा राऊत कडाकी नागवी हत्यार ॥ आपासाहेब घाडगे तयाची कमान जोरावर। पांचशें फौज सवाशें पेंढार अग्नीसार ॥ आंडगर बंडगर झेंड्या धनगर सहदेव सरदार। पांढऱ्या कैदम लोकांच्या आणखी सपकर ॥ बापूसाहेब सर्जेराव गरजतें

---

याचें नांव शिधोजीराव. [याचें चरित्र को. क. प्रां. रा.इ. उत्तरार्ध भा. २ पा. १८७-१९५ वर पहा.]. २

भ्ररांत–मू. श. भ्रांत असावा. भ्रांत–Perplexed Confused Bewildered. [मोल्स.]. विशाळ–विशाळगडकर पंत. **नारोजीबा घोरपडे**–नारायणराव घोरपडे सेनापति. **रत्नागिरी**–रत्नाकर आप्पा. **इट्या पट्याचे झोंक कानडे लोक**–इट्यानें आणि पट्यानें लढणारे कानडे शिपाई. **कमान**–धनुष्य; कमठा. **अग्नीसार**–अग्निसमान. **झेंड्या**–झेंडे, आडनांव आहे.

नांव दलामधिं त्याची तलवार। जरीपटक्याचा धनी सवाई खंबीर कागलकर ॥ शूर० ॥ ३

असे बाराशें उमराव जमले राव निघाले बांधून कंबर। चालले दलबार जसे काय राम लंकेवर ॥ दिसे फौजेचे भार देव अवतार उतारले हमद्या वाड्यावर। दिसे पांढरें फेक चौहूंकडे भाऊचें लष्कर ॥ करूं लागले मसलत बसून डेऱ्यांत मिळून „महाराज मानकरी सार। नव्हती भाऊची वळीख धराय करीत मजकूर ॥ धनी महाराज बोलले विडे मांडले ठेवले पैजेनें म्होर। कोण धरील भाऊला भदरगड किल्ला देईन खर। सर्जेराव बापूसाहेब विडा उचलला पर ॥ तिनदा गेला सपा घालाया भाऊसाहेबावर। फिरले माघारी फौजा कोण पाय घेईना म्होर ॥ आला राजाला क्रोध महाराज बोले हिनवून फार। कळली तुमची किंमत लढाईची हिंमत, खावून बुडविला जागीर ॥ घ्या हातामधि कांकण घालून चला जाऊं माघार ॥ शूर० ॥ ४

---

सहदेव–सखदेव तर नव्हे (?) कैदम लोकांड्या आणि सपकर–कदम, लोखंडे आणि सापकर (?). ३

दलबार–दळभार. उतारले–“अखेरीस महाराज हिय्या करून ता. २ सप्टेंबर रोजीं वेदगंगा उतरून पलीकडे गेले.” [खरे, ५८६४.]. पांढरे फेक–पांढरें फिकट; विवर्ण. भावार्थ भीतीनें विवर्ण झालेले. भाऊंच्या लष्करांत फितूर होता. [का. सं. पत्रें यादी पा. ४९७.]. पैक्याकरितां शिलेदारांची धरणीं पारणीं चाललीं होतीं व शिलेदार उठून जात होते. [खरे.]. वळीख–ओळख. धराय–धरावयाचा. मजकूर–मसलत. भदरगड किल्ला देइन खर–नारो हरि करंदीकर म्हणतो कीं, घाटगे यांनीं “परशुरामभाऊंस आपण पाडाव करून आणलें म्हणून कोल्हापूरकर महाराजांस खोटें सांगितलें व बक्षिसीची आड घालून भूधरगडच्या किल्याची सनद घेतली इ०” [को. इ. सं. पत्रें यादी पा. ४९१.]. सपा–छपा किंवा छापा याचा अपभ्रंश दिसतो. खावुन बुडविला जागीर–फुकट जहागिर खाल्लीत. ४

एवढें ऐकूनशिनया गले क्रोध चढले केले 'मंगळवार मजकूर । झाले नगारा तयार तोफा 'भाऊसाहेबावर ।। जसे अग्नीचे कोट चालले थट धरून दोही बाजूनें फर । आले चढाई करून तंवदी डोंगरा समोर ।। भुल पडली भाऊसाहेबाला हुकूम नाहीं झाला बिनआधारी लष्कर । सोकट्याच्या खेळामंदी गुंतला वग्र ।। असे राजाचे उमराव घातले घाव, रगडले अवचित डेऱ्यावर । तेव्हां भाऊला उमज पडला गडबडलें लष्कर ।। मग स्वार झाला भाऊसाहेब चडला घोड्यावर । श्यामजी घाटगे बापूसाहेब कागलकर ।। केली दोघांनीं लगट जाऊन धरले घोड्यावर । राजापाशीं घेऊन आले डेऱ्यासुमार ।। धनी महाराज बोलला "नको दृष्टीला जीव मारा नेहून दूर" । दवलतराव विश्वासराव तोडून केले चूर ।। शूर० ।। ५

असे लढाई झाली पर खवळले ईर । झमाझम झमकली तरवार ।। बकऱ्या-बाणी मुडदे पडले भले भले सरदार । झाला पांढऱ्या ठार छाती मंदि पार मारला भाला निपाणकर ।। जरीपटक्यासहित उडाला नाहीं गावला बहादूर ।

---

ऐकून शिनया–ऐकूनशानी. क्रोध चढले–क्रोधा चढले. थट–जमाव. फर–फरे. मू. श. फरा–बाजू; फळी; रांग. तंवदी–डोंगराचें नांव (?) का तंवदी म्हणजे ते दिवशीं (?) सोकट्याचा इ०–ही आजपर्यंत चालत आलेली सर्वमान्य दंतकथा! ऐतिहासिक कागदपत्रांत तिला यत्किंचितहि आधार नाहीं. पटवर्धन सरदाराबद्दल हरि.वं.बखरींत मात्र अशाच एक दोन गोष्टी आहेत. वग्र–व्यग्र या शब्दाचा अपभ्रंश दिसतो. रगडले–रगडून पडले; हल्ला करून आले. बापूसाहेब कागलकर–नारो हरी करंदीकर आपल्या हकीकतींत हैबतराव गाइकवाड व सुभानराव बागुल यांचीं नांवें देतो. जीव मारा–जीवें मारा. ५

ईर–धीर. झाला पांढऱ्या ठार–"मालोजी पांढरे......व घोडी दहा-पांच पडली." [खरे, प. नं. ५०९०.]. (२) "करवीरकरांकडील धुळोजी पांढरे हे १००-१५० घोडयांचे सरदार होते. ते ठार जहाले." [नारो हरीचें पत्र]. [को. सं. इ. पत्रे यादी. पत्रांक ४९१ पा. ४९७.]. "पेशजी (पूर्वी कृष्णकुडीच्या लढाईंत) पांढरे यांची गत निपाणकरांनीं केली. त्या अन्वयेंच

नाहीं समयाला कोणी पळाला धनी आपासाब भाऊचा पुत्र ॥ नाहीं कवणाचे खबर कवणाला, झाले गळाठा सार । दोन लाख भाऊचा दल हात जोडले गाई परमान चारा धर ॥ शिपाई खासे राहिले निस टाकून हत्यार । सांपडला भाऊचा खजिना लुटाव केले सार ॥ हुट सांबार कोणी पुसेना झालें दळिंदर दूर । निघाले महाराज खुशाली झाले मानकरी सार ॥ उतरले जाऊन ठिकाणा हामद्यावाड्यावर । त्याचा मान त्याला राजानें दिला, केला बापूसाहेब प्यार ॥ गडाबद्दल पांच गांव दिलें वाळवें खर ॥ शूर०॥ ६

---

घोरपडे यांचें पथक पेंढारी यांणी बसवून दिले." [खरे, ६२३१.]. **निपाण-कर**-निपाणकरें; निपाणकरानें. जरिपटक्यासहित उडाला इ०-तेव्हां पूर्व बाजूस पांढरे यांचें पथक होतें व तें उत्तर बाजूनें पुढें सरसावलें आणि लढाईस आरंभ केला पटवर्धनांनीं सपाट्यासरशीं तोफांचा भडिमार सुरू केला; यामुळें महाराजांकडील लोकांची एकच धांदल उडून गेली. निशाणाच्या हत्तीवर चढाई करून त्यांस घेरलें; पांढरे यांजकडील पांच सात सरदार ठार झाले." (२) "प्रथम पांढरे यांजकडील निशाणाचा हत्ती शत्रूंनीं घेरला होता, त्या ठिकाणीं लगट करून मोठ्या आवेशानें शत्रूच्या फौजेवर जाऊन पडले. असा हल्ला केल्यास बचाव करण्याची पटवर्धनांची तयारी नव्हती. महाराजांच्या लोकांनीं निशाणाचा हत्ती सोडवून घेऊन शत्रूच्या फौजेचा मोड केला." [को. क. सं. इ. उत्तरार्ध भा. १ पा. १११.]. **गळाठा**-गोंधळ. **दोन लाख भाऊचा दल**-अतिशयोक्ति. "मोहिमेच्या भर उमेदींत त्यांचें सैन्य पंचवीस हजार होतें. त्याची संख्या आतां सुमारें ५००० स्वार, दीड दोन हजार पायदळ व दोन तोफा एवढीच राहिली होती. महाराजांचें सैन्यहि इतकेंच किंबहुना हजार पांचशांनीं कमीच असावें." [खरे, ५८६४]. **गाई परमान चारा धर**-गाईप्रमाणें दीन झाले, व दांतीं तृण धरून ते शरण आले असें शाहीरास म्हणावयाचें आहे. **निस**-निसत असा मू. श. असावा, निसत ad.Shameless, Graceless,abandond [मोल्स.]. **लुटाव केले**-लुटले. लुटावें असें केलें. **हुट**-उंट. **सांबार**-संभार (?) **दळिंदर**-दळिद्र; दारिद्र्य. **त्याचा मान त्याला**-ज्याचा मान त्याला. ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें मानमरातब दिला. ६

आला यशवंत महाराज घेऊन फौज डंका वाजे बिन्नी होर । अंबाबाईला दर्शन केलें यशासूर कैरविर ।। भल्यानें जाऊं नये तक्तावरी दखणचे शिरीं शिवशक्तीचें आदघर। मीपण करून भाऊ बुडाला नाहीं चढला हत्यार ।। त्याच्या मागनें क्षेतर भाऊचा पुतुर आपासाहेब केला राजाला । तीन महिने वेढा घातला कंपूचें लष्कर ।। नाहीं मुंगीला रिघाव तोफा भोंवत्या भोर–। जसे मेघाची फळी, मांडली गर्दी दखणेवर ।। धनी महाराज पार झाले पन्हाळ गडावर । बुणगे बाजार लढूं लागले बंदुकीबारदार।। आपासाहेब भला पैज बोलला आतां घेतों कोलापूर । पंचगंगेला माती मिळवितों दांत खाई करकर ।। शूर०।। ७

गड उतरून आले खाल, घेतले चाल रगडलें घोडीं कंपूवर । दौलतराव विश्वासराव रणभैरी भादूर ।। पाठी लागली फौज, मारली झुज गर्दी झाली दोघांवर । लागल्या जखमा दौलतराव झाला जेर ।। काय शिरलें दलामधिं बाघ, हातामधिं सांग, विश्वासराव रणनवर । पडली फौजेची मिठी तयाला जित धरले हो पर ।। सांग आमुच्या भाऊला कोण तोडला पुसे आपासाहेब सरदार । बोले विश्वासराव आम्ही मारलों तलवार ।। कापले राव गळा विश्वासराव झाला ठार । महाराजाला वर्दी लागली पन्हाळगडावर ।। खबर ऐकतां प्राण सोडला दौलतराव थोर । धनी महाराज दुक्षी झाले काय वदले

---

यशासूर–हा 'यशश्वरी' सारखाच शब्दप्रयोग होय. यशासूर–म्ह० यशस्वी. मीपण–गर्व. नाहीं चढला हत्यार–हत्यार हा हत्यारा (हिं.) चा अपभ्रंश दिसतो. हत्यारा–खुनी, नीच इ० क्षेतर–क्षेत्र; रणसंग्राम. पुतुर–पुत्र. भोर–काळीभोर, गर्द. ७

रणभैरी–रणबहिरी. भादुर–बहादुर. सांग–एक तऱ्हेचें हत्यार. मारलों–मारली. कापलें–कापला. मोडककृत कोल्हापूरच्या इतिहासांत विश्वासरावास कानांत व नाकांत दारू भरून उडवून मारिलें असें लिहिलें आहे तें चूक आहे.

इंबीर ॥ आला हैबतराव, धांवून पालकीतनें मुडदे न्हेला गडावर । सायासानें आगीन दिले माहाराज मानकरी सार ॥ शूर० ॥ ८

कोलापूर जायाचे मजकुर आले चढाई केले वेढले कंपूचें लष्कर । नाहीं कवणाचे कटाव दखनेला पडले अगोचर ॥ जरीपटके गादीचे धनी सर्जेराव गुणी तयांनीं केला मनसोबा खर । हिंदुस्थानामधिं पावणे शिंदे होळकर खंबीर ॥ दिला राजानें तोडा सातशे घोडा गेला बापूसाहेब वग्र । दो दिसांमधिं आलें कंपूला शिंद्याचें पत्र ॥ आपासाब वाचुनी पाहिला. मनामधिं भ्याला दिसालें धरायचें मजकूर । रातोरात पळून गेला सोडून कोलापूर ॥ करावरामधिं धनी महाराज आले सत्वर । हिरा लावले तुरा अवघे मानकरीं सार ॥ येस घेऊन आला बापूसाहेब कागलकर । होती गैबीची दया विघ्न कांपती थरथर ॥ बेडकीहाळ किल्ला आखाडा भला शिवबा राजाचें जहागीर ॥ खेमू ओमू केला पवाडा बाळक हाई नेणार ॥ शुरमर्दांची० ॥ ९



---

[को. क. प्रां. रा. व सं. यांचा इ. उत्तरार्ध पा. ११९.]. दुक्षी–दुःखी मुडदे–मुडदा. ८

मजकूर–प्रसंग. कटाव–येथें कटावचा अर्थ सैन्य, जमाव असा दिसतो. दक्षिणेमध्यें आपणाला मदत करील असें कोणाचें सैन्य नाहीं अशी कोल्हापूरकरांना भीति पडली. अगोचर–अगाध; अवघड. जरीपटके गादीचे... सर्जेराव गुणी इ०–[को. व क. प्रां. रा. व सं. यांचा इ. उत्तरार्ध भा. १ पा. १२१ ते १२४.]. हिरा–शिरा (?) नेणार–अज्ञान. हा शब्द सगनभाऊकृत पाणिपतचे पोवाड्याचे शेवटीं आला आहे. "गादीवर स्थापिले माधवराव नेणार." ९

# कंपूचा पोवाडा

## ३६

### [ शाहीर–सुलताना पाटील ]

करविर किल्ला बहु रंगेला पंचगंगेच्या हाय तीरीं। महा तीर्थांची महिमा सांगतो गाजति तीर्थ भारी ॥

गणपतीचें स्मरण करितां परसन हो दत्तात्तरी। काशीविश्वेश्वरनाथ बसले ते रथावरी ॥ अंबाबाई नांदे सवाई त्रिशूळ घेऊन करी। दैत्यावर करते फेरी ॥ बाबुजमाल किल्ल्यांत झुले रंकनाथ आणि भयरी। आई कळंब्याची लक्ष्मी आणि कत्यानी धांवा करी ॥ फिरंगाबाय आणि महांकाली दोघी बसल्या शेजारी। आईतवारांत यमाबाय तिथें मग नांदे एकवीरी ॥ टेंबलाबाय आणि घुंतनी धाव धावण्या धारकरी। सावेजणी बहिणी मिळूनी शिंग्राचे कोटकरी ॥ गलीमाचा गोळा चालला जातो यो वरच्यावरी। निशाण पांढरें बुरजावरी ॥ गैबीचा मारा भारी। मंगळवारामधिं लिजामअली घोडपिराची खडी स्वारी ॥ करविर० ॥ १

---

रंगेला–रगेला पाहिजे. रगेला–जोरदार; मस्त [ पट.] महिमा–शब्द स्त्रीलिंगी वापरला आहे. गाजति तीर्थ भारी–अनेक तीर्थे आहेत अशी ख्याति आहे. गणपतीचें स्मरण करतां परसन हो दत्तात्तरी–" दत्तात्रेय विठोबा, काशीविश्वेश्वर, राम आणि राधाकृष्ण यांचीं देवळें अंबाबाईच्या मुख्य देवळाच्या प्राकारांतच आहेत [ कोल्हापूर गॅझेट.]. काशीविश्वेश्वरनाथ–मंगळवार पेठेंतील विठोबाचे देवळाशेजारीं विश्वेश्वराचें देऊळ आहे. [ भा. इ. सं मं. ष. सं. वृ. पान २०० ]. फेरी करणें–हल्ला करणें. बाबूजमाल–बाबू जमालचा दरगा [ को. क. प्रा. रा सं. इं. उत्तरार्ध पा. १२६]. कत्यानी–कात्यायनी [ खरे, ६२७७ ]. फिरंगाबाय–फिरंगाई, मूळ नांव प्रत्यंगिरा. हिचें देवालय जितीच्या ओढयाजवळ आहे. [ खरे, ६२७८ ]. महाकाळी-[ खरे, ६२७५ ]. " हें देऊळ नवीन बुधवार पेठेंत आहे." [ कोल्हापूर गॅझेटियर]. टेंबलाय–टेंबलाई–त्र्यंबुलाई. गैबी–गैबीची खिंड प्रसिद्ध आहे.

रावणेश्वर तीर्थ थोर ।किल्ला आहे पाण्यावरी। काय सांगूं हवागिरी ॥ रंकाळें आणि पद्माळें दोनी तळीं तीं बरोबरी। शिंग्याळें पेटाळें टाकाळें नागराळें राहिलें दुरी ॥ कोटतीर्थावर गलीम आला उभी राहिली येवून स्वारी। जितीस जाया रिघाव नाहीं आलों बा म्हणंती पेंढारी ॥ वरुण-तीर्थाचें पाणी पितांना कंटाळा हो आला भारी। संध्या मठापाठीं आंगोळ करून जाऊन बसले क्षणभरी ॥ मग बसव्याचें दर्शन घेतां जातो तो पाण्या-वरी। रंकाळ्याचें पाणी पितांना कंटाळा आला हो भारी ॥ करविर० ॥ २

अवघीं तीर्थें करूनशानें मग आलों केसापुरी। उजवी घालून हो नगरी। खंडेराव हैबती बसले तेबि नांदे तळघरीं। विठोबा बुरुजावरी ॥ थळवेताळ आणि पांढर घर आंगीचें भवसरी। गरीबाचीं माणसें भारी ॥ जिकडे हल्ला तिकडे टोला दारें हैत चौफेरी। क्षण एक नाहीं उशीरी ॥ घोडे राउत एकदां निघाले दोनी करिती बरोबरी। पाहून हो कांपे वैरी ॥ लष्करामधिं धाक पडला शाई झाली घाबरी। पुण्यास हो गेल्या खबरी ॥ करविर०॥ ३

एक वर्सानें आंगोळ करावी तिथली महिमा हाय भारी। उत्तरेश्वराचें दर्शन घेतां जाऊन पाहिलीं मछिंद्री ॥ चिटकोबाची खडी पायरी बसला तो माळावरी। शिंगणापुरीं हटकीश्वरी तो बा नांदे जळचरीं ॥ पान्यावडापाशीं

---

हवागिरी-(?) पद्माळे-[ खरे, ६३५६]. जितीस-जितीच्या ओढयास (जयंती-जिती) वरुण तीर्थ-[ खरे, ६३५२]. संध्या मठापाशीं इ०-"त्या दिवसांत ते (राजाज्ञा) गंगावेशीनजीक पिशवीकरांच्या वाडयांत स्नानसंध्या व भोजन उरकून मोर्चांत स्वतः जातीनें जाऊन बसत." [खरे, ६७६५]. २

खंडेराव हैबती बसले तेबि नांदे तळघरीं-हीं गुंफावजा देवळें आहेत. विठोबा बुरुजावरी-विठोबाचें देऊळ हें पद्माळ्याजवळ म्हणजे मंगळवारचे वेशीजवळ आहे. जिकडे हल्ला तिकडे टोला दारें हैत चौफेरी-टोला दारे-तोलदार. ज्या ज्या बाजूनें हल्ला होई त्या त्या बाजूला तोलदार लोक होते. हैत-आहेत. चौफेरी-चारी बाजूंला. ३

उत्तरेश्वर-[ खरे, ६२७६ ]. मछिंद्री-दुधारे वावरांत गणपतीचे बेबीस

संगम निघाला महिमा आहे भारी। एक वर्सानें आंगोळ करावी तियली महिमा हाय भारी ॥ वरिंग्यांत ईश्वरनाथ बसले ते नंदीवरी। आई पार्वती महाशक्ती किल्लयाची चिंता करी ॥ वीर हणमंत दोई तोंड्या तो रघुवीरी। कैकाळाचें धाक नाहीं अवघीं बिघ्नें नीवारी ॥ महा तर्थाची महिमा सांगतो गाजति तीर्थ भारी ॥ करविर०॥ ४

धनी केदार दखनेवर तेनी लाविली नदर। करतो किल्ल्याची फिकीर ॥ तिरीथ अंगारा हमेश येतो घाडिलेही चौघे स्वार। एक इळाची येरझार ॥ दाणेखिंडीचा आला म्हसोबा अष्टकोट देव सार। ठाईठाई चवक्या पार ॥ छपन्न कोटी चवडाबाई तेलंग आणि मोहूर। हालावले हो मुळघर ॥ ते कृपाळ क्षेत्रीपाळ होऊनशान तयार। काळभैरी साऱ्या म्होर ॥ बाजे डंका सवाई ठोका गस्त हिंडे चौफेरी। अंबाबाईची सरदारी ॥ करविर०॥ ५

तवां कंपूनें कटाव केला मोरचे आले म्होरे म्होरे। बनपुरीपाशीं डेरे ॥ शुक्रवारामाधिं येऊन शिरले पेठ धरली शनवार। तोफा वोढिल्या बाहेर ॥ फत्या बुरजाला मार लाविला ढांसळती त्याचे चिर। भिताड केलें बरोबर ॥

---

पाणी लागलें म्हणजे मछिंद्री झाली [शितूत]. शिंगणापूर–करवीरचे पश्चिमेस एक कोस [खरे, ६२९३]. तो बा नांदे जळचरी–जळचर हें विशेषण रामचंद्रपंताबरोबर गेलेल्या फिरंगी कंपूसंबंधीं असावें. शिंगणापुरावर व हटकीश्वरावर जळचरांचा–कंपूचा तळ पडला होता (?) कैकाळाचे–कळिकाळाचे(?) ४

फिकीर–काळजी. तिरीथ–तीर्थ. अष्टकोट–आटोकाट; सर्व. क्षेत्रपाळ–क्षेत्राचें रक्षण करणाऱ्या देवता. ५

कंपू–शिंद्यांचीं कवाइती पलटणें. कटाव–जमाव; तयारी. बनपुरी–ब्रह्मपुरी; "करवीरच्या उत्तरेस बनपुरीनजीक रामचंद्रपंतानीं पॅलटणांकडून पहिला मोर्चा बांधविला......बनपुरीसच ब्रह्मपुरी हें आणखी एक नांव आहे." [खरे, ६२५२.]. भिताड केलें बरोबर–भिताड जमीनदोस्त केलें. "इकडे

बारा तास बत्तीस घडया खिणी एक नाहीं उशीर। होतो गोळ्याचा भडि-
मार ॥ तवां आपाला म्हाराजाची ताकीद येती वरवर। असावें खबरदार ॥
खुब जुर्तीनें किल्ला राखावा हें पूर्वीचें आदघर। पन्हाळ्याचा आधार ॥
दारूगोळीला गणता नाहीं कुमक येती वरवर। लोक भोंवतेनें चौफेर ॥
करविर०॥ ६

शुक्रवारामधिं तोफा लाविल्या नेहून हो चावडी म्होर। झाला धुराचा
भंकार ॥ डोईवरनें बाण चालेना तेव्हां दिसेना काय म्होर। लोक म्हणती
तटावयानें आतली गोळी क्षिणभर ॥ राहिला किल्ला झाला थंडगार। आडा

---

पानशांच्या मोर्च्यांतून तोफांचा मारा एकसारखा चालू होता. तो इतका परिणामकारक झाला कीं, मार्च महिन्याच्या १०-१२ तारखा होतात तोंच दोनशें हात तट जमीनदोस्त होऊन तेथें मोठें खिंडार पडलें." [ खरे, ६२५५.]. **बारा तास बत्तीस घडया खिणी एक नाहीं उशीर**-खिणी-क्षण. उशीर-अवकाश; अंतर. क्षणभरहि उसंत न घेतां तोफांचा मारा चालू होता. **आपाला ताकिद येती इ०**-आपाला-रत्नाकर आपाला. कोल्हापूरच्या कोटाच्या रक्षणाचें काम रत्नाकरआप्पाकडे देऊन महाराज पन्हाळ्यास गेले होते. [ को. क. प्रां. रा. सं. इ. उत्तरार्ध पा. ११५-११६]. "त्या ठिकाणीं राजाज्ञ व उमदेतुल उमराव यांस महाराजांनीं आज्ञा केली कीं, प्राणापरती मेहनत करून किल्ला रक्षण करावा. शत्रूच्या हातीं जाऊं नये." [ को. क. प्रां. रा. सं. उत्तरार्ध पा. ११६.]. **जुर्तीनें**-जुरत (आ. स्त्री.) धैर्य; शौर्य. **आदघर**-आदिघर; आदिस्थान. पुराणप्रसिद्ध क्षेत्र. ६

**डोईवरनें बाण चालेना तेव्हां दिसेना काय म्होर**-डोईवरनें बाण चाले अन् तेव्हां दिसेना काय (काहीं) म्होर.(?) **तटावयनें आतली गोळी क्षिण-भर इ०**-लोक म्हणती तटावरनें (किंवा तटावरले) आंतली गोळी क्षिण, भर राहिला, किल्ला झाला थंडगार-किल्ल्यांतील दारूगोळा संपून गेली आणि आंतील लोकांचा भर म्ह० उमेद खचली. **आडा**-आडीस; अडावणीस; प्रतिबंध करण्याला [ आपटे ]. २. आडी-शंका [ आपटे ]. आंतील लोकांचे हाल होऊं लागल्यामुळें ते बेदील झाले व आडीस आले. " किल्ल्यांतून एक माणूस आला.

हो जमले सार ॥ रत्नाकर आपा होते गंगेच्या वेशी म्होर। नामी नामी सरदार ॥ काय बघतां दादानों विघ्नें आलीं व्हा म्होर। चाल द्यावी सैनेवर ॥ राजमंडळीचें माणूस सारें पूर्वीचें वतनदार। वेशीला बांधून हो शीर ॥ करविर०॥ ७

शिंपण्या दिवशीं हल्ला नेमिली कंपु झाले तयार। हालावलें हो सैन सार ॥ तवां भाऊचा लेक म्हणतो पेंढाऱ्यासी व्हार म्होर। भोंवतेनें वेढा शाहार ॥ कुरुंदवाडकर दादासाहेब चिंतामणराव मिरजकर। तेनी धरला सवता घोर ॥ दोन शिडया हो म्होरे आल्या निशाण हो त्येचावर। संगे कंपूचा सरदार ॥ दोही तोंडानें हल्ला चालली बाजा वाजाति व्हलेर। आले खंदकाच्या शेजार ॥ करविर०॥ ८

शिडीवर लोक आले कुणी नाहीं गेले माघार। ते पडले खंदकावर ॥

---

त्याचे जबानी आंतील लोकांचें म्हणणें, 'आम्ही किती दिवस तवाई सोसावी? याउपर बाहेर पडोन मोर्चे उधळतों नाहीं तर त्यास पालवून शहरांत घेतों'. तेव्हां रत्नाकरआप्पा याणी सांगितलें कीं दम धरणें. चार रोजांत तह होऊन उलगडा पडेल, नाहीं तर तुम्हास कळेल तैसें करणें." [खरे, ६२७७]. **चाल द्यावी**–हल्ला द्यावी;चाल करावी. **राजमंडळीचें**–राजमंडळकरांचे;करवरिकरांचें. **सारे पूर्वीचे वतनदार**–सनदी अर्थात् नांवाचे नामांकित अम्रूदार. **वेशीला बांधून हो शीर**–याचा अर्थ हातावर शिर घेऊन असा असावासें दिसतें. **वेशीला बांधणें**–जाहीर करणें [मोल्स.]. यावरून आम्ही तळहातावर शिर घेऊन लढूं अशा सरदार लोकांनीं जाहीर प्रतिज्ञा केल्या असा अर्थ दिसतो. ७

**शिंपण्या दिवशीं**–शिंपणें–रंगपंचमी; होळीच्या शेवटच्या दिवशींची गुलालफेंक किंवा धूळफेंक [मोल्स.]. **तेनी धरला सवता घोर**–सवता–निराळा; पृथक्. घोर–भयंकर घनचक्कर; हल्ला. कुरुंदवाडकर, चिंतामणराव वगैरे लोकांनीं फार जोराचा, 'सवता', विशेष, निराळा हल्ला केला. २ वरील लोकांनीं दुसऱ्या बाजूनें लढाईस तोंड लावलें. **व्हलेर**–होलारचा अपभ्रंश **होलार**–वाजंत्री [मोल्स.]. ८

**बाजिबा रेवणकर**–"... कुसवास शिड्या लावून हल्ला करण्यास पलटणाचे

साडेचारशें माणूस ठार झालें हो जाग्यावरी। अशी लष्करांत हो खबरी॥ तवां भाऊचा लेक म्हणतो बुडालें देवा घर। फौजेचा तुटला धर॥ निपाणकर आपा पुढलें सांगित होता होणार। हल्ला नका करूं किल्ल्यावर॥ रेवणकर बाजिबा चालून गेला बुरुजावर। तोफ वोढिली त्यानें म्होर॥ तोफेच्चे तोंडीं दिली रेजगिरी म्हणे पेटवा लौकर॥ मारले कंपू फार फिरली हल्ला धर तुटला पळूं लागली माघारी। कैग टांगडया वर करी॥ करविर०॥ ९

महाराजाचे लोक नेमाचे शिपाय हो सरदार। येक येक उठला महावीर॥ खंडेराव भोंसले शिपाई हो सरदार मानोळकर। किल्ल्यांत हो सावध फार॥ विजापूर वेशीला मुंजापादाजी हिंमतबहादूर। निघाली हो त्याची समशेर॥ खानवीलकर दादा, त्याच्या संगें तोरगलकर। निवडली सवती धार॥ बेडकीहाळकर बाबा, होऊन आले तयार। बाजा वाजती व्हलेर॥ करविर०॥ १०

तवां आपानें ताकीद केली शहरांमधिं घरोघर। होऊन यावें तयार॥ साकोळीला सुरंग लागला कोणी वेळेचा त्यो थर। आंत ओढलें तळें सार॥ ढोरेंगुरें पाणी प्यालीं अवघीं सारीं जनावरं। नगरी झाली थंडगार॥ दाणापाणी खावुनशानें सावध झाली हो नगरी। वैऱ्यावर ठोका मारी॥ करविर०॥ ११

---

लोक चढूं लागले तेव्हां चणे चोरटीचे बुरुजावर बाजीराव कृष्ण रेणावीकर व बंदुकबारदार लोक होते." [को. व क. प्रां. रा. व सं. यां. इ. उत्तरार्ध, पान १२२]. रेजगिरी–रंजक. टांगडया–तंगड्या. ८ व ९ चौक–[को. क. प्रां. रा. व सं. इ. उत्तरार्ध, पा. १२२-२३] आणि [खरे, ६२५५-५६]. ९

तोरगलकर–[को. क. प्रां. रा. व सं. इ. उत्तरार्ध, पा. ११६].. निवडली सवती धार–निवडक लोक निवडले. बेडकीहाळकर बाबा–रामचंद्र भगवंत बेडकीहाळकर. [को. क. प्रां. रा. व सं. यां. इ. उत्तरार्ध, पा. ११६] १०

साकोळीला सुरुंग लागला कोणी वेळेचा त्योथर(?)साकोळी–बुधवारांत महाकाळीचे कुंडास म्हणतात. [शितूत]. ११

मनकार्णिचा चिखल काढुनि उपसावी बेगी हीर। पाणी करावें तयार ॥ बाबूजमाल झऱ्यांत गेलों तिथें दादा दाटण फार। धड जाईना घागर ॥ गोखल्यानें तळें फोडिलें नांव केलें केवढें थोर। गडबडलें तेंव्हां शाहार ॥ कैक जणाला पाणी लागलें मासोळी मागे खारी। खावेना डाळभाकरी ॥ करविर०॥ १२

पन्हाळयाचे लोक फांकडे दखनपाणी हाय खर। माणूस हो मारील फार ॥ कैक जणाला पाणी लागलें मासोळी मागे खारी। खाईना डाळ भाकरी ॥ बारा रुपयाला बकरें झालें एक एक करते हुरहुरी। मालवण-गडचे लोक सारी ॥ करविर० ॥ १३

केदाराची दया पुरती रत्नाकर आपावर। आला सपनामधि लौकर ॥ काहो निजला तुम्ही भ्रमांत सावध व्हावे लौकर। हाडबडून जागा झाला कुठे दिसेना काय म्होर ॥ तसाच उठला लौकर। गोखल्यांनीं हल्ला चढविली आली म्हणती खंदकावर ॥ उन्हाचा पहिला भार। पेढेंखान सावध

---

हीर–विहीर. गोखल्यानें तळें फोडलें–[ खरे, ६२७६ ]. शाहार–शहर. कैकजणाला पाणी लागले मासोळी मागे खारी खावेना डाळ भाकरी–" आंत दारुगोळीचा अभाव आहे मुख्य मीठ नाहीं पाणीहि अनुष्टुप् आहे. माणूस बहुत हगवणीनें मरते." [ खरे, ७२७७ ]. " पन्हाळेचें पाणी बंद केलें आहे. आंत पाणी वरुणतीर्थाचें मचुळ व जितीचे ओढ्याचे व खारें विहिरीस आहे." [ खरे, ६३५६ ]. पाणी लागले–पाणी बाधलें. मासोळी मागे–मासळी मागूं लागले. सैनिकांना पाणी बाधलें. शिवाय मिठाचा तोटा पडल्यामुळें नुसती डाळभाकरी त्यांना जाईना. म्हणून ते तोंडीं लावण्याकरितां खारी ( खारावलेली ) मासोळी तरी द्या असें म्हणूं लागले. १२

मालवणगडचे लोक सारी–कोल्हापूरकरांनीं गोंव्याहून पलटणें मागवलीं होतीं त्या लोकांचें बहुधा हें वर्णन असावें. १३

हाडबडून–खडबडून. " हाडबडूं नका। गडबडूं नका " [ रामदास ].

केली कीर्त न कळे अंत धन धन देवा मुरारी। तारिखेस लाखादारी–

होता म्हंकाळ्या बुरुजावर ॥ म्हणे देवा झालें बर । केली कीर्त न कळे अंत धन धन देवा मुरारी ॥ तारिलेंस लाखादारी ॥ करविर० ॥ १४

एक बटीक काव करोनी जात होती धुणें घेउनी । न कळे देवाची करणी ॥ चौकीवाल्यांनीं तिला अडविली मधिच झाले धनी । पुढें जाऊं देईना कोणी ॥ हिकडे आण ग आंमधि आहे तें काय बघुं दे गांड मनीं । मग बोलिले दबावुनी ॥ उघडून पाहतां आंत कागद झाल्याली हो करणी । वाचून हो पाहातो धनी ॥ ह्या रांडेचें नाक कापा द्या मुलखावर सोडुनी । सांग होते ग कोण कोणी ॥ फितवापांजरा कांहीं चालेना गलिम हो चिंता करी । येऊन पडला विचारी ॥ म्हणे सुलताना साहेब चरणा विनती करतों वरवरी । दया असावी मजवरी ॥ कर जोडुनी करतों विनंती मस्तक हो चरणावरी । हात ठेवावा तुम्हीं शिरीं ॥ करविर०॥ १५

---

लाखादारी-लाखा दारीं. ( हे ) देवा मुरारी ( तुझी ) धन धन ( धन्य आहे) (तुझी ) कीर्त ( कृति-चमत्कार-लीला ) न कळे अगम्य आहे. असे चमत्कार करून लाखों लोकांना आपल्या दारीं तारिलेस. याचा संबंध १५व्या चौकाशीं आहे. १४

बटीक-कुणबीण. काव-कावा; कपट. मधीच झाले धनी-धनी पुढें झाले, रत्नाकरआपा पुढें झाले. गांड मनीं-वास्तविक गांडमणी असें पाहिजे गांडमणी-गुह्य [ आपटे ]. येथें अर्थ फितुर किंवा फितुराचे कागद. दबावुनी-दटावून. झाल्याली-झालेली. करणी-फितुर. नाक कापा-" परंतु ती खटपट उघडकीस येऊन त्यास सामील झालेल्या असामींपैकीं तिघेजण मारले गेले. एक कुणबीण होती तिचा नासिकाच्छेद व जिव्हाच्छेद झाला." [ खरे, ६२७४ ]. फितवा पांजरा-फितवा फांदाडा; फितूर. चौक १५-मिरज-करांचा वकील नारो हरी करंदीकर हा या लढाईचे वेळीं करवीरास होता. लढाई सुरू झाली तेव्हां त्यास कैदेंत टाकलें. तेथूनहि त्या स्वामिभक्त हुशार पुरुषानें रामचंद्रआप्पाकडे किल्ल्याचा भेद कळविण्याचें कारस्थान रचलें. पण तें उघडकीस येऊन त्यास व त्याच्या साथीदारांस फार त्रास झाला; त्यास अनुलक्षून हा चौक आहे. [खरे, पा. ६२७४.]. १५

# यशवंतराव होळकर यांचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

सवाई मल्हारराव यांजवर गर्दी होऊन ते मारले गेल्यावर झालेल्या गोंधळांत यशवंतराव व त्यांचे धाकटे बंधु विठोजीराव हे अनुक्रमें नागपुरास व कोल्हापुरास पळून गेले.

नंतर देशांत जिकडे तिकडे गोंधळ व बहुनायकी झाली. निरनिराळे बंडखोर लहान लहान जमाव करून मुलुख मारूं लागले. अशा एका टोळींत बाळकृष्ण गंगाधर कानडे यांचे हाताखालीं विठूजीराव राहिले. त्या टोळीचें पेशव्यांनीं गणपतराव पानसे यांजकडून पारिपत्य केलें व विठूजी होळकरास पुण्यास नेलें. श्रीमंतांनीं त्यास हत्तीचे पायीं देऊन जिवें मारलें.

या वेळीं यशवंतराव वऱ्हाडांत होते. त्यांना ही बातमी समजतांच त्यांनीं आपल्या भावाच्या वधाचा सूड घेण्याचा कृतनिश्चय केला. ते माळव्यांत आनंदराव पवार यांजकडे गेले व त्यांजकडून घोडे व पैसे जमवून त्यांनीं सैन्य जमविण्याचा व मुलूख मारण्याचा उपक्रम सुरू केला. त्यांची जमेत वाढूं लागली. नंतर थोडे दिवसांत पेंढाऱ्यांच्या कांहीं टोळ्या त्यांस मिळाल्या. अमीरखान नांवाच्या एका साहसी व पराक्रमी पठाणानें त्यांच्याशीं दोस्ती केली.

यशवंतरावानें शिंद्यांचा पुष्कळ मुलूख मारला व नर्मदातीरीं जाऊन खंडण्याही वसूल केल्या. यामुळें शिंद्यांनीं काशीराव होळकर याच्या फौजेंतील एक कवाइती कंपू डुडेन या फ्रेंच सरदाराचे हाताखालीं पाठविला. त्याचाही होळकरांनीं मोड केला. याचा परिणाम असा झाला कीं, तो कवाइती कंपूच यशवंतरावास मिळाला. शिंद्यांनीं व होळकरांनीं एकमेकांच्या राजधान्या जाळल्या.

यशवंतराव यांजजवळ जवळजवळ लाख अर्धा लाख फौज जमली व त्यानें पुण्याकडे मोर्चा फिरविला. आपला फत्तेसिंग माने नांवाचा एक सरदार होता त्यास पेशव्याचे मुलखास उपद्रव करण्यास त्यानें पाठवून दिलें आणि मागोमाग अमीरखान पठाण याची रवानगी केली.

फत्तेसिंग खानदेशांत आला. तेथें पेशव्यांतर्फेचे गोडबोले यांच्या फौजेची व त्याच्या फौजेची गांठ पडून गोडबोल्यांचा मोड झाला. यशवंतराव जेजुरीस आला व तेथें आपल्या कुलदेवतेचें दर्शन घेऊन पुण्याजवळ हडपसरचे पूर्वेस सर्व फौजा एकत्र करून लढाईचे तयारीनें बसला. दुसरे दिवशीं लढाई झाली. प्रथम शिंद्यांच्या तोफांनीं होळकराचा बराच नाश केला हें पाहून त्यानें जातीनें स्वार होऊन अराबा पिऊन अत्यंत जोराचा हल्ला चढविला. तोफा बंद पाडिल्या. पलटणांचा शेणसडा केला, आणि पेशव्यांची सर्व फौज बुडवून तो पुण्यांत शिरला व तेथें त्यानें आपल्या चौक्या बसविल्या.

बाजीराव पळून गेला. इकडे पुण्यास यशवंतरावानें लुटालूट केली. सात कोटींची दौलत मिळविली आणि मग तो निघून गेला. राजवाडे खंड १० मधील पत्रांक ६११ व ६१२ हे ही लढाई स्वतः पाहिलेल्या गृहस्थाचे आहेत.

# यशवंतराव होळकर यांचा पोवाडा

## ३६

[ शाहीर–अनंतफंदी ]

[ चाल––दो दिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुन मजा।
गमणा करतां मनिं उमजाना हें सुख पुढें पडेल वजा ॥ ]

सुभेदार यशवंत कन्हेया सदा फत्ते करी तलवारी'। सवाई यशवंतराव होळकर प्रसन्न मल्हारी हस्त शिरीं ॥ ध्रुपद ॥

वडिल नावकर मल्हार ऐका गर्दी झाली त्यावरती। जे सावध होते परंतु सर्यत केली सरतासरती ॥ भाऊ यशवंतराव बहादर ऐकुन घ्याया ह्या कीर्ति। दोन लाख फौजेचा जमाव दों वर्षांमधिं घ्या गणती ॥ बनकस कंपू पठाण कडिये फौजेमधिं नित्य झडती। मान भिडावुन देति लुढावुन टोपीवाले नाहीं गणती ॥ नागोपंत सरदार शिपाई अनेक उमराव हे बहिरी । सुभे०॥ १

शहर पुण्याशीं यावें ऐसा विचार ठरला फौजेचा ॥ दरकूच घेउनि अघाडी मुकाम केला फलटणचा । मागुन दुसरा गोलपठाणशाह आमदखान मीर-

---

कन्हेया–कृष्णाचें नांव. २ देखणा; खेळकर. तलवारी फत्ते करी–यश मिळवी. हस्त शिरीं–आशीर्वाद; कृपा. वडिल–वडील भाऊ असा येथें अर्थ. नांवकर–नांवकरी म्ह० सुप्रसिद्ध. गर्दी झाली–हल्ला झाला. जे सावध होते–बेसावध होते असें पाहिजे. सर्यत–शर्थ, पराक्रम. सरतासरती–शेवटाला; मरतां मरतां. घ्याया ह्या कीर्ती–घ्याव्या ह्या कीर्ति असें पाहिजे. बनकस (?) हा बंकस या शब्दाचा तर अपभ्रंश नसेल ? बंक–चौकी, बंका (पु. स्त्री.) पहारेकऱ्यांची रांग. घ्या गणती–मोजून घ्या. कंपू–जमाव; टोळी. काडिये–कडवे. झडती–सारखे येऊन मिळती. 'कडवे पठाण सारखे सैन्यास येऊन मिळत होते'. लुढावून–मूळ हिंदी शब्द लुंढाना–To Spill; To overturn. उधळून; धुडकावून. नागोपंत सरदार–नागो जिवाजी. १

गोल–जमाव. शहा अहमदखान–हा मीरखानाचा भाचा हा मुखेडावर

नचा ॥ मार्गीं येतां लढाई।संग्राम झाला टोपीवाल्यांचा। उद्यां लढाई दुसरी नेमिली आला हलकारा लष्करचा ॥ खाशासुद्धां करुनि तयारी मुकाम केला जेजुरिचा। किं मल्हाराचें दर्शन घ्यावें मग निर्दाळावे वैरी ॥ सुभे०॥ २

सोमवारच्या दिवशीं प्रातःकाळीं लढाई नेमिली। 'फत्तेसिंगमानी यांणीं तल्लख लिहून पाठविली ॥ अशी लढाई करा म्हणावें मागें मोहरें नाहीं जाहली। टोपीवाले फार हरामी त्यांणीं बहु धुंद केली ॥ सवाई यशवंतराव

---

विंचूरकरांकडून मारला गेला. [वि. घ. इ. १४२-१४३.] **मार्गीं येतां लढाई संग्राम झाला टोपीवाल्याचा**—"शिंद्यांनीं ड्रडेन नामक फ्रेंच सरदाराचा कवाइती कंपू पाठविला त्याचा यशवंतरावानें धुव्वा उडवून दिला." [वि. घ. इ. १३८]. हलकारा—जासूद. **कीं मल्हाराचें दर्शन घ्यावें इ०**—"यशवंत-राव होळकर जेजुरीस गेल्यावर देवाच्या गाभाऱ्यांत जाऊन म्हणाला, देवा! तुझीं देवळें, पायऱ्या आम्ही कशाला बांधल्या? पूजा, नगारखाने कशाला चालविले? त्याचा उपयोग आज व्हावा. नाहींतर आतां मी आपला प्राण येथें देतों. तिसरा घंटा वाजताच शिरच्छेद करून घेईन असें म्हणून पूजा बंद केली. पुजाऱ्यास आंत येऊं देईना. दोन घंटे वाजले. तिसरा वाजणार तोंच तलवारीचें म्यान सरकलें. मग यशवंतरावास आनंद होऊन सव्वा लाख रुपयांचें खोबरें भंडार जेजुरीस उधळिला." [शालिग्राम] २

**फत्तेसिंग मानी**—फत्तेसिंग माने. होळकरांचा एक अधिकारी. तल्लख किंवा तल्लाख—धमकावणीचें पत्र. [अनंतफंदी—आपटे]. **हरामी**—हरामखोर; लबाड; कपटी. **धुंद केली**—धुंदाई केली; गोंधळ केला. **अंगे**—जातीनें "याप्रमाणें भाषण झाल्यावर सर्वांस पुढें होण्याची सूचना करण्यासाठीं यशवंत-राव यांनीं भंडार उधळून 'जय खंडेराव' असा मोठ्यानें शब्द केला आणि नग्न तलवार हातांत घेऊन आपला घोडा झपाट्यानें पुढें चालविला. त्याबरोबर एकदम ४०-५० हजार स्वारांनीं चाल केली." [वि. घ. इ.]. "ही लढाई संपल्यावर दुसरे दिवसी इंग्रज सरकारचे पुणें येथील रेसिडेंट हे होळकर यांचे भेटीस गेले. होळकर हे आपले सरदारांसह चिखलाचे जमिनीवर टाकलेल्या बाज्या चव्यांवर बोलत बसलेले, त्यांचे डोक्यास तरवारेची एक व संगिनीची

जाऊन अंगें तलवार चमकविली। दोन लाख फौजेमधिं जाऊन कणसापरि कत्तल केली ॥ तमाम कंपू पळ सुटला चहुकडे गेले हो पेंढारी। सुभे०॥ ३

सवाई मल्हार ऐका गर्दी झाली त्यावरती ॥ बेफाम होते परंतु भली केली सरता सरती। सवाई यशवंतराव बहादर ऐकून घ्याव्या या कीर्ति॥ दोन लाख फौजेचा जमाव दो प्रहरांमधिं घ्या गणति। बंक कंपु पठाण कडवे फौजेमधीं नित्य झडती॥ मान भिडावून देती लुढावून टोपीवाले नाहीं गणती। फत्तेसिंग मान्या कुलअखत्यारी ऐकुनि घ्याव्या शुर मूर्ति॥ नागोपंत सरदार शिपाई अनेक उमराव हे बाहिरी। जसा कृष्ण अवतार मुरारी गोपिकांवर कृपा करी॥ सुभे०॥ ४

सुभेदार महाराज प्रतापी नामें ऐका एक मोहोरा। कारभारी ऐकुनि घ्यावे हरनाथाचा कुलकल्ला॥ शहर पुण्याची नाकेबंदी वागुं देईना पसारा। खाटमार मोठा कठिण नाहिं कुठें ऐकिली तऱ्हा॥ मार देउनि खंडण्या

---

एक अशा दोन लहानशा जखमा लागलेल्या असें त्यांचे दृष्टीस पडलें. त्या जखमा बऱ्या होण्यास्तव त्यास कांहींच उपचार केलेला नव्हता. तेणेंकरून रेसिडेंटसाहेबांस अचंबा वाटून त्यांनीं होळकर यास विचारलें कीं, "तुम्ही आपल्या जखमा बऱ्या होण्यास्तव त्यांस औषधोपचार कां करीत नाहीं?" होळकरांनीं जबाब दिला कीं, "हे केवळ ओरखडेच आहेत. असे पुष्कळ वेळां निघतात. हे आपोआप बरे होतील. यास औषधोपचार करण्याची जरूर नाहीं." या बेपर्वाईच्या जबाबानें रेसिडेंटसाहेब चकित होऊन उगेच राहिले." [ग्रँट डफ] पळ सुटला—पळापळ सुरू झाली. ३

एक मोहरा—एकटा एक अद्वितीय मोहरा. हरनाथाचा कुलकल्ला—कुलकल्ला'—सर्वाधिकारी. हरनाथ हें कारभाऱ्याचें नांव. "होळकराकडील ब्राह्मण. पुण्यांतील लोकांकडून द्रव्य उकळण्याच्या कामांतील मुख्य अधिकारी [ग्रँट डफ]. पसारा—ये जा. वागुं देईना पसारा—लोकांची आवक-जावक ये-जा बंद केली; चौक्या बसवल्या. खाटमार—खाटेला बांधून घालून दिलेला मार "खाटमार म्हणजे जगविख्यात। वरकड मार त्याचे आश्रित॥ ही दूम ईश्वरें

घेतो चौमुलखामधिं दरारा। वडिलावडिलीं पुरुषार्थ महिमा सवाई यशवंतराव जुरा ॥ आनंदफंदीचे छंद ऐकतां लढाई झाली ही सरी। सुभेदार यशवंत कन्हैया सदा फत्ते करी तलवारी॥ सवाई यशवंतराव होळकर प्रसन्न मल्हारि हस्त शिरीं॥ सुभे०॥ ५



---

अनुश्रुत। कोठुनी काढिली कळेना॥ [अनंतफंदी—माधव ग्रंथ]. जुरा—जुरा; रंगेल; छुष्कबाज. ५

# पेंढाऱ्यांचा व दुष्काळाचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

" सन १७९७ च्या सुमारास सर्व महाराष्ट्रभर निर्नायकी झाली होती व बंडवाले स्वारांच्या टोळ्यांनीं चोंहीकडे लुटालूट चालविली होती...सन १८०२ सालापासून मराठी राज्यांत पुष्कळ बंडें उद्भवलीं होतीं. पेंढाऱ्यांच्या टोळ्याही पुष्कळ उठल्या व अनेक प्रकारचीं राजकारणें उपस्थित होऊन सर्वत्र बखेडे माजले. त्यामुळें महाराष्ट्र देशाचे उत्तर सीमेवरील प्रदेशांत व निजामाचे पश्चिम हद्दीवरील प्रांतांत बेबंदी होऊन मुलुख उध्वस्त झाला. तेणेंकरून शेतांची लागवड बिलकूल झाली नाहीं या कारणानें १८०४ व १८०५ सालीं भयंकर दुष्काळ पडला." [ विं. घ. इ. १५३ ].

"इ. स. १८०३ मध्यें जरी पर्जन्य पुष्कळ पडत होता व पिकें चांगलीं आलीं होतीं तरी होळकरांच्या शिपायांनीं आपले हत्ती व घोडे पिकामधून घालून त्या सर्व पिकांचा नाश करून टाकला होता. व त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यावर्षीं पुण्यास मोठा दुष्काळ पडला. चैत्र महिन्यांत पायली तीन शेराची धारण झाली व आश्विनामध्यें एक शेराची झाली. याप्रमाणें ही भयंकर महागाई एक वर्ष होती. त्या वेळीं मनुष्याला मनुष्यें खाण्याची वेळ आली. जरी होळकरानें जळवांप्रमाणें पैसा शोषून घेतला, तरीहि पण तेथें धनिक पुष्कळ होते व पैसाहि पुष्कळ होता. धान्य मुळींच नव्हतें. लोक अन्नान्न करूं लागले होते. कित्येक अन्न नसल्यामुळें रस्त्यानें मरून पडले, त्यांच्या कंबरेस पैशाचे कसे होते." [पुणें वर्णन, म्यु. गॅझेट].

या पोवाड्यावरील प्रस्तावनेंत शाळिग्राम खालील माहिती देतात—

" लॉर्ड व्हालेन्शिया ह्या नांवाचे इंग्रज प्रवासी ह्या वर्षीं मुंबईहून पुण्यास आले होते. ते म्हणतात कीं, खंडाळ्याजवळ एका तळ्यावर दुष्काळानें मेलेल्या माणसांचीं सुमारें १०० प्रेतें गिधाडें व कुत्रीं ह्यांनीं खातांना त्यांनीं पाहिलीं. प्रत्येक खेड्यांत, प्रत्येक शहरांत व प्रत्येक घरांत दुष्काळाचीं चिन्हें दृष्टीस पडत. दुष्काळानें पीडलेल्या लोकांच्या साह्यार्थ मुंबई शहरांत ४०००० रुपये

जमा झाले होते. त्या द्रव्यांतून इंग्रजांचे रेसिडेंट कर्नल क्लोज हे पुणें शहरांत प्रत्यहीं ५००० माणसांस पैसे वांटीत. बाजीराव पेशवे हेही ह्या प्रसंगीं बराच दानधर्म करीत. परंतु त्यांच्या दानधर्मापासून फक्त ब्राह्मणांसच लाभ होई."

"शके १७२६ चैत्र मासी पायेली तीन सेर दाणे झाले. पुढें आषाढ श्रावणांत एक सेराची धारण जाली. ऐसी महागाई एक वर्षे होती. दुसरे सालीं दीड पायेलीची जाली. मग सवगाई तिसरे सालीं जाली. माणसे फार मेली काळ पहिला होता" [घडफळे यादी].

सदर पोवाड्यांतील वर्णन दिसतांना अतिशयोक्त दिसलें तरी तें वास्तविक तसें नाहीं. पोवाड्यांतील वर्णनें प्रत्यंतर पुराव्यानें खरीं आहेत असे दर्शविणारे बरेच आधार उपलब्ध आहेत. राजवाडे खंड १० मधील उत्तरार्धांत पेंढाऱ्यांच्या दंग्यासंबंधीं बरींच पत्रें आहेत. दुसरा मोठा आधार म्हणजे अनंतफंदीचें बरेंचसें कवित्व. शाळिग्राम यांनीं प्रसिद्ध केलेल्या त्याच्या लावण्यांच्या पुस्तकांत या विषयासंबंधानें सात आठ लावण्या, व श्रीमाधवग्रंथ छापला आहे तो. माधवग्रंथांत तर सबंध एक अध्याय या दुष्काळाच्या वर्णनाकरितां खर्चीं घातला आहे. वरील दोनही आधार अस्सल व विस्तृत असल्यामुळें पोवाड्यावरील टीपांत ठिकठिकाणीं त्यांतील अवतरणें उद्धृत केलीं आहेत. खुद्द रामजोशी याचीच या विषयासंबंधीं एक दुसरी लावणी शाळिग्राम यांच्या १८७९ सालच्या पहिल्या आवृत्तींत छापली आहे.

माधवग्रंथावरून तत्कालीन समजुतीप्रमाणें दुष्काळाचें कारण काय होतें तेवढेंच उद्धृत करतों.

"पूर्वीं भाकीत होतें जाणत जोशी। कीं पुढें येईल रुद्रवंशी॥ काळ पडेल दक्षिणदेशीं। वर्णसंकर होईल" याला जो असत्य म्हणेल कोणी। मग मी करीन त्याची पुरवणी॥ तरीच हा जोशी चिंतामणी। हें वाक्य माझें सत्य जाणा॥

"असो श्रीमाधव जातां देवभेटी। बंडें भ्रष्ट केली बहुधा सृष्टी॥ पुढें दुष्काळहि त्याचेच पोटीं। बंडानिमित्त जाहला॥"

"बंड आणि महर्गतेचा संयोग। या उभयतांचा घडतां योग॥ प्रलय झाला यथासांग। रुसावयाला जागा न ठेविली॥"

पुढें छापलेल्या रामजोशाच्या पोवाड्यांत भाषेची करामत बहुल दृष्टीस पडते. त्यांत अनुप्रास तर कमालीचे साधलेले आहेत. ऐतिहासिक माहिती-च्या दृष्टीनें पाहतां पोवाड्यांत वर्णन केलेली रयतेची भयंकर स्थिति सत्य आहे; परंतु त्यांतील कांहीं कांहीं भाग काल्पनिक व हारदासी थाटाचा दिसतो. उदाहरणार्थ—सबंध दुसरा चौक म्हणजे कालिप्रलयाचें ठराविक काल्पनिक चित्र वाटतें.

सुप्रसिद्ध रंगाचार्य रड्डीशास्त्री यांचे संग्रहीं रामजोशांच्या कवनांचीं दोन अस्सल बाडें होतीं. त्यांतील पुष्कळशी कविता आजपर्यंत कोठेंही छापलेली नाहीं. हीं बाडें खुद्द रामजोशांच्या घराण्यांतलीं आहेत, तेव्हां त्यांचें महत्त्व निराळें वर्णन करावयास नकोच. त्या बाडांत सदर पोवाड्याच्या दोन नकला लिहून ठेवलेल्या आढळल्या. त्यावरून पाठभेद खालीं दिले आहेत.

## पाठभेद

| | शाळिग्राम प्रेस–१९११ | अस्सल बाड |
|---|---|---|
| १ | उगा भ्रमसि वाउगा | उगा भ्रमसि बा उगा |
| २ | कली मातला सारा धनदारा इच्छी | कली मातला सारा धनदारा योच्या |
| ३ | मना येइल तसे | मना येतसे |
| ४ | धनानिमित्तें मरति किति गरति धरुनि यवन अन्न चारिती | धनानिमित्त्ये मराते किति धरिल्या यवन अन्न चारिती |
| ५ | वधिल्या हो काई गाई | कांहीं वधिल्या हो गाई |
| ६ | फंद मातले धुंद झाली | धुंद मातला फंद जाली |
| ७ | खंड कुणाचा गावा | खंड कुणाच्या गावा |
| ८ | कशि मती | कशि गती |
| ९ | लोह हडा लाविती | लोहोडास लाविती |
| १० | वेचिती सांडस घेउनि हातीं | वेचित· हिंदु सांडस हातीं |
| ११ | कां हंबिर होउनि फकिर | किति अमीर होउनि फकीर |
| १२ | जिवा लागती | जिभा लाजती |

| | | |
|---|---|---|
| १३ | तेथाचि भांबावले | येथच भांबावले |
| १४ | कैफ चावले | कैक चावले |
| १५ | किति ब्राह्मणगालही यवनानीं चावले | किति ब्राह्मण परि यवनांनि गाल चावले |
| १६ | कावले जन करितील कां गावले | कावले काय करितील जन कांगावले |
| १७ | किति फंद करिति ते बंदांताचि घातले | किति फंद करीति बेबंदांताचि घावले |
| १८ | काय समय हा | कयास मज हा |
| १९ | हा तरी | कशि गति |
| २० | स्नानाहि कंटाळुनि | श्वानें कंटाळुनी |
| २१ | कणा न पावति सर्णी | कणा पावती सर्णी |
| २२ | आमटी जुनी | आंबाडी जुनी |
| २३ | मुरक चढती कुणी भूक म्हणति द्विज आधुक तशा ब्राह्मणी | मुक पडे ती किती भुक म्हणति द्विज धुक तशा ब्राह्मणीं |
| २४ | कुकरी शाल शाला कुणि त्याला उभे राहु न देती आगणीं | कुकरी ती रस्ताला कुणि त्याला राहु न देती उभी आंगणी |
| २५ | रडावितात | रडियेती |
| २६ | मरति बालक मुडदे | घरति बाळे मुडदे |
| २७ | रुद्र कोण | रुद्रकोप |
| २८ | मुद्रस कैचा त्याला | मुडदस कैचे त्याला |
| २९ | एकादा दाणा मिळे | एकादा घना मिळे |
| ३० | उणा दिवाळी दसरा | पुन्हा दिवाळी दसरा |
| ३१ | डाळकुट मीठ | डाळ उटे मीठ |
| ३२ | यावरि येउनिया | यावरते जेव्हा येउनिया |
| ३३ | बरी नौबत वाजली | भलि नौबत वाजली |
| ३४ | गूळ असो तोळा भर आहे कीं मूळ मिठा चीडली | गूळ असा परी तुळभार किती मुळ मिठाची डली |
| ३५ | खजूरी ती एकली | खजुर परी येकली |

# पेंढाऱ्यांचा व दुष्काळाचा पोवाडा

## ३८

[ शाहीर—रामजोशी ]

**[ चाल—'नरजन्मामधिं नरा करुनि घे नरनारायण गडी'—रामजोशी ]**

उगा भ्रमसि बा उगा कशाला युगांत खळ हा कली। कली मातला सारा धनदारा इच्छी राज्यासहि हाकली ॥ ध्रु०॥

कुणा न कुणि धनि मना ये तसें जनांसि जन वंचिती। धनानिमित्तें मरति किति गरति धरुनि यवन अन्न चारिती ॥ आठां दिवसांमधिं पठाण तिनदां लुटावया धांवती। उठावयाला तकवा नाहीं बकवा सारा धनिचाकर झुंजती ॥ दार वित्त घरदार दिलें तरी मार चुकेना रती। फार वदूं मीं वधिल्याहो काई गाई बाटविल्या द्विजसती ॥ फंद मातले धुंद झालि बेबंद बुडाली क्षिती। मंद करिती मसलतीला मग फसली तिला नावरितां फळ भोगिती ॥ पुंड घरोघरीं बंड कुणावर दंड कोण बांधिती। खंड कुणाच्या गावा कुणि घ्यावा द्यावा कुणि कुणाला किती ॥ असा न कोणी पुसावयाला कसा काळ कशि गती। बसावया नच जागा मग पागा गजरथ बागा कुठें राहती ॥ चिकाआंत ज्या निका पढविल्या पिकाशिं गळ लाविती।

---

**उगा**—व्यर्थ. **युगांत खळ हा कली**—सर्व युगांतील नष्टयुग म्हणजे कलियुग. **खळ**—वाईट, दुष्ट. **गरति**—कुलीन स्त्रिया. **बकवा**—भांडण, वाद, गोंधळ. **दार**—स्त्री. **रती**—रतीभरही, तिळभरही. **मंद करिती मसलतिला इ०**—मंद—मतिमंद; मैंद, मठ्ठ, अक्कलशून्य. नादान मसलतीच्या भरी पडतात. आणि ती सर्व फसली म्हणजे त्यांच्याच अंगावर कोसळून प्रायश्चित्त मिळवितात. **पुंड घरोघरि बंड**—घरोघर जिकडे तिकडे पुंड मातले. **दंड बांधणें**—रक्कम बसविणें, दंड घेणें. **बसावया नच जागा मग पागा इ०**—उभे रहावयापुरतें निर्वेध स्थळ नाहीं; मग हत्ती, घोडे, पागा कोठल्या घेऊन बसतां? **चिका आंत**—चिकाच्या पडद्या-आंत. **निका**—उत्कृष्ट, सरस, शुद्ध. **निका पढविल्या**—

विकावया त्या नेल्या किती मेल्या अबळा उरल्या जन चुंबिती ॥ फांस गळ्यामधिं बांस पाठिवर लोहहडा लाविती । मास विप्र लोकांचें तोकांचें वेचिती सांडस घेउनि हातीं ॥ धीर वीर किति अमीर होउनी फकीर भिक मागती । चीर नसे हो आंगा किति सांगावा तो ताप जीभ लाजती ॥ हातिं धरुनि देवता फोडिल्या लताराम भंगिती । गतायु किति झाले किति प्याले विष किति उरले सुख सेविती ॥ (चाल) ॥ किति सागरउदकें कुटुंब-सह वाहले । किति दैवगतीनें काशीसहि पावले ॥ किति कर्नाटक देशांत धनिक धांवले । किति अब्रूचे जन येथेंचि भांबावले ॥ कैकांनीं हिरे बचनाग कैफ चावले । किति उठाउठी भयभीत मरण पावले ॥ किति ब्राह्मणागालहि यवनांनीं चावले । कावले काय करितलि जन कां गावले ॥ अति सात्त्विक

---

उत्तम तऱ्हेनें शास्त्रशुद्ध गाण्याचें शिक्षण ज्यांना मिळालें आहे त्या. पिकाशि गळ लाविती—कोकिळेच्या गळ्याशीं गळा मिळवितात. भावार्थ—कोकिळे-सारख्या गोड गळ्याच्या. अबळा—अबला. फास गळयामधि बास पाठिवर लोह हडा लाविती—गळ्याला दावें बांधून पाठी बांबूनें सडकतात; किंवा हाडावर लोखंडी कमच्यांनीं मारतात "चराठांची सरासरी । त्याची करावी गळसरी । मग तो डोळे वटारी । प्राण जाऊं पाहतो" [ माधवग्रंथ, अ. ६–१२४ ]. "ओले जैसें पिरगळावें । तैसे मनुष्य धरुनी मुरगळावे । गळ्यांत बांधोनिया दावें ! ओढावे जैसे मेंढरू" [ माधवग्रंथ, अ.६–१४० ]. बास—बांबू; कळक. तोकांचे—अर्भकांचे, मुलांचे. वेचिति सांडस घेउनि हाती "जळत काष्टे घालिती शिरीं । मास तोडिती सांडशानें ॥ [ माधवग्रंथ अ. ६ ओ. ५६ ] अमीर—सरदार, मोठे लोक. चीर—वस्त्र. हाती धरुनी फोडिल्या देवता—"मोठ-मोठालीं देवालयें । चांगली राहूं देऊ नये । छिन्नभिन्न करावे हातपाय । कर्ण घ्राणें फोडावी [ माधवग्रंथ, अ. ६–५२ ]. लताराम—लता आराम; लतामंडप. आराम—क्रीडावन, किती सागर उदके कुटुंबसह वाहले—कुणी परागंदा होत असतां समुद्रांत बुडून मेले. उठाउठी—ताबडतोब. कां गावले—कांगावले. कयास मज हा—माझा असा तर्क होतो कीं.

ते दुष्कर्मी सरसावले। किति फंद करिती ते बेबंदांताचि घावले ॥ (चाल पहिली) ॥ कयास मज हा लया रुद्र करि दया दृष्टि झांकली। भयानका क्षिति झाली घरघाली रुद्रविंशति जगीं फांकली ॥ १

रुसा न कलिवर पुसा मनाला कसा काळ हा तरी। असा जनक्षय कांहो कुणि पाहो संशयं कथितों याचे वरी ॥ घराधीश कुणि परास म्हणती करा पातकें वरीं। खराब जन निजकर्में करिती अधर्म राजाची अफतरी ॥ बाप तयाला ताप वृद्धपणिं पापपुत्र हा करी। शाप देतसे तोही म्हणे नोहे माझा वीर्यज हा तरि जरी ॥ माय टाकिली पाय बांधुनी बायकोशि घे शिरीं। होय कशाचा बेटा तो पेटाऱ्यांतुनि साप काढिला वरी ॥ सून बहिण सासू जे म्हणति तिशीं सुरतवासना धरी। भवन बुडे पापानें, मधुपानें मातुनि माय सुताला वरी ॥ मनीं धरुनि कामिंनी मठामधिं मुनी विनयचातुरी। जगीं दाविती बावा, परि आंतुनि कावा, भोंदुनि खाती पुरी ॥ लेश नसे उपदेश आपुला देश टाकुनी दुरी। केशवार्चन करती वरती परि आंतुनि कर्में नानापरी ॥ असे धूर्त जे तूर्त जगामाधिं मूर्त पाप चव धरी। पूर्ती मखादिक

---

लय–प्रळय. रुद्र–शंकर. घरघाली–सर्वनाश करणारी. रुद्रविंशति–प्रळयकाळ. माधवग्रंथांत हाच शब्द 'रुद्रवंश' 'रुद्रवंशी' असा आला आहे. १

अफ्तरी–कारकीर्द; २ अफ्तरी (स्त्री.) बिघाड; नुकसान. असा जन क्षय इ०–आजपर्यंत असा जनक्षय कुणीं पाहिला आहे काय, असें मी विचारितों याबद्दल कोणास संशय असल्यास आणखी पुढें सांगतों, तें ऐका. खराब जन निजकर्में०–खराब लोक दुष्कृत्यें आणि अधर्म आचरून राजाची नुकसानी करतात. पापपुत्र–कुपुत्र. पापपुत्र इ०–जरि–ज्या अर्थी हा कुपुत्र मला म्हातारपणीं ताप देतो. तरि–त्याअर्थी हा माझ्या बीजाचा नव्हे. भवन–जग. मधुपानें–दारू पिऊन. मातुनि–माजून मत्त होऊन; विनय चातुरी–विनम्रता, विनयशीलपणाचें प्रदर्शन; सभ्यपणा. जगीं दाविती बावा–लौकिकांत साधू म्हणून प्रदर्शन करतात. भोंदुनि–फसवून. भोंदणें–फसविणें. पुरी–पुरी हें पक्वान्न. लेश नसे उपदेश–उपदेश करण्याची

याचिं व त्याचीं कर्में म्हणूं नका हो खरी ॥ वित्त हरिति निरनिमित्त ठेवुनि चित्त अर्थ यावरी । मत्त धन्याशीं चोरी करिती अधिकारी दया कुठुन भूसुरीं ॥ सती म्हणति निजपती त्यजुनि नांदती पराचे घरीं । जिवें मारिती भर्ते त्या वरते दुसरे करिति कितिक सुंदरी ॥ ( चाल ) ॥ किती कन्या हयविक्रयें परमपातकी । एकाची वृत्ति एकास करी घातकी ॥ किति दुर्मतिनें गुरुपत्नीला हाटकी । किति जारण मारण उच्चाटण नाटकी ॥ कितिकांची वाणी मृषा वदुनि हालकी । धनियास पालखी चाकरास नालकी ॥ कुणि विधवा ठेविती घरामधें पाणकी । मित्रास वंचिती मग कोठुन भावकी ॥ अशि कितिएक पापें जगीं कुणा ठाउकीं ॥ ( चाल पहिली ) जराक यास्तव करावया स्तव जरा मातिस जाकली । करा श्रवण होयाचें व्हायाचें ऐशी विधिवाणी भाकली ॥ २

चिन्ह बाटतें भिन्न पुढतिं जें खिन्न जाहलें मनीं । भिन्नदेह किति करति किति भरति पोटें श्वानें कंटाळुनी ॥ पहा कितिक जन महागाईनें दाहि दिशा

---

किंवा देण्याची यत्किंचितहि पात्रता नाहीं. पाप चवधरी–चव धरणें–रंगास येणें, जोरावर असणें, मान्यता असणें; पापाला भाव आला. पूर्ति–मखादिक–होमहवनादि कृत्यें. निरनिमित्त–कांहीं कारणावांचून. मत्त–धन्याशीं०–मत्त–माजलेले, मत्त हें अधिकाऱ्यांचें विशेषण. भूसुरीं–राक्षसांना. [ शाळिग्राम ]. भूसुर–ब्राह्मण. दया कुठुन भूसुरीं–ब्राह्मणांना दया दाखविली नाहीं. म्हणति–म्हणविती. त्यावरते–त्यानंतर. हयविक्रये–हाय ! विक्रयें. असें असावें. कितीतरी कन्यका तनुविक्रय करून पातकी बनल्या आहेत. हालकी–हलकट, खोटी, विनकिंमतीची. पालखी नालखी–पालखीचा मान नालखीपेक्षां लहान आहे. पाणकी–पाणी भरणारी. भावकी–बंधुभाव; आपलेपणा. जराक ( अव्यय )–किंचित्. स्तव–वर्णन. जरा मातिस जाकली–जाकली–कळवळा [ आपटे ]. भाकली–बोलली; भविष्य सांगती झाली. २

चिन्ह–दुश्चिन्ह; विचित्र. भिन्न–(?) कणा–धान्याचे कण. कणा पावती

घुंडुनी। अहो शेवटीं मेले किती गेले यमलोकाशिं गणावे कुणीं ॥ भणाण वारा दणाण झाला कणा पावाति सणीं। कुणास न मिळे भाजी कुणि राजी करडी मिळो आंबाडी जुनी ॥ मुरक चढती कुणी भूक म्हणति द्विज आधुक तशा ब्राह्मणी। कुकरी शालाशाला कुणि त्याला उभी राहुं न देति आंगणीं ॥ कढी म्हणति कुणि वडी घालिती उडी अन्न पाहुनि। रडि येती किति पोरें किति ढोरें तैशीं ओढिति दारांतुनी ॥ पाक हो न हो हाक मारिती भाकर द्या म्हणवुनी। टाक मुखामधिं कांहीं मज नाहीं म्हणती अन्न पंधरा दिनीं ॥ जळा पिउनि किती नळांत फुगले पळांत वपु त्यागुनी। गळां पडुनि किति रडति किति धरति बाळे मुडदे कंटाळुनी ॥ क्षुद्र इतर जे शूद्र तयांवरि रुद्रकोप या क्षणीं। मुद्रस कैंचा त्याला भलत्याला भाकर मागति मुख पसरुनी ॥ चणा अगर नाचणा एकादा धणा मिळे त्यांतुनी। उणा दिवाळी दसरा किती दुष्काळाचा घसरा घ्या पाहुनी ॥ पीठ डाळकुट मीठ ढिगावरी नीट पडति जाउनी। धीट सोशिती कांठी परि पाठी सोडित नच मेल्यावांचुनी ॥ ( चाल ) ॥ करितील कायहो अन्नाविण गांजली। ही दुनया सारी जठराग्नींत भाजली ॥ नच माधुकरीला कोणि तदा लाजली। वेंचिती शितें चिखलांत राड माजली। धनिकाची दौलत अपणांत सामावली॥ शेवटीं विळे पळी दिवेलावणी वाजली। यावरि येउनियां देवा कां गांजली ॥ कैकांनीं कुटुंबें विष पाजुनी निजविलीं। ही दुष्काळाची भलि नौबत वाजली ॥ वर्णावी म्हणुनियां कविमतिला डाजली ॥ ( चाल पहिली ) ॥ काळ कठिण दुष्काळ उडाला काळरीति ठाकली। बाळवृद्ध लोकांत कुठें कांहीं तरी मर्यादा राहिली ? ॥ ३

---

सणी--पैशाला धान्याचा एक दाणा मिळूं लागला. करडी-करडईची भाजी. मुरक चढती-भुरक तर नव्हे. (?) भुरके मारून खातात आधुक-(?) कुकरी (?)-कंटाळुनि-कंवटाळुनि. रुद्रकोप-भयंकर प्रसंग भयंकर संकट. मुद्रस-आनंदरस, आनंद [ आपटे ]; २. अन्नरस (?) घसरा-जोर. पाठी सोडित नच-पाठ सोडीत नाहींत मुंडी देऊन बसतात. डाजली-डाजणें-

सुधी म्हणति निरवधी काळ त्यामध्यें दीडपायली। कधीं ऐकिलीं चिपटीं कधीं निपटीं कोळवीं चोळवीं कधीं पाहिलीं ॥ जुना जिन्नस वरी उणा वाटे कुठें कुणांत पत राहिली। मणास रुपये तेरा तेलाला बारा तुपा शपथ वाहिली ॥ गूळ असो तोळाभर आहे कीं मूळ मिठाचीं डली। खूळ लवंगा पैशाच्या सवंगा मिरची पांच दिधली ॥ हुजूर वाणी रुजू तराजू खजूरी ती एकली। खिजून घेती पैसा देतिल हो कैसा माखली नच जीभली ॥ गहूं म्हणति जे बहु सवंग से नउ चिपटीं जाहलीं। नवे मऊ जे दाणे बेदाणे झाले अशी दशा साहिली ॥ मका रांड ही आका इला परि शिका कोठडी केली। नको द्वाड एरंडी हे रंडी आठा चिपटीं कधीं ऐकिली ॥ दुकाळ त्यामधिं बकाळ मंडळी ठकापरिस ठक भली। दुकान घालुनी बसती वरी दिसती निर्मळ घातुकता वाइली ॥ नितळ सोनिया पितळ म्हणति निज पितळ पुतळि आटली। कुतळ बुडविले सारे ही वारे वेळची सराफाइला दिली! ॥ सार हिऱ्याला गार म्हणति सोनार देत पावली। चार शेर तांब्याला

---

सलणें, जाचणें, व्यथा होणें. बाळ वृद्ध लोकांत-आबालवृद्ध लोकांत असा म्हणण्याचा भावार्थ. काळरीति ठाकली-प्रळयकाळ आला. ३

सुधी म्हणति निरवधी इ०-आजपर्यंत निरवधी काळ लोटला पण असल्या तऱ्हेचा दुष्काळ कीं ज्यांत कोळव्या चोळव्यावर माप बसलें असा ऐकला नाहीं असें शहाणे लोक म्हणत आहेत. जुना जिन्नस-जुना वाईट जिन्नस मिळाला तरी तो उणा म्ह० अधिक वाटतो. वरी-परी असा मूळ शब्द असावा. हुजूर वाणी रुजू तराजू खजूरी ती एकली-(?) खिजून घेती पैसा देतिल हो कैसा माखली नच जीभली (?)-शिका कोठडी केली-कडीकुलुपांत मोहोर करून ठेवण्याची पाळी आली. बकाळ-(अर. पु.) किराणा जिनसांचा व्यापारी, उदमी, दुकानदार. नितळ-शुद्ध. निज-पितळ पुतळि आटली-आपले दागिने आटवून त्याचे पैसे करण्याकरितां विकण्यास काढले असा भावार्थ. कुतळ बुडविले सारे-ही वारे वेळचि सराफाइला दिली-ही उत्तम सोन्यासारखीच संधि सराफांना मिळाली असा

कां भ्यालां म्हणे कांसार देत आधेली ॥ पुरे काळ हा नुरे योग्यता विरे निघुनि चालली। अहो शालुच्या फरदा चवलिचा खुरदा काय गोष्ट चांगली ॥ (चाल) ॥ हें राहो भाजींत बागवान जोडका। पैशाचा एकचि मुळा एक दोडका। पैशांस मक्याचा कंद एक मोडका। हा कांदा दो पैशांस एक बोडका ॥ जळणास रुपयाला एक लहान खोडका। घोड्यास शिपाई काय करिल घोडका ॥ काळानें देश यापरि केला रोडका। मग हत्याराचा उपाय काय थोडका। खाउनी नाबद म्हणों नये' गोड कां ॥ (चाल पहिली) ॥ अजातरिपु हे प्रजा इतःपर मजा वृष्टि शिरकली ॥ दुजी आस न कविरायाची, कृति येथुनि उरकली ॥ ४



---

भावार्थ. सार–उत्कृष्ट, शुद्ध. कासार–तांब्यापितळेचीं भांडीं करणारा. विरे–विरी–शौर्य, वीर्य, सत्वांश. फरदा–फरद–पु. एकेरी वस्त्र. विशेषतः शाल. बागवान जोढका (?)–खोडका–(हिंदी) वाळलेलें झाडझुडूप. बोडका कांदा–पातीच्या कांद्याच्या उलट जात. घोढका–स्वाराबरोबर घोड्याच्या तैनातीस असलेला मनुष्य.

खाउनि नाबद०–नाबद–साखर. खडिसाखर. अजातरिपु हे प्रजा इतःपर मजावृष्टि शिरकली–(?) ४

# बाजीरावाचे पोवाडे

## प्रस्तावना

खडकीची लढाई होऊन बाजीरावाच्या कपाळीं वनवास लागला आणि त्यानंतर त्याला पुण्याचें पुन्हा दर्शन घडलें नाहीं. या करुण प्रसंगावर पुढील चार पोवाडे आहेत. रा० शाळिग्राम यांनीं आपल्या ७९ सालच्या आवृत्तींत ते सर्व छापले आहेत; परंतु त्यानंतरच्या आवृत्तींतून एक प्रभाकराचा तेवढा पोवाडा ठेवून बाकीचे गाळले आहेत. असें कां केलें कोणास ठाऊक !

रा० शाळिग्राम त्या पोवाड्यासंबंधीं म्हणतात, " इ. सन १८१८ मध्यें आमच्या देशांत केवढी राज्यक्रांति झाली हें सर्वांस विदित आहेच. त्याबद्दल येथें आज़ आम्हीं विस्तारपूर्वक लिहिणें प्रशस्त नाहीं. कारण तो दुःखकारक प्रसंग येवढ्याशा चार ओळींत काय मावणार आहे ? त्या वेळीं सर्व प्रजा दुःखानें आक्रोश करीत होती. तो प्रकार पुढील चार पोवाड्यांत फार चांगला वर्णन केला आहे. चार पोवाडे चारजणांनीं केले आहेत, परंतु त्यांतील शोककारक स्थिति सारखीच आहे. या पोवाड्यांच्या चालीहि मोठ्या हृदयास लागण्यासारख्या करुणापर अशा आहेत. म्हणजे ते पोवाडे ऐकतांच हृदय अति दुःखानें भरून येतें."

वरील उद्गारांवरून या पोवाड्यांची खरी योग्यता रा० शाळिग्राम यांस बरोबर कळली होती असें उघड दिसतें. मग हे पोवाडे त्यांनीं पुढच्या आवृत्तींत कां गाळले असावे ?

हे पोवाडे वाचूं लागलें असतां मनाची काय कालवाकालव होते तें सांगतां येत नाहीं. सभोंवार खिन्न उदासीनता पसरल्यासारखी वाटते आणि आपण क्षणभर बाजीरावाच्या काळींच असून स्वराज्यनाशाचा तो दुःखकारक सोहाळा स्वतः अनुभवीत आहोंत असें वाटूं लागतें. खरोखर नुसत्या या पोवाड्यांच्या वाचनानें जर आज आपल्या मनांत इतकी कालवाकालव होऊन जाते तर खुद्द त्या काळीं आपल्या करुणावर चालींनीं आपल्या

हृदयांतील शोकाच्या पुराला वाट काढून देणारे हे पोवाडे लोकांनीं ऐकले असतील तेव्हां त्यांना काय वाटलें असेल हें पारतंत्र्यांतच जन्मलेल्या आपणांस कोठून कळणार ?

आज १०० वर्षांनंतर बाजीरावाच्या पळासंबंधानें आपणांस यत्किंचितहि उद्वेग वाटत नाहीं. आणि बाजीरावाच्या दुर्गुणांची घोषणा ऐकून ऐकून आपले कान किटून गेलेले आहेत. त्यामुळें खडकीचा पराभव व पुढील बाजीरावाचा वनवास आपण हृदयशून्य मनानें वाचूं शकतों किंवा ऐकूं शकतों. परंतु खुद्द स्वराज्यांत बाजीरावाच्या अमदानींत ज्यांनीं स्वातंत्र्याचें सुख भोगलें आणि ज्यांना तें सुख आपल्या डोळ्यांदेखत नष्ट झालेलें पाहण्याची पाळी आली, ज्या राजवटींत त्यांनीं "जगीं वाढलो बडे" अशा तऱ्हेनें दिवस काढले, त्यांना काय वाटलें असेल हें या पोवाड्यावरून उत्कृष्ट रीतीनें समजून येतें.

हे प्रसंग वर्णन करतांना शाहीरांना दुःखाचे हुंदक्यावर हुंदके आलेले आहेत. त्यांना असेंच वाटलें कीं, "लक्षांचें अन्न गेलें !" आपण स्वराज्याच्या "रेशिमगांठीला अन्तरलों !" बाजीरावासंबंधानें ते म्हणतात, "एकटे पक्षावाणी टाकून उडाले मादीला" "कसे प्रभूनीं ब्रह्मावर्त शहर वसविलें। अगदींच पुण्याच्या लोकांला फसविलें ॥ हुरहुर करित कां उन्हामध्यें बसविलें।" "झाले आपण परदेशी करून कोणाचे हवालीं."

त्या वेळच्या ब्राह्मण, मराठे वगैरे सर्व प्रजेला स्वराज्यनाशाबद्दल काय वाटत होतें आणि त्या स्वराज्याच्या मूर्त स्वरूपासंबंधीं म्हणजे बाजीरावासंबंधीं काय वाटत होतें तें "कुंकवावांचुन कपाळ, मंगळसूत्रावांचुन गळा। तसा सैन्यसमुदाय उदासित रंग दिसे वेगळा।" "जळीं राघवमाशास अडविले असंख्य जिंग्यानीं। जर्जर झाला विष्णुवाहन बदकांचे दंग्यानीं।" "दक्षिणचें सौभाग्य गळसरी कोण्या रोहकाला ? ॥" "घड आहेव न रांडकी न कैसे केलें भगवंतानीं।" "एक्या प्राण्यावांचून शहर करती गायावाया" "एका प्राण्याहून शून्य दिसे धरत्री" "दक्षिणचें मंगळसूत्र कोठें दडलें" "कुंकुमहीन दक्षिणवनितेचें वदन दैन्यवाणें। एक्या प्राण्यावीन दिसती ते देश परगाणें." इ. उद्गारांत पाहून घ्यावें.

# ऐतिहासिक माहिती

सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर नाना फडणविसांनीं मुत्सद्दयांचा व गादी-च्या सरदारांचा सल्ला घेऊन यशोदाबाईचे मांडीवर गोत्रजापैकीं मुलगा दत्तक देऊन गादी चालविण्याचें ठरविलें. पण लोकमत व शिंदे प्रतिकूल होते. त्याचा फायदा बाजीरावानें घेतला व शिंद्याचे दिवाण सदाशिव मल्हार यांचे मार्फत जुन्नरास शिंद्याशीं गुप्त तह केला.

इकडे पुण्यास शिंद्याकडील बाळोबा तात्या व जिउबादादा बक्षी होते. त्यांनीं दत्तकाच्या संमतपत्रावर सह्या करण्याचें नाकारलें. बाजीरावासारखी औरस संतति असतां त्याला गादीचा वारसा नाकारणें बरोबर नाहीं. तुम्ही त्यांना आणा नाहींतर आम्ही आणवितों असें ते म्हणूं लागले.

शिंद्यांनीं असा फितूर करतांच नानांनीं निराळीच तोड काढली. रास्ते व पटवर्धन यांच्या सल्लयानें त्यांनीं असें ठरविलें कीं, शिंदे बाजीरावाला घेऊन येण्याच्या आधीं आपणच चिमाजी आप्पास पुण्यास घेऊन यावें व त्याला दत्तक द्यावा. म्हणजे लोकांची समजूत झाली व आपलाहि हेतु तडीस गेला.

नानांनीं तावडतोब परशरामभाऊस रवाना केलें. भाऊ जाऊन त्यांनीं बाजीरावाजवळ आप्पाची मागणी करतांच त्यांनीं नकार दिला. मी मोठा, मीच गादीवर बसणार. माझाच हक्क आहे. मात्र गादीवर बसतांना मी बाजी-राव माधव न होतां बाजीराव रघुनाथच राहणार असें बोलूं लागले.

इकडे शिंद्याचे कंपू पुण्याचे रोखानें निघाले. नानांना तें कळतांच शिंद्या-च्या भीतीनें गोंधळून जाऊन त्यांनीं परशुरामभाऊस बाजीरावाचे म्हणण्या-प्रमाणें करून तावडतोब दोघांस घेऊन येण्यास कळविलें. त्याप्रमाणें ते खडकीला येऊन पोहोंचले. तेथें बाजीरावसाहेबास येऊन भेटले. नंतर लवकर परस्परांनीं गंगाजळाची शपथ घेऊन एकोप्यानें वागण्याचें ठरविलें.

हें वर्तमान ऐकून बाळोबा तात्यास फार वैषम्य वाटलें व बाजीरावानें देऊं केलेले रुपये नानांकडून उकळून त्याला कारभारांतून हुसकण्याचा त्यानें निश्चय केला व भांडणें उकरून बखेडा करण्याचा घाट घातला. फक्त ५००० हजारच स्वार घेऊन यावें असा शिंद्याला दिलेला हुकूम त्यानें मोडला तेव्हां नाना चरकले व सातारयास पळाले.

ज्या दिवशीं नाना साताऱ्यास पोंचले त्याच दिवशीं बाजीरावसाहेबांची द्वाही फिरली; व त्याच दिवशीं शिंदे आळंदीस उतरले. रात्रीं शिंद्यास भेटून श्रीमंत वाड्यांत रहावयास गेले. श्रीमंतांनीं सवाई माधवराव पुरंदराहून पुण्यास आले त्या वेळीं जितके बार काढले तितके काढावयास हुकूम फर्माविला होता.

नंतर कांहीं दिवसांनीं वस्त्रें आणण्याकरितां शिंदे व परशुरामभाऊ यांसह श्रीमंत साताऱ्यास जाण्यास निघाले. वाटेंत थेउरास मुक्काम झाला व तो बरेच दिवस पडला. तेवढ्यांत बाळोबा तात्या व परशुरामभाऊ यांनीं बाजीरावास कैद करून चिमाजी आप्पास दत्तक देऊन गादीवर बसविण्याची मसलत केली व लवकरच एका रात्रीं अचानकपणें भाऊ चिमाजी आप्पाला घेऊन पुण्यास गेले.

चिमाजी आप्पाचें दत्तविधान भाऊंना उरकणें सोपें होतें; पण साताऱ्याहून वस्त्रें मिळविणें अवघड होतें. कारण तेथें नाना होते. बाळोबा तात्याचा निश्चय कीं साताऱ्यास नानांनीं महाराजांजवळ राहतां कामा नये. त्यानी फौज जमविली होती. तिला रजा द्यावी व नुसतें स्नानसंध्या करीत बसावें. त्यानें नानावर फौज पाठविली. तेव्हां नाना मेणवलीस आले; व एकदांचीं चिमाजी आप्पाला वस्त्रें मिळालीं.

मेणवलीस नाना आले तरी त्यांनीं आपली सर्व फौज मोडली नव्हती; भोसले व निजाम यांकडे त्यांनीं सूत्र लावलें होतें तें बाळोबा व परशुरामभाऊ यांना असह्य झालें व त्यांनीं फिरून त्यावर फौज पाठविली पण नाना अगोदरच महाडाला पळाले. नानांनीं महाडास बसून सूत्रें चालविलीं व भोसले, निजाम, इंग्रज यांना वश करून शेवटीं खुद्द दौलतराव शिंद्याला त्याच्या कारभाऱ्याविरुद्ध फोडलें. परशुरामभाऊंना पायबंद देण्याकरितां करवीरकरांनाहि त्यांनीं चिथविलें.

नानांचें राजकारण रंगास येऊन शेवटीं बाळोबा तात्या आदीकरून शिंद्याचे दिवाण व परशुरामभाऊ कैद केले गेले. परशुरामभाऊ चिमाजी आप्पास घेऊन जुन्नरास पळाले होते. तेथें त्यांना घेरून मांडवगणास कैदेंत ठेवण्यांत आलें. शेवटीं बाजीराव पेशवे झाले व नाना मुख्य कारभारी झाले.

## खडकीची लढाई

ता. १४ जुलै १८१५ रोजीं रात्रीं विठोबाच्या देवळाच्या महाद्वाराच्या रस्त्यावर गंगाधरशास्त्र्याचा खून झाला. तो बाजीरावाच्या संमतीनें झाला, असें इंग्रज म्हणूं लागले. खुद्द खून करविणारा त्रिंबकजी डेंगळा हा बाजीरावाचा मुख्य मंत्री होता. त्याला ताब्यांत देण्याबद्दल इंग्रजांनीं बाजीरावावर सक्ति चालविली १८१७ च्या मे महिन्याच्या सुमारास एल्फिन्स्टन् व स्मिथ-साहेब यांनीं " एक महिन्याच्या आंत त्रिंबकजी आमच्या स्वाधीन करा व त्याच्या जामिनकीकरितां सिंहगड, पुरंदर व रायगड हे किल्ले आमच्या ताबडतोब स्वाधीन करा. नाहींतर फौजेची तर्वी होईल " असा निर्वाणीचा निरोप पाठविला. बाजीरावानें टोलवाटोलवी केली. पण ता. ८ रोजीं उजाडतांच खरोखरच इंग्रज शहराला सैन्याचा वेढा देऊन नाकेबंदी करूं लागले, असें पाहून तो घाबरला व शेवटीं त्रिंबकजीला धरून नेण्याबद्दल जाहीरनामे काढून, मागितलेले किल्ले त्यानें इंग्रजांच्या हवालीं केले. त्रिंबकजी डेंगळा पुढें ठाण्याहून इंग्रजांच्या कैदेंतून मोठ्या धाडसानें पळून गेला.

ता. २५ आक्टोबरपासून खऱ्या झगड्यास सुरुवात झाली. ता. ५ नोव्हेंबर रोजीं सुप्रसिद्ध खडकीच्या लढाईस सुरुवात झाली. पेशव्यांचा मोड झाला. बाजीराव पळून गेला. शके १७३९ च्या आश्विन वद्य ११ पासून पौष अखेरपर्यंत पुण्यास नुसती धामधूम चालू होती. दरोडे पडत होते, लुटालुटी चालल्या होत्या. पुण्यांतील लोकांस कोणीच त्राता राहिला नव्हता. " जो येतो तो लुटतो हातीं घेऊन भाला " " लोक रडतात भारी " इत्यादि पोवाड्यांतील उल्लेख या स्थितीस अनुलक्षून आहेत.

२२ नोव्हेंबर रोजीं जनरल स्मिथ यानें बाजीरावाच्या पाठलागास सुरुवात केली. यापुढील हकीकत स्वतः डोळ्यांनीं पाहून लिहून ठेवलेल्या चिटणिसांच्या शब्दांतच देणें बरें.

## अष्टीची लढाई

**" प्रधानपंत पळत फिरु लागले मागे इंग्रेजांची फौज फलटणे लागली पुणियात प्रथम लढाई जाली. त्याजवरून श्रीमत छत्रपती महाराज कुटुंबसुद्धा**

किले वासोटा येथें नर्कचतुर्दशीचे दिवसी किल सातारा येथोन काढोन नेले तेथोन लष्करांत बाजीराव याणी आपले जवळ आणून ठेवावे म्हणजे फंद-फितूर होणार नाहीं या संकल्पानें वासोट्याहून श्रीमंत प्रताप शाहूमहाराज छत्रपतीस्वामी व श्रीमंत भाऊसाहेब यासी घेऊन आपणाजवळ नेले मार्गसीर्ष शुध्घ शष्टीस लस्करात पाव्हले नंतरी लस्करातच स्वारी असतां सोलापुराहून कूच होऊन पुढें आष्टी बाळकीचे मुक्कामी छ. १४ रबिलाखर माघ शुध्घ १५ पौर्णिमा शुक्रवारी कूच जाले बिनी गेली भोजन करून स्वारी निघावयाची तो प्रातःकालचे साहा घटका दिवसास जर्नेल स्मित इंग्रेज बाहादूर घोडनदीवर छावणीस होता तो फौजसुधा तुरुक व लयन तोफा घोड्याच्या समेत आला यापूर्वी छत्रपती स्वामीचे भोजने जाली होती बाजीराव जेवावयास बसले होते आर्धे जेवणात बापू गोखले याणीं बातमी सांगोन पाठविली कीं इंग्रेज कोश आर्ध कोशावरी आले स्वारी जलद निघोन आंतरा पाडावा मी तोंडावर जातो आजचा समय कठीण आहे सावधगिरीने जलद निघोन जावे आणि बापू गोखले तोंडावर जे समयास स्वार मानकरी होते तितकेच घेऊन गलबलीने निघोन गेले इकडे लष्करात गलबल जाली घाबरेपणे बाजीराव भोजन टाकून डेऱ्या बाहेर आले लष्करात गलबल आरड फार झाला मेणा जलद आणऊन म्यानात बसून चालीस लागले आणि माहाराजास चलावे म्हणोन सांगोन पाठविले ही हि स्वारी चालू जाली. तो इतकियात इंग्रेज याचा लगट जाला तुरुक पुढें वाढून आले बापू गोखले तोंडावर पाच च्यारसे स्वारानसी गेले होते त्याचा मुकाबला होताच गोखले याणी चालून घेतले त्यात जाऊन मिसळले समई च्यालीस पनास आसामीनिसी जाऊन हात्यार लाविले तो तुरुक स्वाराचा गोशा मिळाला घेरा पडला मागुन पाठी-वर फौज व कुमक पोहचावी ते न जाले बाजीराव याजबराबर सर्व फौज पळावयास लागली बापू गोखले विरेस येऊन तरवार चांगली केली जर्नेल खासियावरच उठले तेथे गोरे तीन च्यार मारले शेवटी आडवे बाजूनी एक गोरा खासा यांनीं पस्तोल मारिला बापूचे छयातीत जोड गोळ्या लागल्या तत्रापि सांभाळोन खासा जर्नेल स्मित याजवर हात टाकिला आणि बापू गोखले म्हणतात तो मी 'बोलले उजवे मानेवर जखम केली जर्नेल याणी जर्नेल तो मै म्हणून हात चालविला तो बापूचे डोईवर जखम लागोन खपरी

डोईची फुटली त्यानी घोड्याखालीं आले प्राण सोडिला पुरे झाले बराबर उरले त्यापैकी जखमी कांहीं जाले कांहीं ठार जाले घोरपडे दोघे खंडेराव व गोविंदराव व आनंदराव बाबर ऐसी चांगलीच माणसे पडली दुर्गासिंग मोहिते (हंबीरराव) यास दोन जखमा लागल्या कांहीं उघळले नंतरी तुरुक स्वार डावे उजवे दोन तुकड्या करुन वाढले पाठीस लागले व लयन व घोड्याच्या तोफा ऐसे काला पर्जन्याचा ढीग येतो ऐसे पाठीमागे दिसो लागले दोन प्रहरचा समय उन्हानी संगीना चकाकू लागल्या जवळ पिछयावर येऊन भिडले तेव्हा आपा निपाणकर सर लष्कर बाजीराव याचे म्यानाजवळ येऊन रागे भरला की हा समय म्यानात बसावयाचा नव्हे तेव्हां उतरुन घोडयावर बसले आणि माहाराज छत्रपती स्वामी व भाऊसाहेब माहाराज व आपासाहेब माहाराज यासहि घोडयावर बसविले आणि भरधाव घोडी हाकावयास लागले. जवळ बराबर पंचवीस तीस हजार फौज पळती परंतु एकासहि मागे फिरणे हिया होईना फिरेनात तरवारीची मेणे न काढता पळत भालेकरी याणी भाले टाकून दिल्हे भरधाव पळण्यांत अस्फागिरे म्याने पालख्या वगैरे ज्यास जे बोझे जाले ते टाकीत चालले तो लगट फारच जाला या त्रिवर्ग स्वाशास पुढे घालून बाजीराव पाठीसी चालले तो मातुश्री माईसाहेब महाराज म्यानांत होती तो मेना मागे राहिला याजमुळे माहाराज याणी घोडयास हात घालोन माई राहिली त्याची बाट काय म्हणतात तो म्याना येऊन पोहचला यमा बनकर खिजमतगार याजबराबर बाजीराव याणी आपला घोडा बसावयास माईसाहेबास पाठविला याजवर बसून जलद चलावे मेना आता निभत नाही तेव्हा मातुश्रींनी उत्तर केले कीं अगोधर घोडी मागितली तेव्हा आम्हा-विसीच मात्र दुष्काळ पडिला होता आता या घोडयाचा हास भास मला नाहीं आपलेच घोडीवर बसून येतो म्हणून बोलोन बहुतच रागे भरून घोडयावर बसली शामराव व बाळाराव रास्ते मागे चालू लागले जल्द चला ऐसा घेगा करू लागले तेव्हा माईसाहेबानी पुसिले हे कोण आहेत तो राघोपंत जोसी नि ॥ बाजीराव याणी सांगितले की रास्ते आहेत इतके दिवस मागे चालण्यास कोणी नहुते आता कोठून आले ऐसे बोलताच रास्ते तोंड चुकाऊन पुढे .गेले बाजीराव पंडितप्रधान याचे व इंग्रेज

बहादूर याचे गर्दीत दिसेनात त्याजवरून फारच रागे भरली तिघाची भेटी लौकर करा ते बाजीराव याणी ऐकून सेखू खैरा खिजमतगार यास पाठविले आणि त्याबराबर निरोप पाठविला की या समई मजवर मर्जी प्रसन्न असावी दोन कोश संभाळून गेल्यावर मी बिनंत्या करून सर्व स्वामीचे पुढे ठेवितो तो त्रिर्वर्ग महाराज याची गाठ पडली तो गर्दीचा समय लगट फारच जाला बाजीराव याणी आपले बायकोस छिटाचा आंगरखा व पायजमा घालून डोईस रुमाल बांधविला होता तिजला व ढमढेरे वगैरे याच्या दोन चार बायका यास घोडयावर घालोन जवळच चालविल्या असेत ज्या बाजूनी इंग्रज याकडील तुरुक जवळ दिसेत तो मार्ग सोडोन डावे उजवे पळता वाट नांगरटी व वोढ व कर्डीची सेते भडोला भारी यामुळें घोडी व माणसे फार हैराण होत तो येक तोफेचा गोळा येऊन पडला त्याणी फारच गलबल जाली फिस्तूल गोळ्या येऊ लागल्या घोडया हत्तीला व माणसास लागू लागल्या या गलबलीत माईसाहेब यांची घोडी आटपेना आणि इंग्रजाकडील स्वार फारच सन्निध येऊन पोहचले तेव्हा भाऊसाहेब माहाराज याणी माईसाहेब यासी आपले घोडीवर घेऊन शालनामेचे रुमालाने पाठीसी बांधिली माईसाहेब बसली होती ती घोडी आमलं मागे राहिली तो तुरकानी पाडून नेइली घोडयावरून उतरून बसण्यास अवकाष पडिला तो बाजीराव लांबले." [ म. द. रु. २ ]

कोरेगांवाहून बाजीराव निघाला तो माल्प्याचे घाटानें वर चढून कर्नाटकांत शिरून त्यानें थेट घटप्रभानदी गांठली. पण मद्रासेकडून जनरल मन्रो येत आहे असें कळल्यावरून तोंड फिरवून कृष्णापार होऊन फिरून साल्प्याचे घाटानें वर चढून सोलापुराकडे वळला. सोलापुराहून पंढरपुराकडे येत असतां वाटेंत अष्टीची प्रसिद्ध लढाई झाली. बापू गोखले पडले. लढाई संपण्यापूर्वींच बाजीराव बापू गोखल्यास सोडून निघाला तो कोपरगांवास थांबला. तेथून कांहीं दक्षिणी व परदेशी सैन्यासह त्यानें उत्तरेची वाट धरली. चांद्याकडे जाण्याचे हेतूनें बाजीराव वर्धा नदीपर्यंत गेलाहि. पण इंग्रजांचें सैन्य तेथेंहि सामोरें आल्यामुळें तो पश्चिमेस पांढरकवड्यास आणि तेथून शिवणीस गेला. एव्हांपर्यंत त्याचे बरेचसे सरदार त्याला सोडून गेलेच होते. पटवर्धन कोपरगांवाच्या मुक्कामींच गळाले होते. आतां त्याचा

भाऊ चिमाजी, आप्पा देसाई निपाणकर, नारोपंत आपटे, वगैरे सरदारहि त्याला सोडून निघाले व स्मिथच्या स्वाधीन झाले. शिवणीहून बाजीराव उत्तरेकडे वळून ता. ५ मे रोजीं तापीपार झाला. शिंद्यांच्या मुलखांत जाण्याचा त्याचा विचार होता. पण तिकडे तोंडावर माल्कम् याची फौज आहे असें कळतांच तो हताश झाला व अशीरगडाजवळ धोलकोट येथें मुक्काम करून बसला. येथेंच त्यानें आपलें सर्वस्व इंग्रजांच्या स्वाधीन केलें.

# खडकीची लढाई

## पाठभेद

| शाळिग्राम प्रत–१९११ | पोवाडे ( सारस्वत-प्रसारक-मंडळी ) |
|---|---|
| त्याची बातमी गेली इंग्रजांच्या घरांत | चोरबातमी गेली इंग्रजांच्या घरांत |
| माजला कलह ऐका आश्चर्याची मात | तेथुनि रचिला कलंकी ऐका आश्चर्याची मात |
| फेर झडली लढाईवान पडला | फरडी झाली लढाईवान पडला |
| करनल बरसाहेब होते पलटणींत | करनलसाहेब होते पलटणींत |

| शाळिग्राम प्रत–१९११ | शाळिग्राम १८७९ |
|---|---|
| तेथुनि माजला कलह | तेथुनि कज्या झाला |
| कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजी-साठीं | कोट किल्ले देऊं केले त्रिंबकजीसाठीं |
| वसई सुभा दिलारे देवा आड केली ताटी | वसई सुभा देऊ केला अडकेल्या ताटी |
| मनसुबा पहा कैसा केला | मनसुबा पक्का नाहीं केला |
| लढाईवान पडला | लडीवान पडला |
| सत्राशे एकुणचाळीस ईश्वरी नाम-संवत्सराला | एकुणचाळीस ईश्वरी नाम संवत्स-राला |
| हुकुम तो लइ करडा झाला | हुकुम तो झाला |

खालच्या चौकांत चरण आगेमागें झालेले आहेत व "शहरांत लोक आतां रडतात भारी," एवढा चरण १८७९ प्रतींत अधिक आहे.

काव्येतिहाससंग्रहांत सगनभाऊच्या या पोवाड्याची एक तिसरीच प्रत छापली आहे. पण अक्कड कडवें आणि दोन तीन चरण वगळले तर बाकी कोठेंच त्यांत साम्य नाहीं.

शितूतांच्या पुस्तकांत याच पोवाड्याची एक चवथी नक्कल छापली आहे तींत मात्र वरील तिसऱ्या प्रतींतले सर्व पाठ सांपडतात.

# खडकीची लढाई

## ३८

[ शाहीर–सगनभाऊ ]

[ चाल–कडेपठारीं डोळे झांकून बसला मलुराया । ]

दक्षणच्या पेशव्यांशीं घाला कधीं नव्हता आला। गंगाधरशास्त्र्याचे-वरून राज्याचा नाश झाला ॥ ध्रुपद ॥

गंगाधरशास्त्री मारिले पंढरपुरांत। त्याची बातमी गेली इंग्रजांच्या घरांत ॥ तेथुनि माजला कलंकी ऐका आश्चर्याची मात। त्रिंबकजी डेंगळे हवालीं करून झाले शांत ॥ दोन दिशीं वाद मिटला ठेविला ठाण्यांत। पुढें व्हायाचें पळून गेले सहाव्या महिन्यांत ॥ इंग्रजांच्या पहाऱ्यांतून असा कोण गेला ॥ गंगाधर० ॥ १

कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजीसाठीं। महिन्याचा वायदा मसलत केली उफराटी ॥ वसई सुभा दिलारे देवा आड केलीं ताटीं। कसा तरी जिव वांचो पडल्या दुष्टांच्या गांठी ॥ बाबासाहेब गेले पंढरीला विठ्ठलाच्या

---

कलंकी–कली. कलह [ शालिग्राम ]. ठाण्यांत–ठाणे येथें तुरुंगांत. इंग्रजांच्या पहाऱ्यांतून असा कोण गेला ?–'इंग्रजांचे कैदेंत त्रिंबकजी पडला तो सुटावयाचा नाहीं असें असतां सुटला हें ईश्वरी कृत्य असें श्रीमंतांचे मनांत येऊन त्याजकडे ऐवज पाठवून त्याची आंतून पुरवणी श्रीमंत करूं लागले'. [ म. इ. सा. खं. ४ पा. १२२ ].

"The difficulties of this escape were exagerated into an exploit worthy of Shivaji and greatly contributed to raise the fame of Trimbakji amongst his countrymen.'

—*Grant Duff 630* १

कोट किल्ले दिले ओलीला त्रिंबकजीसाठीं–सिंहगड, पुरंदर आणि रायगड. उजवे फूल द्यावे आम्हा माहुलीच्या काठीं–आमचेसारखा कौल द्यावा. गोविंदराव काळयानें मनसुबा पहा कैसा केला–'ते समयीं गोविंद-

भेटी। उजवें फूल द्यावें आम्हां माहुलीच्या कांठीं ॥ गोविंदराव काळ्यानें मनसुबा पहा कैसा केला ॥ गंगाधर० ॥ २

बापु गोखले मुळींच ऐका बेटावर गेले। बेट जाळून निघूनशानें खडकीवर आले ॥ दोघांचे मोर्चे भिडले आकाश कडकडलें। बापु गोखले जाऊनशाने तोफेवर पडले ॥ ' टोपीवाल्याची फरडी झडली लढाईवान् पडला। लहान थोर जन रणभूमीशीं युद्धास आला ॥ दोहों सैन्यांचा बहुतसा चेंदा तो झाला ॥ गंगाधर० ॥ ३

दोन पलटणी येउन पुण्यावर गारपिरीं भरल्या। युक्ती युक्तीनें उठवून लावितां खडकीवर ठरल्या ॥ आश्विन महिना एकादशी तरवारी झडल्या। तेराव्या दिसचा समाचार ऐकुन घ्या दाखला ॥ सत्रासें एकुणचाळीस ईश्वरी नाम संवत्सराला ॥ गंगाधर० ॥ ४

---

राव काळे हे जुन्यापैकीं होते, ते घरीं बसले होते. त्याजला बारामतीहून पुण्यास आणिले. तेव्हां सारा मजकूर काळे यांस समजाविला, त्यासमयीं गोविंदराव काळे यांनीं मसलत सांगितली कीं 'तूर्त इंग्रजाशीं लढाईचा प्रसंग घालूं नये'. [ पे. ब.१८६ ]. २

फरडी झाली–दुर्दशा झाली? फेर झडली [ शालि० ]. लढाइवान पडला–लेफ्टनंट फाकनेर [ डफ ]. ३

गारपीर–"On the right bank of the Mutha river the position which is near the Collector's Office close to the northern outskirts of Poona had been chosen in 1803 by the Duke of Wellington to guard the town,"

Garpir or the quarty saint graveyard is a Musalman grave yard about 150 yards south-east of the Collector's Office and 250 yards west of Saint Pauls Church. In the Musalman Garpir grave yard which is a large plot of ground with several old tamarind trees."

—*Gazetteer of the Bombay Presidency Pages 368-369* ४

लाख फौजेचा जमाव झाला श्रीमंतांपाशीं । रणभूमीवरी येऊन पडल्या तोफांच्या राशी ॥ अल्पिष्टन्साहेब स्मिथसाहेब आले रागाशीं । सिंधुराच्या टेंकडीवर दिल्या तोफांच्या राशी ॥ अल्पिष्टन्साहेबाचा हुकूम तो लई करडा झाला ॥ गंगाधर० ॥ ५

करनल बरसाहेब होते पलटणींत । आले धाऊन खडकीच्या मैदानांत ॥ लढाई करून बहुत केली मात रंजुक झडत । पाचेचा हिरा दडेना वाटोवाटी चंद्र गगनांत ॥ बापु गोखला सकळ सुरवर स्तविती रणांत । तीन लाख फौज पळून गेली बापु गोखला राहिला रणांत ॥ युद्ध केलें त्यानें युद्ध केलें बहुत । बाबासाहेब विश्वास देऊन माहुलीस गेला ॥ बापु गोखला लढतां सवाप्रहर दिवस आला ॥ गंगाधर० ॥ ६

दळणासरसे किडे रगडिले रडती नरनारी । लेकराला माय विसरली कसा ईश्वर तारी ॥ आधीं गेले ते पार पडले पुण्याच्या पारीं । पुण्यावरतीं चढले झेंडे केली बारासारी ॥ जो येतो तो लढतो हातामधिं भाला घेउनी । सगनभाऊ म्हणे ऐशी ईश्वराची करणी ॥ बिबिलन म्हणे चंद्र सूर्याशीं कलंक लागला ॥ गंगाधर० ॥ ७

---

**सिंधुराची टेकडी**–" ही सिंधुर टेकडी येरवड्याजवळ आहे." [ शालि०, टीप, ७९ सालची आवृत्ति ]. ५

**रंजुक झडत**–सिलका होत. फैरी होत. **बाबासाहेब विश्वास देऊन माहुलीस गेला**–शब्द देऊन पण शेवटीं विश्वासघात करून माहुलीला पळाला. बाबासाहेब–दुसरा बाजीराव. ६

**दळणासरसे किडे रगडिले**–लढाऊ शिपायांबरोबर गरीब बिचाऱ्या प्रजेचेहि हाल झाले. **पारीं**–पारी–आच्छादन. आधीं पुण्याबाहेर पडले ते सुरक्षित राहिले. **पुण्यावरतीं चढले झेंडे**–" इंग्रज बहादुर याणीं शहरांत शनवारचे वाड्यांत झेंडा कार्तिक शुद्ध ९ सोमवारीं लावून शहरचे लोक हवालदील होऊन पळो लागले त्यास दिलभरंवसा देऊन उदमी व सावकार वगैरे सर्व रयतेचा बचाव केला." [ म. इ. सा. खं. ४ पा. १५७ ]. ७

# खडकी व अष्टीची लढाई

## ३९

### [ शाहीर—होनाजी बाळा ]

ही उत्कृष्ट पोकळडेवजा लावणी शाळिग्राम व शितूत या दोघांच्या संग्रहांत आढळली. शाळिग्राम प्रतीपेक्षां शितूतप्रत अधिक शुद्ध वाटली. शितूत प्रतींत कांहीं चरणहि जास्त आढळले सबब त्या दोघांची एक प्रत करून येथें छापली आहे.

शके सत्राशें एकुणचाळसा मधीं ॥ ईश्वरे नामं हा बरवा संवत्सर होता तधीं । झाली प्रथम लढाई दिपवाळीचे आधीं ॥ वेळ कठीण मोठी तेव्हांची कैकांच्या हरल्या शुधी । मी सांगत होतें घरीं स्वस्थ राहावें चार दी ॥ ऐकिलें नाहीं गडे माझे, चाकरीस गेले गुणनिधी ॥ चाल ॥ टाकूनी पती मजला गेले ते परतून येतील कधीं । आजवर सोडून सखयाला राहिलेंच नव्हतें जुदी ॥ आठवण तयाची होती मजला क्षणोक्षणीं पदोपदीं । फलटणचा मार मोठा लागले परक्यांचे बुधी ॥ बंदुकी तोफेचे गोळे येतात लष्करामधीं । रक्ताचे पूर वाहताती जशी भरून चालली नदी ॥ हा पण लढाईचा भारी, श्रीहरीच नेयील सिद्धी । या उपरांतिक ललाटीं नकळे काय लिहिलें सिद्धी ॥ वर्तलें जगीं बडें न लागतां नखी । ईश्वरी सूत्र घर ज्याचें त्याला पारखें ॥ पती नाहींत घरींग बाई तीळ घालूं कोणाचे मुखीं । आला संक्रांतीचा सण जीव हा दुःखी ॥ धृ० ॥ १

पहिल्यापासून श्रीमंताचें लष्कर । माहुलीवर जमाव झाला पुण्यानजीक गारपिर ॥ होते पंतप्रतिनिधी, सचिव, स्वारीबरोबर । काळे गोविंदराव बापू, नानाजी माणकेश्वर ॥ होते अबा पुरंदरे आणिक विंचूरकर । राजे

शुधी—शुद्धि. शुध—शुद्ध. चारदी—चार दिवस. जुदी—विभक्त [ शाळि. पाठ—कधीं ]. भारी—मोठा. "काय लिहिलें सिद्धी !" "काय लिहिलेसी विधी" असें असावें. १

**काळे गोविंदराव बापू......सांगू कोठवर—" तेव्हां श्रीमंतांकडील फौजा**

बाहादर आणि रास्ते, पटवर्धन मिरजकर ॥ मोरू दीक्षित पडले प्रथम लढाई-
वर। ते आघाडीवरती बापू गोखले रणी रणशूर ॥चाल॥ पत्र धाडून निपाणी-
तून आणिले निपाणकर। आले अक्कलकोटचे राजे, ढमढेरे, निंबाळकर ॥
घाटगे जगताप दरेकर होळकर। ते दौलतराव शिंदे त्या हिंदुस्थानामधीं दूर ॥
भोंसले व गायकवाड अशीं नांवें सांगू कोठवर। किती वर्णूं श्रीमंतसरदार
हे आणखी ॥ पती०॥ २

इंग्रेजें घेऊन टेकडी बांधलें बळ। मोर्चे साधून त्यावेळीं किंचित न मागें
ढळ ॥ होते गोसावी अरब सिंदे पायदळ। एलवड्यावर पहिल्यानें जाउनियां
केली कळ ॥ त्यामागें उभे राहिले घोडे दळ। महाकाळीच्या गोळ्यानें
इंग्रेजें सोडिला तळ ॥ भाले बरच्या लखलखती, सुरईचे मोकळे सळ ॥चाल॥
पुढें इंग्रेज चालून येतां साफ झालें रणमंडळ ॥ त्यावेळीं आकाशीं पाहातां
चंद्रानें केलें खळ। बळ आणखी पाहून ते दिवशीं श्रीमंत मिळवी दळ ॥

---

सरदार उमराव जमा होतच चालले होते. त्यांचीं नांवें आठवलीं तितकीं
लिहिलीं आहेत. मुख्य बापू गोखले यांची फौज अजमासें पंधरा हजार पाय-
दळ सुद्धां, व आबा पुरंदरे यांची फौज तीन हजार व नारो विष्णु मिरजकर
व रास्ते, व थोरात व जाधव व नानाजी माणकेश्वर, श्रीमंत पंत प्रतिनिधी
व दीक्षित ( मोर ) याचे दिमतीस फौज दोन हजार व विंचुळकर यांची फौज
सुमारी दहा हजार एकूण फौज सुमारी पन्नासा हजारांची भरती जाहाली.
मसलतगार मुत्सदीपैकीं गोविंदराव काळे हे मुख्य प्रभूपाशीं. ढमढेरे वगैरे
मंडळींचीं नांवें कोण लिहितो. मुख्यांचीं नांवें लिहिलीं आहेत." [ साधनें, ४].२

बांधलें बळ–सज्ज झाले. ढळ–ढळे, सरे. सिंदे–सिद्दी. एलवडे–येरवडे ?
कळ–कलह. कळ केली–कलह केला. महाकाळी–महांकाळी ( तोफेचें नांव )
ही तोफ या लढाईंत होती. [ साधनें, ४ पा. ७६ ]. बर्ची–लढवय्या इसमा-
च्या डोक्यापेक्षांहि उंचीचें लोखंडी दांड्याचें, व शेवटास टोंक असलेलें असें
जें शस्त्र त्यास बरची असें म्हणतात. [ दांडपट्टा, पा. ८२, ल. ब. भोपटकर ].
खळ–खळें. भावार्थ–चंद्राला खळें पडलें, अपशकुन झाला. शहरांत सुडका

सरली फौज अवघी मागें शहरांत सुटला पळ। सावकार वाणी उदमी बैसले होऊनी निर्मळ ॥ द्रव्याच्या शोकें करून कितीकाला भरला चळ। सोडून पुजारी गेले त्या देवाचें देउळ ॥ कैकांचे कुटुंबें चुकले रानांत करी तळमळ। ईश्वरि सुत्र घर ज्यांचे त्याला पारखी ॥ पती०॥ ३

फलटणें कोरेगांवीं जाऊन घातलें कडें। उभयतांची पाहून लढाई कैकासि धासत पडे ॥ वीरश्री शूराचे आंगीं सागरीं बाई भरतील हुडे। दरमजल लढाई होती दोहीकडून किन्हा जडे ॥ सोड्चे मारती हात शिर जैसें चेंडू उडे। अशी बातमी ऐकतां काळिज माझे धडधडे ॥ रात्र दिवस माझा जिव गे माझ्या पतीराजाकडे। सांगती भट ब्राह्मण मला यशवंत तुझे चुडे ॥ म्हणे होनाजी बाळा अवघे श्रीहरी निरसिल सांकडें। गाईकांसी ऐकतात जन हे सुखी ॥ पती०॥ ४

---

पळ-“ गांवांत आईस लेंकरूं पुसेनासे जाहाले. पळ असा निघाला कीं रस्त्यांत वाट मिळेनाशी जाहाली. कोणी पर्वतीचे डोंगरांत, कोणी कोणीकडे, ऐशी गेली. नवरा एकीकडे, बायको एकीकडे, पोर एकीकडे ऐशी अवस्था जाहाली. गांवांत बातमी, आतां पुणें जाळतो, आतां लुटतो...... पुढें बातमी गावांत ऐशी आली कीं इंग्रज नाकेबंदी करतो. बाहेर कोणास जाऊ देत नाहीं. तेव्हां जी गांवचे मनुष्याची गत जाहाली ती ईश्वरास ठावूक ! ” [ साधनें, ४, ७९ ]. **भरला चळ**-चळ भरला: वेड लागलें. **निर्मळ**-पैसा वगैरे लपवून किंवा पुरून ठेवून. २ नागविले गेल्यामुळें. **कैकांचे कुटुंबे चुकले**-किती एकांचे कबिले चुकले. ३

**सोड्वा**-सुरईचा पाहिजे. **सुरई**-तरवार. **वीरश्री शूराचे अंगीं सागरीं बाई भरतील हुंडे**-वीरश्री शूराचे अंगीं सागरीं बाई भरतीच चढे-चहडे **किन्हा चढे**-कुन्हा तर नव्हे ? **कुन्हा**-दंश; वैर. **तुज यशवंत होई चुडे**-तुझें चुडेबळ बळकट आहे; तुझें सौभाग्य म्ह०-पति यशवंत होऊन परत येतील. **सांकडें**-संकट. **नेईल**-हरील; हरण करील. ४

# खडकीची व अष्टीची लढाई

## ४०

[ शाहीर–रत्नू केरू ]

[ **चाल—खबर** ऐका बदामीची.॥ ]

[ **चौल दुसरी**—केशवकरणी अघटित लीला नारायण तो कसा । ]

पंढरीराया करा दया हालीव सूत्र निर्धारीं । चला करूं पंढरीची वारी ॥ ध्रुपद ॥

शके सतराशें एकुणचाळीसांत श्रीमंत आले आषाढीला । अंत लागेना फौजेला ॥ चौफेर दिले दलबादल डेरे गोविंदपुऱ्यासमोर । गोखले आणि विंचुरकर ॥ लोक सरसा अरब खासा श्रीमंताचे बरोबर । उतरले पद्म तळ्यावर ॥ फिरंग गोरा पठाण तेरा गोपाळपुरचे ओढ्यावर । रास्ते पटवर्धन मोहरें ॥ सैन्य जमलें बहू रमले आनंद झाला महाद्वारीं । चला करूं पंढरीची वारी ॥ १

वेदशास्त्र संतचार कल्पना घेती साधुजन । आज पंढरी दिसती शून्य ॥ गंगाधरशास्त्री पुण्यपवित्र जात होता रस्त्यानें । केवळ विष्णु भगवान ॥ पुढें

---

**हालीव सूत्र निर्धारी**–निश्चयपूर्वक कौल दे. **आषाढीला**–आषाढी एकादशीकरितां, यात्रेकरितां. **गोविंदपुरा**–पंढरपुरचा एक भाग. गोपाळपुरा असाहि दुसरा एक भाग आहे. **सरसा**–(अव्यय) जवळ, एकत्र, बरोबर [आपटे]. लगेच पुढें 'श्रीमंताचे बरोबर' असे आहे तेव्हां द्विरुक्ति टाळण्याकरितां सरसा म्हणजे सरस, निवडक असाहि अर्थ संभवेल. **फिरंग गोरा पठाण तेरा** (?)१

**वेदशास्त्र संतचार कल्प ना घेती साधूजन**–संतचार 'संचार' तर नव्हे ? 'वेदशास्त्र संचार कल्प ना घेती साधुजन' वेदशास्त्राचा संचार जेथें आहे अशा त्या पवित्र क्षेत्रांतील सज्जनांना संशयहि आला नाहीं कीं खुनासारखें कृत्य तेथें घडेल पण तसें घडल्यामुळें आज पंढरी शून्य म्हणजे उदास दिसत आहे. **कल्प**–संशय; अंदेशा. **जात होता रस्त्यानें**–प्रदाक्षिणेच्या.But he had scarcely proceeded 300 yards when he was attacked in the street."

मागें लोक संगें मशाला जळती जोड्यानें। शास्त्री हो चाले सोवळ्यानें ॥
कोणी मसलत केली गफलत ठाईं ठाईं बसले जपून। धांव घेतली कर्मानें ॥
तस्करानें जलदी करून हात मिळविला जाऊन। मशाला पडल्या गळून ॥
पडला वार झाला ठार प्राण गेला वरचेवरी। चला करूं० २

झाली गर्दी नाकेबंदी कोणी पुसेना कोणाला। लोक वागेना रस्त्याला ॥
मशालजीनें जलदी करून खबर पोंचविली सेनेला। शास्त्रीबोवा ठार झाला ॥
लोकबळ मायाजाळ घळघळ रडती बावाला। कसा वैऱ्यानें घात केला ॥
मानकरी होते पदरीं पाणी आणिती डोळ्यांला। आमचा पोशिंदा गेला ॥
कारकून पडले शून्य हुजऱ्या स्फुंदत स्फुंदत द्वारीं। कसा कोपला श्रीहरी ॥
चला करूं० ॥ ३

किल्लेदार मर्दशूर ताकीद केली सेनेला। आरबी बाजा फडफडला ॥
कारकून बसुनशान मनसूब रायानें केला। पत्र पाठवा फिरंग्याला ॥ घटका
रात्रीं गंगाधर शास्त्री जात होता देवाला। मधीं खपविला रस्त्याला। त्या वेळे

---

[Grant Duff, 639.]. **मसलत**–कट; **गफलत**–लबाडी; दगा. **जपून**–टपून; दबा धरून. **धाव घेतली कर्मानें**–कर्म ओढवलें, वेळ भरली, दुर्दैव उभें राहिलें. **तस्करानें**–चोरानें; नीचानें; मारेकऱ्यानें. **हात मिळविला**–हात भिडविला; घाव घातला. २

**लोकबळ मायाजाळ घळघळ रडती बावाला**–**लोकबळ**–कोलाहल (?) मोडी अक्षरांचा असा घोंटाळा होणें शक्य आहे. शास्त्रीबोवांच्या मायाजाळानें म्हणजे आप्तेष्टांनीं, प्रेमसंबद्ध लोकांनीं एकच कल्होळ केला व ते रडूं लागले. आहेत असेच शब्द घेतले तर बळेंच मायेचा आव आणून घळघळ रडूं लागले असा अर्थ होईल. पण तो बरोबर होणार नाहीं; कारण शास्त्र्याचा खून तेव्हां कोणासच पसंत पडला नाहीं. ३

**बाजा फडफडला**–मिलिटरी बँड वाजूं लागला. **रायानें**–बाजीरावानें का किल्लेदारानें? **खपविला रस्त्याला**–रस्त्यांत ठार केला. **खपावणें**–

झाला काळ उशीर नाहीं घटकेचा झाला। प्रेत जळत तीराला ।। फिरंग्याला क्रोध आला मुत्सदी कोणी मारला। हातीं कलम घेऊन पडला ।। रात्रसमयीं पत्र लिहिलें लखोटा कुंपणीला गेला। अवघा वर्तमान लिहिला ।। कुंपणीनें पत्र पाहून प्रभूशीं जप्ती करी भारी। चला करूं० ।। ४

सेनेंत झाला बेत घाबरें झालें लष्कर। जीन ठेविलें घोड्यावर ।। दर मजली फौज शिणली घाट उतरुन गेले पार। दाखल झाले पुण्यावर ।। कुच केलें निघुन गेले मुक्काम केला वेळापुरावर। गस्त फिरंग्याची तुरुकस्वार ।। चौफेर लाल गोल वाजवी तंबुर बासरी। चला करूं० ।। ५

शुक्रवारीं प्रहर रात्रीं मनसूबा करती आवघेजण। द्यावी चवथाई लिहून ।। गोखल्याला क्रोध आला लैन काढीन कापून। टोपी झाडाला लावीन ।। नानाभाऊ दिल्लीस जाऊं जरीपटका सोडीन। बसवूं दिल्लीचें ठाणें ।। दिल्लीवर सवा प्रहर भाऊनें झेंडे लाविले। बादशाही तक्त फोडीलें ।। रणीं पडले नांव केलें वंश क्षेत्र्याचा अभिमान। लढाई घेऊं जातीनें ।। तह ठरला लढाईला कंबर बांधीली गोखल्यानें। खवळला व्याघ्र पंचानन ।। स्वार झाला निघुन गेला फिरंगी गारपिरावरी। श्रीमंत आले नागझरी ।। चला करूं० ।। ६

- -

ठार मारणें. झाला काळ–मेला. तीराला–नदीतीराला. कलम–लेखणी; टाक जप्ती–तसदी; ताबा; कैद. ४

**चौफेर लाल गोल वाजवी तुंबुर बासरी**–फिरंगी यांचीं पलटणें बहुधा नेहमीं तांबडा पोशाख घातलेली असत. **गोल**–जमाव. **तंबुर**–टँबुरिन. ५

**नाना भाऊ दिल्लीस जाऊं.** जाऊं–जाऊन. **जरिपटका सोडीन**–सोडून असें पाहिजे. जरिपटका फडकावून. निशाणें काम नसेल तेव्हां गुंडाळून ठेवतात म्हणून 'सोडून'. **बसवूं**–बसवून. **वंश क्षेत्र्याचा अभिमान**–अभिमानाला पडलेल्या क्षत्रिय वंशांतील पुरुषाप्रमाणें रणीं पडले व नांव केलें. **जातीनें**–स्वतः. **तह ठरला**–विचार ठरला; निश्चय झाला. ६

आदितवारीं पाहिले प्रहरीं घालमेल झाली सैनेची । तयारी दारूगोळ्याची ॥ सुरु तोफा ,सिपाई बाका पाठीमागें वामनराव पंची । सिस्त मोठी गोलंदाजाची ॥ गोसावी नंग पिऊन भांग हातीं घेउन समसेर कमची खबर आम्ही घेतों फिरंग्याची ॥ लोक उमदी आरब सिद्दी फौज आली पाटणकराची । हवा काय दिसती अंबारीची ॥ निपाणकर पुणेश्वर फत्ते तलवार गोखल्याची । बिकट लढाई कानड्याची ॥ फितूर होता ठाव नवता चोर बातमी फिरंग्याची । तयारी झाली लैनेची ॥ ‹पुढे लैन मधीं सैन्य बाजूनें दाटी तोफेची । पिछाडी तुरुक स्वाराची । साहेब गोरा तीनशें बारा काढिलीं कुलुपें मेण्याचीं । दरद नाहीं त्याला मरणाची ॥ दारू प्याला निसंग झाला हातामधीं झमके तरवारी। जसे कांहीं पांडव क्षत्री॥ चला करूं०॥ ७

तोफ सुटली लैन उठली कडाका पाहिला आरबाचा । देवडी मार कानड्याचा ॥ गोसाव्यानें लगट करून मार बसवी तिरकमट्याचा । पाडिला खासा लैनीचा ॥ आलपिष्टान जलदी करून बुरुज बांधिला फिरंग्याचा । दुहेरी मार तोफांचा । केली हल्ला मधीं शिरला सोडवी गळा कानड्याचा । बंद कापिला गोसाव्याचा ॥ सात हजार गारदी ठार अंत लागेना आरबाचा । लोक फार पडला गोखल्याचा ॥ गोखल्यानें उलट करून वार

---

वामनराव–वामनराव आपटे. पंची–प्रिय; दोस्त. सिस्त–नेमबाजी. कमची–कमठी; कमटा–धनुष्य (?) कारण ८ व्या चौकांत ‘गोसाव्यानें लगट करून मार बसवि तीरकमठ्याचा’ असेंच आहे. पुणेश्वर (?) बिकट लढाई–रसाकसीची; चुरशीची. फितुर होता ठाव नव्हता–हें विंचुरकरांना उद्देशून आहे. कुलपे मेण्याची–म्यानाचे बंद सोडले. तरवारी बाहेर ओढल्या. ‘सळ सोडिले फिरंगीचे’ –कुलुप–बंद; बंधन. दरद–भीति, क्षिति.७

देवडी मार–देवढमार–एका पाठोपाठ सोडलेल्या तोफांचा किंवा बंदुकींचा धडाका, धोधाटा. भावार्थ–कानड्यांनीं तोफांनीं किंवा बंदुकींनीं भयंकर कामगिरी केली. सोडवी गळा कानड्याचा–गळा सोडविणें–गळा कापणें. कानड्यांची कत्तल केली. बंद कापिला गोसाव्याचा–बंद–जमाव

टाकिला गोऱ्यावरी । रीघ निघेना उपाय चालेना फिरली स्वारी ॥ चला करूं०॥ ८

रण घुमलें कतल झालें पूर अशुद्धाचा वाहिला । स्वर्गीं घंटा वाजला ॥ बाराभाई शिंदेशाई मार्ग त्यांनीं काशीचा धरला । फिरंगी पाठी लागला ॥ दरमजलीं फौज शिणली दाखला पंढरीस आला । मुक्काम त्यानें आष्टीचा केला ॥ अष्टीवर लढाई फार मानकरी थोर थोर पडला । गोखल्याचा अंतकाल झाला ॥ श्रीमंत भयाभ्रित पळुनी घाटपार झाला । पवाडा कटिबंध केला ॥ रत्नू केरू नाथबहिरू आखाडा महशूरानें केला । चंद्रभागेच्या तीराला ॥ छंद झाला बसुन केला हणमंताचे पारावरी । चला करूं०॥ ९



---

रांग, टोळी. रीघ रिघेना–अवकाश मिळेना; शिरकाव होईना; प्रवेश मिळेना. ८

# दुसऱ्या बाजीरावाचा पोवाडा

## ४१

[ शाहीर—प्रभाकर ]

यशस्वी झाले श्रीमंत पहिले सर्वे लढायाला । आतांच आलें अपेश कोठुन बाजीरायाला ॥ ध्रु० ॥

दादासाहेब पुण्यप्रतापी निस्सिम शिवभक्त । स्वारी करून दरसाल हालविलें दिल्लीचें तक्त ॥ आनंदीबाइ सुशील शिरोमणी सुगुणसंयुक्त । पतिभजनीं सादर घडोघडी अखंड आसक्त ॥ बाजिरावसाहेब सदोदित जो जीवनमुक्त । जन्मांतरीं तप केले निराहारी राहुन एकभुक्त ॥ चाल ॥ शके सोळाशें शहाण्णवीं अति उत्तम जयसंवत्सरीं । पौषशुद्ध दशमीस भरणी नक्षत्र भौमवासरीं ॥ ठीक पहिल्या प्रहरांत जन्मले रात्रीच्या अवसरीं ॥ (चाल) ॥ पहा बाईसाहेब धारमुक्कामीं राहुनी । कंठिला काळ कांहीं दिवस दुःख साहुनी । केलें तेथुन कुच सुपुत्रमुख पाहुनी ॥ (चाल) ॥ गंगातिरीं येऊन राहिली अपूर्व ठायाला । कचेश्वर शुक्रेश्वर सन्निध दर्शन घ्यायाला ॥ १

समाधान सर्वांस वाटलें कोपरगावास । स्वारी शिकारिस बरोबर जाती कथा उत्सवास । जें करणें तें पुसून करिती अमृतरावास ॥ एकास नख लागल्या दुःख होई त्रिवर्ग भावांस । असें असुन नानांनीं मांडिला अति सासुरवास ॥ हळुच नेउन जुन्नरास ठेविलें श्रीमंतरावास ॥ (चाल) ॥ इतक्या संधींत सवाई माधवराव मरण पावले । तेव्हांपासून नानांनीं राक्षसी कपट

---

**शिवभक्त**—खऱ्यांच्या ऐ. ले. संग्रहांत दादासाहेबांच्या शिवभक्तीबद्दल अनेक वेळां उल्लेख आलेले आहेत. **कचेश्वर शुक्रेश्वर**—'कोपरगांवनजीक गंगेच्या पलीकडे कचेश्वराचें ठिकाण असून त्यास बेट अशी संज्ञा आहे. या बेटानजीक किंबहुना बेटांतच शुक्रेश्वर व विष्णु अशीं दोन मंदिरें आहेत. या मंदिरानजीक श्रीमंतांचा भव्य वाडा होता. [भा. इ. सं. मं. वा. इ. वृत्त शके १८३७ पा. १२२].

डौल दाविले ॥ परशुराम रामचंद्र निरोपुन मग वाटेस लाविले ॥ (चाल) ॥ आले खडकीपुलावर श्रीमंतास घेउनी । दर्शनास नाना परिवारें येउनी ॥ दाखविली याद रावास एकांतीं नेऊनी ॥ (चाल पहिली) ॥ भय मानून शिंद्यांचें निघाले वाईस जायाला । साताऱ्यांत राहून लागले भेद करायाला ॥ २

आपण बाळोबा होऊन एक केली खचित मसलत । चिमाप्पास धनी करून राखिली जुनाट दौलत ॥ करारांत दोघांच्या झाली कांहीं किंचित गफलत । म्हणुनी फिरून नानांनीं उलटी मारुनी केली गल्लत । सूत्रधारी जो पुरुष ज्याच्या गुणास जग भुलत । हातांत सगळे दोर पतंगापरी फौजा हालत ॥ (चाल) ॥ परशुराम रामचंद्र आणि बाळोबास ठाउक रण । राज्यकारणी नव्हेत एक केसरी एक वारण ॥ कठीण गांठ नानाशीं न चाले तेथें जारण मारण ।( चाल )॥ महाडास बसुनी नानांनीं बेत ठरविले ॥ बाळोबास शिंद्यांकडून कैद करविलें । शिवनेरी गडावर पटवर्धन धरविले ॥ (चाल पहिली) ॥ रास्ते झाले जामीन प्रसंगीं अवघड समयाला । असा गुजरला वक्त नेले मांडवगण पाहायाला ॥ २

घडी बसवून महाडाहुन नाना त्वरितच उलटले । द्वेषबुद्धि विसरून संशय सर्वांचे फिटले ॥ शिंदे भोसले होळकर मुश्रुल्मुल्क एकवटले । दलबादल डेऱ्यांत श्रीमंतासन्निध संगटले ॥ बाजीराव राज्यावर बसतां आनंदें जन नटले । तोफांचे भडिमार हजारों बार तेव्हां सुटले ॥( चाल )॥ नंतर नाना एकविसांमधीं समाधिस्त झाले । महाल मुलुख शिंद्यांनीं बाविसामाधिं आपले

**डौल**–आव; हुलकावणी. २

**उलटी मारून**–करार बदलून, कोलांटी मारून. गल्लत- घोंटाळा, कालवाकालव. **खचित**–निश्चित **गफलत**–घोंटाळा; कालवाकालव. **बाळोबा**–बाळोबा पागनीस. **जारणमारण**–शत्रूला वेड लागावें किंवा मरण यावें यासाठीं केलेला मंत्रप्रयोग. **मांडवगण**–परशुरामभाऊस मांडवगडावर कैदेंत ठेवलें. **संगटले**–एकवटले. ३

पाहिले ॥ यशवंतराव होळकर लढाईस जमुन उभे राहिले ।(चाल)॥ शिंद्यांनीं करून माळव्यांत खातरजमा ॥ केली फौज गंगेच्या रोखावर खुप जमा । सोडिना कंबर कधीं काढिना पायजमा ॥ ( चाल पहिली ) ॥ कुच मुकाम दररोज बनेना पलंगीं निजायाला । घेई जोठाची पचंग समरीं कोण जिंकील याला ॥ ४

दिला मार पळणास । जातिनें पुण्यास येऊनियां । शहर सभोंते वेढुन बसले चौक्या ठेवुनियां ॥ खंडेराव रास्त्यांनीं प्रभुला वसईस नेउनियां । सुखांत होते स्वस्थ सतत पंचामृत जेउनियां ॥ इंग्रजास कुमकेस प्रसंगीं बरोबर घेउनियां । सरंजाम अलिबहादरपैकीं तयास देउनियां ॥(चाल)॥ अगोदर सोजर तुरुक धांवले मप्याशी दक्षिणी । त्या भयानें होळकर परतले नाहीं कोणी संरक्षणीं ॥ भरघोसानें श्रीमंत त्यावर पुण्यास येतां क्षणीं ॥(चाल)॥ झाला बंदोबस्त सर्वही पहिल्यासारखा ॥ परि घरांत शिरला शत्रु सबळ पारखा । लाल शरीर टोपी अंगीं आठ प्रहर अंगरखा ॥ ( चाल पहिली ) ॥

---

**सोडीना कंबर**–नेहमीं लढाईच्या तयारीनें बद्धपरिकर होऊन राहिले. **जोठाची पचंग**–जो ठाशी (?). **पचंग**–पासोडी इत्यादिकांनीं कमरे-पर्यंतचा देह आवळून बांधणें. **पचंग**–(स्त्री) कास घालणें; पांघरुणांनी कास बांधली म्हणजे बद्धपरिकर झाले. ४

**पळणास**–पळण (न.)–पळ; शत्रूपुढें झालेली सैन्याची पळापळ. **जातीनें**–स्वतः. 'यशवंतराव फार शौर्यानें लढला' [ विंचू. घ. इ. १४८ ]. **खंडेराव रास्ते०**–" ते समयीं खंडेराव निळकंठ रास्ते याजकडे वसई सरसुभा होता. त्यामुळें श्रीमंत येऊन तेथें राहिले. खंडेराव यांनीं सरकारची तरतूद चांगली राखली." [ पे. ब. १७८ ]. **इंग्रजास कुमकेस०**–'वसई येथें तह झाल्या-वर बाजीराव पेशवे हे बरोबर १२०० गोरी फौज व १३०० काळी फौज घेऊन पुण्यास आले'. [ विं. घ. इ. १५३ व १५२ ]. **सरंजाम०**–" अली बहाद्दर याणें कोट रुपयाचा नवा मुलुख सोडवून त्या मुलखाचे तो राज्य करीत असतां बाजीरावानीं त्या मुलखाच्या सनदा इंग्रजास करून दिल्या."

धर्म कर्म ना जातपात स्थल नाहीं बसायाला। असें असुन सम्पूर्ण व्यापला प्राण हरायाला ॥ ५

फार दिवस आधिं जपत होते या इंग्रज राज्याला। अनायासें झालें निमित्त पंढरपुरास कज्जाला ॥ संकट पडलें कांहिं सुचेनाप्रधानपूज्याला। रति फिरली सारांश, मिळाले लोक अपूज्याला ॥ भय चिंता रोगांनीं ग्रासिलें काळीज मज्जाला। पदर पसरिती उणाख आणखी नीच निर्लज्जाला ॥ (चाल) ॥ परम कठिण वाटलें आठवलें त्रिभुवन राव बाजीला। थोर थोर मध्यस्त घातले साहेबांचे समजीला ॥ निरुपाय जाणुनी हवालीं केलें मग त्रिंबकजीला ॥(चाल)॥ ठेविला बंदोबस्तीनें नेउन साष्टीस। एक वर्ष लोटल्यानतर या गोष्टीस। केलें गच्छ भाद्रपद वद्यांतिल षष्ठीस ॥ (चाल पहिली) ॥ स्वदेशीं जागा बिकट पाहिली निसुर बसायाला। शोध लावून साहेबांनीं तेथें पाठविले धरायाला ॥ ६

इंग्रजाचा अन्यायी निघाला पाठ पेशव्याची। म्हणून साहेब लोकांनीं आरंभिली आगळिक दाव्याची ॥ वसई प्रांत कल्याण गेली गुजराथ पुराव्याची। रायगड सिंहगड बेलाग जागा केवळ विसाव्याची ॥ कर्नाटक दिलें लिहून ठाणीं बैसलीं पराव्यांची। कोणास न कळे पुढील इमारत इंग्रजी काव्याची ॥ (चाल) ॥ अश्विनमासीं वद्य एकादशी दोन प्रहर लोटतां। श्रीमंत बापूसाहेब एकांतीं पर्वतीस भेटतां ॥ हुकूम होताक्षणीं रणांगणीं मग

[पे. ब. १८२]. **भरघोसानें**–ऐटीनें ? धौशा वाजवीत. **लालशरीर०**–इंग्रजी शिपायांचे पोषाग नेहमी एकजात लाल असत. ५

**प्रधानपूजाला**–पूज्य प्रधानाला. **रति फिरली**–दैवदशा फिरली. **मज्जा**–मेंदू. **उणाख**–नीच; हलकट. **गच्छ–गच्छ करणें**–पळून जाणें. **निसुर**–निर्वेध. ६

**इंग्रजांचा अन्यायी**–इंग्रजांचा हरामखोर. गुन्हेगार. **पाठ पेशव्याची**–पेशव्यांचा पाठिंबा. **गुजराथ पुराव्याची**–(पोर्तु. प्रोव्हा. पु.) पुरवठा; पुरवणी; आधार [साधनें, ४,१३७.] **बेलाग**–अवघड; बळकट. **पराव्यांची**–परावा–परका. शत्रूंची; परक्यांची. **बापुसाहेब**–बापू गोखले.

फौजा लोटतां ॥ (चाल)॥ बैसले राव दुर्बिणींत युद्ध लक्षित। भले भले उभे सरदारसैन्य रक्षित। लागून गोळी ठार झाले मोर दीक्षित ॥(चाल ५०)॥ तसाच पांडोबांनीं उशीर नाहीं केला उठायाला। उडीसरशी तरवार करुन गेले विलयाला ॥. ७

आला त्रास वाटतें फार ह्यावरून लक्षुमिस। विन्मुख होऊन श्रीमंत आणिले चहुंकडून खामीस। फसले शके सत्राशें एकुणचाळीसच्या रणभूमीस। ईश्वरसंवत्सरांत कार्तिक शुक्ल आष्टमीस। प्रहर दिसा रविवारीं सर्व आले आरब गुरमीस। खुप मोर्चा बांधून विनविती श्रीमंत स्वामीस॥ (चाल) ॥ दारूगोळी पुरवावी आम्ही आज हटकुन त्याशीं लढूं। गर्दीस मिळवून देऊन पलटणें क्षणांत डोंगर चढूं। शिपाइगिरीची शर्थ करून समशेरी सोन्याने मढूं ॥ ( चाल ) ॥ लाविले बापुसाहेबानीं तोंड जाउनी। दीड प्रहर रात्र होते श्रीमंत दम खाउनी। गेली स्वारी मशाला हिलाला मग लावुनी॥ ( चाल पहिली ) ॥ जलदी करुनी साहेबांनीं लाविलें निशाण पुणियाला। खेंचुन वाड्याबाहेर काढलें कदीम शिपायाला ॥ ८

**मोर दिक्षित**–" मोर दिक्षित मराठे व पांडुरंग सहस्रबुद्धे.......ठार झाले." [ सा. खं. ४, १५५ ]. **पांडोबा**–[ सा. खं. ४, १५५. ] ७

**उठायाला**–हल्ला करून उठण्याला. **खामीस**–विपन्न दशेस; दुर्दशेस. **खामी**–वाईट अवस्था. **गुरमाईस**–" अष्टमीचे दिवसी रविवारी दोन प्रहरी गोखले याजकडील अरब व सरकारचे गोसावी याणी जाऊन येलवडे गांव घेऊन आत आरब व गोसावी शिरले. तेव्हां मोठे कलागतीस प्रारंभ झाला. ते दिवशीं पेशवे यांचा लढाईचा बेत नव्हता. परंतु त्यांचा नेट पडला." [ सा. खं. ४ पे. अ. अखबार.] **देऊन**–देऊं. **खेचुन वाड्याबाहेर काढिले कदीम शिपायाला**–" बाजीरावसाहेब यांची द्वाही कंपनीसरकारचा हुकूम, अशी द्वाही फिरवून चारी वांड्यांत चौकीदार व पहारेकरी, ब्राह्मण मंडळी आचारी व खटपटे कुळंबिणी व कामाठी वगैरे श्रीमंतांकडील होते तितकेहि चोहो वाड्यांतून काढून इंग्रजी पहारे वाड्यांत ठेविले.", [ पे. ब. १८९ ]. **कदीम**–जुने; पुरातन. ८

सकळ शहरचे लोक हजारों हजार हळहळती । सौख्य स्मरून राज्याचें मीनापरी अखंड तळमळती ॥ रात्रंदिवस श्रीमंत न घेतां उसंत पुढें पळती । यम-स्वरूप पलटणें मागें एकदांच खळबळती ॥ धडाक्यानें तोफांच्या वृक्ष आणि पर्वत हादळती । त्यांत संधी साधून एकाएकीं दुरून कोसळती ॥ (चाल ) ॥ भणाण झालें सैन्य सोडिली कितिकांनीं सोबत । कितीक इमानी बरोबर झुकले घर टाकुनि चुंबत । कितीक मुकामीं अन्न मिळेना गेली साहेब नौबत ॥ (चाल) ॥ कोठें डेरे दांडे कोठें उंट तट्टें राहिलीं । कोठें सहज होऊन झटपट रक्तें वाहली । कोठें श्रीमंत बाईसाहेब सडी पाहिली ॥ ( चाल पहिली ) ॥ बहुत कोमावली पहावेना दृष्टिने उभयांला । हर हर नारायण असें कसें केलें सखयाला ॥ ९

माघ शुद्ध पौर्णिमेस बापुसाहेब रणीं भिडले । जखम करुन जर्नलास फिरतां जन म्हणती पडले ॥ गोविंदराव घोरपड्याचे दोन हात भले झडले । आनंदराव बाबर ढिगांमधीं खुप जाऊन गढले । मानाजी शिंदे मागें फिरतना डोई देऊन अडले । छत्रपती महाराज तळावर समस्त सांपडले ॥ (चाल) ॥

---

**चुंबीत**–Compliantly ; Yieldingly; Submissively. [ मोल्स ] **साहेबनौबत**–सैन्यापुढें हत्तीवर चालणारी मुख्य नौबत. **डेरे दांडे**–छावणीचें सामानसुमान. **सडी पाहिली**–सडी–घोड्यावर बसलेली. " तो गर्दीचा समय उलट फारच जाला. बाजीराव याणी आपले बायकोस छिटाचा आंगरखा व पायजमा घालून डोईस रुमाल बांधविला होता तिजला व ढमढेरे वगैरे याच्या दोन चार बायका यास घोड्यावर घालोन जवळच चालविल्या असेत." [ म. द. रु. २, चिटणीस दिनचर्या, २७ ]. **कोमावली**–कोमेजली. ९

**जखम करूनि**–" त्यासमइ बापु गोखले यांची व इसमत साहेब बहादुर यांची गाठ पडून जखमा लागल्या ऐसे ऐकीव वर्तमान परंतु गोखले याच्या मंडळीस कोणाच्या दृष्टीस पडले नाहीत बापु गोखले याणी गर्दीत मिसळले त्याची अखेरी जाहाली ते ईश्वर जाणे " [ मराठी दप्तर रुमाल २. सरदार गोखले यांची कैफियत पा॰ २१]. " तो इतकियात इंग्रेज याचा लगट

घाबरले श्रीमंत सुचेना मन गेलें वेधुनी। बाईसाहेबांना तशिच घोडयावर पाठीस बांधुनी। नेले काढुनिया अमृतराव बळवंत जेष्ठ बंधूनिं॥ (चाल)॥ दहा प्रहर पुरे पंतप्रधान श्रम पावले। नाहीं स्नान शयन नाहीं स्वस्थपणें जेवले। आले आले ऐकतां उठपळ राव धावले॥ ( चाल )॥ गर्भगळित जाहले लागले शुष्क दिसायाला। बाईसाहेबांना फुरसद न पडे बसून न्हायाला॥ १०

दिवाळी आणि संक्रांत कंठिला दुःखांत फाल्गुन। रागरंग नाहीं आनंद ठाऊक रायालागुन॥ सदैव चिंताग्रस्त शब्द बोलती वैतागुन। कर जोडून फौजेस पाहिलें घडोघडी सांगुन॥ धैर्य धरून कोणी कसून लढेना क्रियेस जागुन। कर्म पुढें प्रारब्ध धावतें लगबग मागुन॥ (चाल)॥ पांढरकवड्यावर

---

जाडा तुरुक पुढे वाहून आले बापू गोखले तोंडावर पाच च्यारसे स्वारानसी गेले होते त्याचा मुकाबला होताच गोखले याणी चालून घेतले त्यात जाऊन मिसळले समई च्यालीसं पन्नास आसामीनिशी जाऊन हात्यार लाविले तो तुरुक स्वाराचा गोशा मिळाला घेरा पडला पाठीवर फौज व कुमक पोहचावी ते न जाले बाजीराव याजबराबर सर्व फौज पळावयास लागली बापू गोखले विरेस येऊन तरवार चांगली केली. जर्नेल खासियावरच उठले तेथे गोरे तीन च्यार मारले सेवटी आडवे बाजूनी एक गोरा खासा याणी पस्तोल मारिला बापूचे छयातीस जोड गोळया लागल्या तत्रापि सांभाळोन खासा जर्नेल स्मित याजवर हात टाकिला आणि बापू गोखले म्हणतात तो मी बोलले. उजवे मानेवर जखम केली जर्नेल याणी जर्नेल तो मै म्हणून हात चालविला तो बापूचे डोईवर जखम लागोन खपरी डोईची फुटली त्यांनी घोड्याखाली आले प्राण सोडिला पुरे जाले" [ मराठी दप्तर रुमाल २. छत्रपतींची शके १७३९ तील दिनचर्या टिपणी पा. ३०-३१ ] **ढगामधीं**–लढाईच्या गर्दीत "Govindrao Ghorparde and Anandrao Babar both persons of distinction were killed with him." [—*G. Duff, 661.*]. १०

**क्रियेस जागून**–शपथेला स्मरून; शब्दाला जागून. **क्रिया**–आण भाक: शपथ. **कर्मपुढें प्रारब्ध धावते**–(?) आरंभलेल्या कार्याला कर्म आडवें

रचविल्या घनगारा अद्भुत। थंडीनें मेले लोक उठविले गारपगाऱ्यांनीं भुत। बेफाम होतें लष्कर नव्हती कांहीं वार्ता संभुत ॥(चाल)॥ ओढवलें कसें सर्वांचें समयीं संचित। कडकडून पडलें गगन जसें अवचित॥ दुःखाचे झाले डोंगर नाहीं सुख किंचित ॥(चाल पहिली)॥ अनुचित घडली गोष्ट दिसेना ठाव लपायाला। कोणे ठिकाणीं नदींत लागलें सैन्य बुडायाला॥ ११

जे श्रीमंत सुकुमार वनांतरीं ते भटकत फिरती। कळेल तिकडे भरदिसास प्रभु काटयांमधिं शिरती॥ आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारुन धरती। खालीं पसरुन उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करती॥ अस्तमानीं कधीं रात्रीं भात भक्षिती पाटावरती। दरकुच दर मजलीस कृपेंतिल सेवक अंतरती॥ (चाल)॥ पेशव्यांचे वंशांत नाहीं कोणी असा कहर पाहिला। हत्ती घोडे उंट खजीना जेथील तेथे राहिला॥ बाजीराव होय धन्य म्हणून यापरी आकांत साहिला॥ (चाल)॥ नर्मदेस शालिवाहन शक संपला। त्या ठायीं ठेविला शकपंती आपला॥ भरचंद्रराहूग्रहणांत जसा लोपला॥ (चाल पहिली)॥ सांब कसा कोपला लागले गलीम लुटायाला। सिद्ध झाले मालकमास राव राजेंद्र मिळायाला॥ १२

---

होते. पांढरकवडयावर–[वि. ध. इ. १८३]. रचविल्या घनगारा–गारांचा पाऊस पाडण्यासाठीं चेटूक केलें. गारपगार–मंत्रसामर्थ्यानें गारांचा पाऊस पाडणारे वाममार्गी. “श्रीमंत नागपूर पावेतो पळाले. तेव्हां गारपगारी श्रीमंतापाशी येऊन भेटले. श्रीमंतास म्हणत होते “आम्हास कांहीं रुपये द्याल तर इंग्रजांचे लष्करावर गारांचा पाऊस पाडून लष्कर उधळतो.” तेव्हां श्रीमंतांनीं तें न ऐकलें. तसेच गारपगारी इंग्रजाकडे गेले.......तेव्हां साहेबलोकांनीं गोष्ट कबूल करून गारांचा पाऊस श्रीमंतांचे लष्करावर पाडला. त्याणे लष्कराची दाणादाण होऊन लष्कर उधळिलें.” [पे. ब. १९०]. ११

संभुत–यत्किंचितहि उ. “श्रीमंतांचे लग्नाची संभूत देखील आम्हास दखल नाहीं.” [खरे, ४२२]. शकपंती–शक पंतीं–पंतांनीं शक ठेवला (?). पंती–पंताचा; प्रधानपंताचा (?) त्या ठिकाणीं आपला शक–पेशव्यांचा, सोडून दिला. गलीम–शत्रु. १२

# दुसऱ्या बाजीरावाचा पोवाडा

## ४२

[शाहीर–मोतीराम]

पुणें शहर किलवाणी दिसती जागा। करुणा कां येईना तुला अरे श्रीरंगा ॥ ध्रु०॥

जाऊन राव राहिले ब्रह्मावर्तीं। वनचरा हातें पृथ्वी केली निक्षेत्री ॥ एका प्राण्याहून सुन्य दिसे धरत्री। रयतेला लागला वनवा जळती अंत्रीं ॥ रायाचे आश्रमीं ब्राह्मण गायत्री। कशी एकाएकी झाली धन्य कळसुत्री ॥ शाहु छत्रपतीचें देणें गेलें भंगा। व्याघ्राचें घरामधीं जंबुक करितो दंगा ॥ पुणें०॥ १

कांहींच योग्यता नाहीं राजेशाला। पंचामृत माहित. नवतें मोशीम शाला ॥ चवरंग पलंग तरी गेले ! किंमत खुर्च्यांला। उन्माद सदां धुदी मधीं दारू निशाला ॥ भरगच्ची मंदील, चिरे, शाल, दुशाला। आल्या डगल्या टोप्या कंदील नाहि मशाला ॥ पालख्या अब्रदागिरी गेल्या मादून पागा। झाले मेणा छत्र्या जागोजागा ॥ पुणें०॥ २

---

किलवाणी–केविलवाणी, उदास. वनचर–माकड, इंग्रज. वनवा–वणवा. अंत्री–आंतड्यांत; पोटांत, अंतःकरणांत किंवा अंतरांत. रायाचे आश्रमीं ब्राह्मण गायित्री–वसिष्ठ ऋषीच्या आश्रमांतील कामधेनूप्रमाणें बाजीरावाच्या राजवटींत ब्राह्मण चैनींत निःशंक होते. कळसूत्री–क्रांति, अचानक झालेली उलथापालथ. १

योग्यता नाहीं–योग्यता–महत्त्व. बाजीरावाच्या योग्यतेसारखा त्याला सरंजाम मिळाला नाहीं असा भावार्थ. पंचामृत माहित नव्हते मोशीम शाला–मोशिमशाला (ग म ची गफलत). गोशी मसाला–गोश मसाला. गोश–मांस. मशाला ऐवजीं मसाला–मांसमसाला. भावार्थ–त्या बिचाऱ्या ब्राह्मणाला पंचामृताची सवय. इंग्रजी राज्यांतील मांसमसाल्याची काय माहिती? निशाला–निशेला. मंदील–उंची फेटा. चिरा–मांदिल [आपटे] पागोटें.

दक्षिणचें मंगळसूत्र कोठें दडलें ? । मध्यभागीं जाऊन समुद्रीं जहाज बुडलें ॥ वनवास आला नळराया तसें हें घडलें । कसे एकाएकी शिरीं आकाश कडकडलें ॥ मसलत करूनी बारांनीं मधीं सोडविले । आले निघून वनवासीं हो राव राहिले ॥ तूं बौध्य होउन बसलाशी पांडुरंगा । अझुन सत्त्व किती पाहाशी होशील जागा ॥ करुणा कां येईना तुला अरे श्रीरंगा ॥ पुणें०॥ ३

रायाचे मनामधीं नवतें दुजेपण कांहीं । भरी घालून चहुंकडे गेले च्यार बाराभाई । चौमुलखी दर्प जयाचा कीर्त सवाई ॥ हा दर्प लोपला पर्वताची रायी । असें कधींच नवतें झालें होती लाखो शाई ॥ घटकेंत बुडाला सरली ज्याची कमाई । कवी विठ्ठल मोरू म्हणें पहावें सोंगा ॥ गुणी मोतीराम म्हणे सादर व्हावे प्रसंगा ॥ पुणें०॥ ४



---

माद्वन पागा-माद्वान घोड्यांच्या पागा. माद्वान्-मादवान-एक ,घोड्याची जात. झाले मेणा छत्र्या-मेणकापडाच्या छत्र्या. २

मधीं सोडविलें-मध्येंच सोडून दिलें. मध्येंच दगा दिला. बौद्ध होऊन-समाधि लावून, बुद्धासारखी समाधि लावुन. २ डोळ्यांवर फातडें ओढून. होशील जागा-होशी न जागा. ( मोडीतलि 'न' वं 'ल' चा घोटाळा). ३

कमाई-पुण्याई, संचित. ४

# दुसऱ्या बाजीरावाचा पोवाडा

## ४३

### [ शाहीर—होनाजीबाळ. ]

दिन असतां आंधार आकाशतळीं पडला बाई । विश्वतरंगाकार प्रभुविण शुन्य दिशा दाही ॥ ध्रु०॥

च्यारी दिशेमध्यें परमप्रतापी राज्य सबळ भारी । यशध्वज चहुंकडे किर्ती यां पृथ्वी माझारी ॥ दहशत परराज्यांत न करितां शत्रुवर स्वारी । प्रतिवर्षी घरीं खंडण्या चालुन येती परभारी ॥ केवढा दर्प ज्याचा वाघबकरीं या दरबारीं । एके ठाईं जळ प्राशन करिती निरवैर प्रकारीं ॥ विवेक बळ सुविच्यारीं नितीचीं कामें चालती सारीं । यथा धर्म वर्तती प्रज्या आहा आपल्या वयवदरीं ॥ ( चाल )॥ असें असतां हें विघ्न कसें वोढविलें लवलाई । फिरली बुद्धी सर्वांची रणांगणीं नेमिली लढाई ॥ विश्व०॥ १

भर दिपवाळीमध्यें युद्ध चाललें शस्त्रआस्त्रीं । श्रीमंत इंग्रज दळीं कितीएक शूर पावले परत्री ॥ त्यांत सखा सर्वज्ञ आतां कधीं हरी दाविल नेत्रीं । निजध्यास लागला पडेना चैन दिवसरात्रीं ॥ तेजहीन ह्या प्रजा प्रभुकारितां

---

आकाशतळीं—पृथ्वीवर, आकाशाच्या तळाला, आकाशाच्या खालीं. वरआकाशांत आणि खालीं पृथ्वीवर. विश्वतरंगाकार—तरंग—बुडबुडा [आपटे], सर्व विश्व तरंगाप्रमाणें व्यर्थ, खोटें, शून्य आणि निरर्थक भासतें. पृथ्वी माझारी—पृथ्वीमध्यें, जगामध्यें. परभारी—परस्पर, परभारें. दर्प—दरारा. निरवैर प्रकारीं—वैररहित रतीनें. विवेकबळ सुविच्यारीं नितीची कामें चालती सारीं—राज्यांत विचारपूर्वक नीतीनें कामें चालतात. वयव-दरीं—(?) लवलाई—लवलाही, लवकर, ताबडतोब, एकाएकीं. १

शस्त्र आस्त्रीं—शस्त्रास्त्रांनीं; तरवारी, बंदुका तोफा इत्यादिकांनीं. श्रीमंत इंग्रजदळीं—श्रीमंतांच्या आणि इंग्रजांच्या दळांत. पावले परत्री—परत्रास पावले, परलोकांत गेले. निदध्यास—निदिध्यास. तेजहीन या प्रजा प्रभु-

अंत्री। मूर्तीमंत ये काळीं विषय बिधवारूपें धरत्रीं॥ असंख्य क्षेत्रांमाजी स्वामीची वस्ती कोण्या क्षेत्रीं। वर्तमान आदि अंत,न कळे कागदपत्रीं॥ मुळींच गर्भी श्रीमंत, दुःख ठाऊक नाहीं तयासी। टाकुन वनांत त्यास आले सोडुन बाराभाई॥ विश्व०॥ २

सुंदर जागोजागीं उत्तमोत्तम विलासस्थानें। इंद्रभुवनवत् आरसेमहाल ठाई मयसभेप्रमाणे॥ कंदिल तरू बिलोरी, पराच मखमाली बिछोने। ते बेमरामत पडले बंद आठरा कारखाने॥ कुकुमहीन दक्षिण वनतेचे वदन दैन्य-वाणे येक्या प्राण्यावीण दिसती ते देशपरगाणे॥ उदारचित्ते यथासाग दिधलें पवित्र दानें। तीर्थक्षेत्रीं वांछित ठेविले विप्र यथामाने॥ (चाल)॥ निर्मळ शशीसारखी आचळ आहे पदरीं पुण्याई। तरीच भेटतील स्वामी येरव्हीं नसे उपाय कांहीं॥ विश्व०॥ ३

---

कारितां अंत्री-बाजीराव प्रभूकरितां मनांत सव प्रजा तेजहीन-खिन्न-उदास झाल्या आहेत. अंत्री-अंतरीं. ये काळीं-या काळीं. विषय-(?) मूर्तिमंत येकाळीं विषय विधवारूपें धरत्री-यावेळीं सर्व पृथ्वी विधवा स्त्रीप्रमाणें दुर्दर्शनीय व करुण दिसत आहे. असंख्य क्षेत्रामाजीं स्वामीची वस्ति-कोण्या क्षेत्रीं-कोणच्या क्षेत्रांत श्रीमंतांचा वास आहे त्याची बातमी कळत नाहीं. मुळींच गर्भी श्रीमंत-गर्भात असल्यापासूनच बाजीराव श्रीमंत होते; त्यांना दुःख कसें तें ठाऊक नव्हतें. बाराभाई-सरदार. २

ठाई-ठाई ठाई असें असावें. तरु बिलोरी-काचेचीं झाडें. "बिलोरी झाडें" [प्रभाकर लावणी, १४२ पा. १४२.] पराच-पराचे. बेमरामत-अव्यवस्थित. मरामत-डागडुगी; सांभाळ, निगा (अरबी क्रि) दैन्यवाणें-केविलवाणें. येक्या प्राण्यावीण-एका राजावांचून. बाजीरावावांचून. परगाणे-परगणे. उदार चित्तें यथासांग दिधलें पवित्र दानें। तीर्थ क्षेत्रीं वांछित ठेविलें विप्र यथामानें इ०-क्षेत्रोक्षेत्रींच्या ब्राह्मणांना बाजीरावानें नेमणुका करून दिल्या आहेत. अर्थात् ते पवित्र ब्राह्मण बाजीरावाचें कल्याण चिंतीत असतील-च. त्या पुण्याईनें व स्वतःच्या पुण्याईनें सर्व संकटांतून मुक्त होऊन श्रीमंत आपणास येऊन भेटतील. एरवीं दुसऱ्या कोणत्याही उपायाचा संभव दिसत नाहीं. आचल-अचल, शुद्ध. चल-प्रमाद, अचल-प्रमादरहित, शुद्ध. ३

आहा विधात्या कैसें अक्षर लिहिलें कपाळीं निराश्रीत सर्वस्वें आसरा नाहीं तिन्ही ताळीं ।। मोठा काळ कठिण लागलें किती एक रानोमाळीं। कुठवर चिंता वाहावी वियोगानळें हृदय जाळी ।। दुर्धर युद्धप्रसंगें गेली वैऱ्याची दिपवाळी। जाले आपण परदेशीं करून कोणाचे हवालीं ।। विचित्र गती, दैवाची वाजती दोंही हातीं टाळी। होणारासारखें वर्तलें वर्तमान ते काळीं ।। (चाल) नकळे ईश्वरी सूत्र झाली पाहा पर्वताची राई। नवेंच सर्व निघालें, लोपली मागिल चतुराई ।। विश्व०।। ४

पारखी जाहली होऊन आयोध्यापुरीं राया हरिश्चंद्राशीं ।। रोहीदास तारामती राणी त्रिवर्ग जाले वनवासी। सत्यधीर भूपती न ढळला किंचित सत्वासी ।। घेऊन कौसिक पुण्य पावला आपल्या स्वपदासी। असता श्रीहरी सखा कां तो वनवास पांडवाशीं ।। काळमहात्म्य विचित्र! असावें सादर भोगासी। विषलिखित जाली प्राप्त विषया त्या चंद्रहासासीं।

---

निराश्रित सर्वस्वें-सर्वस्वीं निराश्रित. तीन्ही ताळीं-त्रैलोक्यांत. लागले किती एक रानोमाळी-देशोधडीला लागले. गेली वैऱ्याची दिपवाळी-दिपवाळीसारखा आनंदाचा प्रसंग असूनही तो वैऱ्यासारखा गेला. जाले आपणा इ०-आम्हाला, प्रजेला, कोणाच्या हातांत निरवून गेले? दैवाची वाजती दोंही हातीं टाळी-दुर्दैव आनंदानें नाचून टाळ्या पिटून उपहास करीत आहे. होणारासारखे इ०-भविष्याप्रमाणें किंवा अदृष्टाप्रमाणें सांप्रतच्या गोष्टी घडून आल्या. पर्वताची राई होणें-मोठेपणा जाणें; गर्वहरण होणें; महत्त्वाचा नाश होणें. ४

पारखी जाहली होऊन आयोध्यापुरी इ०-जाहली-मूर्खपणा [पट.] अयोध्येच्या प्रजेनें मूर्खपणा करून हरिश्चंद्राला सोडलें इत्यादि. घेउन कौशिक पुण्य इत्यादि-विश्वामित्रानें हरिश्चंद्राच्या पुण्याचें दान घेऊन त्यास देशोधडीं लाविलें व स्वतः त्याचें राज्य हिरावून घेतलें. विषलिखित जाली प्राप्त विषया त्या चंद्रहासासी-ज्याप्रमाणें चंद्रहास राजपुत्राला विष द्यावें असें दुष्टबुद्धीनें लिहून पाठविलें परंतु त्याच्या सबळ पुण्याईनें शेवटीं विषा-

देशोधडीं फिरविलें कलिनें राया नळाशीं ॥ ( चाल ) अशा पुण्यरूपें नृप न सोडी भोग सर्वाथाई । होनाजी बाळा म्हणे कर्ता हर्ता शेषशाई ॥ ५



---

ऐवजीं राजकन्या विषयाच त्याला प्राप्त झाली. त्याप्रमाणें कदाचित् या विपन्न स्थितींतूनही बाजीरावसाहेब परत येऊन गादी घेतील, असा भावार्थ दिसतो. अशा पुण्यरूपें नृप न सोडी भोग सर्वथाई–सर्वथाई–सर्वथा. बाजीराव साहेबांच्या पूर्व पुण्याईमुळें त्यांचें राजपद गेलें तरी ब्रह्मावर्तास त्यांना थोडीशी जहागीर मिळालीच, असें म्हणण्याचा शाहिराचा उद्देश आहे काय ? ५

# दुसऱ्या बाजीरावाचा पोवाडा

## ४४

### [ शाहीर–सगनभाऊ ]

गगन कडकडुन पडलें, पार नाहीं दुःखाला अरे दुःखाला। श्रीशैल्य-मलकार्जुना आम्ही अंतरलों सुखाला ॥ ध्रु० ॥

शिरीं दुःखाचे डोंगर ग्रहदशा पाठिला। एक वरिस नऊ महिने प्रभु-रायाच्या भेटीला ॥ गाया अनाथापरी दिवस वैऱ्याचे लोटिला। जगन्निवासा कां अंतरलों रेषिम गांठिला ॥ आनंदांत केलें राज्य सोनें बांधून काठिला। दुनिया बापुडी दिसती, पैसा असून गाठिला ॥ दक्षिणचें सौभाग्य गळसरी कोण्या रोहकाला। अरे रोहकाला ॥ श्रीशैल्य० ॥ १

रायाच्या मनीं नवते, पडूं नये उपाधीला। चौघांनीं भरी भरून घातली गोष्ट विषादिला ॥ फुटली मुठ आवळयाची राव पडला अवकाळीला।

---

**गाया अनाथापरी दिवस वैऱ्याचे लोटिला**–आम्ही प्रजाजन गाईप्रमाणें अनाथ झालों आहोंत व चिंतेनें काळजींत दिवस कंठित आहोंत. **रेशिम गांठिला**–रेशमासारख्या सुखकर बंधनाला; स्वराज्याला. ( शाहिरानें ही सुंदर उपमा दिली आहे.) **रोहकाला**–रोहू–a Kind of fish. यावरून जल-चराला–इंग्रजाला असें तर नसेल ? २ रोधकाला तर नसेल ? रोध–रोखणारा, शत्रु, अवरोध करणाराला. ३ रोहक–ब्रह्मराक्षस. [ शु. म. को.] १

**रायाच्या मनीं नवते पडूं नये उपाधीला**–उपाधीला–घालमेलीला. कार-स्थानाच्या उपाधींत पडूं नये असें रायाच्या मनीं होतें किंवा "रायाच्या मनीं नवते तरी ये उपाधीला पडून आणि चौघांनीं भरी भरून गोष्ट विषादीला आणिली" असाही अर्थ होईल. २ पडूं नये उपाधीला–पडून ये ( या ) उपाधीला· या भानगडींत पडून. विषादीला–विषाद उत्पन्न होईल अशा परिणामास. **फुटली मुठ आवळयाची**-मुठ–मोट. आंवळयाची मोट. अशा रीतीनें आपापल्या स्वार्थाकरितां एकत्र जमलेले कारस्थानी लोक जिकडे तिकडे फुटून गेले आणि बिचारा बाजीराव मात्र आवकाळीला म्ह० दुर्दशेप्रत पावला

फास करुनि केसांचे शत्रूंनीं समया साधिला ॥ लक्षांचें अन्न गेलें राव अंत-रले गादीला । एकटे पक्षावाणी उडाले टाकून मादीला ॥ बंगले बागबगिचे वस्त्र लाखाचे फुकाला । अरे फुकाला ॥ श्रीशैल्य० ॥ २

कशी उचलली तळी मिळाले ते बाराभाई । परदेशीं पांखरूं कसें केलेंस विठाबाई ॥ तीथवार सण कैचा, जंगल वस्ती कोण्या ठाईं । पंचप्राण शहरा-कडे वढतील ओस दिशा दाही ॥ आग लागली दर्यांत बुडालें जहाज ठीक नाहीं । वनवास आला राजेन्द्राला निजली शेषशाई ॥ ज्याचें होतें त्यास पारखें, काळोखी मुखाला । अरे मुखाला ॥ श्रीशैल्य०॥ ३

रोजगार सावकार बंद उदम्याचीं दुकानें । केविलवाणे जन आपापल्या राव दुःखानें ॥ नाहीं निखालस उदीम, आठरा बंद कारखाने । फिकीर झाली प्राप्त काळजी ज्याचा तोच जाणे ॥ घड आहेव न रांडकी न कैसें

---

असा भावार्थ. याचा अर्थ मोल्स्वर्थ असा देतो. a term for a gang of fellows united by some present and common interest. अवकाळीला-दुर्दशेला. [शाळी.]. समया-समय; प्रसंग; संधि. मादिला-पक्ष्यांतील स्त्रीस मादी म्हणतात. पक्षी आपल्या मादीपासून उडून जात नाहीं, परंतु त्या जोडयाची ताटातूट व्हावी त्याप्रमाणें बाजीराव प्रजेला टाकून निघून गेला. वस्त्र लाखाचे-ते बागबगीचे, ते बंगले, ते लाखो रुपयांचे श्रीमंती पोषाख सर्व सर्व फुकट गेले. २

उचलली तळी-तळी उचलणें-जोर करणें; एखादें कार्य सर्वांनीं एक-विचारानें पतकरून पार पाडण्याचें ठरविणें. तीथ वार सण इ०-बाजीराव कोठें कोण्या वनांत भटकत असेल कोणीं सांगावें ? तेथें त्याला तशा विपन्न स्थितींत सण वगैरे आनंदाचे दिवस कसे साजरे करतां येतील ? त्याने पंचप्राण पुणें शहराकडे ओढ घेत असतील. वढवील-ओढतील; ओढ घेतील निजली शेषशाई-शेषशाई विष्णूनें क्षीरसागरांत विश्रांति घेण्याकरितां सुरवात केलेली दिसते. अर्थात् जगाकडे त्याचें लक्ष नाहीं. "आजच बहुधा क्षीर-सागरीं निजले नारायण." ३

अहेव-सौभाग्य. रांडकी-वैधव्य. निरउपाय-निरुपाय. कंबर

केलें भगवंतानें। निरउपाय झाली गोष्ट कंबर बसली घोरानें।। वडलावडली नव्हता बोल लागला हो नखाला। अरे नखाला।। श्रीशैल्य०।। ४

भोळा माझा सांभ वामन अहो निर्मळ काया। त्याच्या पदरचे च्यार उठले, बसले बुडवाया।। निमकहरामी झाले लक्षपती धन खाया। सात ताल हवेलीचा ज्यांनीं ढासळला पाया।। शिकारखाने रमणे ब्राह्मण मोकलती धाया। एक्या प्राण्यावांचून शहर करिती गायावाया।। थान पितें बालक लोटून दिलेस रघुराया। मी अनाथ माउली कशी नाहीं आली तुज माया।। रयत बिचारी लोल झाली उपटली पराला। अरे पराला।। श्रीशैल्य०।। ५

पुण्यासारखें शहर चहुं मुलखीं दुसरें नाहीं। छत्रपतीचें देणें सवाई श्रीमंत पेशवाई।। कृष्ण गोकुळीं नांदत होता तैसी सकळ शाही। नाच तमाशे गायन करिती भौती रोषनाई।। शेळीनें व्याघ्रास पिटीलें राहिले

---

**बसली घोरानें**—काळजीनें कंबर मोडली. **नव्हता बोल लागला हो नखाला**—यत्किंचितही कलंक लागला नव्हता. ४

**वामन**—बामन पाहिजे. गरीब निरुपद्रवी अशा मनुष्याला "ब्राह्मण" "देवब्राह्मण" असें म्हणण्याचा प्रघात आहे. **निर्मल काया**—पवित्र, शुद्ध, निष्पाप. **चार**—चार हलकट लोक. **निमक हरामी झाले लक्षपती धन खाया**—विश्वासघात करणारे लाखोपती बनून चैन मारीत आहेत. **ताल**—मजला. **मोकलती धाया**—धाय मोकलतात. **गायावाया**—गयावया. **एका प्राण्यावांचून**—बाजीरावावांचून शहर दीन दिसतें असा भावार्थ. **मी अनाथ माऊली**—हें प्रजा स्वतःस उद्देशून म्हणते असें समजावयाचें कीं काय ? **लोल**—लोळागोळा, पंख उपटल्यासारखी. 'पंख उपटल्यावर लोल म्हणतात'. [ शालिग्राम प. आवृत्ति]. **पराला**—पिसांना. **उपटली परांला**—पिसें उपटलीं. परांना उपटलें. ५

**शाही**—पृथ्वी. **भौती**—भोंवतीं. **शेळीनें व्याघ्रास पिटिलें राहिलें ठाईं**—शेळीनें व्याघ्रास त्याचें राहिलें ठायीं येऊनि पिटिलें. शेळीनें वाघाच्या गुहेंत जाऊन त्यास हुसकून द्यावें, त्याप्रमाणें इंग्रजांनीं पेशव्यांस पुण्याहून हुसकून

ठायीं। आधार महा आक्रीत, झाले लागले तक्काला पाय ॥ बाळा बहिरू म्हणे कीं धन्य ईश्वर करणी काय ?। घोर होईल परी, हरण च्यार दिवस स्वस्थ राही ॥ सगनभाऊ म्हणे परिसा विनंती उतरावें तुकाला। अरे तुकाला ॥ श्रीशैल्य०॥ ६



काढिलें; आधार महा आक्रीत–अधर्म हा आक्रीत असें असावें. महा आक्रीत–मू. श. आक्रांत, व्यापलेलें. लागले तक्काला पाय–पायरीला पाय लागले. अप्रतिष्ठा झाली. घोर–चिंता; काळजी. उतरावे तुकाला–तुक–महत्त्व; योग्यता. याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. ६

# पेशवेवंशावर पोवाडा

हा पोवाडा दुसऱ्या बाजीरावाचे कारकीर्दीत रचलेला आहे आणि तो कदाचित् बाजीरावाचे आज्ञेने त्याला उद्देशून म्हणून दाखविला आहे असे 'प्रभूच्या पणजानी' या शब्दावरून वाटतें. पोवाड्यांत नानासाहेब पेशव्यांचे मृत्यूपर्यंतच हकीकत आली आहे. बाजीरावाचे कारकीर्दीत पोवाडा तयार झाला आहे त्या अर्थी पानपतानंतरच्या हकीकतींचे चौक मूळ पोवाड्यांत असावेत पण मागाहून ते कोठें गहाळ झाले असावेत अशी सकारण शंका येते.

## ४९

### [ शाहीर—प्रभाकर ]

[ चाल—श्रीरंग गोपिकोत्संग—राजजोशी ]

श्रीमंत ईश्वरी अंश धन्य तो वंश परमपुरुषार्थी। बरोबरी तयांची कोण करिल पहातार्थी ॥ ध्रु० ॥

राजाधिराज महाराज, गरीब नवाज, धनी श्रीमंत। भासती सदैव देव आमचे हेच भगवंत ॥ पाषाण धातुच्या मूर्ती, धरत्रीवरती, आहेत अनंत। त्या पूज्य परंतु नाहींत प्रगट जीवंत ॥ तसे नव्हेत हे तर देव, कलिमध्यें भूदेव, ब्राह्मण संत। त्या वंशीं पेशवे झाले सबळ बळिवंत ॥ ( चाल ) ॥ योग्यतेस आणिले पंत होऊनियां कृपावंत, त्या राजांनीं. ह्या मुळेंच चढती कमान धरुनी अभिमान........॥ मग बहिरोपंत सोडवून, बिडी तोडवून,

---

पहातार्थी—पाहिलें असतां. पाहता अर्थी किंवा पाहत अर्थी If we consider; upon consideration or reflection; [ मोल्स ]. गरीब नवाज- गरीबांचा परामर्ष घेणारे. मग बहिरोपंत सोडवून बिडी तोडवून इ०- बहिरोपंतास धरून नेलें. राज्याचा बंदोबस्त झाला पाहिजे. पिंगळे नाकर्ते. ते समयीं 'परशुरामपंतास, पेशवाई तुम्ही करून राज्याचा बंदोबस्त करणे, आंग्रे यांणीं घेतले त्याचें पारिपत्य करून किल्ले घेणें म्हणून आज्ञा केली. त्यास परशराम पंत यानीं विचार केला कीं, बाळाजी विश्वनाथ यांजकडे फौजेचें वळण आहे, त्यास पेशवाईचीं वस्त्रें द्यावीं; ते बंदोबस्त करतील. तेव्हां खंडोबल्लाळ यांसही महाराजांनीं विचार पुसून बाळाजीपंतास आज्ञा केली त्याही मान्य केली; ते समयीं वस्त्रें व शिक्केकटार प्रधानपंताची देऊन रवाना केले. त्याही तीन हजार फौज जमा करून दरमजल लोहगडाखालीं आले. नानाचा व आंग्रे यांचा कागदोपत्रीं घरोबा होता. आंगरे यांस पत्र लिहून पाठविलें, व दरमजल कुलाब्यास गेले. सरखेल पुढें सामोरे येऊन भेटीचा समारंभ झाला. उपरान्त खलबतास बसोन त्यास सांगितलें कीं, "तुमचा आमचा भाऊपणा पेशवाई

प्रभुच्या पणज्यांनीं ॥ ( चाल पहिली ) ॥ पुढें प्रधानपद मिळवून, वैरी पळवून, मारिल्या शर्थी ॥श्रीमंत० ॥ १

राव बाजी पुण्यामध्यें येऊन, हातावर घेऊन, निघाले शीर। प्रारंभीं पाहिलें जनस्थान रघुवीर ॥ नेमाड माळवा मुलूख, करून सरसलूख, मोडिले वीर। मेवाडचे राजे न धरती धीर ॥ गढमंडळ बुंदेलखंड, डंघईत अखंड राहून थंड, सही केलें। प्रतापें करून या जगांत नांव मिळविलें ॥ (चाल)॥ बुडवुनि या बहाद्दरास, आणली घरास, माषुक मस्तानी। दरवर्षीं धौशा घालून, जावें चालून, अघाडीस मस्तानी ॥ शह दिला नगर थेटपास, खु............।...............॥ ( चाल पहिली) ॥ उपरांत नर्मदा कांठीं, सार्थकासाठीं, मोक्षकार्यार्थी। देह समर्पिला त्या स्थानीं याच भावार्थी ॥ श्रीमंत० ॥ २

---

तुमच्या घरांत आयते किल्ले देत असाल तर तसेच सांगावें." शिक्केकटार व वस्त्रें त्यास दाखविली, व त्यास विचार सांगितला कीं सरखेलीचें पद ताराबाई-कडून आहेच. इकडूनही करार करून देववितो....... बहिरोपंतास सोडवून घेऊन समागमें आले." [सा.खं ४,३५. सवाईमाधवरावाकरितां लिहिलेली पेशव्यांची बखर]. " शाहूच्या संकटसमयीं त्यास पैशाची मदत विशेष पाहिजे होती ती बहिरोपंत करूं शकला नाहीं. बाळाजीनें अनेक खटपटी करून पैशाची व्यवस्था शाहूस करून दिली........बहिरोपंतास सोडवून आणल्या-बरोबर शाहूनें बाळाजीस मुख्य प्रधानाची जागा दिली. [म. रि. म. वि. ७३-७४]. मारिल्या शर्थी–शर्त–पराक्रम. पराक्रम केले. १

जनस्थान रघुवीर–रघुवीराचें जनस्थान. (भावार्थ. नासीक पंचवटी.) सरसलून–सर करून आणि सलोखा तह करून. सलूख–तह. गढमंडळ–"गढा-मंडळ. हें एक जबलपुराजवळ गोंड राजाचें प्राचीन राज्य होतें." [भा. व. गो. बुं. कै. २२]. डंघई–" बुंदेल खंडांतील धसान व केन या दोन नद्यांमधील प्रांत. येथें प्राचीनकाळीं डांग व गोंड लोक रहात असत. हा प्रांत सांप्रत बुंदेल-खंडांतलि चरखारी संस्थानामध्यें आहे." [भा. व. गो. बुं. कै. पा. २]. बहाद्दरास–बंगष बहाद्दरास. माषुक–सुंदर. अघाडीस मस्तानी–"बाजी-

तेची दुनियेमाजी धन्य न मानी अन्य, वंदिती स्वामी। जीव खर्चे कराया सिद्ध धन्याच्या कामीं ॥ तीन वर्षें राज्य वसवून, मोर्चे बसवून, सभोंवते धमामी। सुरुंगांनीं पाडिला अलगत बुरुज बदामी ॥ हल्ल्यांत उडाले लोक, करिती किती शोक, पडून संग्रामीं। नऊ लक्ष बांगडी फुटली वसई मुक्कामीं ॥ (चाल) ॥ बक्षीस दिले कडितोडे, पालख्या घोडे, वाजे चौघडे, जमीदाऱ्या। ठायीं ठायीं दिमती भरभरून, आंख ठरवून, सजीवल्या सरदाऱ्या। परशत्रू होईना खाक वांटूनी परख, तशाच हवालदाऱ्या ॥ (चाल पहिली) ॥ खूब केली तुम्हीं तलवार, नांवनिशीवार, म्हणून किती प्रार्थी। यशस्वी होता तो संवत्सर सिद्धार्थी ॥ श्रीमंत० ॥ ३

बाळाजी बाजीराव प्रधान, केवळ निधान, होते प्राणी। आणिलें पुण्यांत जपानी नळाचें पाणी ॥ युद्धांत जिंकुन नबाब, बसविली बाब, करून धूळ-

---

राव तिला बहुधा आपल्याबरोबर स्वारींत नेत असे." [म. रि. म. वि. ४३५.] थेट पास–थेटपर्यंत (?) उपरांत–नंतर. २

तेचि–ते सेवक; सरदार. धमामी–दमामा–लहान नगारा. पण येथें दम्दमा धम्धमा या अर्थी वापरलेला दिसतो. ज्या उंचवट्यावर तोफा चढवतात त्यास धम्धमा म्हणतात. वाजे चौघडे–वाजे चौघडे. जमीदाऱ्या–तैनाती; वतनें. दिमती भरभरून–अधिकारी नेमून देऊन. आंख ठरवून–खंडणीचा आंकडा? आंख–अंक. सजीवल्या सरदाऱ्या–निरनिराळे सरदार उत्पन्न केले. परशत्रु होइना खाक–शत्रु खाक होऊन जात नाहीं म्हणून(?) परख–(?)मूळ दरक असावें.दरख किंवा दरक–श्रेष्ठ अधिकार किंवा हुद्दा(आपटे.) (२) A common term for the higher heridatory Public office as दिवाण, फडणसि, मुजुमदार. नांवनिशीवार–प्रत्येकानें स्वतंत्रपणें. ३ निधान–निधी, भांडार, ठेवा. प्राणि–अद्वितीय पुरुष, अलौकिक पुरुष. जपानी नळाचें पाणी–'जहांपन्ही' म्हणजे बादशाही तर नव्हे ? (मुसलमान बादशहांचा पाणी खेळवण्याचा शोक सुप्रसिद्ध आहे.)' मुसलमान बादशहाप्रमाणें नहर बांधून पाण्याची रेलचेल केली (?) बाब बसविली–बाब–

खाणी। त्या कालींच बंगाल्यांत घातलीं ठाणीं ॥ ( चाल )॥ लागलेंच केलें कूच, स्वारी दरकूच, परतली मखाल्यांची। लष्करांत केवढा गजर, होई खिय नजर, मोतींमणिपोंवळ्यांची ॥ वांटून खिचडी रमण्यांस, आनंदें पुण्यांस, मोहरा पुतळ्यांची ॥ ( चाल पहिली )॥ खुष गेले शास्त्रीपंडीत, विद्यामंडित, विप्र विद्यार्थी। गेले कीर्त गात ते ब्राह्मण तीर्थोतीर्थीं ॥ श्रीमंत० ॥ ४

शत्रूस न जाती शरण, आल्या जरी मरण, न देती पाठ। दादाही गणावा त्यांत, बाण भात्यांत, भाताचें ताट ॥ भलत्याच ठिकाणीं घाली रिपुशीं गांठ। तिन्ही काळ निरंतर साधी, जातीनें बांधी, हत्यारें आठ ॥ (चाल) ॥ फेडून नवस माहोरास, केले लाहोरास, जिकीत शेंडे। अरे जपानी सहज अटकेंत, पाव घटकेंत, लाविले झेंडे ॥ सरदार पदरचे कसे, कोणी सिंह जसे, कोणी शार्दुल गेंडे ॥ (चाल पहिली) ॥ पुढें चाले वीरांचा भार, घेती कर-भार, स्वामीकार्यार्थी हे पुरुष म्हणावे श्रेष्ठ बंधुचे स्वार्थी ॥ श्रीमंत०॥ ५

भाऊसाहेब योद्धा थोर, अंगामध्यें जोर, पुरा धैर्याचा। विश्वासरावही तो तसाच शौर्याचा ॥ दोहों बाजूस भाला दाट, पलिटेना वाट, अशा

---

रक्कम, खंडणी. ठाणें घालणें–मोहीम करणें, स्वारी करणें, तळ पाडणें. खुष गेले–खुष होऊन गेले. २ कदाचित् खुष केले असेंहि मुळांत असावें. ४

बाण भात्यांत–पौराणिक योध्दयांच्या भात्यांत ज्याप्रमाणें एखादा अमोघ बाण राखिलेला असे त्याप्रमाणें दादासाहेब नानासाहेबांचा राखिलेला बाण होय, असा भावार्थ. भाताचें ताट–भात–Credit, repute, good name. भाताचें ताट–कीर्तिसंपन्न, फार, प्रसिद्ध (?) तिन्ही काळ निरंतर साधी–दादांच्या त्रिकाळ स्नानसंध्येसंबंधीं हें आहे. २ कोणच्याहि काळीं त्याला विजयच येत गेला. केले लाहोरास–गेले लाहोरास असें पाहिजे. शेंडे–झेंडे. अरे जपानी सहज अटकेंत–जहापन्ही–बादशाही लोक (?) मुळांत 'अरे'च्या ठिकाणीं 'अलें' असें असावें. बंधुचे स्वार्थी–बंधूचा स्वार्थ साधून देणारे; बंधूच्या हिताला तत्पर. ५

पर्याचा। किंचित् पडेना प्रकाश वर सूर्याचा ॥ दृष्टान्त किती कवि भरील, काय स्तव करील, ऐश्वर्याचा। शेवटीं बिघडला बेत सकळ कार्याचा ॥ ( चाल ) ॥ कितीकांचीं बसलीं घरेंच, हें तर खरेंच, ईश्वरी कृत्य। शोकार्णवीं नाना पडून, नित्य रडरडून, पावले मृत्य। कबि गंगु हैबती दीन, पद्मांकुर्वी लीन, कृपेंतील भृत्य ॥ ( चाल पहिली ) ॥ महादेव प्रभाकर ध्यावी, सदा गुण गाई, यथासाह्यार्थी। श्रीमंत, प्रभूची कीर्त जशी भागीरथी ॥ श्रीमंत० ॥ ६



पाळिटेना वाट–पलीकडे जावयास वाट मिळेना. पर्याचा–प्रकारचा. मृत्य–मृत्यु. यथा साह्यार्थी–यथार्थ (?); यथातथ्य (?) ६

## ४६

### [ शाहीर—प्रभाकर ]

जगदीश्वर कोपला गोष्ट झाली खरिच निरुपाई, म्हणून एकाएकीं सर्व बुडाली ब्राह्मणबाच्छाई ।। ध्रु०।। सबळ वीरांचें राज्य पुरुष जे क्षणांत हरणारे आकाश कडकडल्यास सकल जे उचलुन धरणारे ।। अणिक जागा जिंकुन जे धन भंडारीं भरणारे, रिपुसन्मुख धैर्यानें रणांगणिं जे नर ठरणारे ।। चोहों सागरिचें स्नान सैन्यसमवेत जे करणारे, पूल बांधुन नांवांचे जान्हवीनिर जे तरणारे । छत्रपतींच्या कामीं शरिर जे खर्चुन मरणारे, उभे कंबर आंवळून वायुवत सदां जे फिरणारे ।। स्वकर्म आचरणारे अभय जे बळी सर्वां ठाईं, पहा त्यांचे वंशज हिंडती पृथ्वीवर पाईं ।। जगदी०।। १

शके सोळाशें तिसापासुन राज्याची अमदानी, स्वतां खपुन कारखाने जमविले घरीं खावंदानीं। कसे दप्तरीं लिहिणार लेख जे लिहिले मर्दांनीं, त्यांत चुकि नाहीं ठावि लेखणी कोरी कलमदानीं ।। वेदशास्त्रसंपन्न मुखोद्गत वदति आनंदानीं, असे ब्राह्मण प्रतिसूर्य पाळिले त्यांच्या छंदानीं। शहर पुणें हरहमेष भरलें वाडे बांधिती घरवंदानी ।। नळ वाहाती नित्यानी पाणी पीती हौदावर गाई, पुढें उघडे बाजार सुखें जन करती कमाई ।।जगदी०।। २

---

निरुपाई—निरुपायाची, नाइलाजाची. आणिक जागा जिंकुन जे धन भंडारी भरणारे-आणिक म्ह. नवीन नवीन मुलूख जिंकून ते आपल्या भांडारांत म्हणजे खजिन्यांत संपत्ति आणून भरीत असत. अभय—निर्भय. जे बळी सर्वां ठायीं—सर्व ठिकाणीं जे बळवंत ठरले. १

असे ब्राह्मण प्रतिसूर्य पाळिले त्यांच्या छंदांनीं—असे जे सूर्यासमान तेजस्वी निस्पृह ब्राह्मण होते त्यांना त्यांच्या मानाप्रमाणें सर्व सुखसोयी करून देऊन आपलें राज्य विद्वानांनीं भरवून टाकिलें. घरवंद—घरंदाज. मोल्स्वर्थ घरंवद या शब्दाचा अर्थ the site of a razed or ruined house असा देतो. तेव्हां पूर्वीच्या पडक्या वाड्यांच्या जागीं टोलेजंग हवेल्या बांधल्या असाही अर्थ होईल. आवंतर—इतर. २

प्रतिवर्षिक दक्षणा लक्ष ब्राह्मण श्रावणमासीं, असा धर्म आहे कुठें आवंतर कोण्या ग्रामासी। निरिच्छ योगी ध्याती गाती जे ईश्वरनामासी ॥ अन्न वस्त्र धन धान्य तयांच्या धाडिती धामासी। नंदादिप नैवेद्य ठाईं ठाईं विठ्ठल रामासी, उच्छाहास दिल्हे गांव सुभद्रासुताच्या[१]मामासी ॥ कितीक विडे उचलून पावले मृत संग्रामासी। त्यांचे पुत्र पौत्रांस मागें नाहीं दुष्काळ दामासी ॥ मुलुख सरंजामास देऊन केली कायम गलिमाई, मनुष्यमात्रादिकांचे माहेर होति पेशवाई ॥ जगदी०॥ ३

मूळ बाळाजी विश्वनाथ, सुत त्यांचे बाजीराव, नांव केले आपांनी लढविले वसइस उमराव ॥ राव बाजिचे पुत्र प्रभु बाळाजि बाजिराव, कनिष्ठ दादा त्याहुन धाकटे जनार्दनराव। आपासाहेबांचे एक चिरंजिव सदाशिवराव, शूर होते विश्वासराव आणि गुणी माधवराव ॥ नारायणरावांचे सवाइ झाले माधवराव, रावसाहेब घेतल्या वरी जन्मले बाजीराव। चिमाजी आपासाहेब प्रसवली मग आनंदीबाई, विनायकराव बापुजी हे कांहीं किंचित सिपाई ॥ जगदी०॥ ४

---

सुभद्रासुताच्या मामासी–मुरलीधरास, कृष्णास. कृष्णाच्या उत्सवाकरितां गांवें लावून दिलीं ह्या भाव. पावले मृत संग्रामासी–संग्रामांत मरण पावले. केली कायम गलिमाई–(१) गलिमाई–गनिमाई–मराठेशाही "आम्ही गनीम श्रीशिवाजीमहाराजांचे शिष्य आहोंत." नाना सा.–पेशवा. (२) गनिमांत–(अर. स्त्री.) विपुलता; लूट [आपटे]–लूट, खंडणी कायम मिळण्याची व्यवस्था केली. पण येथें शब्द मात्र बदलला पाहिजे. (३) मोल्स्वर्थ गलिमाचा अर्थ Invasion or hostile irruption; also a raid or foray असा देतो. कायम–स्थिर. शत्रूंच्या जिंकलेल्या मुलुखांत आपले सरंजामदार निर्माण करून शत्रूंकडून होणारीं बंडें व हल्ले थांबविले. ३

जनार्दनराव–जनार्दन बाजीराव, २१ सपटें. १७४९ सातान्यास वारले. रावसाहेब घेतल्यावरी जन्मले बाजीराव–अमृतरावास दत्तक घेतल्यानंतर राघोबास बाजीराव झाला. विनायकराव बापुजी–अमृतरावाचा मुलगा. सीपाई–लढवय्ये. ४

पुरुष पंथ्रांतुन पराक्रमी गत झाले अकरा, तदनंतर चौघांनीं दिल्या आल्या शत्रुसवें टक्करा। उपाय हरले ह्याच प्रसंगीं गोष्ट गेलि निकरा, जो रक्षणा आणिला तोच करी दौलतिचा विकरा॥ हरण झालें सर्वस्व राहिला नाहीं त्यांतुन बकरा, गुप्त ठिकाण अजुन सांगती जा सत्वर उकरा। अशी अवस्था बघुन जनाच्या मनिं पडल्या फिकरा, हरहर हे भगवान कशा तरी घरिं रहातिल ठिकरा॥ गुंगहैबती म्हणे आज काय सरली पुण्याई, महादेव गुणी प्रभाकराच्या कवनीं चतुराई॥ जगदी०॥ ५



जो रक्षणा आणिला–इंग्रज. बकरा–बखरा? कागदपत्र या अर्थी तर नसेल? कागदाचा चिटोरा–(?) फिकरा–चिंता, काळज्या. ५

# पुण्याचा पोवाडा

४७

[ शाहीर—रामजोशी ]

श्रीमंत पेशवे प्रधान बहु प्रीतीचे। अष्ट प्रधानांमध्यें उतरले मर्जीत महाराजाचे ॥ वसविलें त्यांनीं पुणें शहर टुमदारीचें। जागोजाग बांधले दाट नळ पाण्याचे ॥ ठायिं ठायिं शोभती हौद एक फर्म्याचे। धनी कृपावंत प्रभु कल्याण करी रयतेचें ॥ लंकाच पुण्यामध्यें लेश न दारिद्राचें। शहरांत घरोंघर सावकार गबर घरचे ॥ सरदार एकाहून एक श्रीमंताचे। लढणार शिपाई किती सांगूं मी बाचे ॥ हत्ती घोडे रथ अंबारी थवे पालख्यांचे। सरकार वाड्याभौतालीं झुलती बहारीचे ॥ जागोजाग वस्ती भरदार, गर्दी बाजार, कमती नसे कांहीं। पुणें शहर अमोलिक रचना दुसरी नाहीं ॥ ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई जबर सद्दी कैकांनीं पाहिली शत्रु ठेविले नाहीं ॥ ध्रु० ॥ १

उत्तम पुण्याच्या भोंवतीं शोभती बागा। शहरांत हजारो स्वार घोड्यांच्या पागा ॥ भले भले धनंतर वाडे हवेल्या जागा। आळोआळीं झळकती एकसारख्या रांगा ॥ वर्णितां गोड वाटतें किती तरि सांगा। शहरांत सुखी अवघे क्वचितची भीकमागा ॥ तेही गेले कोठें धर्मास करिनारे जागा। शिंद्याचा ज्यान बत्तीस फ्रेंचना लुंगा ॥ गाईकवाड सरदार येती

---

महाराजाचे—शाहू छत्रपतिमहाराजाचे. टुमदारीचे—सुंदर, सुरेख रम्य. दाटनळ—नळ—नहर. अनेक नहर बांधून आणले. एका फर्म्याचे—एका नमुन्याचे; एका साच्याचे. बाचें—वाचेनें. बहारीचे—थव्यांचें विशेषण. सद्दी—दरारा. १

धनंतर—धनवत्तर; श्रीमंत. जागा—जागा जागा (?). जागजागीं (?) भीकमागा—भीकमाग्या. तेही गेले कोठें धर्मास करीनारे जागा—भिकारीच नाहींसे झाल्यामुळें त्यांना धर्म करून पुण्य जोडण्याची संधि नाहींशी झाली. ज्यान बत्तीस—जीन बॅपटिस्ट. फ्रेंच ना लुंगा—लुंगा—हलकासलका. हलका-

प्रसंगा। धावती रणांगणीं मानकऱ्यांच्या चुंगा ॥ सिरकेल कोणता काळ कोरण्यास भुंगा। सहजांत जिरविती सर्व तयाचा मुंगा ॥ गोखले बापू तलवार बहादर लढाईत जाई। शत्रूची फौज जरजर करितसे लवलाही ॥ ब्राह्मणी राज्य०॥ २

साक्षांत विष्णु अवतार पेशवे कूळ। संपूर्ण महिचे भूप कांपती धाक दरारा प्रबळ ॥ सगोपंत देवराव विठ्ठल नाना काळ। शहाण्यांत साडेतीन शहाणे बुद्धिचे सबळ ॥ सेवेंत सर्वदां श्रीमंताच्या जवळ। होळकर भोसले शिंदे मानकरी सकळ ॥ तलवार बहादर करीत शत्रूची राळ। स्वारीच्या भोंवतीं पटवर्धन मंडळ ॥ युद्धांत रणांगणीं जसा आगीचा लोळ। बहुनामी पल्लेदार तोफांचा कल्लोळ ॥ जेजाल जंबुरे बाण करी वळवळ। सरदार सभोंवतीं दाट पसरती तळ ॥ घोरपडे रास्ते सरदार पुरंधरे स्वार पानसे पाहीं। फडणीस नानाची जरब भूमंडळीं राही ॥ ब्राह्मणी राज्य०॥ ३

पर्वतावरती पर्वतीस्थान वरती चौघडा। पाहेऱ्या तळापर्यंत जावें धडधडा ॥ अनुष्ठान पंचपक्वान्न पडेना खाडा। पुजारी पुजीती उमामहेश्वर जोडा। पीतवर्ण सोन्याच्या मूर्ति नव्हे बा बाडा ॥ पहाऱ्यास शिपाई उभे पेटवूनि तोडा। रमणाही ब्राह्मणासाठीं बांधिला केवढा ॥ श्रावणमासीं

---

सलका नसलेला म्ह० प्रसिद्ध वजनदार. येती प्रसंगा–प्रसंग पडतांच सेवेस हजर होतात. चुंगा–टोळ्या. सिरकेल कोणता काळ कोरण्यास भुंगा–काळ–शत्रु (?) असें राज्य पोखरावयाची कोणाची छाती आहे; फितूर करण्याची कोणाची छाती आहे! मुंगा–गर्व. २

सगोपंत देवराव विठ्ठल नाना काळ–काळ–मूर्तिमंत काळ, यमासारखे. सगोपंत–सखारामपंत बोकील. देवराव–देवाजीपंत. विठ्ठल–विठ्ठलपंत परश्रामी ऊर्फ विठ्ठल सुंदर. "अर्धा शहाणा नाना–शाहिरानें साडेतीन शहाण्यांची नामावळी उच्चारतां उच्चारतां विठ्ठल सुंदराचा उल्लेखहि पेशव्यांच्या बाजूनें केला आहे!! विठ्ठल सुंदर पेशव्यांचा" वैरी होता व राक्षसभुवनाच्या लढाईत तो पेशव्यांकडून मारला गेला हें प्रसिद्धच आहे. ३

खर्च तो कोट्यावधी तोड़ा। पुढें तळें त्यामध्यें लहान बेटाचा तुकडा ॥ गणपती त्यांत पलिकडेस आंबील ओढा। ग्रामांत तुळशीबागेंत बेतही जाडा ॥ बुधवार पेठ बेलबाग नजीकची वाडा। जागोजाग मौज अनिवार नसे अंत-पार वर्णू तरी काई ॥ कविराय म्हणे धन्यधन्य पेशवाई"। ब्राह्मणी राज्य०॥४



---

पाहेऱ्या—पायऱ्या. बाडा—थापा. बाड—थापं, गप्प. तोढा—हजार रुपये भरलेली थैली. ४

# महादजी शिंद्याचा पोवाडा

हा पोवाडा शितूत यांना एका हुसेन कोरबी नांवाच्या मुसलमानानें म्हणून दाखविला त्यावरून त्यांनीं त्याची ही प्रत तयार केली. याची लेखी प्रत त्यांना मिळाली नाहीं. त्याचप्रमाणें हा पोवाडा तोंडानें म्हणून दाखविणाराही कोणी गोंधळी त्यांना आढळला नाहीं.

सदर पोवाडा अपूर्ण आहे. कारण, सबंध पोवाड्यांत कोठेंहि शाहिराचा सहीशिक्का नाहीं. तसेंच या पोवाडयांत बरीच भेसळ आहे. याचे पहिले पांच चौक मूळ शाहिराचे आहेत व पुढचे दोन चौक मागाहून दुसऱ्या कोणी जोडलेले दिसतात. कारण त्यांत खडर्याच्या लढाईचें वर्णन केलें आहे. पोवाडा जर महादजी शिंद्याचा आहे तर महादजीच्या मृत्यूनंतर झालेल्या खर्ड्याच्या लढाईचा इतिहास त्यांत कसा येणें शक्य आहे ? बरें, ते दोन्ही चौक शुद्ध, सुसंगत व ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें यथास्थित आहेत म्हणावें तर तसेंहि नाहीं. सहाव्या चौकांत मराठ्यांनीं मोगलाला खर्ड्याच्या गढींत कोंडल्याची हकीकत आली आहे. बहुतेक सबंध सातव्या चौकांतहि त्याच्या सैन्याच्या हालांचें व उपासमारीचेंच वर्णन आहे. पण त्यानंतर फिरून 'पुण्याबाहेर मोगलावर ढाल दिली' असें मोहिमेस निघावयाच्या वेळचें वर्णन आहे ! सातव्या चौकांतिल वर्णनाच्या झोंकावरून उपासमार झालेले लोक मराठेच असावेत असा समज सहजच होतो. सोईकरितां ते मोगल आहेत असें मानावयाचें इतकेंच ! एरवीं 'घरदार पोरें लेंकरें बायको मुकली। घरीं मुबलक खायापिया देवदया प्रपंच माया चाकरी धरली' इ० वाक्यें मराठ्याच्याच मुखांतून निघण्यास योग्य, असें कोण म्हणणार नाहीं ?

त्याच चौकांतील 'डाकदार बघतो नाडी' इत्यादि उल्लेखावरून भेसळ बरीच मागाहून झालेली असली पाहिजे हें उघड दिसतें. पेशवे किंवा निजाम यांच्या सैन्याबरोबर इंग्रजी डॉक्टर असत, असे ऐतिहासिक कागदपत्रांतून आधार सांपडल्याखेरीज 'पोवाड्यांतील उल्लेख भेसळींतील नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं.

अखेरील दोन चौक सोडले तर पहिले पांचहि चौक सुसंगत व फार सुंदर आहेत. शिंदे सैन्य सरंजाम करून पुण्याहून कूच करून उत्तरेंत गेले व तिकडे नांव कमवून बादशहाकडून पेशव्यांकरितां त्यांनीं मुतालकीचीं चिन्हें मिळविलीं. नंतर ते ग्वाल्हेर, उज्जनी, तुळजापूर, पंढरपूर मार्गें पुण्यास आले. हडपसरास पेशवे त्यांना सामोरे गेले इत्यादि हकीकत त्यांत आली आहे व ती बहुतेक सत्य आहे. बहुतेक म्हणण्याचें कारण एक मोठी चूक शाहिरानें केली आहे. पोवाड्यावरून असें दिसतें कीं, सवाई माधवराव साताऱ्याला जाऊन आले; नंतर, मसलत ठरून शिंदे हिंदुस्थानांत गेले व तेथें पराक्रम करून त्यांनीं परत येतांना पेशव्याकरितां मुतालकीचीं वस्त्रें आणलीं. पण ही गोष्ट अगदीं विसंगत आहे. सन १७९१ मध्यें श्रीमंत माधवराव पेशवे कन्यागत असल्यामुळें कृष्णास्नानाकरितां वाईस गेले होते व तेथून साताऱ्यास जाऊन छत्रपतींचें दर्शन घेऊन १७ नोव्हेंबर रोजीं पुण्यास परत आले. आणि नंतर पुढील वर्षीं हिंदुस्थान काबीज करून पाटीलबोवा ११ जून १७९२ रोजीं पुण्यास येऊन पोहोंचले. अशी खरी वस्तुस्थिति आहे ( खरे, पान ४४८८ ते ४४९१ व ४५०१ ते ४५०२ ).

पण या पांच चौकी पोवाड्याचें महत्त्व दुसऱ्याच एका दृष्टीनें अतिशय मोठें आहे. शाहिरानें हा महादजी शिंद्याचा म्हणून पोवाडा केला असला तरी वास्तविक त्याचा नायक कोणी तरी एक काल्पनिक मराठा शिलेदार आहे. सदर नायकाला उपलक्षणादाखल धरून त्याच्या अनुषंगानें शाहिरानें, पेशवाईंत सैन्यभरती कशी होई, कलमजारी सुरू होतांच गांवोगांवचे शिलेदार आपापलीं नांवें नोंदविण्याकरितां कसे उत्सुक होत, सैन्यांत असामी मिळावी म्हणून आपलीं घोडीं माणसें कशी तयार ठेवीत व सजवीत, गांवाहून निघण्याचा दिवस येऊन ठेपला म्हणजे त्या दिवशीं त्यांची कशी धांदल उडे, त्यांची, त्यांच्या बायकांची व मित्रांची प्रयाणाचे वेळीं कशी स्थिति होई, सैन्यभरतीकरितां स्वेच्छेनें पुण्यास धांव घेणाऱ्या शिलेदारांनीं• पुण्याकडे जाणारे रस्ते कसे फुलून जात, रात्रीचा दिवस करून शेवटीं चांदरातीला धुणें गाठल्यावर 'घोडें माणूस पाहून' असामी कशी ठरे, लाख दोन लाख फौज पुण्यास जमल्यामुळें धारण वाढून शहरकऱ्यांना कसा धाक पडे, तळाची व्यवस्था कशी असे, कुचाचा हुकूम झाल्यानंतर तळावर कसा

देखावा दिसत असे, कुचावर कूच करून जात असतां वाटेंत रानावनांतून निरनिराळ्या वन्य आणि हिंस्र श्वापदांच्या निःशंक संचाराची मौज कशी दिसे, त्यांतच शिपाई लोक तिरंदाजीनें शिकारीची हौस कशी भागवीत, सातघुड्यासारख्या बिकट डोंगराळ मुलखांतून जातांना कित्येक ठिकाणीं कूच थांबवून सुरुंग लावून खडक फोडून, दगड काढून, झाडी तोडून वाट कशी करून घ्यावी लागत असे वगैरे अत्यंत मनोरंजक व महत्त्वाची माहितीच शाहिरानें दिली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सुप्रसिद्ध इतिहास-शास्त्री दत्तोपंत आपटे यांनीं आपल्या श्रीरंगपट्टणची मोहिम या पुस्तकांत कागदपत्रांतून व तत्कालीन इंग्रजलोकांचे लेखी पुरावे देऊन मराठ्यांच्या तळाचें सुंदर वर्णन केलें आहे. त्या माहितींत या पेशवेकालीन शाहिरानें स्वानुभवानें केलेल्या सरस व विश्वसनीय वर्णनानें नवीन भर पडल्याशिवाय राहणार नाहीं.

शाहिराची भाषापद्धति सुरेख आहे. ‘सोडिली पुण्याची जागा, तोडिल्या धागा, भडकल्या पागा, कालवा झाला’ यासारख्या हुबेहूब चित्र डोळ्यापुढें उभें करणाऱ्या ओळी कितीतरी आहेत.

# महादजी शिंद्याचा पोवाडा

[ शाहीर—अज्ञात ]

## ४८

भले भले सरदार जमून सारे पुण्यावर बारभाई,। चल पाहूं तकत बाच्छाई दिल्लीची छाई ॥ ध्रु०॥

शाहूराजा तकद सातारा मोरचेलवाला गादी थोर राज्य करी। श्रीमंत पेशवे वागे त्याच्या दरबारीं ॥ श्रीमंत किताबी थोर दिली जागीर। सनदावर शेरा मारी ॥ ह्या झाल्या पुण्याच्या सनदा. कोंकणबारी। पेशव्याच्या कृतीवर बावन सरदार शिंदे होळकर वाढले भारी ॥ सोन्याचा कळस हत्तीवर झुले अंबारी। अनंतराव पाटणकर निशाण हाय म्होर तुरुप स्वार पंच हत्यारी ॥ घोड्याला तंग तोबरी जिनबंद कोरी। सैनत फिरे हलकारी ॥ नकीब चोपदारी आणिक हुलशारी। सैनेनें बांधल्या कबरा झाली तयारी ॥ दिला हुकूम गोलंदासाला तोफेचा भार गगनीं धूर छाया घरी। आन्ते

---

छाई- शाई—राजमंडळ. मोरचेलवाला—छत्रचामरांचा अधिकारी. छत्रपति. श्रीमंत किताब थोर—श्रीमंत हा किताब दिला. कोंकणबारी—कोंकणबारी हें पेशव्यांचें विशेषण. यःकश्चित् एका कोकण्याच्या कृतीवर ( पराक्रमावर ) पुढें सर्व सरदारमंडळ वाढलें, हा भावार्थ. सोन्याचा कळस हत्तीवर झुले अंबारी—सोन्याचे कळस असलेली अंबारी हत्तीवर झुलते. अनंतराव पाटणकर (?)—तुरुप—ट्रुपचा अपभ्रंश. तंग तोबरी—तंग-खोगीर आवळण्याची वादी. तंगतोबरी=भावार्थ घोड्याच्या आवश्यक जिनसा. जिनबंद—जिनबंदी—खोगीर चढविणें. हलकारी- हलकारा—जासूद; हरकारा. हलकारी म्हणजे हरकाऱ्याकडून पाठविलेला हुकूम. नकीब—राजबिरुदें ललकारणारा; भालदार. चोपदारी—चोपदार—वेत्रधारी. हुलशारी—हुलस्वारी; मू. श. हुळस्वार. हुलीचे स्वार. हूल म्हणजे बिनीची बिनी. अथवा लष्कराच्या अघाडीची अघाडी. “ हुलीचे स्वार महार जातीचे असत.” [ खरे, भा. इ. सं. मं. ष. इं. वृ. पा. ७२ ] गोलंदासाला—गोलंदाजाला.

मानकऱ्यासी पोशाग भरजरी ।। वाजे हत्तीवर नौबत ताशाचे भार वाजंतरी । शिंग पुकारलें कर्णे विटेवरी ।। फुलाचे गुंफले हार झाले स्वार हौद्यावरी चक्रधारी । श्रीमंत चालिले राज हंबिरी स्वारी ।। सोडला तकद सातारा गेले म्होरे पार झाले कृष्णाबाई । त्याला प्रसन्न हो पर्वति पुण्याची देवी ।। १

जाऊं धन्याच्या डेऱ्याला मजकूर केला त्या घटकेला पत्र लिवली ।। दखनेंत फिरे हलकारी ताकीद केली । चढे हिंमत रोजगाऱ्याला जाऊं पुण्याला तलवारीला दरोबस्त बांधिली ।। मेण शिकल केली, गडी बरचा पठिवला जलदी गेला जिनकराला ताकीद केली । घोड्याचा रंग पाहून जिन फांजिली ।। मुबलक पैसा खर्चीला उंच अब्रूला किनखाफाची खरेदी केली । ढेलजेस

---

गगनीं धूर छाया धरी–आकाश धुरानें व्याप्त झालें. धुराचें छत्र पसरलें. 'गगनी लागून गेला धूर'. ताशाचे भार–अनेक ताशे. शिंग पुकारले कर्णे–कर्णे आणि शिंगें पुकारूं लागलीं. फुलांचे गुंफिले हार–हौदे अंबाऱ्या पुष्पमाळांनीं अलंकृत केल्या. चक्रदारी–चक्रधारी. देव असा भावार्थ. २ चक्रीदार हौद्यावर. राज हंबिरी स्वारी–राजमोहरा स्वारी. राजबिंडा स्वारी. पहिल्या चौकांतील शेवटच्या ४।५ ओळींचा संबंध कुणाकडे आहे ? १

मजकूर केला–मसलत केली. बोलणें केलें. रोजगारी–उमेदवार; शिलेदार; शिपाई इ०. तलवारीला दरोबस्त बांधिली मेण शिकल केली–तलवारी घासूनपुसून, धार लावून, तयार केल्या किंवा त्यांना त्यांच्या म्यानांत घालून तयार ठेवल्या. मेण–म्यान. शिकल करणें–जिल्हई देणें; पाणी देणें इ० जिनकर–जिनगर (फा. पु.) खोगीर करणारा. घोड्याचा रंग पाहून जिन फांजिली–फांजणें To sew a खोगीर i. e. to finish it off with stitching. घोड्याच्या रंगाला शोभून दिसतील अशा रंगाचीं खोगिरें तयार केलीं. मराठी शिलेदारांचें आपल्या घोड्यावर अतोनात प्रेम असे. त्यांना सजविण्यांत, त्यांची बरदास्त ठेवण्यांत आणि त्यांच्या आयाळांच्या बटांच्या वेण्या म्ह० चोट्या घालण्यांत त्यांचा पुष्कळ वेळ जात असे, अशा साक्षी तत्कालीन अनेक इंग्रज लोकांनीं दिल्या आहेत [श्रीरंग. मोहीम पहा.]. मुबलक पैसा खर्चीला उंच अब्रूला किनखापाची खरेदी केली–आपल्या

बसले शिंपी म्होरकी शिवली॥ दाहा रुपये दरमाहा केला मोत्ततदार ठेविला संगें नेयाला सोबत झाली। घोड्याची खटपट त्याच्या हवालीं केली ॥ उठ सखया अंगोळीला सैपाक झाला भोजनाला नार बोलली। ह्या रत्नाताटाभोवती रांगोळी भरली ॥ जीन भिडविला घोड्याला,गेदजोड त्याला तुरा खोविला म्होरकी दिली। निघाली घाई घरीं अस्तुरी कष्टी झाली ॥ ह्या अवघ्यांसी चांगला भेटू तो सर्व्याला मुजरे करतो घोडी धरली। संगे मैत्राची मंडळी घालवीत आली ॥ पदर लविला नेत्राला पाय दिला रिकिबाला तयारी केली। ह्यो वाहतो पुण्याचा रस्ता रब पडली ॥ रातीचा दिवस केला पुण्याला गेला चांद रात्रीला हजिरी दिली। घोडे शिपाई पाहून बोली

---

प्रतिष्ठितपणाला शोभतील अशा तऱ्हेचीं उंची किनखापाचीं कापडें खरेदी केलीं. देवळज—कमानी दरवाजा किंवा वाड्याच्या मोठ्या दरवाजाच्या आंत प्रवेश केल्याबरोबर डाव्या उजव्या हाताला असणारी देवडीवजा ओंवरी. म्होरकी—एक प्रकारचें दावें [शु.म. को.] २ जनावरांच्या तोंडाला बांधावयाची कांहीं विशेष आकाराची दोरी. दहा रुपये दरमहा केला—दरमहा दहा रुपये पगार ठरविला. नेयाला—न्यायाला. उठ सखया...नार बोलली—ऊठ सखया आंघोळीला, भोजनाला, सैपाक झाला असें नार बोलली. या रत्ना ताटाभोवतीं रांगोळी भरली—रत्नखचित ताटाभोंवतीं रांगोळी काढली. गेदजोड—the pair of (silk or silver) tufts or knobs on a horse's crupper [मोल्स]. निघाली घाई—निघण्याची वेळ येऊन गर्दी झाली. या अवघ्यासी चांगला भेटू तो सर्व्याला मुजरे करतो—भेटू तो—भेटतो; आलिंगन देतो. सर्व्याला—सर्वांना. संगे मैत्राची मंडळी घालवीत आली—बरोबर सोबती दूरपर्यंत पोंचविण्यास आले. ह्यो वाहतो पुण्याचा रस्ता रब पडली—रब—रांग. ठिकठिकाणाहून पुण्यास सैन्यांत दाखल होण्याकरितां जाणाऱ्या शिपाईशिलेदारांची जणुं काय माळच लागली होती; २ या नायकाबरोबर जाणाऱ्या टोळींतील शिपायांची रांग लागली. रात्रीचा दिवस केला—रातवा किंवा रतावा करून गेले. म्हणजे रातोरात गेले. रात्रींहि मुक्काम किंवा विश्रांति न घेतां दरमजल गेले. चांदरात्रीला हजिरी दिली—चांदरात—

केली ॥ उतारले डेऱ्याम्होरे बसले धीर गादीवर विडे घेई । चल जाऊं पाहूं श्रीमंत दिल्लीची छाई० ॥ २

आली शार पुण्याला शोभा दाटली पागा मिळेना जागा पुण्या भोंवतेला । तीन लक्ष रुपये नित उडे खर्चाला ॥ ह्या बोले शिंद्याच्या फौजा लावूं ध्वजा दिल्ली अटकेला डाकेवर खबरा पोंचवूं पुण्याला । तुम्ही कराल पुण्यावर मौजा खर्चाल फौजा जिवाकडे बघा मुकाल प्राणाला ॥ त्यानें हिंमत धरली जाऊं हिंदुस्थानाला । शिंद्यानें भरविल सभा मजकूर बगा द्यावी रजा ह्या सैनेला ॥ ललकारी नकीब चोपदार रुमाल फिरला । शिंद्याचा सबता सुभा धनी उभा

---

सैन्याच्या पगाराचा दिवस. भावार्थ असा कीं, सैन्यांत आपलें नांव किंवा आपलें पथक नोंदण्याकरितां चांदरात्रीला दाखल झाला. घोडे शिपाई पाहुन बोली केली–घोडे चांगले व शिपाई जवान आहेत अशी खात्री करून घेऊन बोली केली म्ह० तनखा वगैरे ठरविला. डेऱ्या म्होरे–खाशा स्वारीच्या म्हणजे शिंद्यांच्या डेऱ्यासमोर तळ दिला. २

शार–शहर. नित–नित्य. ह्या बोले–ह्या बोलती. डाकेवर खबरा पोचवू पुण्याला–डाक बसवून. मजकूर–मसलत. द्यावी रजा या सैनेला–शब्द आहे तसाच अर्थ घेतला तर भलताच विसंगत अर्थ निघतो. वर आलेलें सर्व वर्णन सैन्याच्या संचणी संबंधींच आहे व पुढेंहि दिल्लीकडे तेंच सैन्य गेलें आहे, त्याअर्थी सैन्याला रजा द्यावी म्ह० सैन्य कमी करावें हा अर्थ सुसंगत नाहीं. रजा देणें म्हणजे कूच करण्याकरितां निरोप देणें असा अर्थ अभिप्रेत असल्यास न कळे. २ द्यावी रजा हे शब्द 'द्या विरजा' असे तर मुळांत नसतील ? विरजा किंवा इरजा याचा मूळ अर्थ इरजिकीप्रमाणें उसनी दिलेली किंवा घेतलेली वस्तु. त्यावरून शिंद्यानें सैनिकांच्या अडचणी भागवल्या असा अर्थ होईल कीं काय ? रुमाल फिरला–नकीब चोपदार कुचाचा हुकूम ललकारीत तळावर फिरूं लागले. चरणाचा भावार्थ सहज कळतो. परंतु नकीबांच्या जवळ खरोखरीच रुमाल असत कीं काय हें समजण्यास ऐतिहासिक कागदपत्रांत कांहीं खुलासेवार आधार सांपडला नाहीं. रुमाल याचा अर्थ मोल्सवर्थ असा देतो. "applied to the cloth which is waved

हत्ती त्येगा त्यानें धरिला ।। ही वाजे नौबत दणका तोफेचा झाला । हत्तीवर चढे हौदा डेरे चौदा राहुट्या लादा नगारे झाले ही दारू गोळीनें हजार छकडे भरले ह्यो घोडा सजीवला ।। जर्दा बांधून गुर्दा शिपाई उमदा साज कमरेला । ह्यो नागनिशाणी झेंडा हत्तीपुढें गेला ।। सोडली पुण्याची जागा तोडिल्या धागा भडकल्या पागा कालवा झाला । 'चालला शिंदा दखनचा धाक उडाला ।। त्यानें उतरून गेले गंगा होईल दंगा सावध सांगा ह्या सैनेला । ही साडेसातशें तोफ चाले बिन्नीला ।। श्रीमंत धनी होय राजा हुटावर लेजा पैसा ताजा खजिना भरला । ही दर मुकामीं खर्ची धाडी शिंद्याला ।। दरकूच चालले म्होरे नर्मदावर उभारले डेरे राहुट्या देई । ह्या नर्मदेचे सैना पाणी पीई ।। भले०।। ३

आली सातपुड्याची घडी तोफगाडी दाटली घोडी वाट पुढें नाहीं

---

before kings and nobles" पारसनीस यांनीं आपल्या ऐतिहासिक टिपणांत एके ठिकाणीं उडत रुमाल हा एक किताब असून सैन्यांतील शूद्र किंवा अतिशूद्र लोकांना तो मिळे व राजे लोकांप्रमाणें पांढरें फडकें त्यांच्यावर चवऱ्यांप्रमाणें उडविण्याचा त्यांना मान असे अशी माहिती दिली आहे. वर हुल्सार या टीपेंत सैन्याच्या अगदीं आघाडीचे पथकेदार महार, मांग वगैरे अतिशूद्र असत हें आपण पाहिलेंच. त्यावरून कुचाचा हुकूम झाल्याबरोबर हुलीचे पथकदार चालूं लागले, असा भावार्थ दिसतो. हत्ती त्येगा—हातीं तेगा. तेगा—तलवार. नागनिशाणी झेंडा—शिंद्यांच्या निशाणावर नागाचीं चित्रें असत. हत्ती पुढें गेला—निशाणाचा हत्ती पुढें गला. धागा—या शब्दाचा अर्थ सूत्र, दोरी असा सांपडतो. येथील संदर्भावरून धागा—घोड्यांचे पायबंद असा अर्थ दिसतो. कालवा झाला—गर्दी उसळली, कालवाकालव झाली. दखनचा धाक उडाला—शिंद्याच्या सैन्याचा तळ पडल्यामुळें धारण वाढून शहरकऱ्यांचे हाल होत त्यास अनुलक्षून. त्यानें उतरून गेले—तो उतरून गेला. हुटावर लेजा पैसा—हुटावर—उंटावर. लेजा पैसा—खजिना लादला. खर्ची—रक्कम. नर्मदावर—नर्मदेवर. ३

घडी—बारी. कामाठा—डेरेराहुट्या व लष्करचे इतर सामान व तोफ-

कामाठे खादी पर्वत फौज उभी राही। टाकीन् पाषाण फोडी खपरे पाडी बार भरी तोफा लावी ॥ तीन हजार खलाशी संगें राव पगार खाई। पुढें चिल्लारीची झाडी काठवाडी मोठ्या धाडी वर्सल्या बाई ॥ गर्जती वाघ जाळींत जांभया देई। ह्यो चिता मारतो उडी लबक पडी नीरकाडी सांबर भिई ॥ पळे जंबुका स्वाैर मृग थडकले रुई। कमठेला तीर जोडी चिमट सोडी गाईकवाडी पाहिली नाहीं ॥ ह्यो कठीण देश परगाणा भिल्लाची खाई। आली हुटाची खिल्लार हात्ती चिरचिरे डुकर मारद, खळ्या घेई ॥ चल मृग तरस रानांत हिंडे वनगाई। आली थाप्यावरती झाडी असमान फाडी साहेब फडफडी हेलावे घेई तीन मजले गेले सुर्या दिसला नाहीं ॥ आली उंच उजनीची गडी जेजाला जोडी तोफा सोडी होती लढाई। रणशूर शिपाई दखनी चालून घेई ॥ गेले डोंगर उतरून पार जमून सार हें लष्कर शिंदेशाई दिल्लीवर लाविले झेंडे फिरविली द्वाही ॥ भले०॥ ४

---

खाना व्यवस्थेनें नेणें व ठेवणें व लष्करची लढाईशिवाय इतर कामें असतात तीं करण्याकरितां लावलेले कामगार [ खरे, ९२९ ]. खादी–खोदी. टाकीन–टाकीनें. बार भरी तोफा लावी–सुरुंग लावी. खलाशी–a Gunner or an artillery man. (मोल्स) चिल्लारी–काटेरी झुडूप. धाडी वरसल्या–(?) धाडी बसल्या तर नव्हे? लबक पडी नीर काढी सांबर भिई–चित्ता लकबेनें उडी मारतो. स्वार मृग थडकले रुई–रुई–रोही. हरणाची एक जात. स्वार मृग–स्वार मग (?) चिमठ सोडी–चिमटीनें दोरी ओढून बाण सोडले. ( दाभाड्याच्या पोवाड्यांतील चिमट्या या शब्दावरील टीप पहा ). डुकर मारद खळया घेई–मारद (?)–खळी घेणें–डुकर खळीस यावा तैशी गत झाली असा वाक्प्रयोग भाऊसाहेबांच्या बखरींत आलेला आहे. चल (?) –थाप्यावरती–थापा–एकाद्या पर्वतावरील सपाट प्रदेश किंवा पठार. झाडी असमान फाडी–आधींच तुंग असलेल्या डोंगरावरील उंच झाडी आकाशास भिडल्यामुळें ती आकाशच फाडतें कीं काय असें भासे. साहेब–श्रोत्यांस अनुलक्षून. फडफडी–हेलावे घेई–झाडी. मजले–मजली. सूर्या–सूर्य. गडी–गढी. ४

शिंदे बाच्छाई तकत थेट ठेविली दृष्ट मुजर दाट त्यांनीं केले ॥ त्यांनीं येक नालखी बाच्छाई देणें झालें। सोडिला दखन कूचट आले नीट काम मोठें जबरा केलें ॥ घे दखनेचा हिसाब बाच्छाई बोले। झाला लष्करचा आठीकाट झाडी दाट कठीण वाट लष्कर फिरलें ॥ ते उज्जनी ग्वालेरीवरी ठाणें बसलें। झाला लष्करचा बोभाट कलमादाट तीनशें साठ बिगारी धरले ॥ ते उतारले नर्मदा अलीकडे आले। ईर साहेब, मराठा थेट निराळा गोट उठून पहाटेस स्नान केलें ॥ देवीच्या दर्शनास मराठे गेले। ही धामणगांवची वाट धरून नीट गेले थेट डेरे दिले ॥ ते बोधल्याला पठाण निमाज पढले। करावरी कट साधु भेट पंढरी आले ॥ ते चंद्रभागेचें महातीर्थ केलें।

---

मुजर दाट—सर्व सैनिकांनीं एकापाठोपाठ मुजरे केले. सोडिला दखन कूचट—सोडिला दखन कूच चट आले नीट इ०. भावार्थ, दक्षिण सोडून कुचावर कूच करीत बादशहाच्या साहाय्याकरितां धावून जाऊन बादशहाची मुक्तता केली यामुळें बादशहा खूष झाला. बाच्छाई—बाच्छाय. बाच्छा—बादशहा. जबरा—फार मोठें; अगाध. आठीकाट-आटोकाट तयारी किंवा गर्दी. कलमा—गोंधळ किंवा आरडाओरड (मोल्स.) ईर (?)—ते उतारले नर्मदा अलीकडे आले........हडपसरच्या रानीं आडवे गेले—"पावसाळा संपल्यानंतर महादजी शिंदे उज्जनीहून निघाले ते दोन तीन महिने माळवा व नेमाड याच प्रांतांत फिरत होते. मार्च महिन्यांत ते बऱ्हाणपुरास आले. तेथून थेट चाल करून गोदावरी-तीरीं बीड येथें गेले. तारीख १३ एप्रिल रोजीं ते बिडाहून तुळजापुरास गेले. तुळजापुराहून जामगांवास जाऊन ११ जून रोजीं पुण्यास पोहोंचले" [ खरे, ४५०२ ]. शाहीर म्हणतो त्याप्रमाणें ते (शिंदे) पंढरपुरास गेले नव्हते. "पंढरपुरास जाऊन जोतीबास जावें असें त्यांच्या मनांत होतें. परंतु तो बेत त्यांनीं बदलला." [ खरे, ४५०२ ]. करावरी कट—कटावरी कर असें पाहिजे. साधुभेट—"बिडास कोणी अवलिया फकीर त्यांचा गुरु होता त्याच्या सहवासांत त्यांनीं आठ दिवस घालविले." [ खरे, ४५०२ ]. महा तीर्थ केले—महातीर्थाची यात्रा केली. मोत्याचे बुट—मोत्याचे बुट्टे. बक्षी केले—बक्षीस दिलें. देसावी—देशाला. ५

करकरा लिवले लाखोटे जासुद उठे गेले थेट पुण्याला गेले ॥ तीं पत्रें पाहून श्रीमंत सावध झाले । श्रीमंत मोत्याचे बुट सोन्याचे कट सजीवले हुट हत्ती घेतले ॥ त्या हडपसराच्या रानीं आडवे गेले । श्रीमंत शिंद्याला भेटे उल्हास दाटे तोफा सुटे बार झाले ॥ हे पांच हत्ती शिंद्याला बक्षी केले । यशवंतराव म्हराटे खरे भाग्य थोर आले माघारी पुणें देसावी ॥ त्या हिंदुस्थानाच्या खबरा डांकेवर घेई ॥ भले० ॥ ५

साहा महिने पुण्यावर झाले पत्र लिहिलें जोड हरकरी पुण्याला गेले त्यांनीं पत्रें टाकूनशान मुजरे केले ॥ मसीरंग पाहून लटपटे करून झटपट फोडी लखोटे । वाची अक्षरें कीं पाहून राव चिठ्या करी परगण्यावर ॥ त्या बत्तीस लक्ष लाखा लिहून लिखा एकच शिका नगरी सारी ॥ शिंद्याला धाडली खर्ची पुण्यावरी । नाहीं भरले शिंद्याचें मन रुपये पाहून घेई भरून दखने दरबार ॥ दखनेचा हिसाब पुसी समयावर । हिंदुस्थान काबीज केलें दखनेंत आले काळ झाले शिव अवतार ॥ मग दवलतराव स्थापिले तक्तावर । असें कळलें कीं मोगलाला तंबूर झाला मानकऱ्याला केले पुकार ॥ पुण्याकडे फिरविले झेंडे धारवाडावर । हात जोडून आरज करतो नवास बोला शेख सल्लाला सत्व फार ॥ गाई कापू कंदुरी राव तुमच्या म्होर । मोरीचा घाट धरला उतरून गेला तळघाटाला उतरून गेला गांव नाहीं म्होर ॥ तोफेचा बुरूज बांधिला गारपिरावर । खर्ड्यांचा किल्ला घेरिला वेढा दिला

---

जोड हरकरी—जोड हरकारी; जासूद जोडा. मसी रंग—मशीरन (?) मशीर. चिठ्या करी परगण्यावर—खंडणीची रक्कम वसूल करून पाठवून देण्याकरितां प्रांताधिकाऱ्यांना आज्ञापत्रें लिहिलीं. लिखा एकच शिक्का नगरी सारी (?)—मोंगलाला तंबूर झाला—मोंगल आला तंबूर झाला. धारवाडावर—धारूरावर असें पाहिजे. नवाज (?)—शेखसल्लाला सत्त्व फार—शेखसल्ला हें जागृत पीरस्थान आहे. तेथें त्यांच्यापुढें तुमच्या डोळ्यादेखत गाईचा बळी देऊं. मोरीचा—मोहरीचा. तोफेचा बुरुज बांधिला गारपीरावर—अर्थात् पेशव्यांनीं. गारपीरावर तळाचें ठिकाणीं तोफखाना आणून ठेवला.

मोंगल आला बसला थीर ।। हे साडेसोळाशें डेरे दिले चौफेर । असें कळलें मोंगलाला तळघाटाला गलबल झाली । पांचावर बसली धारण तोंडें मुकलीं ।। भले० ।। ६

एक एक शिपाई बोले बरें नाहीं झालें मराण आलें घडिली चकली । घरदारपोरें लेकरें बायको मुकलीं ।। घरीं मुबलक खायापिया देवदया प्रपंच माया चाकरी धरिली । मी गेलों असतों मागेंच आस्ता घडली ।। वरजिलें अन्नपाणी दिलगीरवाणी बसे होउनी काळोखी चढली । रातदिवस करी घोकण्या आणि चिंता पडली ।। अन्नपाणी लागेना गोड निघालीं हाडें धाई-धाई रडे नशीबा खुटली । आतां काई करावें दोरी स्वर्गाची सुटली ।। गांडुनीं काढिलीं दुखणीं भ्या घेउनी कणा दाटुनी निद्रा केली । बोट बोट डोळे गेले खोल अंधारी पडली ।। कोण बघतो निघून जाया जातो हगाया पडतो पाया शाई घाबरली । सभोंवतेनें करडा पहारा जाऊं देईना कुणी ।। डागदार बघतो नाडी दवा देत तोडी चालवी जडी बाधा नाहीं जडली ।। धडधडी उडताय काळीज धडकी भरली । मग गोपाळराव गुंडा करून झुंडा फिरवून तोंडा हिंमत धरली ।। मग रुपयाची ढाल भर बोली केली । मग मानाजी फांकडे हटील घोरपडे रुपये रोकडे पगार चालविले ।। भाल्याला बांधिलें बारिंग हळद लाविली । रणांत रणनवरे शिपाई बावरे भुजा

---

पेशवे डेरेदाखल झाल्यावर. मोंगल आला—मोगलाला असें पाहिजे. थीर—स्थिर, अर्थात् किल्ल्यांत कोंडल्यामुळें. ६

घडिली चकली—घडलीच कली (कळी) किंवा घडली र ! कळी. अस्मानी झाली, दुर्दैवानेंच कळ फिरवली. २ चकली (पु.) म्ह० चौकी. घडली चकली म्ह० चौक्या बसवल्या. शहरांतील जो महला किंवा चवाठा त्यास चकली म्हणतात [ शास्त्री. कोश ]. आस्ता (?)—नशीबा खुटली—नशिबें खुटली—आपलें नशीब खुंटलें, दुर्दैव उभें राहिलें म्हणून रडू लागले. काई—काय. दोरी स्वर्गाची सुटली—कालपाश जवळ येऊं लागले. कणा दाटुनी निद्रा

थरथरे लढाई नेमली ॥ पुण्याबाहिर मोंगलावर ढाल दिली । ढालाई चालले म्होर घेउनि शिर तळहातावर भ्या कांहीं नाहीं ॥ चल जाऊं पाहूं श्रीमंत दि०॥ ७



केली (?)–तोडी चालवी–युक्ति चालवी. जडी बाधा नाहीं जडली–याला कांहीं एक बाधा किंवा व्यथा नाहीं, हें निवळ ढोंग आहे. हाटील–हाटेले. ७

# नाना फडणिसांचा पोवाडा

## ४९

[ शाहीर–बाळा बहिरू ]

[ चाल — श्रीमंत महाराज पेशवे अमोलिक सुर्तीमोती ॥ ]

श्रीमंतमहाराज सवाई रावसाहेब मोतीदाणा । खुप युक्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ ध्रु०॥

रतिवंत महाराज पेशवे माधव विष्णू अवतार । हिंदुस्थान कर्नाटक तेलंगण काबिज केलें सार ॥ घरिं बसल्या घरिं खंडण्या येती वृत्तांत ऐका साचार। शिंदे होळकर गाइकवाड नामी नामी सरदार ॥ जाट रोहिले पठाण कांपति राजे उदापूरचा राणा । खुप युक्तीनें०॥ १

जरीपटक्याचें निशाण तात्या हरिपंताला सरदारी । चौखंडांमधिं धौंशा वाजतो कइकांला दहशत भारी ॥ हुजरातिची जिलीब चालती मानकरी सेना सारी । पाटणकर घोरपडे निंबाळकर तलवारीचे धारकरी ॥ अपाजि बळवंत-राव शिपाईशाईमध्यें एक दाणा । खुप युक्तीनें०॥ २

भले बुद्धीचे सागर नाना ऐसे नाहीं होणार । मर्दानें हो राज्य राखिलें मनसोबीच्या तलवार ॥ इंग्रेजाला खडे चारिले नाहीं लागुं दिला थार । दर्यामधीं पिट्टून घातलें काय सागूं वारंवार ॥ बदामीचा किल्ला घेतला असा पुरुष नाहीं शहाणा । खुप युक्तीनें०॥ ३

---

रतिवंत–दैववान. साचार–वास्तविक; खरी; सत्य. १

जरिपटक्याचें निशाण तात्या हरिपंताला सरदारी–हरिपंत तात्याला जरिपटक्याच्या निशाणाची सरदारी होती म्हण. जरिपटक्याच्या फौजेवर हरि-पंत सेनापति होता. धौंशा–प्रख्याति, ख्याति, कीर्ति. जिलीब–लवाजमा. सरंजाम. तलवारीचे धारकरी–तरवारबहाद्दर. शिपाईशाई-लढवय्यांचें मंडळ; २

मनसोबी–मसलत. मनसोबीची तलवार करून तिच्या जोरावर राज्य

भले बुद्धीचे सागर बुद्धीवंत बुद्धीचे सागर। दुष्टाचें निर्दाळण करुनि राज्य राखिलें एकछतर ॥ श्रीमंतांच्या वाडयामधीं सबनिस अण्णा खेडकर। कुल अखत्यारी बंदोबस्ती बाळाजीपंत ठोसर ॥ नानापरिचे विलास करितो जैसा गोकुळीं हा कहाना। खुप युक्तीनें०॥ ४

लक्ष धन्याचे पायीं जित्तापासुनि हा ज्याचा भाव। पहा राइचे पर्वत केले वाढिवले माधवराव ॥ लग्नासाठीं आणले ज्यानें मोठे मोठे उमराव। जागजागीं दिल्या बैठका अनंत होतो उच्छाव ॥ तखतराया रथ हत्तीचा पुढें वाजे नौबतखाना। खुप युक्तीनें०॥ ५

राव बाजीचे पुण्य प्रतापी पुणें शहर केवळ काशी। गोब्राह्मणां प्रतिपाळितो दक्षिणा श्रावणमासीं॥ टिकून धनया धन्य म्हणे या पेशव्याच्या वंशाशीं। बाळा बहिरू करी कविता बसूनियां नित्य गासी॥ सेवक सिताराम ज्यांचा दशनामीं भगवा बाणा। खुप युक्तीनें०॥ ६

---

चालविलें. भावार्थ–महामुत्सद्देगिरीनें राज्य रक्षिलें. असा पुरुष नाहीं शाहाणा–असा (अन्य) शहाणा पुरुष नाहीं. ३

एक छतर–एकछत्री. सबनिस आण्णा खेडकर (?) बाळाजीपंत ठोसर–[काव्येति. सं. प. या. लेखांक ३३१ पान २९०.] दुसऱ्या अनेक ठिकाणींही याचे उल्लेख आले आहेत. नाना प.रिचे विलास करितो–श्रीमंत पेशवे नानांनीं सवाई माधवरावाला कांहीं उणें पडूं दिलें नव्हतें. कहाना–कान्हा, कृष्ण. सवाई माधवरावास उद्देशून. ४

भाव–भक्ति. तखतराया–तख्तरावा. ५

रावबाजीचे–पहिल्या बाजीरावानें पुणें वसविलें. टिकून धनया धन्य–पेशव्यांच्या वंशाशीं म्हणजे आपल्या धन्याशीं टिकून एकनिष्ठ राहून त्यानें धन्य म्हणवून घेतलें, (२) आपल्या धन्याशीं एकनिष्ठ राहून त्याचा (पेशवे वंशाचा) बोलबाला केला. ६

# आळत्याची लढाई

सन १७८५।८६ मध्यें कोल्हापूरकरांनीं सावंतवाडीकरांचे कांहीं किल्ले व मुलूख लढाईंत जिंकले. सावंतवाडी सातारकर छत्रपतींच्या शिक्याखालील असल्यामुळें पेशव्यांना करवीरकरांचें पारिपत्य करणें प्राप्तच होतें. सबब त्यांनीं कोल्हापूरकरांवर स्वारी करण्याची परशरामभाऊस आज्ञा केली.

ही खबर पोंचतांच करवीरकरांनींच खोडी काढून पूर्वी भाऊंना दिलेलें अळत्याचें ठाणें जबरदस्तीनें घेतलें. भाऊंनीं आपला ज्येष्ठ पुत्र रामचंद्र आप्पा याजबरोबर चार हजार फौजा, दोन हजार रोहिले व तोफा इ० देऊन त्याची रवानगी केली. आप्पांनीं आळत्यास वेढा दिला. करवीरकरमहाराजास हें कळतांच ते जातीनिशीं फौज घेऊन आले, व त्यांनीं जोराचा हल्ला चढविला. मोठें झुंज झालें. "ईश्वरी इच्छें लढाई बिघडली. रामचंद्र आप्पानीं जवामर्दीविषयीं कमती केली नाहीं. त्यास जखमा उजवे डोळ्याजवळ आखांस, शेंडीजवळ, डावे बाव्हस्यास व उजवे हाताचे आंगठ्याजवळ अशा चार झाल्या व ते पाडाव झाले." त्यांचीं घोडीं, उंटें, तट्टें, तोफा निशाणाच्या हत्तीसुद्धां करवीरकरांनीं हिसकावून घेतलीं. पण महाराजांनीं रामचंद्र आप्पास फार प्रेमानें व इतमामानें बागवून त्यांच्या जखमांची निगादास्त करून, वस्त्रें देऊन बरोबर स्वार देऊन निशाणाचे हत्तीसुद्धां परत पोंचविलें. ते हरिपुरनजीक अंकलीस आले.

आपल्या इभ्रतीकरितां भाऊंना स्वतः लढाईस सिद्ध होणें ओघानेंच आले. व लढाईची बातमी येतांच तत्काळ म्हणजे २९ डिसेंबर दिवशीं ते डेरेदाखल झाले. त्यांनीं पुण्यास 'सरकारांत विनंति करून इंग्रजी पलटणें दोन व सरकारचे गाडद व चाकरीस नवे मिळतील ते व पांच सात पागा व प्रतिनिधि वगैरे यांचीं पथके जलदीनें पुढे रवाना करावी. तुम्ही यावे. एकटे येऊ नये. जो ऐवज लागेल तो देतो. हरतऱ्हां करून सामान मिळवावें. इंग्रजी पलटणास विलंब असल्यास शिंदे यांजजवळ पलटणें तयार आहेत त्यापैकीं पलटणें सरकारच्या विचारास आलिया बोलोन आणावी' अशीं निकडीचीं पत्रें लिहिलीं व ते अंकलीच्या तळावर पोहोंचले.

अंकलीवर सर्व फौज जुळल्यावर, बेदेरी कुपवडा, चिंचवड, वळवडें, उचगांव असे कुचावर कूच करीत करवीराजवळ टेंबलाईचे टेकडीवर येऊन मोर्चेबंदी केली. त्याच दिवशीं सायंकाळीं शत्रू आंतून बाहेर आला व मोठी चकमक झाली. पण हरिपंतबाबानें म्हणजे परशुराम भाऊच्या दुसऱ्या मुलानें त्यांना उधळून लावलें. १९ फेब्रुवारी व १२ मार्च रोजीं मोठ्या गर्दी-च्या चकमकी होऊन करवीरकरांचा मोड झाला. वेढ्याच्या पहिल्या दिवसा-पासूनच करवीरकरांनीं तहाचें सूतोवाच करून ठेवलें होतें. शेवटीं दोहों-पक्षीं बरीच घासाघीस होऊन दहा लक्ष खंडणीवर सल्ला ठरला व रत्नाकर-पंत, प्रीतिराव, इत्यादि सहा प्रमुख लोकांच्या मुलांना ओलीस घेऊन भाऊ मिरज करून तासगांवास परत आले.

# आळत्याची लढाई

## ५०

[ शाहीर–जिवाजी पांचाळ ]

[ चाल—दक्खनच्या पेशव्याशीं घाला कधीं नवता आला। ]
[ चाल दुसरी—श्रीमंताच्या बावन पागा त्यामधीं बावन सरदार। ]

तासगांव अपूर्व परशुरामभाऊचें शहर। गणपतीचा उत्साह होतो हरिस्मरण गजर ॥ ध्रु०॥

भाऊसाहेबांचा नित्य नेम त्याचें दर्शन घ्यावें अगोदर। असे एक धनी श्रीमंत त्याला पेशव्यांचा आधार॥ पुण्यप्रताप नांव थोर आलें श्रीमंताचें पत्र। पाहिला वाचून मजकूर ॥ (चाल) ॥ मग आणूनिया ध्यानांत। डेरे दिले पाहून मुहूर्त ॥ वाजे नगारा नौबत। कुचावर कूच करीत ॥ (चाल)॥ गेले सालप्याच्या घाटा धनी उमराव। तेथें बसून मसलत केली जलदीनें यावें॥ मुळेमुठेवर पुणें गांठावें। असें कळेल श्रीमंताला हुजूर धाडावें॥ धाडुनियां हुजूर भाऊशीं आणिलें वाड्यांत। श्रीमंताच्या भेटी झाल्या बहु आनंदांत॥ तासगांव किल्ला अजब तऱ्हा झाली रचनुका केली दक्षिणेंत। परशुरामभाऊंनीं केली चौखंडा कीर्त॥ तासगांव०॥ १

सवाई माधवराव भाऊशीं बोले वचन। करवीर कोल्हापूर आतां तुम्ही घ्यावें जाऊन॥ तीन लाखांची खंडणी हुंडी घ्यावी उतरून। महाराजाशीं कैद करावें बसवावें ठाणें॥ श्रीमंतांचें वचन हृदयीं धरिलें भाऊनें। आणलें जरतार पांघरूण॥ वस्त्रें केलीं पेशव्यानें। चालले निरोप घेऊन॥ सोडिलें त्या दिवशीं पुणें ॥ (चाल) ॥ मग निघालें लष्कर। केले कुचाचे नगारे॥

---

हुजूर धाडावे (?)–हुजरे,धाडावे (?). हुजुर भाउशीं आणिले वाड्यांत–आपल्यासमोर आणले. रचनुका–रचना; मांडणी. १

हुंडी घ्यावी उतरून–हुंडी लिहून घ्यावी. पांघरूण–वस्त्र. वस्त्रें

नदी उतरून झाले पार। ढाल दिली कात्रजेवर तळ पाहून ॥ आले रहिमतपुरावर चालून। दरकुच करीत चालले कड निकडीनें ॥ आले तासगांवाशीं केलें देवदर्शन। घेऊनियां दर्शन मग भाऊ गेले वाड्यांत ॥ पाहून आपासाहेबास भाऊंनीं केली मसलत ॥ तासगांव०॥ २

भाऊसाहेब आपासाहेबाशीं काय बोले। सरंजाम कराया आपासाहेबांनीं पत्र लिहिलें ॥ गांवोगांवास लिहिलीं पत्रें खासे मिळविले। सरंजाम करून डेरे राहुट्या बाहेर दिले ॥ घेतला निरोप आपासाहेब बाहेर आले। गणपतीशीं नमन करून मग पालखींत बसले ॥ हत्ती कुंजर शृंगारिले। भडक जरीपटके सोडिले। पुढें चालती कोतवाले ॥ भगवी ढाल पुढें चाले। मग निघाले सरदार तळ नेमिला कौलापुरा ॥ ढाल रोविली येऊनि मोर। गांवोगांवचे शिलेदार ॥ असे जमले कीं दहा हजार। भडक सरदार ॥ दरकुच सोडिले तव उतरले मोर। येऊनि ढाल रोविली कृष्णातीर ॥ तैं बसूनि आपासाहेबांनीं केला विचार। तोफा लावाव्या आळत्यास नका उशीर ॥ सुभेदारासंगं तोफा दिल्या बरोबर। घेऊनियां गारदी फिरंगी गेले अळत्यावरतीं ॥ दुहेरी लाविल्या तोफा वेढा पडला सभोंवतीं ॥ तासगांव० ॥ ३

---

केली पेशव्यानें–पेशव्यांनीं वस्त्रें दिलीं. ढाल–निशाण. तळ पाहून–तळाला योग्य अशी जागा पाहून. 'पाहुन' या ऐवजीं मूळपाठ 'पाड्न' असा असणें शक्य आहे. २

सरंजाम करणें–जंगी ( लढाऊ ) सामानाची आणि सैन्याची जुळवाजळव. हत्ती कुंजर–अशीच द्विरुक्ति अफजलखानाच्या पोवाड्यांत आली आहे. 'संगात कुंजर मस्त हत्ती.' कोतवाले–कोतवाल घोडे, किंवा कोतवाल–घोड्यांचे मोतद्दार. भगवी ढाल–भगवा झेंडा. मोर–म्होर–पुढें (?). कृष्णातीर–कृष्णातिराला. सुभेदार–जनोबा सुभेदार. घेउनियां गारदी फिरंगी–'परशरामपंत भाऊ यांचे थोरले पुत्र राजश्री रामचंद्रपंत चार हजार फौजा व दोन हजार रोहिला व तोफा दोन येणेंप्रमाणें घेऊन येऊन ठाणे आळतेस वेढा घालून उभे राहिले' [ खरे, पत्र नं. ३५२९ ]. ३

सकाळचा दिवस प्रहरभर आला उगवून। गांवकुसवाशीं तोफा लाविल्या सुभेदार जनोबानें ॥ खर खर खर खर लिहून पत्रें जासूद धाडून। फोडूनियां लखोटे वाचिले आपासाहेबानें ॥ केलें सैन्य तयार सडी स्वारी संगें घेऊन। जरीपटक्याचा हत्ती बिनीवर चाले निशाण ॥ गेले अळत्यावर चालून। हल्ला नेमिला रायानें ॥ मारिती बाणावर बाण। शिरले वाड्यांत जाऊन॥ लुटली पेठ फिरंग्यानें। लुटला गांव पाहुण्यानें ॥ केला अळत्याचा संहार। दिस होता दोन प्रहर ॥ गेली महाराजास खबर। धनी बसले सदरेवर॥ ( चाल ) मानकरी मिळाले थोर थोर प्रितजी चवाण। मग सरजेराव घाटगे आले चालून बोले रत्नाकर आपाजी फौज स्वाधीन॥ हैबतराव गायकवाड बिनी स्वाधीन। मोहरप्याला लाविले हत्ती तक्त निशाण॥ महाराज निघाले इतकें सैन्य घेऊन। आले आळत्याचे जवळ॥ बाजीराव माने खिंडींत। दोन टोळ्या करून पुढें गेले रत्नाकरपंत ॥ तासगांव०॥ ४

घनचकर मांडलें लागलें तोंड झुंजाचें। खणन खणन तलवार अशुद्धें वाहती रक्ताचें ॥ आपासाहेबांनिं उठून पाहिले लोक राजाचे। हाणा हाणा बोलती मार उडाले गोळ्याचे ॥ स्वार भाले वारूवर सळ सोडिले फिरंगीचे॥ (चाल) ॥ हैबतराव गायकवाड ओढला हत्ती निषाणाचा। वेढा पडला फौजेचा॥ क्रोध चढला झुंजायाचा। गुंडाळा केला दहापांचांचा॥ धडा

---

सडी स्वारी—घोडदळ. सडी फौज—घोडदळ. पेठ—शहर; गांव. पाहुण्यानें—परक्यानें; शत्रूनें (?). मोहरपा—आघाडी. तक्त निशाण—तगट—(प्रा. न.) भरजरी वस्त्र. तगट निशाण—जरीपटका 'हें वर्तमान ठाणे मजकुरीहून आलें. ह्यावरून श्रीमन्महाराज राजश्री स्वामीची खासा स्वारी फौजसुद्धां त्याजवर झाली' [ खरे पत्र नं. ३५२९ ]. भाले—जाले (?) कां भाले म्हणजे भालेकरी भालाईत ? ४

सळ सोडिले फिरंगीचे—सळ—कमरपट्टयाला तरवार अडकविण्याचा बंद. अशुद्धें—रक्तें. ओढला हत्ती निशाणाचा—वळवून नेला; जिंकून नेला. गुंडाळा—नाश; आटोप. आप्पासाहिब धरावा धीर—'आप्पासाहेब थांबा असें

मग केला जिवाचा ॥ (चाल) ॥ आपासाहेब सरदार। फिरफिरून मारी तलवार ॥ असे दहापांच केले ठार। आले सरजेराव हंबीर ॥ आपासाहेब धरावा धीर ' मग जाऊन धरले कर ॥ आणा पालखी चला लवकर घेऊन। आपासाहेब आंत बसविला सर्जेरावानें ॥ महाराज बसले होते पाहिले त्यानें। झाली दृष्टभेट दोघांची चला घेऊन ॥ गेले कोल्हापुराशीं केलें देवदर्शन। राव राहिले महिनाभर बहु प्रीतीनें ॥ दिले बादली पोषाख नवीं पांघरुणें। मंदिल मोत्यांचा तुरा दिला राजानें ॥ तीन पदरी मोहनमाळ जडित कोंदण। दोन गांवें बक्षिस दिलीं हातीं निशाणें ॥ आपा साहेबाशीं घालवा महाराज बोले त्वरित। घालवीत चालले संगें सवारों राउत ॥ तासगांव० ॥ ५

इतकी खबर ऐकून मग भाऊ झाले वित्रास। कोलापुरची माती आणून मिळवीन कृष्णेस ॥ गांवोगांवांशीं लिहिलीं पत्रे मिळविले खासे। सरंजाम करून तळ नेमला कुपाड्यास ॥ आकलीवर उतरले ढाल दिली कृष्णा-तिरास। खरखरखरखर लिहून पत्रें धाडिलीं मिरजेस ॥ धनी बाळासाहेब बैसले होते सदरेस। वाचून पाहिलें जीन ठेविलें वारूस ॥ चिंतामणरायानें हुकूम केला फौजेस। अंबारींत बसून राव मग आले अकलीस ॥ (चाल) ॥ फार सांगितलें भाऊस जाऊं कोल्हापुरास। आतां नाहीं पुरवत रहायास ॥ याच प्रसंगीं घेईन यश। मान नाहीं केला शब्दास ॥ कागद लिहिले बाबास।

---

म्हणून' किंवा 'आप्पासाहेबास धीरें धरावें अशी उमेद त्यानें धरून. बादली-जरीचें काम केलेलें. जाडित कोंदण-जडावाचें काम केलेलें. हातीं निशाणें-हत्ती निशाणें. रामचंद्र आप्पास करवीरकरांनीं हत्तीनिशाणासुद्धां लुटला होता [ खरे, प. नं. ३५२९ ]. तीं निशाणें परत दिलीं. घालवा-पोंचवा. ५

वित्रास- विषादयुक्त, सचिंत, कोलापुरची माती इ०-कोल्हापूर खणून काढीन, उध्वस्त करीन. फार सांगितलें भाऊस-'आम्ही वडिलांस विनंति केली त्यांतील भाव आज्ञा जाहल्यास मी फौजेत जातो. त्याजवरून ती ॥ भाऊसाहेब याणी आज्ञा केली कीं तूं व मी बरोबरच जाऊ म्हणोन बोललो' [खरे, पान ७३५३.] मान नाहीं केला शब्दास-ऐकलें

पत्र पाहतां या अकलीस ॥ केले कुचहुकूम ढालीस । गेले इचलकरंजीस ॥ तिथेंच तळ पडला चार दिवस ॥ (चाल) ॥ तिथें जमाव सारा झाला । तळ उचगांवचा नेमला ॥ ढाल दिली पंचगंगेला । त्या टेमलाईच्या माळाला ॥ केली पेंढाऱ्यानें हल्ला । कोणी खाईना उसाला ॥ दिले मोर्चे चौ बाजूंला सोमवारीं नेमिली हल्ला भाऊ साहेबानं । मोर्चांत बसविले लोक खासे निवडून ॥ आले महाराजांचे लोक बाहेर निघून । केली मोर्चावरती हल्ला पडले येऊन ॥ शेंपन्नास केले जखमी गेले परतून । म्हणे भाऊ साहेब आतां तुम्ही असा बंदोबस्त ॥ नका करूं गडबड कोल्हापुर घेईन क्षणांत ॥ तासगांव० ॥ ६

मंगळवारचे दिवशीं भाऊनीं केली ताकीद । गांव कुसुवासी तोफा लाविल्या केली हिकमत ॥ महाराजाचे लोक ते एकशूर नामांकित । स्वार झाले वारूवर आले जितीच्या वढयावरत ॥ भाऊसाहेबांनीं कमर बांधिली पट्टा हातांत ॥ (चाल) ॥ घेतला पट्टा हातांत । गेले जितीच्या वढयावरत ॥ झुंज मांडलें पटांगणांत । सूर्य झळकला गगनांत ॥ केली फिरंग्यानें मात । घातले मोडून गांवांत ॥ गांव मग आणिला वेजीत । लागली सल्ल्याची मसलत ॥ (चाल) ॥ घ्या खंडणी म्हणून बोलले मग लखोटे लिहिले । जासुदा हातीं धाडिले । लोक रदबदलीशीं आले ॥ तीन लाखांवर ठरविले ।

---

नाहीं. केलें कूच हुकुम ढालीस–निशाणाला म्हणजे सैन्याला कुचाचे हुकूम केले. कागद लिहिले बावास–हरिपंतबावा. त्यांचा द्वितीय पुत्र. “ चिरंजीव हरिपंतबाबा यास झाडून लोक बुनग्यासहित उदईक अंकलीच्या मुक्कामावर पाठवावे.” [ भारत वर्ष.] उसाला–उसाळी–श्वासोच्छ्वास. भावार्थ, कोणी दम खाल्ला नाहीं. विश्रांति घेतली नाहीं. पडले येऊन–येऊन भिडले. तुम्ही असा बंदोबस्त–बंदोबस्तानें तयार रहा. ६

आणिला वेजित–जिंकला; हारीस आणला. वेजीत किंवा येजित आणणें–जिंकणें, हार खावयास लावणें. तीन लाखावर ठरविले–तीन लाख खंडणी घेण्याचें कबूल केलें. ही माहिती चूक. १० लाखावर भांडण मिटलें. [खरे ]

लोक ओलीशीं घेतले । भाऊ माघारे परतले ।, मिरजेचे मुक्काम केले ॥ भाऊ तासगांवाशीं आले । गणपतीचें दर्शन केलें लोक नगरींचे खुशाल झाले ॥ कडीं तोडे बक्षिसा दिले । मंद्रुपचे देशमुख आले ॥ (चाल) ॥ गजदंत हत्ती दिला राव देसायाशीं । चौखंडामधें कीर्त सांगायाशीं । केला भाऊचा पोवाडा मिरजदेशीं ॥ गांव कोल्हापूर ठिकाणा जागा राहिवाशी । कवि जिवाजी पांचाळ आणा ध्यानाशीं ॥ गुरुरायाची कृपा आम्हाला प्रसन्न नागनाथ । डफावर पांच निशाणें त्रिशूळ झळकत ॥ तासगांव० ॥ ७



लोक ओलीशीं घेतले–"तहाचीं कलमें कबूल केल्याप्रमाणें अमलांत येतील याजबद्दल हमी म्हणून भाऊंनीं महाराजाजवळ रत्नाकरपंत; राजाज्ञा, नारायणराव पाटणकर यशवंतराव घाटगे, रायाजी जाधव, गुजाजी गायकवाड आणि प्रीतिराव चव्हाण इतक्या असाम्या ओलीस मागितल्या. पण शेवटीं, या लोकांचीं मुलेंच घेण्याचें ठरलें." [ खरे, ४६६३ ]. 'भाऊ माघारे–"नंतर ती ॥ परशुराम भाऊसाहेब कुरुंदवाडाकडून मिरजेस येऊन तासगांवास गेले." खरे, ७३५३ ]. ७

# आनंदराव धुळपाचा पोवाडा

## ऐतिहासिक माहिती

धुळप यांचें मूळ उपनांव मोरे. शिवाजीकरवीं मोरे घराण्याची धुळधाण उडाल्यानंतर धुळपांचे पूर्वज स्वसंरक्षणार्थ विजापूरचे बादशहाचे आश्रयास जाऊन राहिले. तेथें त्यांनीं तरवार गाजविल्यामुळें बादशहानें खूष होऊन धुळप असा बहुमानाचा किताब दिला. विजापूरकर व शिवाजी यांच्या झटापटींत या शिल्लक मंडळीपैकीं बरीच मंडळी कामास आली. शेवटीं छत्रपतीच्या धाकानें अवशिष्ट मंडळी वाट फुटेल तिकडे गेली. कांहीं घवडे बंदरीं कांहीं दुदुशी दुधगांवीं व कांहीं वसईस व बिरवाडीस.

१७५६ मध्यें तुळाजी आंग्रे यांस कैद केल्यानंतर पेशव्यांनीं विजयदुर्ग येथें आपल्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं आरमार तयार करून त्यास म्हणजे त्या ठिकाणास सुभा आरमार अशी संज्ञा दिली. या आरमारावरच्या मुख्य अधिकाऱ्यास सुभेदार निस्बत सुभा असा किताब होता. इ. स. १७६४ पासून १७९४ पर्यंत आनंदराव धुळपाकडे हें काम प्रमुखत्वें करून होतें. आनंदराव धुळप यांची तैनात सालीना १२०० रुपयांपासून वाढत वाढत सुमारें चार हजारपर्यंत चढली होती. जो युद्धामध्यें उत्तम शौर्य दाखवील त्यास पालखीचा सन्मान मिळून त्याबद्दल निराळा सरंजाम मिळत असे. आनंदराव, हरबाजीराव, लक्ष्मणराव या सर्वांना पेशव्यांकडून पालख्या मिळाल्या होत्या.

सन १७८३ मध्यें हैदराबरोबर इंग्रजांचें युद्ध चालू होतें. त्यावेळीं त्या युद्धांतील मुख्य सेनापति ब्रिगेडिअर जनरल मेकलाउड व इतर अधिकारी पुष्कळशा युद्धसामुग्रीसह बेंदनुराकडे रेंजर नामक लढाऊ जहाजांतून चालले होते. मराठ्यांचा व इंग्रजांचा तह झाल्याची गोष्ट धुळपांस माहीत नव्हती. त्यामुळें त्यांनीं तें जहाज थोपविलें, मोठी लढाई झाली व धुळपांनीं इंग्रजांचा मोड करून योद्धे व जहाज पाडाव करून विजयदुर्गास नेलें. खालील अस्सल पत्र म्ह. या युद्धांची हकीकत आनंदराव धुळपांनीं पेशवे

सरकारास कळविल्यानंतर त्यांच्याकडून आलेलें उत्तर होय. मुद्द्याचा तेवढा भाग उतरून घेतला आहे. " आरमारची तयारी करून × × × गोव्यापासुन रत्नागिरीचे सुमारे फिरत असतां छ० ५ जमा दिलावली इंग्रजी लढवई दुघोशी बोट एक व बतेला एक व शिबाड तीन ऐसे पांच दागिने जंगी सरंजाम दारूगोळा व गाडत भरून निकलोट जनराल व आणखी सात कपितान पालखीवाले कर्नाटकांत हैदरखान यांजकडील प्रांत सोडविला त्याच्या बंदोबस्तास मुंबईहून जात होते; त्यांची गांठ रत्नागिरीनजीक पडून प्रातःकालचे प्रहर दिवसापासून त्याची आमची लढाई सुरू होऊन परस्पर तोफाची मारागिरी फार जाली, व बरकंदाजीची मारागिरी केली. संध्याकाळच्या प्रहर दिवसापर्यंत लढाई होत असता आयास नये, त्याचा लढावयाचा जोम भारी मारागिरीनें तरांडे पाडाव होत नाहीं ऐसे जाणून सर्व लोकांचा एक जथ करून धण्याचे पायाचें स्मरण करून तरांड्यास अडावणी केली. ते समयीं रेजगिरी व बरकंदाजीची मारगिरीची सीमाच केली. सरकारचे बरे बरे माणूस आठ ठार जाले. तरांड्यावर पाय न लागे तेव्हां बरकड लोकांस इरे पडोन तरांड्यावर चढले. त्या गर्दीत पाऊणशें माणूस जखमी जाले. हत्यारांस हत्यारें मिळाल्यावर त्याजकडील एक कापितान व पंचवीस आसामी ठार जाले. तरांडे पाडाव केले असतां बतेल्यावरील लोक कौल न घेतां बतेला लढविला. त्याजवर मारागिरी करून आडावणीस धरून पाडाव केला. मातबर लढाई होऊन पांचही दागिने पाडाव करून बंदरांत आलों. खासा जनरलास तीन जखमा आहेत, व वरकडही लोक जखमी आहेत. तीस पस्तीस गोरे वगैरे लोक चारशेंपर्यंत माणूस होईल. त्याचें वर्तमान जबानी मनास आणतां विलायतेहून कर्नाटक प्रांतीचा मुलकी व फौजेचा बंदोबस्त अखत्यारीनें सांगोन रवाना जाला. त्याजबरोबर कोशलदार घेऊन मुंबईहून जात होता. याप्रमाणें सांगतात......सरफराजी करणार धणी आहेत म्हणोन विस्तारें लिहिलें तें विदित जालें." यापुढील भागांत पेशव्यांनीं धुळपांची फारच स्तुति केली आहे. त्यांनीं त्यास बहुमानाचा खासगीचा पोषाख व कंठी पाठविल्याबद्दल उल्लेख आहे. हें सबंध पत्रच वाचनीय आहे. [ भा. इ. सं. मं. अहवाल-शके १८३३ पा. १२०, १२१.]

# आनंदराव धुळपांचा पोवाडा

## ५१

[ शाहीर—भिकुबाळा ]

[ चाल—हा फंदी फांकडा मज सांपडला गुंडा ।
चालूंदे प्रीत शेवटा देवा मार्तंडा' ॥ ]

धोशा धुळपाचा अति आनंदराव रणशूर । मारिला ++++ ॥ ध्रु०॥
फाल्गून मासीं राव निघाले बाहेर । पाल गुलाब त्यांनीं सजवुनियां आरमार ॥ ओढिले नांगर पुढें जायाचा करार । राहिलें वारें केला मुक्काम बाघापूर ॥ दुसऱ्या दिवशीं आलें इंग्रजांचें आरमार । सत्तावीस मनोरे भरोनी वाहे भरपूर ॥ अभिमान भारी इंग्रजांस अहंता फार । रामचंद्रांनीं वधिला दशशीर ॥ १

---

धोशा–नौबत, साहेबनौबत, लक्षणेनें कीर्ति, लौकिक बोलबाला, [ खरे, ऐ. श. व्युत्पत्ति. ] पाल–" मोठ्या लढाऊ जहाजास पाल अथवा गुराब अशी संज्ञा असे. पाल किंवा गुराब यास दोन किवा तीन शिडे असत म्हणून त्यास 'दुघोसी' किंवा 'तिर्कती' असें म्हणत असत." [ म.आ.५१ ] गुलाब–गुराब 'गुराबा हा अरबी शब्द 'घोराबु (डोंबकावळा) यापासून झालेला आहे. गुराबा ही बहुधा दोन डोलकाठ्यांचीं तारवें असत. त्यांत १५० पासून ३०० टन वजन रहात असे. त्यांचें बूड पाण्यांत फार खोल जात नसे व त्यामुळें पश्चिम किनाऱ्यावरील हलक्या वाऱ्यांत तीं फारच वेगानें चालत. त्यांची नाळ पाण्याच्या सपाटीवर फार लांबपर्यंत तिर्कस गेलेली असे. समुद्रांत एकटें तारूं आढळलें म्हणजे या गुराबा दोन तीन मिळून त्यावर हल्ला करीत व नाळीवरुन त्या तारवावर जाऊन तलवार घेऊन लढत असत." [ सावंतवाडी संस्थानचा इतिहास. पान १४३.] आरमार–हा एक जहाजाची प्रकार असतो. [भा इ.सं.त्रै.] ओढिले नांगर-नांगर वर ओढले, नांगर काढून घेतले. करार–निश्चय. राहिले वारे–वारा पडला. मनोरे–इंग्रजी man of war चा अपभ्रंश मनेवर किंवा मनोर. लढाऊ जहाज. अहंता–गर्व. रामचंद्रांनीं वधिला दशशीर–रामानें दशशीर रावणांचा वध करून त्याचा गर्व परिहार केला. त्याप्रमाणें धुळपांनीं इंग्रजांचा पराभव करून त्यांचा गर्व परिहार केला असा भावार्थ. १

बाहिर सावध होया आहेत राहत्यारे राज्याची । लावली नाळ केली हंकारणी पालाची ॥ जलदी केली भर उमेद लढायाची । अडकलें तारूं फिरंगी रयत कोणाची ॥ हिरे हिरे मारून सोई धरिली किनाऱ्याची । दया संपूर्ण धुळपानर रामलिंगाची । पुढें शाहुचा जरीपटका बिनीवर ॥ उडविला चांचा त्यानें ओढुनि केलें दीनमोर ॥ २

विलायत जंजिरा नवकुलपांचें तारूं । शिरीं हात ठेवून पाठविला दक्षण

---

**बाहिर सावध होया आहेत राहत्यारे राज्याची**–बा हिरसावध होया आहेत रे हत्यारे राज्याची. हिरसा–( प्रा. वि. ) नाठाळ; उन्मत्त. लंडे गुंडे हिरसे तट्टू. राज्याची–राजाची. जुन्या भाषेत हे दोन्ही शब्द कांहीं एक फरक न करतां लिहीत. शाहीर म्हणतोः अरे, रामानें ज्याप्रमाणें पूर्वी रावणाचा वध केला त्याप्रमाणें हल्लीं राजाची (पेशव्यांची) हत्यारें नाठाळ लोकांचा वध करावयास हजर आहेत, सज्ज आहेत. मराठे कुळांचा इतिहास भाग ३ पा. ९३ वर याच पोवाड्याचे कांहीं पाहिले चरण छापले आहेतः त्यांत असा पाठ आहेः 'बाहेर सावट शाफ दिसते राज्याचे' सावट–प्रतिबिंब. शाफ–साफ. राज्याचे–राजाचे. भावार्थ. बाहेर जगांत कीर्तीचा ठसा पूर्णपणें उमटला होता. लाविली नाळ–नाळ–जहाजाची अणकुचीदार निमुळती होत जाणारी बाजू, सुकाणूच्या विरुद्ध दिशेची. बोट ज्या दिशेकडे जात असते तिकडे पुढें नाळ असते. अर्थात् येथें अर्थ विशिष्ट दिशा धरिली. हंकारणी–हाकारणी. हिरे हिरे मारून–मू. श. ईर–त्वेष, ईर्षा. इरेइरे–ईर्षेनें. सोई धरिली–वाट धरिली. उडविला–मारला. चांचा–समुद्रावरचा लुटारू. दिंनमोर–( दिग्मूढचा अपभ्रंश तर नव्हे ? ) २ एक तऱ्हेची बोट. २

जंजिरा–रेंजरचा अपभ्रंश ? नव कुळूपांचें तारू–कुलूप हा कशाचा अपभ्रंश तें कळत नाहीं. Sloop स्लूप असा एक लढाऊ जहाजाचा प्रकार होता खरा. Sloop of war formerly a vessel of war rigged either as a ship brig or schooner and mounting from ten to thirty two guns. Now any war vessel larger than a gunboat and carrying guns on one deck only, [ वेब्स्टर ]. दाक्षिण

वारू ॥ घेतली गुजराथ वसई केली जेरू । लढुनि शिंद्याशीं पाडाव केले डेरू ॥ कपींद्र भारी नऊ पालखीचे सरदारू । राव धुळपांनीं त्यांना मारून केलें जेरू ॥ ३

मसलत होती हैदरावर जायाची । बोट ओढती सफ्रशें गारदी त्याची ॥ रामप्रसाद आहे गुरूब चालीची । लक्ष्मण धुळप ऐके न गोष्ट कोणाची ॥ सोडिले मचवे लोक चढती काठीवर । राव ते मोठे बुद्धीवंत सरदार ॥ दांतीं तृण धरुनी उडी टाकिती बाहेर ॥ ४

इंग्रजांला धास्ती नव्हती कधीं काळाची । अवचित गांठ पडली आनंदराव धुळपाची । नदी वाहते वाहते हो अशुद्धाची । तीन साठ शिरें उडविलीं त्यानें + + + ॥ + + + + + । घायाळ मुर्दे घुमति राव फार ॥ ५

---

वारू–दक्षिणेवर–दक्षिण दिशेवर असें म्हणण्याचा तर शाहिराचा हेतु नाहीं? दक्षिणेवरू असाहि मूळ शब्द असूं शकेल. घेतली गुजराथ वसई केली इ०–राघोबाच्या वतीनें इंग्रज भांडत होते तेव्हांचें हें वर्णन आहे. 'इकडे गुजराथेंत गादर्दानें डभई व अमदाबाद हीं शहरें काबीज केलीं, व फत्तेसिंग गायकवाडाशीं तह करून त्यांची मैत्री संपादिली.' "गादर्द कोंकणांत आल्यावर त्यानें वसईस वेढा घातला, व ती घेतली" "क्यामाक यानें एक रात्रीं आकस्मात शिंद्यांच्या फौजेवर छापा घालून तिची वाताहत केली इ०" [ नाना फ. चरित्र ६८, ७०, ७३.] जेरू–जेर. डेरू–डेरे. कपींद्र–इंग्रज. भारी–खासे. पालखीचे सरदारू–पालखी पदस्थ; मोठे अधिकारी. ३

बोट ओढती–बोट चालवतात. राखतात बोटीवर आहेत (?). गारदी–गार्डस्, जहाजावरचे लढाऊ लोक. रामप्रसाद–गुराबाचें नांव (म. आ. पान ५१ ). गुरूब–'गुराब मोठ्या लढाऊ जहाजास 'पाल' अथवा 'गुराब' अशी संज्ञा असे. पाल व गुराब ह्यास दोन किंवा तीन शिडें असत. म्हणून त्याल दुघोसी आणि तिर्कती असें म्हणत" [ म. आ. ५१]. चालीची–प्रसिद्ध (?) काठीवर–डोलकाठीवर टेहळणीकरितां. दांतीं तृण धरुनी उडी टाकिती बाहेर–तन ( फा.)–शरीर. तन देणें, छाती पुढें करून स्वतःवर घेणें. जाती तन धरुनि उडी टाकिती; २ इंग्रज दांतीं तृण धरून दीन झाले व त्यांनीं बाहेर उड्या टाकल्या, असाही अर्थ होईल. ४

रत्नागिरीचे कागद पुण्याला गेले। रावसाहेब वाचुनि खुशाल झाले। सांगे श्रीमंताला धुळपांनीं नांवाचे नक्षे केले। सत्तावीस गोरे धरुनि त्यानें आणीले। अठ्ठावीस गोरे धरुनि त्यानें कापीले। डफ झांज वाजताती चावडीवर। पोवाडा केला पुण्यामध्यें बसूनी ॥ पोवाडा केला भिक्या बाळा यांनीं ॥ ५




---

खुशाल झाले-संतुष्ट झाले. नांवाचे नक्षे केले-ख्याति, कीर्ति, ख्याप ल्यौस्त्य,

# आधारग्रंथांची सूचि

[ टीपांत अर्थ देतांना चौकटी कंसांत ज्या ग्रंथांचीं सबंध नांवें उतरलीं आहेत त्यांचा या यादींत समावेश केलेला नाहीं.]

| सबंध नांव | संक्षेप |
|---|---|
| शिवाजी सोव्हिनीर<br>Shivaji Souvenir | शि. सो. |
| चित्रगुप्ताची बखर | चित्र |
| मराठी दप्तर रुमाल | रु. १ |
| मराठी दप्तर रुमाल २, रा | म. द. रु. |
| केळुसकरकृत शिवचरित्र | केळु |
| सभासद बखर | सभा |
| महाराष्ट्रांतील किल्ले | किल्ले |
| शिवभारत | शि. भा. |
| अफझुलखानाचा वध–भावे | अ. व. भा. |
| ऐतिहासिक पोवाडे–शाळिग्राम | शाळि |
| मराठी शब्दरत्नाकर | आपटे |
| Ballads of the Marhattas by H. A. Acworth | B. M. |
| महिकावतीची बखर | महिका |
| पेशवे डायऱ्या | पे. डा. |
| मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें–राजवाडे | साधनें<br>सा.<br>म. इ. सा. |
| हरिवंशाची बखर | हरि. ब. |
| मोल्सवर्थ | मोल्स. |
| ऐतिहासिक लेखसंग्रह–खरे | खरे |
| ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र–पारसनीसकृत | ब्रह्मेन्द्र |
| फारशी–मराठी कोश–पटवर्धनकृत | पट. |
| ज्ञानेश्वरी | ज्ञाने. |
| भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, षष्ठ संमेलन-वृत्त | भा. षष्ठ सं. वृ. |
| Bombay Gazetteer | B. G. |
| मराठी रियासत–सरदेसाई, विभाग २ | रि. वि. |
| इतिहाससंग्रह–पारसनीस | इ. सं. |
| शुद्ध मराठी कोश | – – . |

| सबंध नांव | संक्षेप |
|---|---|
| श्रीरंगपट्टणची मोहीम–द. वि. आपटे | श्रीरंगपट्टणमोहीम |
| राजव्यवहारकोश | रा. व्य. को. |
| भाऊसाहेबांची बखर | भा. ब. |
| पानपत बखर | पा. ब. |
| मराठी रियासत--मध्यविभाग | म. रि. म. वि. |
| थोरल्या माधवराव पेशव्यांच्या रोजनिशी | थो. मा. पे. यांची रोजनिशी |
| काव्येतिहाससंग्रह–पत्रें, यादी | का. सं. प. या. |
| भारत-इतिहास-संशोधक मंडळ अहवाल | भा. इ.सं.मं.अह. |
| हरिवंशाची बखर | हरि. बख. |
| नागपुरकर भोसले यांची बखर | ना. भो. ब. |
| पेशवे बखर | पे. ब. |
| इतिहाससंग्रह | इ. सं. |
| श्रीरंगपट्टणची मोहीम | श्री. प. मो.<br>श्रीरंग मोहीम |
| ऐतिहासिक व इतर पोवाड्यांचा संग्रह ऊर्फ कोल्हापूरचे पोवाडे | शितूत |
| शिवाजी महाराजांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र आवृत्ति १९२४ | सप्त प्र. चरित्र |
| होळकरांची कैफियत | हो. कै. |
| दक्षिणेंतील सरदारांच्या कैफियती यादी वगैरे | द. स. कै. या. |
| मराठी कुलांचा इतिहास | म. कु. इ. |
| पंतप्रधान यांची दुसरी शकावली | पं. प्र. यां. दु. श. |
| इंदूर संस्थानची बखर | इंदूर सं. ब. |
| कोंकण व कर्नाटक प्रांतांतील राज्यें व संस्थानें यांचा इतिहास | को. क. प्रां. इ.<br>को क.प्रां. रा. सं. इ. |
| विंचूरकर घराण्याचा इतिहास | विं. घ. इ.<br>विंचू. घ. इ. |
| भारतवर्ष–गोविंदपंत बुंदेल्याची कैफियत | भा. व. गो. बुं. कै. |

परिशिष्ट नं. १

# पुरवणी टीपा

**पृष्ठ ११–टीप ओळ ४–मस्तुती** — असाच शब्द चंडीच्या पोवाड्यांत आला आहे. " करूनि मस्तुती ज्यांनीं निशाणी घाव घातला " [ शितूत, पान ३५० ].

**पृष्ठ १५–टीप ओळ ९–काचबंदी पटांगणाचा ढाळ इ०** — दासबोधाला जोडलेल्या शब्दकोशांत रा० देव 'काचबंदी' या शब्दाचा अर्थ काच बसविलेली जमीन असा देतात. सगनभाऊच्या एका लावणींतही हा शब्द आला आहे. उदाहरणार्थ, " गाई सगनभाऊ तेज काचबंद आंगणी-चे " [ सगन भाऊ लावण्या, पान ३८].

**पृष्ठ १७–टीप ओळ १–नवगजी** — हा शब्द एका राजाराम-कालीन मेस्तक-पुस्तकांतही आला आहे. " कनाता रख्त सामीने । जमी-दोज हवादोज शामीने । नौगजी राहाटिया ।". [ भा. इ. सं. मं. अहवाल, शके१८३४ पान ४९].

**पृष्ठ २२–टीप ओळ ६–दृष्टीपर्यस** — हा शब्द मुळांत परिस असा असावा. शिवाजीची दृष्टि परिसासारखी आहे. परीस ज्याला स्पर्श करील त्याचें सोनें करतो, त्याप्रमाणें शिवाजी जिकडे दृष्टि टाकील तो प्रदेश आपलासा करतो.

**पृष्ठ ३६–टीप ओळ ७–झाड होऊन आंबे बांधिले इ०** — " वेढा काय दिला चौभोवत । बाच्छायानी पण भोगिले ।' आंबे लाविले तिथ । आब्याचे आंबे खावून । बाच्छाई गेला आपुल्या मुलखांत । पन्हाळा नाहीं आला हात ॥ " [ भोजराजाचा पोवाडा, शितूतप्रत].

**पृष्ठ ४२–टीप ओळ ४–ठाव** — केळीचें पान किंवा पत्रावळ.

" उठुन ताजीम देती । ठाव पंगतीचा जेवाया ।. पोऱ्या खिसमतगार कोतवाल घोडा बसाया ॥ " [ होनाजी लावणी ].

**पृष्ठ ६८–टीप ओळ १४–टेहळ्या** — पाळत्या उदाहरणार्थ, " भाऊसाहेबाचा एक पाळत्या हुता बुरजावर " [ शितूत, पान २४७ ].

**पृष्ठ ६८–टीप ओळ १४–धाडधाडसा बोलला** — मूळ शब्द 'धाडा' असा आहे. धाडा म्हणजे हल्ला. हा शब्द ज्ञानेश्वरींत सांपडतो. मुळांत " धाडा धाडा " असें टेहळ्या बोलला म्हणजे हल्ला आला, हल्ला आला, असा ओरडा त्यानें केला. 'धाडा धाडा असा' याचेंच गोंधळ्याच्या तोंडांत 'धाडधाडसा' असें झालें.

**पृष्ठ ७३–टीप ओळ २–तकटी निशान** — जरीपटका. उदाहरणार्थ " आसनी आपण बैस तिचे शिरीं छत्र तकटी निशाणें " [ शितूत, पान ३५० ].

**पृष्ठ ७५–त्रिंबकराव दाभाड्याचा पोवाडा**— प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें या पोवाड्याचें अफझुलखानाच्या पोवाड्याशीं फार साम्य आहे हें खरेंच; तथापि दत्ताजी जाधवाचा म्हणून एक दुसरा जुना पोवाडा आहे त्याच्याशीं मात्र या पोवाड्याचें खरेंखुरें साम्य आहे. दत्ताजी जाधवाचा पोवाडा मुख्यतः दिलेरखानानें पुरंदरावर केलेल्या स्वारीसंबंधीचा आहे. अर्थात् दाभाड्याचा पोवाडा पुष्कळच मागचा असल्यामुळें मल्हारदासानें अज्ञान यमाजीचेंव अनुकरण केलेलें स्पष्ट दिसत आहे. ओळीच्या ओळी, वर्णनें, चौक व त्यांची लांबी, वृत्त वगैरे सर्व बाबतींत फारच साम्य आहे.

**पृष्ठ ८०–टीप ओळ १०–जोडा** — जासूद जोडा. " बातमीस जोड जाती त्यास तो येकदर स्वामीची आज्ञा आहे की, तुम्हाजवळ जावे. पत्रें तातडी (क) रिता देता गाठी पडली नसेल व बातमी जोड्यापासी पत्रे नसावी " [ भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ७, अंक १–२–३–४, पान ८७]. जोडा म्हणजे पत्र असा शब्द महिकावतीच्या बखरींत आलेला आहे.

**पृष्ठ ९२–बाजीरावाचा पोवाडा**—या पोवाड्याप्रमाणेंच सर्व मूळाक्षरें एका पाठोपाठ दर चरणाच्या सुरवातीला एकेक याप्रमाणें घालून केलेली एक परशरामाची लावणी आहे. 'कळा अचळ करतार'. त्रिंबक साळ्या-प्रमाणें परशरामाचीही त्यांत थोडीशी ओढाताण झाली आहे.

**पृष्ठ ११७–चौक ८–कुंपिणीचें कोष्टक** — Historical papers relating to Gwalior State Volunie II, पुस्तकांत कंपूच्या कोष्टकावर प्रकाश पडणारीं कांहीं वाक्यें आहेत. पान १८० वरील पत्रांत असें वाक्य आहे. "त्याजवरी हल्लीं अकरा पलटणांचा कंपू तयार करून इस्माइल्यावरी रवाना केला." तसेंच पान ८७ वरील पत्रांत खालील उल्लेख आहे. "तीन हजार गोरा विलायतेहून पातशहानें पाठविले आहेत त्याजला रजमण ( रेजिमेंट ) म्हणतात. जसें १००० प्याद्यांचें पल-टण एक, तैसे १००० गोरे म्हणजे एक रजमण."

**पृष्ठ १२०–टीप ओळ ६ -गोळ्यासरसा......दादू महात** — दादू महात हें काल्पनिक नांव नाहीं. हा एक पेशव्यांचा उत्कृष्ट महात होता. महाताची किंमत लढाईत मोठ्या लढवय्याइतकी समजत असत. सारथ्याला जितका मान असतो तितका या महातांना असे. त्यांना फौजदार हें बहुमानार्थक विशेषण लावीत. अस्सल पत्र पहा.

"१६०८ भाद्रपद शुद्ध ३ सोमवार राजश्री लक्ष्मण आपाजी यासी— सु॥ सबा सबैन. तोतियाच्या काहीं खुणा अर्ध्या अर्ध्या लिहाव्या म्हणोन लि॥. तरी सेवटील स्वारीस तीर्थरूप भाऊसाहेब हिंदुस्तानांत गेले तेव्हां मजपासीं अगोधर काय बोलिले ? तेव्हां हिंदुस्थानांत जाण्याचा निश्चय केला व आमचीं भाषणें कशीं कशीं जाहालीं तें सविस्तर सांगावें. त्या वेळेस विठ्ठल शिवदेव व फडणीस व दादू फौजदार वगैरे कोणते कोणते मागून घेतले कोण दिल्हे ते सविस्तर पुसावें. विसाजी केशवास वसई सुभेदारी तीर्थरूपांनीं सांगितली ते समई तीर्थरूप उभयतांचीं व माझीं

भाषणें कशीं जाहलीं तें सविस्तर सांगावें. दोनच जाबसालांवर कळेल ”
[ साधनें, खं. १२, पान १२० ].

पृष्ठ १२१-टीप-ओळ ३-बेरड घालिती छापे — “ बरकड फौज बाळोबाच्या मुलखांतून ज्यास जिकडे वाट फुटली तिकडून निघाली. वाटेनें गांव मातबर. गांवोगांव राउतांचा भरणा. दोन रोज रात्रंदिवस गनारांचें झुंज पुरवलें. घोडीं थकोन गेलीं. कोणाचें घोडें निभावलें नाहीं. तमाम फौज पाय उतारां झाली.” [ सटवोजी जाधवाचें पानपतच्या पळा-संबंधीं पत्र ].

पृष्ठ १३०-टीप ओळ ७-लोक पुसती एकुणेराला — एक-मेकाला परस्पराला. उदाहरणार्थ, “ एकुणेरीला उणे बोलती एकाहून एक आगळी ” [ परशराम, पान ७२ ].

पृष्ठ १३६-नानासाहेब पेशव्याचा पोवाडाः—“ नानासाहेबीं जो मनुष्य गुणी आढळला, स्वराज्य परराज्यांतील तो संग्रहोन ठेविला.” [ साधनें, खंड १२, पान १८५ ].

पृष्ठ १३८-ओळ ५-उघड्याताटी मुलुख करतो राज्य — असाच वाक्यप्रयोग परशरामानें एका लावणींत केला आहे.

पृष्ठ २१०-टीप ओळ १७-गजराची भिक्षावळ इ० — “ श्रीमंतांची मुंज पुण्यांतच केली. चैत्राच्या अखेरीस श्रीमंतांची स्वारी पुरंदराहून निघाली ती जेजुरी, मोरेश्वर व थेऊर येथें जाऊन देवदर्शन करून पुण्यास गेली. तेथें मोठ्या समारंभानें नेमलेल्या मुहूर्तावर पर्वतीस त्यांचा व्रतबंध झाला. त्या वेळीं शिंदे होळकर उभयतांही त्या समारंभास आले होते. एकादशीस श्रीमंतांची स्वारी शहरांत मोठ्या थाटानें मिरवत येऊन शनवार वाड्यांत राहिली.” [ खरे, ३४०३ ].

पृष्ठ २११-ओळ ११-अलिबक्षावर निशाण ठेवून — “ श्री विनंति उपरी येथील कुशल ता॥ छ १९ रबिलोवल मुका (म) राजेवाडी यथा-

स्थीत असे विशेष. अलिबक्ष हती पुढें लोणीस आणवीला आहे. तो आला असला तर बरे. नाहीं तर कवडी अगर हडपसर येथें पाठवणे. हुजऱ्या (हुजऱ्या) पाठविला आहे हा लोणीस पाहील. आला असला तरी लवकरच हडपसरास हती ( हत्ती ) घेऊन जाईल व चिठी देईल. नसला आला तर हडपसरास आणावा. आज निघोन सायंकाळीं गारपिरावर येतो. पाच घटिका येकेचालीस पलाचा मुहूर्त आहे घरी जाण्याचा हे विनंति." [ अप्रसिद्ध पत्र ].

पृष्ठ २११–टीप ओळ ६–सहेली — "दुश्चित झाली व्याकुळ सुंदरा । धावा सैल्यानो माशी पंखा वारा" [ परशराम ].

पृष्ठ २१९ ते २२३–प्रभाकराचा खर्ड्यांचा पोवाडा — या पोवाड्यांतील चार, पांच चौकांत जीं सरदारांचीं नांवें आलीं आहेत, जवळ जवळ तीं सर्व बरोबर आहेत हें सवाईमाधवराव पेशव्याच्या डायऱ्या, व्हाल्युम ३, पान ३१० ते ३४७ मध्यें आलेल्या नांवनिशीवरून दिसतें. ती नांवनिशी सन १७९४ मध्यें दसऱ्याचे दिवशीं पेशव्यांनीं पोषाख दिलेल्या सरदार-शिलेदारांची आहे. १७९५ मध्यें खर्ड्यांची लढाई झाली. अर्थात् त्या यादींत असलेला एकूणएक सरदार खर्ड्यास हजर होता.

पृष्ठ २२१–ओळ १–सानपदोगें — सानप आणि दोगें हीं निरनिराळीं आडनांवें आहेत. यांचेसंबंधीं उल्लेख सवाईमाधवराव पेशव्याच्या डायऱ्या, व्हाल्यूम ३, पान ३३९ वर मिळतो. सानप—त्रिंबकराव सानप.

पृष्ठ २२१–ओळ ३–भगवंतसिंग बैसे — बैस किंवा बैसे हें आडनांव आहे. [ सवाईमाधवराव पेशव्याच्या डायऱ्या, ३, पान ३३० ].

पृष्ठ २२३–टीप ओळ ८–सपुत — हा शब्द, सगनभाऊच्या लावणींत एके ठिकाणीं आला आहे. "सगनभाऊ म्हणे सपुत कपुत कोण आहे रे-झुंजणारा" [ सगन०, लावण्या, पान ५९ ].

पृष्ठ २२४–टीप ओळ १०–पाळी — समुदाय किंवा समूह.

उदाहरणार्थ, "गळा तुळशीच्या माळा। सर्व पाळा गोपाळांच्या किती नाचती॥" [रामजोशी लावणी, २१]. "नाना जाती श्वापदपाळ्या हिंडती वनीं निस्संग निराळया" [होनाजी लावणी, ७८].

**पृष्ठ २३७—टीप ओळ १—चिरा उतरणें** — "आल्या त्या लिंबोण्या पाडा जशा। चिरा उखळा माझा राव नशा। घेऊन पलंगावर बसा" [परशराम].

**पृष्ठ २४१—खड्यांच्या लढाईचा तिसरा पोवाडा, चौक २ व ३** — "अवघड सातपुड्याचा घाट। रस्ता न मिळे जाया वाट। जाळ्या वेळवाच्या दाट। करकरा लवती। उंच गेले ताडमाड। आंबे आवळे खिरण्या पाड सागवान नारळीचे बाड।.........रामफळे सिताफळे आला बार। रातंजन चंदन देवदार केतकी कर्दळी अकबार। बहु टवटवती......सिंह शार्दूलाचे थवे चित्ते सांबर गेंडे भवे......रोहा गिध आणि सिंध अपार। उन्हाळा गव्याची एकधार वानरे करिती भुभुःकार। वृक्षावरती" [परशराम, पान ७].

**पृष्ठ २४१—चौक २ रा. सुरंग** — "कोले बाउल सुरुंग गवे। येडके मयूर पारवे।" [राजारामकालीन मेस्तक पुस्तक, भा. इ. सं. मं. अहवाल, शके १८३४, पान ४९].

**पृष्ठ २४४—टीप ओळ ७—तिवस** — "महिना थंड काळ पौष। राहिली हाडे गळाले मास। जसा वृक्ष वाळला तिऊस इ०" [परशराम].

**पृष्ठ २४४ ओळ ९—मोगलाचा दलबादल जर्दा हौदा** — निजामाच्या दरबारी हत्तीवर जर्दा म्हणजे पिवळा हौदा त्याच्या कुटुंबांतील मंडळीखेरीज कोणी घालावयाचा नाहीं असा कडक निर्बंध असे. [मराठे इंग्रज—उत्तरार्ध, पान ५५]. वरील दाखल्यावरून शाहीरानें "मोगलाचा दलबादल जर्दा हौदा" असें वर्णन केलें आहे त्यांतील स्वारस्य उघड होईल.

**पृष्ठ २५०—टीप ओळ ११—न जन्मले माते उदरीं** — असाच वाक्प्रचार परशरामानें आपल्या इंग्रजांच्या पोवाड्यांत योजला आहे.

उदाहरणार्थ, " महाल मुलुख पहाडी किल्ले ना लढता बसले अर्पून। तेज हीन अवघ्यांचे झाले ना आले जननी उदरा ".

**पृष्ठ २७७ -टीप ओळ १०—नेमिवंत** — आम्ही पूर्वी दिलेली टीप चूक आहे. नेमिवंत हा किताब आहे. " निजामाच्या दरबारांत हिंदु लोकांना देण्याच्या पदव्यांपैकीं 'वंत' या उपपदाची एक मोठी पदवी आहे." राजे नेमिवंत हे निजामाचे सरदार होते. यांचें ऋग्वेदी ब्राह्मण घराणें. हे मूळ भिक्षुक व मलकापूर तालुक्यांतील धरणगांवचे जोशी. "साडेतीन शहाण्यांपैकीं प्रसिद्ध विठ्ठल सुंदर निजामाचा दिवाण यास राजे प्रतापवंत ही पदवी होती. त्याचप्रमाणें या घराण्याच्या मूळ पुरुषासहि 'राजे' व 'नेमिवंत' या दोन पदव्या मिळाल्या." [ वऱ्हाडचा इतिहास, पान ४१२ ].

**पृष्ठ ३०४—टीप ओळ ७—चुरसाचुरसी** — उदाहरणार्थ, " तुझ्या आधीं जाईन पंढरीला चुरसाचुरसी " [ सगनभाऊ, पान ७७ ].

**पृष्ठ ३१८—टीप ओळ १- जिवनीं लवणापरि** — ही होनाजीची आवडती उपमा आहे. " जणुं धर्मन्यायें लवण मिळविलें जिवनीं " [ लावणी नं. १० ].

**पृष्ठ ३८५—३८८ खडकीची लढाई,** चौक ७ आणि खडकीची व अष्टीची लढाई—चौक ३.

" श्री

यादी बापूची सनगे तिसरे मजल्यावर लिपून ठेविली पेटींत. मि॥ कार्तिक व॥ २ शके १७३९." यापुढें कोणकोणत्या कापडाच्या वस्ता लपवून ठेविल्या त्याची याद आहे.

" श्रीगजानन प्रसन्न

यादी खासगत राजश्री बहिरो विठल सहस्रबुद्धे मु॥ पुणे पेट मेहूनपुरेतून भांडी आणून ठेविली खासगत वाडयांत शेनवारचे परसात जावलीजवळ ( जांभळीजवळ ) बलद ( बलद ) लाकडाचे साठवाचे आहे तेथे

ठवलीत वि॥ दाजी शके १७३९ ईश्वरनाम सवछरे माहे कार्तिक शु० ११"
यापुढें मालाचा तपशील दिला आहे.

"श्रीगजानन

यादी स॥ राजश्री बहिरो विठल सहश्रबुधे मुकाम कसबे पुणें पेठ शेनवार नवे वाडयांत शके १७३९ ईश्वरनाम सवछरे माहे कार्तिक शु० १० बी॥ दाजी व भिकाजीपंत भोजाले भांडी वगैरे बच्छाईत ठेवली माझ-घरचे बलदांत."

"श्री

खा॥ बहिरो विठल सहश्रबुधे याणी मेहूनघुरेतून राहाते घरातून भांडी वगैरे आणलीत ती ठेवली तिसरे मजलेवर बलदात जिना आहे तेथे यादी भांडी ठेविस शके १७३९ माहे कार्तिक शु० १०" यापुढें मालाचा तपशील दिला आहे. [सर्व पत्रें अप्रसिद्ध.]

पृष्ठ ३९२-टीप ओळ १०-बंद, — जमाव. "त्यास किला शामलानें घेतला ते समई सेलकिया बाबत गावांचा बंद धरिला ते समई आपण शामलास हस्तगत जालों" [भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष ८, अं. १-२ पा. २४].

पृष्ठ ३९६-टीप ओळ ५-पळण — पळापळ "४८॥ भाडे. रुमाल पळणसमयीं वाईस पा॥ त्यास" [भा. इ. सं. मं. त्रै., अंक १।२ पान ६३].

पृष्ठ ४०१-टीप ओळ २-गारपगार — "काये बोलू सुख वाटे ना इटका गारपगारा। खरा प्रश्न घ्या ऐकून जैशा जमिनीवर वर्षति गारा" [सगनभाऊ, पान ५१] "हरि ऐसा गारपगारी मर्दुनया काल खगारी" [प्रभाकर पा. १६.]

पृष्ठ ४१६-ओळ ५-मेवाडचे राजे न धरतों धीर — मराठ्यां-नीं माळवा घेतल्यावर त्यांचे पुढारी व सेनापति बाजीराव पेशवे हे जेव्हां

चौथाई वसूल करण्याचे निमित्तानें मेवाडास गेले तेव्हां त्यांचेविषयीं उदेपुरांत मोठा गवगवा झाला. उदेपुरचा राणा जगत्सिंग यानें त्या वेळीं आपला दिवाण बिहारीदास पंचोळी यास लिहिलेलीं अस्सल पत्रें टॉडच्या इतिहासांत आहेत. त्यांपैकीं एक असें आहे. " मी ,त्यावर विश्वास ठेवीत नाहीं. म्हणून त्याबद्दलचें प्रत्यक्ष म्हणणे आणि त्यांच्या मागण्या काय आहेत त्याही कळविण्यासाठीं कोणीतरी मनुष्यें मजकडे पाठवा. बाजीराव आला आहे; व तो मजजवळून खंडणी घेऊन त्याबद्दल आपली कीर्ति पसरून जाणार. खंडणीशिवाय तो जमीन मागतोच आहे. त्याणें माझ्या देशांत पाय शिरविला असून, तो हळू हळू मजजवळून इतर राजांपेक्षां वीसपट पैसा–इतरांनीं खंडणी देण्याचें कबूल केल्यास त्या मानानें–जास्त घेईल, ईश्वराला जर माझी विनंति ऐकणे असेल तर बाजीराव माझ्या भूमीचा अपहार करणार नाहीं. देवीचंदाकडून विशेष समजेलच, गुरुवार संवत् १७९२." पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दींतच मेवाडच्या राण्याला खंडणी देण्याचा प्रसंग मेवाडच्या एकंदर इतिहासांत हा पहिल्यानें आला. [ राजस्थानचा इतिहास उदेपूर ].

पृष्ठ ४३९–ओळ ५, जाट रोहिले पठाण कापति राजा उदापुरचा राणा पहिल्या बाजीरावापासून पुढे पेशवे, शिंदे, होळकर वगैरेंनीं या रजपूत मंडळाशीं टकरा घेऊन त्यांचेकडून अतोनात पैका काढण्याचा क्रम अखेरपर्यंत चालविला होता. या कडव्या रजपूत राजमंडळाला मराठ्यांनीं कसें गाय बनवून टाकलें होतें याचें सुरस व तपशीलवार वर्णन पाहिजे असल्यास वाचकांनीं राजस्थानच्या इतिहासांतील भाग १३, १४ व १५ हे वाचून पाहावे. येथें उदापूरच्या म्हणजे उदेपूरच्या म्हणजे मेवाडच्या राण्याचा उल्लेख करण्यांत शाहिराला सामान्यतः सर्व रजपूत राजमंडळाचाच उल्लेख करावयाचा आहे. उदेपूर हे रजपूत राजमंडळांतील अत्यंत प्रमुख संस्थान मानलें जात असे.

# शब्द–सूचि

परिशिष्ट नं. ३

# हत्यारांची यादी



१ पेषकबाज—अंगरख्यावर कमरेभोवती गुंडाळलेला रुमाल अगर पट्टयांत अडकवण्याचे हत्यार. पात्याची लांबी १ फूट.

२ कट्यार—बाळगण्याची तऱ्हा वरीलप्रमाणेच.
पात्याची लांबी १० ते १४ इंच. मूठीच्या दोन कांबीभोवतीं मूठ दाबून धरण्याची.

३ जंबिया—बाळगण्याची तऱ्हा वरीलप्रमाणेच.
या हत्यारात पात्याचे आकार हरतऱ्हेचे असतात. लांबी ८ ते १० इंच. हीं तिन्ही हत्यारे हातात घट्ट धरून मनुष्य जवळ आल्यावरच वापरणेची. फेकून मारता येत नाहीत.

४ माडू—मध्ये साधी मूठ व दोन्ही बाजून ९।९ इंची पाती. बाळगण्याची तऱ्हा वरीलप्रमाणे. अंगावर गर्दी आल्यावेळी चारी दिशास उपयोग करण्याचा. पट्टा अगर तरवार जवळ असल्यास याचा उपयोग कमी. पट्टा वापरणाऱ्याजवळ जंबिया असेल.

५ पट्टा—सर्वांनी पाहिलेला असतो. पाते ३½ फूट. कोठेही रुंदी १॥ इंचाहून जास्त नसते. पाते वळते ते तुटणार नाहीं उपयोगी गर्दीत.

६ सैफ—हा पारशी शब्द कोणच्याही तऱ्हेच्या तरवारीस सामान्य आहे. सडक, गजवेल नागमोड वगैरे विशेष.

७ कडाबिन—बंदुकीचे जातीचे हे लहान हत्यार आहे. लांबी १ फूट ७ इंच. प्रथम दारू ठासून वर खडे, तांब्याचे तुकडे इत्यादि कठीण पदार्थ भरणेचे. घोडयावर चकमक असते, व कान्यावर असलेली दारू घोडा ओढताच पेट घेते. पल्ला ६० फूट. बंदुकीप्रमाणे सरळ नेम धरून मारण्याचे हे हत्यार नव्हे. दोन्ही हातात धरून गरदिशी वाटोळे फिरल्याने अधिक लोकांस मार देता येतो.

८ कमठा—तीर व कमठा यांसच बाण व धनुष्य म्हणतात. आमच्या कडील कमठा पोलादि आहे. त्यावरून तीर फार पल्ला घेत नाहीं.

९ **खांडा**—यासच तेगा म्हणतात. कमरेस लटकविणे. जबरदस्त हत्यार. पात्याची लांबी २ फूट २॥ इंच. मोठी रुंदी ३ इंच; धार पुढील बाजूस व टोंकास दोन्हीकडे. उपयोग तरवारीप्रमाणेच.

१० **बल्लम**—यालाच सांग म्हणतात. हत्यार सबंध पोलादी. दांडा व फळा-सह सलग लांबी ७।-७॥ फूट. भाल्याचे फळ पोलादी व दांडा लांकडी असतो. फळाची लांबी लहान असते. उपयोग एकच पण बल्लमची ताकद अधिक, फळ लांब २॥ फूट, व भक्कम, चार धारी.

११ **बरछा, छी**—यालाच अंकुश म्हणतात. हत्तीला टोचून कामे घेण्याकरिता.

१२ **गुरु-गुज**—हे हत्यार गुर्ज म्हणतात तेच असल्यास—ही एक तऱ्हेची गदा आहे.

१३ **सांग**—नं. १० 'वल्लम' पहा.

१४ **पंच हत्यार**—पेषक-बज, जंबिया, कटार, कडाबिन इत्यादि हत्यारांपैकी अंगावर असलेलीं.

१५ **सोटा**—पोलादी मोठी काठी. आठ बाजूस धारा व काटे असतात. लांबी २-२। फूट.

[ माहिती देणार—रामतीर्थ येथील म्यूझियममधील शिकलगार–लाडा वल्लद हुसेनसाहेब शिकलगार वय ६० धंदेवाईक तीन पिढ्याचा. ]

---

परिशिष्ट नं. ४

# स्वरलेखन

## सवाई माधवराव–रंगाचा पोवाडा.

### १९ वा.

### ( शाहीर–प्रभाकर. )

ध. सा ० सा ० सा स रि रिग ० ग ग ० ग मगारि
ज सा ऽ रं ऽ ग श्री ऽ रं ऽ ग खे ऽ ळ ले ऽ
री ० री ० रि रि रि स स रि रि ग मगगरिसस०
हं ऽ दा ऽ व नि द्रा ऽ पा ऽ रा ऽ त ऽ ऽ ऽ
रि ग ० ग ० ग ग रि नि. ० रि ग ० रि सारिनिस
त मा ऽ रं ऽ ग श्री ऽ मं ऽ त खे ऽ ळ ले ऽ
स रि रि ग ० ग ग रि नि. ० रिरिग ० ० ० ०
क लि यु गा ऽ त अ ति आ ऽ द रा ऽ ऽ ऽ ऽ ऽ
मगगरिसस ० ० ० ०
त ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या धृवपदाप्रमाणें कडव्याचे चरण चालीपर्यंत म्हणावे.

चाल.

ससनि ० स स नि. नि. सा ० ध ० ध. ० ध ध. नि. ०
महावी ऽ र म हा द जी ऽ वा ऽ वा ऽ हु ज रा ऽ
सा ० री ० ० ० ० ०
ति ऽ चे ऽ ऽ ऽ ऽ ऽ

चालीचे पुढचे दोन्ही चरण याचप्रमाणें म्हणून:—

पुन: चाल मिळवणी:–धृपदाच्या चालीप्रमाणे.

# खड्यांच्या. लढाईचा तिसरा पोवाडा.

२३ वा.

( शाहीर-कुशाबा. ).

नि.० ससस ० रिॅरिॅ रिॅग गग गग ० ग
झां ऽ गड झां ऽ गड नौ ऽ बद् झडे ऽ श्री
ग ० गरिॅरिॅरिॅस ० नि ०रिॅ ०रिॅग०ग ०
मं ऽ तीऽ भ ग वे ऽ झें ऽ डे ऽ उ डेऽकाऽ
रिॅरिॅ ० रिॅ ० रिॅरिॅ ० स स ० ० नि़० स स
न डे ० लो ऽ क फा ऽ क डे ऽ ऽ रां ग डे ऽ
नि़रिॅ० रिॅग ० ० ० ० रिॅसानि.स रिॅरि
मु ल्ल ऽ क ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ दि ले
नि.नि.स० स सरिॅरिॅ नि. नि. सा० ससरीॅ०
अ ट के ऽ व रि ज रि प ट काऽकारि तो ऽ
स स रिॅ० रिॅगॅ ० ० रिॅसानि.स००सा० ००
ल खल ऽ खऽ ऽ ऽ जी ऽ ऽऽजीऽऽ ऽ

या चरणाप्रमाणें पुढील चरण चालीपर्यंत म्हणावे.

१ ल्या चालींत २ च चरण---

नि.० स ० ध.० निनि स री ० ० ० ० ० ०
अं ऽ ग्रे ऽ इं ऽ दु र क र ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
गरिसस ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ०
ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
नि.स ० स ध़ ० नि.० स ० री ० ० ० ० ०
पु रं ऽ द रा, ऽच्याऽ म्हो ऽ र ऽ ऽ ऽ ऽ ऽ

२ री चाल—

सा रे नि. ० स ० ध. ० नि. ० स रि स ०
अ शि श्री ऽ मं ऽ ता ऽ ची ऽ ख ट लीं ऽ
वि र सा रे न ट ले ऽ
ल ढु ल ढु ग ट ले
कु णि ना हि ह. ट ले
स स स नि नि रि ० ० ० रि ० ० ०
उ ठ ले स र दा ऽ ऽ ऽ र ऽ ऽ ऽ
० रि नि. नि. ० स स स ० नि. नि. सारिग ० ० ० ०
ऽ सं गे घे ऽ उ नि या ऽ द ळ भा ऽ ऽ ऽ ऽ
मगारि सानि. स
र ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या पुढचे चरणः—

रि नि. ० स स नि. ० ध. ध. नि. स ० ० ० ० ०
नि पा ण् क र पा ऽ ट ण क र ऽ ऽ ऽ ऽ ऽ
रा ऽ जे ऽ निं ऽ बा ळ क र ऽ ऽ ऽ ऽ ऽ
आ ले धा ऽ ऽ र चे ऽ पो ऽ वा र ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या पुढचे चरण.—

नि. नि. ० स रि रि ग ० ग ग ० मग रि ० ० ०
अ धा ऽ डि स म हा ऽ द जी ऽ शिं ऽ दा ऽ ऽ ऽ
ग ग म ग रि ० रि ० ग ० ग ग रि ० रि ०
जि व वा ऽ दा ऽ दा ऽ मो ऽ ठा ऽ खं ऽ दा ऽ
द ट वि ला हौ ऽ दा ऽ फ ळ ट णें सु ऽ द्धा ऽ

या पुढचा चरण—

नि. नि. स स  स नि. स रि॑  रि॑ ग ०,० म ० म ग
स वा इ शि  कं ऽ द् ऽ  र ऽ ऽ ऽ  के ऽ ळे ०
रि॑ ० सानि. ०  नि.० स रि॑ रि॑ ग० ० ०  ० ० सारि॑ नि.
कं ऽ पू ऽ  तै ऽ या ऽ  र ऽ ऽ ऽ  ऽ ऽ ऽ ऽ

या पुढें चाल—

नि.० नि.० स स  नि.० स ०  सा ० स स  ध.० नि. ०
से ऽ ना ऽ मधि  से ऽ ऽ ऽ  ना ऽ प ति  दा ऽ भा ऽ
स रि ० ० ० ० ० ०
डा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

याच प्र० पुढचा चरण—

घा ऽ ळि तो ऽ ऽ  पा ऽ यी ऽ  सो ऽ न्या ऽ  चा ऽ तो ऽ
डा ऽ ऽ ऽ  ऽ ऽ ऽ ऽ
आऽ घा ऽ  डि स मा ऽ  ना ऽ जी ऽ  फा ऽ क ऽ
डा ऽ ऽ ऽ  ऽ ऽ ऽ ऽ

त्या पुढचा चरण—

नि.० स स  स ० ० स  नि.० ० ० सरि॑ गमगमगरि॑
अ ऽ क्क ल  को ऽ ऽ ट  वा ऽ ऽ ऽ  ला ऽ ऽ ऽ
सारि॑ ० ० ० ० ० ० ०
ऽ ऽ ऽ ऽ

स रि॑ रि॑ ग ० ग ० ग,ग ० रि॑ ०,० रि॑ रि॑ ० रि॑ स
आ ले ळ ढा ऽ या  ऽ सिं पो. ऽ  ळा ऽ ऽ द्  ना ऽ शि र

नि. ० ० ० सरिगं ० ० ० ० ० ० ग रि॑ नि. स

दो ऽ ऽ ऽ ळा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

पुढचा चरण—

सरि॑ रि॑ ० ग ग ग ० ग ० ग ० रि॑ रि॑ नि. ० ० ०

श्रीऽ मं ऽ त स वा ऽ इ ऽ मा ऽ ध व रा ऽ ऽ ऽ

रि॑ ग ० ० ० ० ० ०

व ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

याच प्रमाणे खालचे चरण—

पे ऽ श वे ऽ दि ले ऽ अ ट के ऽ व र ना ऽ ऽ ऽ

व ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

हजारो प द रा ऽ म ऽ धे ऽ उ ऽ म ऽ रा ऽ ऽ ऽ

व ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या पुढें—

० स स स सारि॑ ग ० ० ० ० ० ०

ऽ न शि ब वा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

मगगारि॑ सारि॑ ० ० ० ० ०

ळा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

रि॑ रि॑ नि. ० नि. नि. नि. नि. नि. नि. रि॑ रि॑ ग ० ग म प ०

दिल्या गा ऽ र पि रा ऽ ब र मो ग ळा ऽ व र दा ऽ

पधॅपमगमगारि॑ नि. स ० ०

ळा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

---

# खडकी व अष्टीची लढाई

## पोवाडा ३९.

### ( होनाजी बाळा. )

स स नि.स ० स स नि.स रिं रिं ग ० ग ० ग म ग
श के ऽ स आ ऽ शे ऽ ए कुण्चा ऽ ळि सा ऽ
रिं रिं रिं ग रिं स रिं ० ० ० ० ० ० ० ० ०
म धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या चरणा प्रमाणें पुढचे दोन्ही चरण—

आ ळि प्र थ म ल ढा ऽ ई ऽ दि प वा ऽ ळी ऽ चे ऽ
अ धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
मी ऽ सां ऽ ग त हो ते घ रिं स्व ऽस्थ र हा वे चा ऽ
र दी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या पुढचा चरण—

नि.नि.०नि. ०नि.स रिं ग ग प म ग ० म ग
ई ऽ श्व रे ऽ ना ऽ म हा ऽ ब र वा ऽ सं ऽ व ऽ
ग रिं नि.स स ० नि.० रि ग ० ० ० ० ० ०
त्स ऽ ऽ र हो ऽ ता ऽ त धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या चरणा प्रमाणे पुढचे चरण—

वे ळ क ठी ऽ ण मो ऽ ठी ऽ ते ऽ व्हां ऽ ची ऽ कै ऽ
का ऽच्या ऽ ह र ल्या ऽ सु धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
ऐ ऽ कि ले ऽ ना ऽ ह्रि ग डे मा ऽ झे चा ऽ क रि स
गे ऽ ले ऽ हो ऽ गुण निधी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

चाल—

नि.० सा ० ० स स स स स नि.० सा ० नि.० सा ०
टा ऽ कू ऽ ऽ न प ति म ज ला ऽ गे ऽ ले ऽ ते ऽ
नि.नि.स स ध.०नि.नि. स री ० ० ० ० ० ०
प रं तु न ये ऽ ति ल क धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

याचप्रमाणें पुढचे चरण—

आ ज व ऽ ऽ र सो ऽ डु न स ख या ऽ ला ऽ हो ऽ
रा हिले च न व्हते ऽ जु दी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
आ ठ व ऽ ण त या ऽ चीऽ हो ऽ ती ऽ म ज ला ऽ
क्ष णो ऽ क्ष णी ऽ प दो प दी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
फ ल ट ण चा ऽ मा ऽ ऽ र मो ऽ ठा ला ऽ ग ले ऽ
प र क्या ऽ ऽ ऽ चे ऽ बु धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
बं दु कीं ऽ तो ऽ फे ऽ चे ऽ गो ऽ ळे ऽ हो ऽ ये ऽ
ता ऽ त ल ऽ ष्क रा ऽ म धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
र ऽ क्ताऽ चे ऽ पू ऽ ऽ र वा ऽ ह ता ऽ त जाशि
भ रु न चा ऽ ळ लीऽ न दी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
हा ऽ प ऽ ण ल ढा ऽ ई ऽ चा ऽ भा ऽ री ऽ श्री ऽ
ह री ऽ ने ऽ इ ळ ऽ सिद्धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
या ऽ उ प रां ऽ त क ल ऽ ल्ला ऽ टी ऽ न क ळे ऽ
काऽ य लि ही ऽ ले ऽ सिद्धी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

पुनः चाल—

ध.० ध.सा० स स री ० ० रि ग ० ग ० ग म ग
व ऽ ते ले ऽ न ज गी ऽ ऽ व डे ऽ ला ऽ स ता ऽ

रिगरी ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ० ०
न खी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

ग ० रिग ० री ० स स स स ० ध., स ० रि ग रि
ई ऽ श्वरी ऽ सू ऽ त्र घ र ज्याऽचे त्या ऽ ला पा ऽ

ग ग ० ० ० ० ० ० ० ० ० ० रि स नि. स
र खी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

पुनः मूळ चाल—

स स नि.०नि.नि. स सा ० रिँ ग ० ग ० ग ग म ग
प ति नाऽ हि त घ री ऽ ग बा ऽ ई ऽ ति ळ घा ऽ

रीँ० रीँ ० स नि.नि.० स स रिँगारिँस रिँ ० ० ०
लू ऽ को ऽ णा ऽ चे ऽ मु खी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

सा रिँ गमप प ० प ० धँ प मँग ० ० ग रिँ रिँ नि.०
आ ळा संऽ क्रां ऽ ती ऽ चा ऽ स ऽ ऽ ण जि व हा ऽ

रिँग ० ० ० ० ० ० स रिँ ग ग रिँ स नि. स
दु खी ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

---

## दुसऱ्या बाजीरावाचा पोवाडा.

### ४४ वा.

### (सगनभाऊ.)

ध.सा ० स स स स रि सारिम ० म मं म म ०
ग ग ऽ न क ड क ऽ डू ऽ ऽ न प ड ले ऽ

म ० म म ० म म, म म म ० म म ० म ०
पा ऽ र ना ऽ हिं दु ऽ खा ला ऽ अ रे ऽ दु ऽ

| | | | | |
|---|---|---|---|---|
| रि म रिमप | ० ० ० ० | पममगॅगॅरिसारि | ० ० सारिगॅ |
| खा ऽ ळा ऽ | ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ श्री ऽ |
| गॅ ० ० गॅ | गॅ गॅ रि स | स स ० स | स ० ध ० |
| शै ऽ ऽल्य | म ल का ऽ | जु ना ऽ आ | म्हीऽ अं ऽ |
| ध. स स रि | री ० सारि | सारिगॅ ० ० | गॅरिरिसानि.स |
| त र लो ऽ | सु ऽ खाऽ | ला ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ |

या प्रमाणें पुढील सर्व कडवीं म्हणावयाचीं.

---

## पेशवाईचें संक्षिप्त वृत्त.

### ४६ वा.

### ( शाहीर-प्रभाकर. )

| | | | |
|---|---|---|---|
| ध.ध.सा ० | स स सा रि | रि री ० सा | ० स स स |
| ज ग दी ऽ | श्व र को ऽ | प ला ऽ गो | ऽ ष्ट झाली |
| ध.सा ० स | स स स रि | सारिगम ० ० | ० ० ० ० |
| ख री ऽ च | नि रु पा ऽ | ई ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ |
| ० ० ० ० | ० ० ० ० | गॅमगॅरिसारि ० | ० ० ० ० |
| रि रि रि रि | रि स स स | स ० रि रि | रिस सा ० |
| म्ह णु नि ए | काऽ ए कि | स ऽ र्व बु | डा ऽ ली ऽ |
| ध. ० स सं | सु रिगॅरि | गॅरिगॅरिगॅरिसस | ० ० ० ० |
| ब्रा ऽ म्ह ण | पा ऽ छा ऽ | ई ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ |

या धृपदाप्रमाणें-पुढील चरण म्हणूनं कडवें पुरें होतें.

---

# महादजी शिंद्याचा पोवाडा.

४८ वा.

( शाहीर–अज्ञात. ).

ध. ध. ध. सा० ० स स स रि रि॰ग ० ग ० ग ग रि
भ ले भ ले ऽ ऽ स र दा र ज़ मू ऽन्सा ऽ रे पू ऽ
री ० स स स रि ग ऽ ग ० ० ग ०गारि रि रि
ण्या ऽ व र बा र भा ऽ ई ऽ ऽ च ऽ ल पा हु
रि री ० स स रि ग ० ग ० ०गारि ० रि रिस०
त क ऽ त बा ऽ छा ऽ ई ऽ ऽ दि ऽ ल्लि चीं ऽ
सरिग ० ० ग ० ० ० गारिस० ० रिगरिगारिग०
छा ऽ ऽ ऽ ई ऽ ऽ ऽ जी ऽ ऽ ऽ जी ऽ ऽ ऽ

इतकें धृपद झालें.

सा ० सा ० सा ० स रि रि ग ० ग ग ० ग रि
शा ऽ हू ऽ रा ऽ जा ऽ त क ऽत्सा ता ऽ रा ऽ
री ० रि रि री ०रिगारिरि ० ० ० ० ० ० रि रि
मो ऽ चें ल वा ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ गा दि
रि स ० स स ० स रि रि ग ० ० ग ० ० ०
थो ऽ ऽ र रा ऽ ज्य ऽ क ऽ ऽ ऽ री ऽ ऽ ऽ
० ० ० ० ० ० री ० री ० स स ,० स स ०
ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ श्री ऽ मं ऽ त्र पे ऽ श वे ऽ
नि.०नि.नि.' ० नि.स रि सरिगमप० ० ग ० ० ०
वा ऽ गे त्या , ऽहैया द र बा ऽ ऽ ऽ री ऽ ऽ ऽ

. ० ० ० ० गारिसानि.०० सरिग०.० ० रिसनिस० ०
ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ जी ऽ ऽ ऽ जी ऽ ऽ ऽ

याचप्रमाणें पुढील चरण म्हणून कडवें पुरें होतें.

---

## नाना फडणिसाचा पोवाडा.

### ४९ वा.

### ( शाहीर–बाळा बहिरु )

| | | | |
|---|---|---|---|
| नि. स ० स | ० स स स | सरिगॅ० गॅ गॅ | ० गॅ गॅ ० |
| र ती ऽ वं | ऽ त म हा | रा ऽ ज पे | ऽ श वे ऽ |
| गॅ ० गॅ गॅ | गॅ म गॅ रि | सस नि.सरिगॅ | री ० ० ० |
| मा ऽ ध व | वि ऽ ष्णू ऽ | अ व तां ऽ | र ऽ ऽ ऽ |
| रि प ० प | ० प म म | गॅ ० गॅ रि | स ० नि.नि. |
| हिं दु ऽस्था | ऽ न क र | ना ऽ ट क | ते ऽ लं ऽ |
| नि.नि.नि. ० | स स म ० | गॅ रि गॅ रि | नि.स० ० ० |
| ग ण का ऽ | विज के ऽ | ले ऽ सा ऽ | रे ऽ ऽ ऽ |

सर्व कडवीं याच चालीची.

---

## पानपतचा दुसरा पोवाडा.

### १० वा.

### ( शाहीर–रामा सटवा. )

| | | | |
|---|---|---|---|
| नि.० नि.निं. | ० नि. नि. ० | सा ० स स | सा ० स स |
| भा ऽ उ सा | ऽँ र खा ऽ | म्हो ऽ रा अ | म्हाऽ व र |
| नि.० नि.नि. | सा ०. म ० | गॅ. म गॅ रि | सा ० ०. ० |
| का ऽ रु स | ला ऽ पं ऽ | .ची.ऽ ग्याऽ | रा ऽ ऽ ऽ |

या पोवाड्यांत हें एक चरणाचेंच धृपद आहे व तें कडव्याच्या शेवटीं चालीला जोडून म्हणावयाचें आहे कडवें:—

| | | | |
|---|---|---|---|
| गॅ गॅ गॅ गॅ | गॅ गॅ गॅ ० | गॅ ० ०·० | गॅ ० गॅ ० |
| ब हु त दि | व स झा ऽ | ले ऽ ऽ ऽ | शा ऽ हू ऽ |
| गॅरिसारि० ० | ० ० ० ० | ० ० ० ० | ग ० री ऽ |
| ला ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ | जा ऽ वे ऽ |
| नि.नि. स स | सा ० ० ० | रिगॅरिगॅ० ० | ० ० ० ० |
| नि ज भ व | ना ऽ ऽ ऽ | ला ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ |
| सा ० ० ० | सा ० ० ० | | |
| जी ऽ ऽ ऽ | जी ऽ ऽ ऽ | | |

याप्रमाणें ३ चरण म्हटल्यानंतर चाल:—

| | | | |
|---|---|---|---|
| स स ० प | प ० प प | म ० ० म | ० म म म |
| मु लू ऽ ख | मा ऽ रु न | के ऽ ला च | ऽ कु चु रा |
| गॅ ० गॅ ० | गॅ ० गॅ रि | स स सारिगॅ | नि. ० ० ० |
| दु ऽ श्म न् | का ऽ पे ऽ | थ र थ ऽ | रा ऽ ऽ ऽ |

हा एकच चरण चालीचा व याला जोडून 'भाऊ सारखा' हा धृपदाचा मिळून हें कडवें पुरें झालें. याचप्रमाणें पुढचें प्रत्येक कडवें.

# खर्ड्याच्या लढाईचा सहावा पोवाडा.

## २६ वा.

## (शाहीर–बाळा लक्ष्मण)

ध.सा ० स  री ० रिगम  म ० म ०  म म म ०
मो ऽ ऽ ग  ला ऽ च्या ऽ  ये ऽ ती ऽ  ख ब रा ऽ
म म ० ध  प प म ग  गरिसरि ० ०  ० ० ० ०
शि पा ऽ इ  र ण शू ऽ  र ऽ ऽ ऽ  ऽ ऽ ऽ ऽ
० ० ० रि  ग ० ग ग  ग ० ० ०  गरिस ० ०
ऽ ऽ ऽ भ  ले ऽ झुं ज  णा ऽ ऽ ऽ  र ऽ ऽ ऽ
सरिग ० ०  ० ० ग ०  गरिस ० ०  सा ० ० ०
दा ऽ ऽ ऽ  ऽ ऽ जी ऽ  जी ऽ ऽ ऽ  जी ऽ ऽ ऽ

पुढील चरण याच तऱ्हेनें म्हणावयाचे. शेवटचा चरण एकेरी आहे तो पालुपदाचा असून कडव्याच्या शेवटीं म्हणावयाचा आहे.

स ० ० स  सा ० प प  प प ० प  प ० प ०
मो ऽ ऽ ग  ला ऽ व र  दि ल्या ऽ रे  ढा ऽ ला ऽ
म ० म ०  म ० म ०  गमप ० ० ०  री ० ० ०
पु ऽ ण्या ऽ  बा ऽ हे ऽ  र ऽ ऽ ऽ  ऽ ऽ ऽ ऽ
री ० ० ०  ० ० ० स  गॅ ० ० ०  स ० ० ०
दा ऽ ऽ ऽ  ऽ ऽ ऽ जी  जी ऽ ऽ ऽ  जी ऽ ऽ ऽ

असें हें पालुपद. येथें कडवें पुरें होतें (पुढील प्रत्येक कडवें वरीलप्रमाणें म्हणून शेवटीं पालुपदाचा चरणं म्हणावयाचा.).

# सवाई माधवरावाच्या मृत्यूचा पोवाडा.

३१ वा.

( शाहीर–प्रभाकर )

ध. ध. स स स ध. स रि रि ग ग ग रि ग रि स
क मि न व्ह ते ऽ पृ थि वी ऽ त अ वं ऽ त र
ध. ० ध. स स ध. स रि रि ग ऽ ऽ मगगारिसरि ०
आ ऽ णी ऽ न्या ऽ या ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
री ० ग ग ग ० ग रि ग रि सा ० स सा ० स
औ ऽ क्ष क से ऽ क मि झा ऽ ले ऽ स वा ऽ इ
सा ० रि रि ग ० ग रि रिगमगगरिसस ० ० ० ०
मा ० ध व रा ऽ या ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या धृपदाप्रमाणें कडव्याचे चरण चालीपर्यंत म्हणावयाचे. नंतर चाल:—

रि रिगम० म म ० पमगम रि ग ० रि नि.सारि सा ०
श के ऽ सो ळा ऽ शे ऽ श हा ऽ ण्ण वा ऽ च्या ऽ
रि ग ग रि स ध. स रि रि रिगमगरिग ० ० ० ०
मु ळ ज य सं ऽ व ऽ त्स री ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या चालीचे ३ चरण म्हटल्यानंतर पुन: चाल:—

प प रि ग ० रि स रि स ० रि ग रि स ० ध. त रि
आ ला ज ऽ ऽ न्म हा ऽ दै ऽ दी ऽ प्य मा ऽ न पू ऽ
रि गारिसस ० ० ० ०
त ळा ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

या चालीचे दोन चरण म्हणून पुनः मूळ धृपदाच्या चालींत.

म हो ऽ त्सा ऽ ह ध रो घ रीं ऽ ला ऽ ग ले ऽ
लो ऽ क क्र रा ऽ या ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
प र शु रा ऽ म प्र ऽ त्य ऽ क्ष आ ले ऽ का य
छ ऽ त्र ध रा ऽ या ऽ ला ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

हें दोन चरण म्हणून कडवें पुरें करावयाचें.

---

# पानपतचा पोवाडा.

## ९ वा.

## ( शाहीर-सगनभाऊ )

नी नी ऽ नी नी ऽ नी सां रीं ऽ गं गं ऽ गं गं रीं
स वा ० ई बा ० जी ० रा ० व पे ० श वे ०
रीं गं गं ऽ ऽ गं गं रीं गं ऽ रीं ऽ सां ऽ ऽ ऽ
पु ० ण्यवा ० न प्र धा न ० ० ० ० ० ० ०
सां ऽ सां सां ऽ सां सां ऽ सां ऽ रीं गं गं ऽ गं ऽ
ना ० ना भा ० ऊ गा ० दी ० व र शू ० र ०
रीं ऽ रीं गं रीं रीं गं गं रीं सां ऽ गं रीं सा ऽ ऽ
ज ० न्म ले जै से अ र जु ० ० न ० ० ० ०

चाल बदलून.

नि सां ऽ नी नी ध ध नी नी सां रीं गं रीं सां ऽ नी नी
ना मां ० कि त स र दा र थो ० र ० ० ० ना मे
सां ऽ सां ऽ ध ध नी नी रें ऽ सां ऽ ऽ
ऐ ० का ० त प शि ल जा ० र ० ०

चाल बदलून

सां सां सां
चा ळि स

रीं गं गं गं गं गं रीं रीं सां ऽ सां ऽ सां ऽ रीं ऽ
ह जा र प ठा ण नि त्य ते ० थे ० च ० म ०
गं गं रीं सां ऽ ऽ सां सां सां सां ऽ ऽ सां ऽ रीं ऽ
क ती ० ० ० ० अ शि ज मा ० ० बं ० दी ०
रीं गं रीं ऽ ऽ सां सां सां सां ऽ सां ऽ सां सां रीं सां
क रू ० ० ० न भा ऊ ना ० ना ० त ळ वा र
रीं गं रीं सां रीं रीं सां सां सां ऽ सां सां सां सां रीं सां
घ रू ० न गे ले गि ल च्या ० व र च ढा ई ०
रीं गं रीं ऽ ऽ ऽ ऽ सां
क रू ० ० ० ० ० न

---

## बदामीचा पोवाडा.

### १७ वा.

### ( शाहीर–राघू )

सां ऽ सां नि सां ऽ सां ऽ सां ऽ सां सां ऽ सां सां ऽ
जा ० ठ शि पा ० ई ० था ० ट रो ० हि ले ०
सां ऽ सां नी सां ऽ सां ऽ सां ऽ सां सां ऽ सां सां ऽ
जा ० ठ शि पा ० ई ० था ० ट रो ० हि ले ०
सां ऽ सां सां ऽ रीं गं ऽ गं गं रीं सां ऽ सां सां ऽ
जा ० ठ गां ० ठ न ० प ड लि है ० द रा ०

# स्वरलेखन चिन्हें.

मंद्र सप्तकाचे स्वर – म. प. ध. नि. इ.

तार ,, ,, – सं रिं गं मं इ.

मध्य ,, ,, – साधीं स्वराक्षरें स रि ग म इ.

एक मात्रा चिन्ह – ० किंवा ऽ ( तो स्वर लांबविणें. )

सर्व पोवाडे धुमाळी ( किंवा केरवा ) तालांत आहेत. हार्मोनियम-वरील कोणतीही पट्टी ( आवाजाप्रमाणें ) 'सा' धरून स्वरलेखना-वरून पोवाड्याची चाल सहज बसवितां येईल.